टेलीफोन नंबर २११५ ] गुणकारी फार्मसी. [ टेलिग्राफिक आड्रेस "गुणकारी" मुंबई.

कै. डॉ. अण्णा मोरेश्वर कुं... डी. शोधित आनुभविक औषधें

हीं औषधें त्यांनीं आपले ... वर्षांचे प्रॅक्टिसमध्यें फार परिश्रम घेऊन अनुभवसिद्ध गुणकारी ... होतीं व त्याप्रमाणें लाखों लोकांना रामबाण गुणही आलेला ... ह्या औषधांचा सर्व गरिबांपासून श्रीमंतांस सारखा फायदा घेतां ... त्यांचें नांव अजरामर रहावें ह्मणून किंमत फारच स्वल्प ह्मणजे ... दिवस पुरणारे प्रत्येक औषधास फक्त १ रुपया ठेवली आहे. ... औषधांचा टपाल खर्च निराळा.

**(१) आंकडी, अपस्मार, ...** (कन्व्हल्शनस्) इ. विकारांवरः— तोंड वेडेंवांकडें करणें, श्वासोच्छ्... जोरानें चालणें, हातपाय पिळवटणें, ओठ थरथरावणें, तोंडास फेस येणें ... ाच्या मुठी वळणें, एकसारखें अगर राहून झटके येणें, हातपाय हाल... णें, वगैरे विकारांवर रामबाण.

**(२) विषमज्वरांकुश—(An...larial) गोळ्याः**—थंडी वाजून रोज अथवा १,२,३,४ अगर ७ ...आड ताप येणें; हाडीज्वर संध्याकाळीं थंडी वाजून ताप येणें, व... विकारांवर वस्ताद.

**(३) अर्शकुठार (** मुळव्याधीव... **चूर्णः**—ओली, कोरडी, कंडूयुक्त कडा धरलेली, रक्ती किंवा बिन... मूळव्याध, मोडाची किंवा बिन-मोडाची वगैरे विकारांवर वस्ताद.

**(४) मुळव्याधीचे मोडावर म...** —मुळव्याधीचे मोडावर फार उपयोगी पडतें. हें लावल्यानें मोडास निर्जीव ... न त्यापासून होणारी आग व कंडू तात्काळ शमविते. एकदोन वेळां ला... ानें मोड आपोआप गळून पडतात.

**(५) कॉलरा आमातिसार ...हणीवर बिंदुः**—कोणत्याही कारणामुळें पोटांत दुखून किंवा न दुखू... जुलाब होणें; पोटशूळ, अपचन, कॉलरा, तांबडी पांढरी आव, संग्रहणी वगैरेवर वस्ताद.

**(६) आर्तवदोष व शूलपरिहारी ...ळ्याः**—स्त्रियांच्या आर्तवदोषामुळें उत्पन्न झालेल्या विकारांवर, मासिक रज... ...नापूर्वी असह्य अशा पोटदुखीवर, दाहविकार, ओटीपोटांत दुखणें, या ... विकारांवर वस्ताद. किं. १ रु.

**कृष्णाजी अण्णा कुंटे.**

मोठमोठ्या शहरीं एजंट पाहिजेत. } पत्ताः— ...श्रम, गिरगांव ब्याकरोड.

अरसिकेष्वितिहासनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख !!!

सरसवाङ्मयरत्नमालेचें २० वें रत्न.

# श्रीसमर्थ राष्ट्रगुरु.

( ऐतिहासिक चरित्र. )

लेखक

रा. रा. लक्ष्मण नारायण जोशी,

पाटीलबोवा अर्थात् महादजी शिंदे, डाकिनीविलास, भाऊसाहेब पेशवे अथवा उद्गीरचा प्रतापी वीर, कुंदमाला, श्रीरामदास, ही सारी भाऊबंदकी, कपटप्रभाव, दामाजी, शिवाजीचा उजवा हात, सोमदत्त, सार्थ अध्यात्मरामायण, कपिलगीता, वगैरे वगैरे पुस्तकांचे कर्ते व माजी 'गुराखी' वर्तमान पत्राचे संपादक.

——:o:——

प्रकाशक

तात्या नेमिनाथ पांगळ,

प्रोप्रायटर–सरसवाङ्मयप्रसारक मंडळी, गिरगांव–मुंबई.

डॉ० भालचंद्र यांच्या बंगल्यासमोर, रा. [illegible] यांचा दगडी बंगला, चर्नीरोड.

——:o:——

मुद्रक—रा. रा. दत्तात्रय गणेश खांडेकर,

मालक—'लॉ प्रिंटिंग प्रेस,' ४४१ शनवार पेठ, पुणें.



इ. स. १९१८. } शा. श. १८४०. }  किंमत २८४.  { वर्ष चवथें. { एप्रिलचा अंक.

ॐ नमः सिद्धेभ्यः ।

# प्रकाशकाचे दोन शब्द.

आगाऊ जाहीर केल्याप्रमाणें प्रस्तुत आम्ही **सरस वाङ्मय-मालेचें** २० वें रत्न प्रसिद्ध करीत आहोंत. मराठेशाही नष्ट होऊन ०० वर्षे लोटलीं, या गोष्टीचे संस्मरणार्थ गेल्या खेपेस आम्हीं " अस्तांतील निखारा व पेशवाईचा अंत " हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं; तर आज आपल्या भारतखंडास **मॉंटेग्यु-चेम्सफर्ड** सुधारणेच्या रूपानें '**स्वराज्याचा ओनामा**' शिकण्याचा प्रसंग आला असल्यामुळें अशा वेळीं या रामदासानें महाराष्ट्रास स्वराज्याचा ओनामा शिकवून शिवाजी-कडून मराठेशाही संस्थापिली त्या महात्म्याच्या उदात्त चरित्रानें सजलेली **श्रीसमर्थ राष्ट्रगुरु** नामक ऐतिहासिक व पूर्वकालीन स्वराज्याच्या स्थापनेची स्मृति करून देणारी उत्कृष्ट कादंबरी सादर करीत आहोंत. या कादंबरीसंबंधानें खुद्द लेखकानें प्रस्तावनेंत दोन शब्द लिहिले असल्यामुळें त्याबद्दल विशेष लिहिण्याचें जरी प्रयोजन नाहीं, तरी प्रस्तुत कादंबरीस ऐतिहासिक सत्यता, धर्मतत्त्वज्ञान यांची जोड दिली असल्यामुळें कित्येक प्रकरणें वाचतांना, आपण एखादा धर्मग्रंथ वाचतों कीं काय, असाहि भास होऊन मनास आनंद होतो. तर शिवाजीच्या चरित्रांतील उदात्त प्रसंग वाचतांना कैक वेळां हृदय उचंबळून येऊन आनंदाश्रु येतात. सारांश, ग्रंथकार रा. बाळासाहेब जोशी यांनीं आमचे विनंतीस मान देऊन अति परिश्रम घेऊन हा ग्रंथ उत्कृष्ट रीतीनें आम्हांस लिहून दिला, याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. पुढील खेपेस " सौभाग्य-तिलक किंवा अमृतशोध" या उत्कृष्ट कादंबऱ्यांपैकीं एक कादंबरी आक्टोबर-मध्यें प्रसिद्ध करण्यांत येईल. पुढील सूचनात्मक विनंतीकडे लक्ष देऊन सवलतीचा फायदा घेण्याविषयीं विनंति आहे. मागील १९ व्या रत्नाचे वेळीं ज्या गृहस्थांनीं नूतन आश्रयदाते मिळवून देऊन आम्हांस सहाय केलें त्यांचे आम्ही आभारी आहोंत. याहि खेपेस शक्य तों आणखीहि नूतन ग्राहक जमवून देऊन सहाय करण्याविषयीं त्यांना विनंति आहे.

## आश्रयदात्यांचे आभार व त्यांना अगत्याची विनंति.

चौदाव्या रत्नाच्या वेळीं आमच्या आश्रयदात्यांना विनंति करून " विशेष सवलतीचा " फायदा घेण्यास सुचविल्याप्रमाणें २-३ शें आश्रयदात्यांनीं आमच्या विनंतीचा आदर करून १५ व्या रत्नापासून [illegible] 'महा रुपये'

रक्कम भरून आम्हांस साह्यता दिली, हा त्यांचा ग्रंथमालेवर मोठा उपकार आहे, आणि त्याबद्दल आम्ही त्यांना आजवर "तीन आण्यांच्या" व्ही. पी. खर्चानें पुस्तकें पाठवून व या खेपेचें हें (६ वें पुस्तक) २० वें रत्न त्यांच्या पदरांत टाकून, कबूल केलेल्या वचनांतून बिनतकार मोकळे होत आहोंत.

आम्ही आगाऊ रक्कम घेऊन आश्रयदात्यांच्या पदरांत "**गुर्जरवीर अनहील, साठ वर्षांपूर्वी** ऊर्फ १८१७ **चें बंड, गांधींचा बंदीवास, सैतानी चक्कर, व्रतपालन, अस्तनींतील निखारा आणि पेशवाईचा अंत व राष्ट्रगुरु समर्थ** प्रभृति पुस्तकांचा जो बदला टाकला तो किती उत्कृष्ट व वाजवी टाकला आहे हें त्या त्या रत्नांची केसरी, ज्ञानप्रकाश, इंदुप्रकाश, विविधज्ञानविस्तार प्रभृति सन्मान्य वर्तमानपत्रांनीं केलेल्या प्रशंसेवरून व आश्रयदात्यांना तीं आवडलीं यावरून व्यक्त होत असल्यामुळें त्यासंबंधानें विशेष लिहिण्याचें प्रयोजनच नाहीं. सारांश, बऱ्याच आश्रयदात्यांनीं या सवलतीचा फायदा घेतला व इतर आश्रयदात्यांनीं आपला आश्रय सतत कायम ठेवून या ग्रंथमालेच्या प्रकाशनास साह्यता दिली याबद्दल आम्ही त्या सर्वांचे फार फार आभार मानतों.

१४ व्या रत्नाच्या वेळीं असें आम्हांस वाटलें होतें, कीं, २० वें रत्न प्रसिद्ध होण्यापूर्वीं हें महायुद्ध संपून पूर्ववत् स्वस्ताई होईल; पण तसें न घडतां आणखी वर्षभर तरी महायुद्ध थांबत नाहीं, असें मोठमोठ्या मुत्सद्यांनीं भाकित केलें असल्यामुळें प्रकाशनकार्य उत्तरोत्तर फार बिकट व महाग होत चाललें आहे म्हणून आजच्या महागलेल्या कागदाचा व शाई, छपाई, बांधणी वगैरे गोष्टींचा विचार करून आगाऊ रकमेंत किंचित वाढ करून पुढीलप्रमाणें सवलत देत आहोंत तरी **पुढें उल्लेखिल्याप्रमाणें** विशेष **सवलतीचा** फायदा **घेऊन या ग्रंथमालेस** आगाऊ **साह्यता करावी म्हणून आम्ही आश्रयदात्यांना विनंति करीत आहोंत.** कागदाचे भाव वरचेवर वाढत आहेत व नुकसानीशिवाय धंदा करणें मोठ्या मुष्कीलीचें झालें आहे. व्यवसाय तूर्त थांबवावा म्हटलें तर बसलेली घडी पुन: विसकटेल, या भीतीनें तसें करणें नाइलाजाचें झालें आहे व म्हणून देवावर भार ठेवून अशा बिकट प्रसंगाशीं धैर्यानें टक्कर मारण्याचाच आमचा कृतनिश्चय असून त्या कामीं आमचे उदार आश्रयदाते आम्हांस पुन: पूर्ण साह्यता देतील, असा आम्हांस भरंवसा वाटत आहे. आज

करमणूक वगैरे पत्रें महागाईमुळें बंद पडलीं आहेत, केसरीचे दरहि वाढले आहेत, तसेंच ज्या इंग्रजी कादंबऱ्या पूर्वी ।- ।= ला विकत होत्या त्याच आज १रु.ला मिळताहेत. इतक्या त्या महागल्या आहेत; पण आमच्या मराठी पुस्तकांच्या किंमती त्या मानानें मुळींच वाढल्या नाहींत. याचें कारण किंमती वाढल्या तर ग्राहक तुटेल ही प्रकाशकास भीति असून मोठ्या मिनतवारीनें चार दोन आणे किंमत वाढवून तो बिचारा नुकसानींतच आपला मार्ग कंठीत आहे. अशा वेळीं आश्रयदात्यांचा भरपूर पाठिंबा असणें हें प्रकाशकास प्रोत्साहनपर आहे; आणि म्हणून सध्यांचे महागाईचे वेळीं आमचे उदार आश्रयदाते महागलेल्या कागदाचा व छपाईचा विचार करून दिल्या जाणाऱ्या सवलतीचा फायदा घेऊन आगाऊ रकमा देऊन आम्हांस सहाय करतील अशी उमेद बाळगतों

विशेष सवलतीबद्दल विनंति येणेंप्रमाणें:—आमच्या आश्रयदात्यांकडून पुढील सहा पुस्तकांबद्दल ( म्हणजे २१ व्या रत्नांपासून तें २६ वे रत्नापावेतों ) आम्हांस एक वर्षाचे आगाऊ रुपये **पावणे सात** द्यावेत; व पुढें प्रत्येक रत्न ८३ व्ही. पी. चे ऐवजीं " **चार आणे व्ही. पी. नें** " स्वीकारावें. **कापडी प्रतीस** मात्र आतां यापुढें चार आण्याचे ऐवजीं " **सहा आणे** " पडतील; तर ज्या कोणास तें हवें किंवा नको असेल तें त्यांनीं जरूर कळवावें ही विनंति आहे.

याप्रमाणें सवलत देण्याचें आम्हीं ठरविलें असून १४ ते २० रत्नांपावेतों सवलतीचा फायदा आश्रयदात्यांनीं यापूर्वीच घेतला आहे, त्यांना याहि सवलतीचा फायदा घेणारे समजून पुढील २१ वें रत्न आगाऊ ६ पुस्तकांबद्दल किं. ६॥। + ।・ ट ह. मिळून **सात रुपयांच्या** व्ही. पी नें साध्या कागदी बांधणीचें पाठविलें जाईल; व कापडी प्रत घेणाराला २१ वें पुस्तक आगाऊ रक्कम ६॥। + ।= कापडी बांधणीबद्दल व ट. ह. ।・ मिळून रु. ७।= स पाठविलें जाईल. व कापडी प्रत घेणारांना २२ वे पुस्तकापासून २६ वे पुस्तकांपावेतों प्रत्येक प्रत दहा आण्यांस व्ही. पी. नें पाठवूं.

या सवलतीचा ज्यांना फायदा घ्यावयाचा असेल किंवा नसेल त्यांनीं ता. ३० सप्टेंबर अखेरपर्यंत काय तें कळवावें. कारण ही सवलत या बिकट प्रसंगीं आम्हांस सहाय देणाऱ्या उदार आश्रयदात्यांनाच देत

आहों; तरी आमचे उदार आश्रयदाते प्रस्तुत महर्घतेच्या परिस्थितीचा पूर्ण विचार करून व आमच्या नम्र विनंतीकडे लक्ष देऊन सहाय करतील अशी आम्ही आशा बाळगतों.

पण ज्यांना खरोखरच हें शक्य नसेल त्यांनीं असाच आपला आश्रय चालूं ठेऊन निदान एकेक तरी ' नवीन ग्राहक ' जमवून देऊन या ग्रंथमालेस साह्य करावें अशी आमची विनंति आहे. गेल्या १९ व्या रत्नाचे वेळीं केलेल्या विनंतीस मान देऊन बऱ्याच ग्राहकांनीं कायमचे नूतन ग्राहक मिळवून देऊन साह्य केलें, याबद्दल आम्ही त्या त्या हितचिंतकांचे आभारी आहोंत. पूर्वीच्या पाठविलेल्या कार्डावर ( १९ व्याचें नांव खोडून त्या जागीं चालूं २० व्याचें नांव घालून ) याहि खेपेस नवीन ग्राहक जमवून पाठविण्याबद्दल विनंति आहे. लेबलांवर ग्राहकांचे **रजिस्टर नंबर** लिहिलेले असतात, ते पत्रव्यवहार करतांना कळविण्याविषयीं अवश्यमेव विनंति आहे.

ज्या नव्या ग्राहकांना या " **विशेष सवलतीचा** " फायदा घ्यावयाचा असेल त्यांनीं आपला र. नं. कळवून " तसें " जरूर कळवावें. व ज्या पूर्वीच्या ग्राहकांना या "**विशेष सवलतीचा**" फायदा '**नको**' असेल त्यांनीं उत्तरीं जरूर तसें कळवावें. म्हणजे ट. ह. व्यर्थ जाणार नाहीं. तरी या सूचनेकडे अवश्य लक्ष देणेविषयीं अगत्याची विनंति आहे.

ताजमहाल, गृहलक्ष्मी—प्रेमळसवत सुप्रसिद्ध ग्रंथलेखिका **सौ. जानकींबाई देसाई** यांच्या हृदयंगम लेखणींतून उतरलेलें " **सौभाग्यतिलक** " नामक २१ वें रत्न १ आक्टोबर १५ चे सुमारास प्रसिद्ध होईल. स्त्रियांचा आत्मा जो तिचा पति देव**सौभाग्यतिलक**, त्याच्या सुखाकरितां एका साध्वीनें किती अनंत यातना सोसल्या, त्याचें अतीव हृदयद्रावक कथानक यांत चित्रित केलें आहे. हें पुस्तक किंवा तें वेळेवर पूर्ण छापून न संपल्यास त्याऐवजीं **रत्नकंकणकर्त्यानें** लिहिलेला " अमृत शोध " नामक अतीव मनोरम कादंबरी प्रसिद्ध केली जाईल. मागील पुस्तकें संपत आलीं आहेत. तरी नवीन ग्राहकांनीं तीं मागविण्यास विसरूं नये. कारण एकदां आवृत्ति संपल्यावर पुनः ती छापली जाणें तूर्त मुष्किलीचें आहे. शिवाय इ. स. १९१९ पासून मागील कांहीं पुस्तकांच्या निम्मा किंमतींतही वाढ केली जाणार आहे. तरी नवीन ग्राहकांनीं त्वरा करावी ही विनंति आहे.

या खेपेस रा. रा. दत्तोपंत खांडेकर यांनीं चागल्या रीतीनें आम्हांस हें पुस्तक लौकर छापून दिल्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत.

पान ३५ वर चाथ्या प्रकरणासच प्रकरण तिसरें असें पुनः नजरचुकीनें छापलें गेल्यामुळें शेवटच्या प्रकरणाला प्रकरण विसावें व एकविसावें असें म्हटलें आहे. याशिवाय आणखी कांहीं अंतर्गत मजकुरांत नजरदोषानें चमत्कारिकच चुका राहून गेलेल्या आहेत. त्या सर्वांबद्दल क्षमा असावी. नवीन ग्राहक जमवून देऊन मालेस साह्य करीत जावें अशी सर्वांस नम्र विनंति आहे.

गिरगांव–मुंबई ता. २०।८।१८. } आपल्या सर्वांचा नम्र, तात्या नेमिनाथ पांगळ.

---

## SHREE SAMARTHA RAMDAS

**has been depicted by**

### The late Justice Mr. M. G. Ranade in his "Rise of the Maratha Power" in the following words :—

By the influence of Ramdas and Tukaram the national sentiment was kept up at a higher level of spirituality and devotion to public affairs than it would otherwise have attained. In token of the work of liberation being carried on, not for personal aggrandisement but for higher purposes of service to God and man, the national standard received at the suggestion of Ramdas its favourite orange colour, which was and is the colour of the clothes worn by anchorites and devotees. The old forms of salutation were dispensed with as implying submission to the foreigner, and a new form was substituted, which only recited the name of Ramadasa's deity. Under the same influence the names of Shivajee's principal officers were changed from their Manomedan designations to Sanskrit equivalents, and the forms of correspondence also were similarly improved. Shivaji from a sense of gratitude to his spiritual teacher made a gift of his kingdom, and Ramdas gave it back to him as a trust to be managed in the public interest.

# प्रस्तावना.

There comes a voice that awakes my soul.
It is the voice of years that are gone;
They roll before me with their deeds.

*Ossain.*

धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥—गीता

कृतेतु मारुताख्याश्च त्रेतायां पवनात्मजः ।
द्वापारे भीमसंज्ञश्च रामदास कलौ युगे ॥—भविष्यपुराण.

श्रीरामदास अर्जुन, वन्हि शिवाजीच यवन खांडव तें ॥
दग्धचि करिते झाले जेंवि प्रलयांत रुद्रतांडव तें ॥
स्वर्वेल्लिसुरभिसरिदधित्काश्रित सर्व कामदासाची ॥
श्रीरामाची जैशी सत्कीर्ति तशीच रामदासाची ॥—मोरोपंत.

एका रामोपासक कवीनें आपल्या ग्रंथाच्या आरंभीं असें म्हटलें आहे कीं, ‘ मी ही जी रामकथा गातों, ती श्रीरामचंद्राचें यश वाढविण्याकरितां गातों, असें मुळींच नाहीं; कां कीं, अपरंपार रामचंद्रयश कोणीकडे आणि माझी अल्पवाणी कोणीकडे, हें मला ठाऊक आहे. मी हें जें श्रीरामाचें यश गातों, तें स्वहिताकरितां म्हणजे वाणी आणि मन हीं पवित्र करण्याकरितां गातों ! ’ थोर पुरुषांच्या चरित्राविषयीं आम्ही तेंच म्हणतों. थोर पुरुष असतात त्यांची दिगंत कीर्ति गाजत असते. तिला आमच्या लेखांनीं किंवा शब्दांनीं तिळमात्रही भर पडण्याची अपेक्षा नसते आणि आम्हांला तिजविषयीं आशाही नसते. अशी जरी गोष्ट आहे, तरी थोरांचीं चरित्रें लिहिणें हें एक प्रकारें त्यांच्याशीं समागम करणेंच आहे. त्यांचे आचारविचार, त्यांचीं मतें, त्यांचे अभिप्राय, त्यांच्या कृति, त्यांची उद्योगशीलता, त्यांची सरलता, त्यांची सद्बुद्धि, त्यांची सत्यनिष्ठा, त्यांचं धैर्य, त्यांची निर्लोभता इत्यादि त्यांच्यासंबंधाच्या गोष्टींचें वर्णन करीत असतां, आणि त्यांविषयीं विचार करीत असतां, मन अगदीं तद्रूप होऊन जातें. एके पक्षीं त्यांशीं–मग तें कितीही का अल्प असेना–

खंडींत पाव रती असेना—तादात्म्य पावते. ह्या दुर्मिळ आणि अप्रतिम लाभाच्या आशेनें आम्ही त्यांचीं चरित्रें वाचतों आणि लिहितों. या लाभापुढें दुसऱ्या कोणच्याही लाभाची मातबरी नाहीं. म्हणजे हा खरा सत्संग आहे. याची बरोबरी दुसऱ्या कशानेंही करवत नाहीं.

सत्संग अति श्रेष्ठ श्रेयस्कर म्हणुनि सुज्ञ या गाती ।
यातें भजतां सिद्धिप्राप्ति असे जी न यज्ञयागा ती ॥ १ ॥
लीलेनें देतों जें सत्संग नता न दे पद पिता तें ।
जरि राज्य दिलें केलें न च पुत्राचें बरें तदपि तातें ॥ २ ॥
सत्संगति करिताहे लीलालेशें करूनि जेंवि हित ।
न तसें माता जाणे संसारामाजि मात्र जें विहित ॥ ३ ॥
जी हरिहरप्रसादीं कल्याणें वसति साधुसंगीं तीं ॥
अघ शमतें सुख गमतें मन रमतें जेंवि संगीतीं ॥ ४ ॥
स्पर्शमणि सुवर्ण करी दे स्पर्शमणित्व तो न लोहातें ।
हा साधुसंग करितो साधु असाधूसि हरुनि मोहातें ॥५॥—**मोरोपंत.**

असो; तर मग चरित्रें लिहिण्याचा आणि वाचण्याचा हेतु हा असावा कीं, त्यापासून आपलें म्हणजे—आपल्या लोकांचें आणि राष्ट्राचें—कांहीं तरी हित—खरें हित—साधावें. खरें हित काय तें सद्विचारांत असतें. सद्विचार सत्पुरुषांच्या चरित्रांवरून सुचतात. म्हणूनच सच्चरितांचें लेखन आणि अवलोकन हें एक फार उत्तम हित साधन मानिलेलें आहे आणि म्हणूनच आम्ही त्याला अनुसरलों आहों.

राष्ट्रामध्यें राजा आणि प्रजा असे मुख्य दोनच खरे पक्ष असतात; त्यांचें हिताहित एकमेकांच्या हिताहितांत गुंतलेलें असतें. खरें आणि सर्व हित काय तें—स्वातंत्र्य आणि संपत्ति—यांच्या संग्रहावर अवलंबून असतें. या दोन्ही वस्तू राष्ट्रांत समाईक असतात. म्हणजे त्यांजवर राजा आणि प्रजा या उभयतांची सत्ता असते. तेणेंकरून त्या आपणांला अधिकाधिक मिळाव्या म्हणून उभयतांचे भगीरथ प्रयत्न चाललेले असतात. हे दोन पक्ष म्हणजे कांहीं सामान्य नव्हेत. समरांगणांत गुरु द्रोणाचार्य आणि शिष्य अर्जुन हे कसे दिसले, ह्याचें वर्णन श्रीधरांनीं केलें आहे.

एक वसिष्ठ एक वामदेव एक प्रेम एक सद्भाव ॥
एक सद्विवेक एक गौरव तैसे दोघे दीसती ॥ १ ॥
एक चंद्र एक चंद्रकिरण एक रमापति एक उमारमण ।
एक बृहस्पति एक पाकशासन तैसे दोघे दीसती ॥ २ ॥
एक तपस्वी एक उदास एक औदार्य एक धैर्य विशेष ।
एक पुण्य एक यश तैसे दोघे दीसती ॥ ३ ॥
एक ज्ञान एक विज्ञान एक आनंद एक समाधान ।
एक सगुण एक निर्गुण तैसे दोघे दीसती ॥ ४ ॥
एक साधक एक सिद्ध एक वैराग्य एक बोध ॥
एक क्षमा एक ब्रह्मानंद तैसे दोघे दीसती ॥ ५ ॥

राष्ट्रामध्यें असे हे दोन पक्ष मोठे जाज्वल्य असतात. त्यांच्या सत्तेच्या मर्यादा जरी राजनीतींत ठरलेल्या असतात, तरी व्यवहारांत त्या अचल राहात नाहींत; त्यांचा मर्यादाभंग होतो व तो बहुधा प्रबल पक्षाकडूनच होतो. त्या पक्षाला तो यथार्थ वाटत असतो, आणि दुर्बल पक्षाला तो अन्यायाचा–अ-शास्त्र–वाटत असतो. प्रबल पक्ष म्हणजे ' बळी तो कान पिळी ' किंवा ' हम् करे सो कायदा ' असे असल्यामुळें, दुर्बळ पक्षाला त्याचे परिणाम भोगावे लागतात. अशा दोन्ही पक्षांना उत्तमसा, खरा व हिताचा मार्ग दाखवून संतुष्ट ठेवणें हें कर्म मोठें–परम–दुष्कर आहे. सिंह आणि वाघ यांची मैत्री करून त्यांना एका ठिकाणी संतुष्ट ठेवणें हें एकवेळ माणसाला कदाचित् सुकर होईल; परंतु सबळ आणि दुर्बळ अथवा राजा आणि प्रजा यांच्या मधील तंटयांत तसें कांहीं चालायचें नाहीं. कारण, त्या उभयतांची दृष्टि एकसारखी कुशाग्रवत् असते; म्हणून त्यांच्यात ऐक्य उत्पन्न करण्याचा मनोभावें प्रयत्न करणें हें व्रत दुधारी खांडयाप्रमाणें तीव्र आहे. तें अगदीं नीट चाललें पाहिजे; त्यांत तिळमात्र जरी अंतर पडलें तरी तें विकोपास आणि नाशास कारण होतें. असें हें खडतर असिधाराव्रत उत्तम रीतीनें साधून यशस्वी होणाऱ्या समर्थ विभूति पृथ्वीच्या पाठीवर फारच थोडया उत्पन्न होतात. एकाच चंद्रानें जशी सर्व आकाशाला शोभा येऊन तिमिरनाश होतो, तद्वतच अशा प्रकारच्या माण-सांची वृत्ति त्यांच्या सगळ्या राष्ट्राला अत्यंत लाभदायक आणि अत्यंत भूष-

णावह होते. कोकिळाला मधुर स्वर प्राप्त होण्याला, वृक्षांना नवी पालवी फुटण्याला वसंत काळ आवश्यक आहे, अथवा समुद्रोदरीं मौक्तिकें उत्पन्न होण्याला स्थलविशेष आवश्यक आहे, त्याच न्यायानें, राज्यकार्यधुरंधर थोर असे राष्ट्रपुरुष पैदा होण्यास आणि प्रकाशमान होण्यास स्वराज्यच आवश्यक आहे यांत संदेह नाहीं. त्यांचे पराक्रम फार मोठे असतात आणि त्यांची बुद्धि अचाट असते. ह्या आमच्या भरतभूमधील स्वराज्यें नष्ट–लुप्तप्राय होऊन धर्माला, परकीय सत्तेचें वळण लागल्यामुळें सर्वत्र भ्रष्टाकार होऊन, स्वकुलाभिमान आणि स्वत्व नष्ट होत चालल्याकारणानेंच असे पराक्रम करण्याला आणि अशी बुद्धीची सर्वोत्तमता दाखविण्याला जागा उरली नसल्यामुळेंच, कर्मवीर उत्पन्न होऊन त्यांनीं कर्मयोगाचें मूर्त स्वरूप–अनेक दगदगी सोसून–सर्व जगाला जें दाखविलें, त्याचें चित्र–अस्पष्ट कां होईना–प्रकृत पुस्तकांत दाखविलें आहे.

श्रीसमर्थ **रामदास**स्वामी आणि छत्रपति **शिवाजी**महाराज यांनीं स्वतःच्या अतर्क्य बुद्धिबलावर लोकसंग्रह करून सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत मराठ्यांच्या साम्राज्याची जा प्राणप्रतिष्ठा केली त्या दोघां कर्मवीरांचे पराक्रम पाहून, त्यांच्या पराक्रमांचें मोल ज्यांना कळतें त्यांनां त्यांचीं नांवें आपल्या राष्ट्राच्या इतिहासांत जडावाच्या अक्षरांनीं ल्याहावीं असें वारंवार वाटल्यास त्यांत आश्चर्य तें कसलें !

ज्यांचें वर्तन अत्यंत पवित्र आणि निर्मळ असतें त्याच्या योगानें त्यांची योग्यता वाढून ते मानमान्यतेला पात्र होतात आणि त्यांच्या हातून राष्ट्राची मोठमोठीं कार्यें घडतात. अशा थोर विभूतींसंबंधानें **वामनपंडितांनीं** म्हटलें आहे—

वाञ्छा सज्जनसंगमीं गुरुकुळीं वंदारुता नम्रता
निंदेचें भय तुष्टता परगुणीं स्वस्त्रीसुखीं लुब्धता
विद्याभ्यासमहेशभक्ति खलसंसर्गीं अनासक्तता
चित्ताचा जय या गुणांस निधि जे त्यां वंदिजे तत्वतां १
हिंसात्याग अलोभता परधनीं सत्यत्व संभाषणीं
तृष्णाच्छेद परांगनाविमुखता भूतानुकंपा मनीं
दान प्रश्रयभाव सद्गुरुकुळीं सन्मार्ग सर्वांस हा
संसाराब्धि तरावया स्मृतिशतीं कीं बोलिजेला पहा. २

त्यांत ज्या गुणांचें वर्णन केलें आहे, ते गुण वरील जोडीच्या अंगीं उत्तम प्रकारें वसत होते म्हणूनच त्यांनां महत्पदाचा लाभ होऊन ते वंदनीय झाले.

व्यक्तींना काय किंवा राष्ट्राला काय, उन्नतावस्था प्राप्त करून घ्यायला सर्व साधनांमध्यें उत्तम साधन म्हटलें म्हणजे सद्गुणसंपादन-सदाचरण-हें आहे. हेंच सगळ्या इतिहासाचें आणि त्यांतील सच्चरित्रांचें मुख्य तात्पर्यसार आहे. म्हणून, आम्ही परमेश्वराची अशी प्रार्थना करितों कीं, आमचीं सद्यःकालीन अवशिष्ट राज्यें म्हणजे—कदाचित् भावी देशस्वातंत्र्याचीं बीजें—त्यांचें संरक्षण त्यांच्या प्रभूंनीं कसें करावें, त्यांच्या साह्यकर्त्यांनीं कसें वागावें, जनांची बुद्धि त्यांच्या संबंधानें कशी असावी, राजनीति आणि धर्मनीति यांमध्यें भेद काय, परिस्थिति आणि वस्तुस्थिति या कशा आहेत व त्यांचें अवलंबन करण्याचे वेगवेगळे प्रसंग कोणते इत्यादि विषयांचें परिज्ञान, त्या त्या संबंधाच्या मंडळीस होऊन, सामान्यत्वें सर्व जनांच्या अंतःकरणांत स्वदेशाभिमान, स्वधर्मभक्ति, सत्पुरुषानुकरणासक्ति आणि स्वदेश व स्वराज्य यांबद्दलची साधनोत्सुकता, या गुणांची प्रेरणा या चरित्राच्या अवलोकनानें व्हावी तिचा यथायोग्य य त्यांस करितां यावी आणि तिचें उत्तम सार्थक्य यथाकालीं व्हावें, ही आमची प्रार्थना तो जगदात्मा पूर्ण आणि सफळ करो.

राजापासून रंकापर्यंत मनुष्यें म्हटलीं म्हणजे सगळीं सारखीं असतात. त्यांच्या देहव्यवहारांत कांहीं अंतर नसतें. प्रथमारंभीं यासंबंधानें त्यांच्यांत कांहीं एक भेद नसतो; परंतु पुढें श्रेष्ठत्वाचा किंवा अनिष्टत्वाचा जो कांहीं भेद पडतो, तो त्यांच्या बुद्धीवरून आणि करणीवरून पडतो. तो किती पडतो हें दाखविण्याकरितां कबिरांनीं म्हटलें आहे—

पशूकी होत पन्हय्या, नरका कछु नहिं होत
जब् नर करणी करे तो नरका नारायण होत.

याचीं उदाहरणें इतिहासांत आढळतात; पण तीं फार थोडीं असतात. त्यांतलेंच उदाहरण **श्री समर्थ रामदासस्वामी** आणि छत्रपति **शिवाजी** महाराज या दुकलीचें आहे. जे विद्वज्जन इतिहासशास्त्रांत अगदीं मग्न झालेले असतात, त्यांस आनंद होण्यास अनेक प्रकारच्या गोष्टी कारणीभूत होत अस-

तात. त्या सर्वांत अत्यंत सुखप्रद गोष्ट म्हटली म्हणजे थोर राष्ट्रपुरुषांच्या उन्नतीची कथा होय. अशीच कथा प्रकृत पुस्तकांत गोंविलेली आहे.

नदीचा प्रवाह शांतपणें चालत असावा, त्यांतल्या जलचरांनीं स्वस्थपणें क्रीडा करीत हिंडावें आणि तें सगळें पाहून प्रेक्षकांनां संतोष होत असावा. असें चाललें असतां, अकस्मात् मध्येंच एखादा खळगा पडावा व त्यायोगें भोंवरा उत्पन्न होऊन पाणी खवळून जावें आणि त्याच्या योगानें जलचरांस अतिशय पीडा व्हावी हें दृष्टीस पडणें फार खेदास्पद वाटतें. म्हणून तसें कधीं घडूं नये अशी माणसाची इच्छा असते; परंतु तें त्याच्या हातचें नसतें, पराधीन असतें. तोच प्रकार मनुष्याच्या व्यवहारांचा आहे. त्यांतले असे अनिष्ट प्रकार माणसांस निमूटपणें पाहावे लागतात. एवढेंच केवळ नव्हे, तर त्यांत अतिशयित हानीही सोसावी लागते. तसलाच प्रकार जो या भरतभूमींत, सतराव्या शतकाच्या मध्यापर्यंत घडत होता तो प्रकृत पुस्तकांत ग्रथित केला असून, त्या राजकीय प्रकाराचें वातावरण कसें होतें व तें वरील ऐतिहासिक पूज्य अशा दोन परम थोर विभूतींनीं आपल्या अचाट बुद्धिबलानें व पराक्रमानें, म्हणजे युक्ति आणि शक्ति यांच्या साहाय्यानें कसें बदलून टाकलें हें या पुस्तकांत यथामति दाखविण्याचा अल्प प्रयत्न केला आहे.

राष्ट्रावर आपत्ति कोसळली असतां, लोकनायकांनीं कसें वागून आपल्या राष्ट्राला उन्नतीप्रत पोंचवण्याचा कसा कर्मयोग धारण करावा याबद्दल नारदांनीं धर्मराजाला जो बोध केला आहे तो श्रीधरकवींच्या शब्दांत सांगायचा म्हणजे—

एक प्रकट लोकीं बोलावें, एक साधुकर्णीच सांगावें ।
एक मनींच गौप्य ठेवावें, हें तूं बरवें जाणसी कीं ॥

असा आहे.

कर्तव्य करण्याविषयीं मनुष्याची प्रवृत्ति निरंतर जागृत राहात नाहीं. तेणेंकरून व्यवहारांत अकर्म होतें. तें न व्हावें—ती प्रवृत्ति जागृत राहावी–यासाठीं उदयोन्मुख किंवा प्रस्थापित राष्ट्राला त्यांतील मुत्सद्यांची आवश्यकता असते. या बाबतींतली सर्व नीति **पंतांनीं** थोडक्यांत एकाच ओळींत वनपर्वांत वर्णिली आहे.

प्रभुनें प्रजा प्रजांनीं प्रभु रक्षावाचि संकटीं असुंनीं
हीच स्थिति सध्यां प्राप्त झाली आहे.

प्रस्थापित झालेल्या राष्ट्राची व्यवस्था हातांत असणें निराळें आणि स्वतंत्र राष्ट्राची स्थापना करून त्याची व्यवस्था करणें निराळें. **शिवाजीला** स्वतंत्र राष्ट्र निर्माण करून त्याची सुव्यवस्था करायची होती. अशा राष्ट्रामध्यें लोकनायक म्हणवून घेणाऱ्याला जीं कांहीं कामें करायचीं असतात, त्यांत किती एक अशीं असतात कीं, तीं कधीं शिकून येत नाहींत. तीं स्वयंभु-स्वभाव-सिद्धच अंगीं असावीं लागतात. त्यांत—**समर्थां**सारख्यांचीं—

उदंडांचें उदंड ऐकावें । परी तें प्रत्ययें पाहावें ।
खरें खोटें निवडावें अंतर्यामीं ॥
दु:ख दुसऱ्याचें जाणावें । ऐकोनी तरी वांटून घ्यावें ।
बरेंवाईट सोसावें । समुदायाचें ॥

अशा तऱ्हेची उपदेशवाणी साह्य करण्यास तत्पर असली म्हणजे दुधांत साखर पडल्यासारखें होतें. **शिवाजीचा** सर्व कारभार असाच झाला.

जिहीं आपुल्या सर्व प्रयत्नें ।
पराचे क्लेश परिहरणें ।
श्रमोनी पुढल्या सुख दावणें ।
तो एक धन्य संसारीं ॥

श्रीधरकवींची ही उक्ति महाराष्ट्रललामभूत **शिवराजासंबंधानें** सर्वथैक यथातथ्य आहे. स्वपराक्रमानें मिळविलेल्या राज्याची भिक्षा गुरुपदीं अर्पण करणारे आमचे **छत्रपती शिवराज** धन्य होत. **श्रीसमर्थ रामदासही** त्या भिक्षेपासून अलग राहिले आणि प्रसिद्ध कडकडीत ब्रह्मचर्यानें वागणाऱ्या **भीष्माचार्यांच्या** वरची योग्यता जगाच्या निदर्शनास त्यांनीं आणून दिली. लक्ष्मीचा मोह **भीष्माचार्यांना** चुकवितां आला नाहीं. **धर्मराज** त्यांस युद्धास आपल्याकडे येण्याकरितां पाचारण करण्यास गेले. आपला सत्पक्ष असून **श्रीकृष्ण भगवंतां**सारख्यांचें आपणांस साहाय्य आहे हें त्यांस माहीत असल्यामुळें, ते 'ना' म्हणायचे नाहींत अशी त्यांची खात्री होती.

तरी त्यांनीं सर्व गोष्टी जाणूनबुजून समजूनउमजून, धर्मराजाला एकच उत्तर दिलें. त्याबद्दलची **मोरोपंतांची** अशी आर्या आहेः—

अर्थाचा दास पुरुष अर्थ नव्हे पुरुषदास बापा हें
सत्य मज कौरवांनीं केलें अर्थेंचि बद्ध बा पाहें.

**भीष्माचार्यां**सारख्या थोर महात्म्यांस ज्या अर्थाचें दास व्हावें लागलें त्या अर्थाला समर्थांनीं दूर लोटलें व आम्हां ब्राह्मणांचा मुख्य धर्म 'भिक्षा म्हणजे कामधेनु' असें स्पष्टपणें **शिवाजीला** सांगितलें. **तुकोबा**रायांनीं म्हटलें आहे 'अंतरींचा रंग उमटे बाहेरी, बोळवी यापरी आपेआप.' तेंच या बाबतींत खरें ठरतें.

पुढें किंवा मागें मनिं रसविपर्यास नसती
चरित्रें साधूंचीं अकपट विशुद्धेंचि असतीं.

त्या **पंडितांच्या** उक्तीप्रमाणेंच **समर्थांचें** चरित्र आहे हें आम्हीं सांगायला हवें असें नाहीं. जगामध्यें जीं माणसें होऊन जातात, त्यांच्या कांहींना कांहीं तरी चमत्कारिक गोष्टी असतात. त्या सगळ्या टांकीं लागत नाहींत. थोरांच्या तेवढ्या मात्र टांकीं लागतात. कां कीं, त्यांवरून त्यांच्या वृत्तींचें प्रदर्शन उत्तम प्रकारें होत असतें. त्या वृत्तींच्या अनेक अंगांचें वर्णन त्यांच्या चरित्रांत येत असतें. अशाच गोष्टी आमचे **राजे शिवराज** आणि **समर्थ राष्ट्रगुरु** यांच्यासंबंधानें वेगवेगळ्या लिहिल्या जाऊन त्यांचे ग्रंथ झाले आहेत व होत आहेत. तशा गोष्टी जमा करून त्यांतल्या कांहींचा संग्रह या पुस्तकांत केला आहे. तो संग्रह जरी अगदींच थोडा आहे, तरी त्यावरून खरा इतिहास कळण्याला अल्प तरी मदत होईल असें वाटतें; कारण, **राजा** आणि **राजगुरु** यांच्या वृत्तींच्या कितीएक अंगांसंबंधानें या पुस्तकाच्या वाचनानें प्रकाश पडेल अशी अटकळ आहे, ती खरी ठरो. आजपर्यंत वर्णनीय अशीं ज्यांचीं चरित्रें झालीं आहेत त्यांच्या अंगच्या इतर गुणांपेक्षां त्यांच्यांत श्रेष्ठ गुण हा दिसतो कीं, ते खरे मानधन होते. परकीय सत्तेच्या जुंवाखालीं हरघडी होणारा अपमान असह्य झाल्यामुळेंच **शिवराजाला** हातीं तरवार धरावी लागून **समर्थांच्या** युक्तिवादाच्या जोरावर जी तिला विजयी

करितां आली, ती फक्त स्वजनांच्या मान रक्षणाकरितां होय; कारण, ' मानोहि महतां धनम् ' हें वाक्य त्यांच्या डोळ्यांपुढें अक्षय उभें होतें.

विवेक आणि सुविचारु, ईश्वरें नेमून दिधले गुरु ।
त्यांचिया बुद्धि वर्ततां नरू, आघातातें न पाविजे ॥—मुक्तेश्वर.
धर्म तोचि शुद्ध पंथ, मनु शुद्ध तोचि शुचिष्मंत ।
विवेकी तोचि पंडित, सर्वभूतीं समदर्शन ॥—श्रीधर.

अशाच तऱ्हेनें **शिवराज** वागले व त्यांनीं स्वराज्याची प्राणप्रतिष्ठा केली. राज्याचा पाया जे कायदे आणि कायद्यांचीं बीजें त्यांचेंही **शिवराजानें** उत्तम रीतीनें परिपालन केलें. कायद्याचें योग्य तऱ्हेनें परिपालन केलें म्हणजेच राष्ट्राचा अभ्युदय होतो. सर्वांचें विशेष ऐक्य व्हावें, न्याय स्थापित व्हावा, प्रपंचांत शांतता रहावी, सर्व प्रजेचें चांगलें संरक्षण व्हावें, सर्वांचें कल्याण वृद्धि पावावें आणि स्वातंत्र्यसुख सर्वांस लाभावें, याच तत्वांवर **शिवराजांनीं** कायद्यांची अमलबजावणी केली आणि त्याचमुळें ते सर्व **महाराष्ट्रीयांच्या** आदरला पात्र होऊन महत्पद पावले.

हरिहरजनाश्रय बरा होतें तदितर जनाश्रयें भंड ।
लागुनि असमर्थाच्या कांसेला वस्त्र पावतें दंड ॥

ह्या **मयूर**कवीच्या उक्तीप्रमाणेंच **शिवराज समर्थांच्या** कांसेला लागले, म्हणूनच धन्यता पावले आणि म्हणूनच स्वकृतीनें परमश्रेष्ठ पदावर आरूढ होऊन स्वजनांना त्यांनीं यश आणि संपदा यांचा लाभ करून दिला. कविजनांना अशा थोर विभूतींचें यश गायला आणि रसिकांना तें ऐकायला याजमुळें लाभप्रद झालें. प्राणीमात्राच्या मागें उपजणें आणि मरणें हें गरगर फिरणाऱ्या भोंवऱ्याप्रमाणें जरी लागलेलेंच आहे, तरीः—

उपजला तरि तोचि मला गमे । कुलसमुन्नति ज्यास्तव घे रमे ॥

हें **पंडितांचें** वाक्य जो खरा करतो तोच खरा. **तुकाराम** सुद्धां असेंच म्हणतात कीं, ' पुत्र व्हावा ऐसा गुंडा, त्याचा तिन्ही लोकीं झेंडा. ' यासंबंधानें लिहावें तेवढें थोडेंच आहे. असो.

उपासनेला दृढ चालावें । भूदेवसंतांसि सदां नमावें ।
सत्कर्मयोगें वय घालवावें । सर्वांमुखीं मंगल बोलवावें.

**समर्थांच्या** या उपदेशाप्रमाणेंच अखेरपर्यंत **शिवराज** वागले व त्याचें फळ त्यांना मिळालें. आतां एकदोन गोष्टींचा येथें उल्लेख करावयाचा आहे तेवढा करून ही लांबलेली प्रस्तवना पुरे करूं.

आमचे परम मित्र व प्रसिद्ध कादंबरीकार श्री. रा. **नाथमाधव** यांचे जर येथें आभार मानले नाहींत तर मित्रद्रोहाचें पातक घडणार आहे. प्रकृत पुस्तक हें जसें श्री. **तात्यासाहेब पांगळ** यांच्या आश्रयाचें फळ आहे तद्वतच उपरिनिर्दिष्ट लेखकमित्राच्या सूचनेचेंही आहे. **श्रीसमर्थ राष्ट्रगुरु** हें नांव देऊन **समर्थांच्या** चरित्रावर अशा तऱ्हेचें पुस्तक लिहिण्याची त्यांनींच मला प्रथम जी सूचना केली ती जर रा. **पांगळ** यांनीं अमलांत आणली नसती, तर हें पुस्तक लिहिण्याचें बाजूला राहून, अशा स्वरूपांत बाहेरही आलें नसतें; म्हणून वरील उभयतां मित्रांचे उपकार मानावेत तितके थोडेच आहेत.

दुसरी गोष्ट अशी आहे कीं, प्रकृत पुस्तक हें चरित्ररूपाचें म्हटलें तरी चालेल किंवा कादंबरी म्हटलें तरी चालेल अशा पद्धतीचें लिहिलें आहे. असें जरी आहे, तरी इतर कादंबऱ्यांत आणि यांत फरक इतकाच आहे कीं, या पुस्तकासारखें हें एक पुस्तक मुद्दाम नव्या वाङ्मयाच्या आखाडयांत नव्या स्वरूपानें मांडण्याचें धारिष्ट केलें आहे. नायक आणि नायिका यांच्यावर अनेक संकटें आणून शेवटीं यांच्या भेटीनें शेवट गोड करण्याची कादंबरीकारांची जी वहिवाट, तिला सोडून यांत दोन नायकांच्या श्रमाचें चीज स्वराज्यप्राप्ति हें दाखविलें आहे. प्रयत्न नव्या दिशेचा आहे. वाचकांना कितपत आवडेल तो बघणें आहे.

आतां शेवटीं **समर्थशिष्य आनंदमूर्ति** यांच्याच शब्दांत:—

समर्थ हें नामचि साच मानूं । समर्थ हें नाम दुज्या न मानूं ॥
समर्थकृपेनें जडजीव तरती । समर्थ हें नाम सद्यःप्रचीती ॥

हा श्लोक म्हणून, **समर्थ**चरणांचा अक्षय लाभ घडावा अशी जी खरी इच्छा ती **समर्थ** पुरी करोत अशी विनंति करून ही प्रस्तावना येथेंच संपवूं.

**ल. ना. जोशी.**



श्री

# समर्थ राष्ट्रगुरु.

## प्रकरण पहिलें.

### दोन पंथांची भेट.

—:०:—



आहाहा! कोण ती त्या प्रांताची शोभा! अस्मान फोडून जाऊन सूर्याच्या गतीला अडथळा आणण्याचा भास पाडणारीं तीं हिमनगशैलशिखरें, जणूं काय पूर्वेकडून पश्चिमेकडे जाणाऱ्या स्वर्गाचा मार्ग अति पवित्र व निष्कलंक आहे हें दाखविण्या-करितांच मस्तकांवर रुपेरी रंगाचें हिम धारण करून बसलीं आहेत. प्रलयकालीन अग्नीप्रमाणें तेजस्वी असा मूळपुरुष महेश्वर आपल्या उमारूप प्रकृतीसह याच उत्तर दिशेला हिमाचलावर राहात असतो. याच ठिकाणीं चंद्राला द्विजराज्याचा अभिषेक झाला. आकाशांतून भ्रंश पावलेल्या गंगानदीला याच ठिकाणीं महादेवानीं स्वशिरीं धारण करून मनुष्यलोकाला दिली. जगदंबा पार्वतीनें शंकराच्या प्राप्तीकरतां याच ठिकाणीं तप केलें. काम व क्रोध यांचें याच ठिकाणीं घनघोर युद्ध होऊन कामाला अनंग व्हावें लागलें. स्वाति नक्षत्राची स्थिति व उदय याच उत्तर दिशेला होतात. कुबेराचें कैलास-नामक जें प्रसिद्ध वसतिस्थान तें येथेंच आहे. विद्युत्प्रभानामक दहा अप्सरा येथेंच उत्पन्न झाल्या. त्रैलोक्य पादाक्रांत करतेसमयीं त्रिविक्रमस्वरूपी विष्णूनें

याच उत्तर दिशेला आपलें पद उठविलें. मोक्षप्राप्तीच्या मार्गाला अखंड लागलेल्या अनेक सिद्धांचे आश्रम या उत्तर दिशेनें आपल्या कुक्षींत घेतल्यामुळेंच ती पुनीत झाली आहे. अशा ह्या पापापासून उत्तीर्ण करणाऱ्या उत्तर दिशेकडील हिमालयाच्या एका अति रम्य वनांत नेहमींप्रमाणेंच एके दिवशीं प्रातःकाळीं मंदमंद वारा वाहात होता; तेथील घनदाट वृक्षांस सुगंध पुष्पें असल्यामुळें सर्वत्र मनोहर सुवास पसरला असून, तेथें उगवलेलें मऊ गवतही सुंदर दिसत होतें. झिल्ली कीटकांचा मधुर ध्वनि ऐकूं येत असून, कोकीळ आपल्या गोड स्वरानें तेथील वनश्रीचें कौतुक गात होते. अनेक पक्षी आपापल्या मधुर ध्वनींनीं वनचर प्राण्यांस तल्लीन करून सोडीत असून मोठमोठाल्या जुनाट वृक्षांनीं आपल्या विस्तीर्ण शाखा पांथस्थांस छायापर सुख देण्यासाठीं सभोंवार पसरलेल्या होत्या. भृंगांचा गुंजारव चालला होता. वनश्री आपलें सर्व ऐश्वर्य पसरून उभी राहिली होती सर्व वृक्षराजी आपल्या फुलभारानें वांकून गेली असून, त्यांच्या सुवासाला लुब्ध झालेल्या भ्रमरांची गर्दी झाल्यामुळें सर्व वनाला मेघःशामत्व आलें होतें. पक्ष्यांचा मनोवेधक तारस्वर, प्रशस्त छाया देणाऱ्या वृक्षांस सर्व ऋतूंतील पुष्पांनीं आलेली विलक्षण शोभा, अतिथिअभ्यागतांस शिष्ट वायूच्या प्रेरणेनें स्वागतपर झालेली प्रतिक्षणीची पुष्पवृष्टि, गगनचुंबित वृक्षांनीं केलेले चित्ताकर्षक विचित्र फुलांचे रमणीय पोषाख, नूतन पल्लवांनीं व पुष्पभारांनीं विनम्र झालेल्या शाखांवरील मधुमत्त भ्रमरांचा गुंजारव आणि पुष्पांचा सडा झालेला तो भूप्रदेश, मनाची प्रीती वाढविणारे लताकुंज व परस्परांस शाखाबाहूंनीं आलिंगन देणारे अनेक वृक्ष जेथें विपुल आहेत अशा त्या मनोरम वनश्रीच्या साम्राज्यांत, एक—उंचा पुरा, शरिरानें धिप्पाड, वर्णानें गौर, अंगांत सफेत कफनी, हातांत माळ, भरपूर कृष्णवर्ण दाढी असलेला विचारमग्न पुरुष हिंडत असतां—दुसरीकडे—भगव्या रंगाच्या छाट्यांनीं विभूषित झालेला व ज्याचे वरचे ओंठ नुकतेच काळे दिसूं लागले असून जो अंगकांतीनें सतेज आहे असा एक पुरुष फुलें तोडून आपल्या परडींत भरीत होता. उत्तम फुलें हातांत आलीं नाहींत, तर वेळीं काखेंतल्या कुबडीनें झाडाचे शेंडे वांकविण्याचेंही काम तो करीत होता.

" ह्या पृथ्वीरूप मेजावर आकाशाची जी सफेत चादर पसरलेली आहे हिच्यावर अलम दुनिया इंद्रजालाच्या खेळाप्रमाणें आपल्या मर्जीप्रमाणें गिरफ-

दार होऊन, अनेक जन्म देणाऱ्या या क्षुद्र संसारांत गुंग होऊन परमेश्वराला पार विसरून गेली आहे! पण आपण कोण, कोठून आलों, जायचें कोठें, आपला जन्म कशाकरतां झाला आहे व आपण काय केलें असतां देवाला तें मंजूर होईल याबद्दलचा विचार करीत असलेले प्राणी बिलकुल नजरेस पडत नाहींत. हा संसार म्हणजे काय कर्दममय आहे. यांतच आपली उत्पत्ति झालेली आहे. आपण आपल्या मातेच्या उदरांतून बाहेर पडतों, पण त्या उदराचा—त्या घाणेरड्या स्थलाचा—आपण तिटकारा न करतां, ज्या उदरामुळेंच आपल्या आईच्या स्तनांत दुग्धोत्पत्ति होते त्या दुधावरच आपण वाढतों व आपल्याला त्या दुधावर वाढविणाऱ्या परमेश्वराला आणि ज्या धरित्रीनें आपल्याला राहण्याला आसरा दिला तिला आपण विसरतों. कमल हें सुद्धां कर्दमापासूनच उत्पन्न होतें. त्यांतील मधुर मकरंद मधमाशा घेऊन जाऊन त्याचीं मधाचीं पोंवळीं तयार करितात आणि अशा त्या परोपकारी कमळाची कीर्ति, त्याच्या सुगंधी परागांना बरोबर घेऊन बंधुत्वाच्या नात्यानें मारुत सर्वत्र संचार करून दशदिशांत भरून टाकतो. तेव्हां अशा ह्या—अथाक पाण्याच्या पृष्ठभागावर राहून पाण्याच्या एका थेंबाचाही स्पर्श न होऊं देतां कमळ जसें आपलें मूळ कर्दमांत गाडून घेऊन सर्व जगाला आनंद देतें, तद्वतच आपण आपलें जन्मकारण ओळखून या जगावर उपकार करायला नकोत का? आपण तोंडानें हवी तेवढी वटवट करतों, पण हातून कांहींच होत नाहीं. या जगांत जी जी वस्तु आहे ती ती निर्माण करण्यांत परमेश्वराचा कांहीं तरी हेतु हा आहेच. परमेश्वराचा हेतु न ओळखतां आपण जर वाह्यातपणें वागून आयुष्य कंठूं लागलों व भूमीला फुकट भार देत ऐषआरामांत निमग्न झालों, तर हें देवाला कसें सहन होईल? आपल्यापाशीं जें त्यानें ज्ञानतंतूंचें जाळें ठेविलें आहे त्या जाळ्याचा आपण दुरुपयोग करीत असलेले आपणांस पाहून त्याला संताप येणार नाहीं का? कमलनाळाचा तंतु काढण्यास आपणांस जितके श्रम लागतील तितके तरी श्रम, आपली आयुष्याची दोरी तोडून टाकायला परमेश्वराला पडतील का? केरकचऱ्याप्रमाणें या देहाची स्थिति होणें हें किती विपरीत आहे! ह्या देहांत असलेल्या सुविचारी आत्म्यानें—स्वदेश, स्वधर्म व स्वराज्य—या त्रयींबद्दल कांहींच विचार करायला नको काय? अनेक वस्तूंची झीज जशी रात्रंदिवस स्वाभाविकपणें

चालूं आहे तद्वतच आपला देहही या मृत्युभूमींत कालचक्राच्या गतींत झिजत असून तो लयाला जाणार आहे असें समजून, प्रथम परमेश्वराचें साह्य मिळवून, नंतर स्वधर्म व स्वराज्य ह्या जोडीच्या ऐक्यानें आपल्या बांधवांचें कुशल करणें आपलें कर्तव्य नाहीं काय ? आजपर्यंत स्वधर्म व स्वराज्य या दोहोंकरितां अनेक धडपडी केल्या; परंतु यवनी कारकीर्दींत खुशालचेंडू बनून ऐषआरामांत मग्न होणाऱ्या आमच्या बांधवांचे डोळे अद्यापि उघडत नाहींत. जाऊंदे म्हणून म्हटलें पण मन राहात नाहीं. हा देह उत्तम कार्याकरतां झिजवावा म्हणून सच्चा गुरूचा शोध करतों आहें, पण असा गुरूही अजून सांपडत नाहीं. हा हिमालयांतील शांत प्रदेश अशाच एखाद्या संच्छील विभूतीनें भूषणभूत केलेला असला पाहिजे अशा दृढभावनेनें आज चार महिने हिंडलों, पण पत्ता लागत नाहीं. आत्मनात्मविचाराचा ठाव लागल्याशिवाय हें मन शांत होत नाहीं. सबंद हिंदुस्तान हिंडलों, तरी खरा रस्ता दाखविणारा एकही गुरु मिळूं नये हें आश्चर्य नव्हे काय ? नुकतेंच असें ऐकलें आहे कीं, महाराष्ट्रामध्यें रामदास नांवाचे जे साधु मारुतीच्या अंशानें उत्पन्न झाले आहेत, ते तीर्थयात्रा करीत करीत त्या पलीकडच्या श्रीनगरच्या पहाडावर येऊन ठेपले आहेत. ते अस्सल दर्जाचे ब्रह्मचारी ब्राह्मण असून, देशाभिमानी आणि पूर्ण रामभक्त आहेत अशी त्यांची प्रसिद्धी झालेली आहे. तेव्हां अशा या साधूचें दर्शन घेऊन ते कोणच्या योग्यतेचे आहेत हें पाहिलेंच पाहिजे. ''

अशा तऱ्हेचे विचार करीत करीत ती भव्याकृति हातांतली माळ ओढीत चालली असतां तिच्या कानांवर-मुसलमानी दोहऱ्याच्या चालीवर कोणी कांहीं तरी सुरावर गात असलेले सूर पडल्यामुळें ती आकृति तेथेंच थबकली व गाणें शांत चित्तानें ऐकूं लागली.

श्लोक.

**जनीं भक्त ज्ञानी विवेकी विरागी ।**
**कृपाळू मनस्वी क्षमावंत योगी ॥**
**प्रभू दक्ष व्युत्पन्न चातुर्य जाणें ।**
**तयाचे नियोगें समाधान बाणें ॥ १ ॥**

हे गाण्याचे सूर ज्या दिशेनें आलेले ऐकण्यांत आले त्या दिशेकडे दृष्टी फिरवून ती दाढी-कफणीवाली मूर्ती सलक्ष्य न्याहाळूं लागली. तों काय! एक ऐन ज्वानींतला तरूण हातांत फुलांची परडी घेतलेला व काषायांबरें धारण करून आपल्याच बाजूला येत आहे असें त्या श्यामवृक्षसदृश आकृतीनें बघितलें. तेव्हां जागच्या जागीं स्तंभित होऊन, त्या भगवीं वस्त्रें परिधान करणाऱ्या जवानाची गांठ घेण्याचा ती शुभ्र कफणीवाली मूर्ती विचार करूं लागली.

काषायांबरें परिधान केलेला तो तरुण जवान आपल्याशींच पुटपुटत स्वस्थ चालला होता!

"अहाहा! या रामनामाचा महिमा किती अतर्क्य आहे! याच रामनामानें जगत्पिता जो शंकर त्याला हालाहल विष पचवितां आलें. याच रामनामाचा रावणानें तिरस्कार केला म्हणून तो अधोगतीला गेला.

श्लोक.

मुखीं राम त्या काम बाधूं शकेना।
गुणीं इष्ट धारिष्ट त्याचें चुकेना॥
हरीभक्त तो शत्रु-कामासि मारी।
जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी॥ २॥

आत्मारामाचें दास्य करण्यास वायुपुत्र हनुमान सदां तत्पर असल्यानेंच निर्विकार आणि अनंत अशा रामानें आपल्या ठिकाणीं वायुपुत्राचें दास्यत्व जाणून त्याला चिरंजीव करून सोडला. म्हणूनः—

श्लोक.

बहू चांगलें नाम त्या राघवाचें।
अती साजिरें स्वल्प सोपें फुकाचें॥
करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें।
जिवा मानवा हेंचि कैवल्य साचें॥ ३॥

जें रामनाम ऐकण्याबरोबर सहस्र पापें जळून खाक होतात, मतिमंद साधनाला योग्य होतात आणि ज्ञानवैराग्याचें सामर्थ्य अंगीं येऊन जर मुक्ति-भोग प्राप्त होतो, तर तें फुकट मिळणारें नांव कां न घ्यावें! अरे, पण हा काय ईश्वरी चमत्कार पाहा! अरुणकांतीनें आसमान झोंपणारा

हा चित्रविचित्र रक्तवर्ण गालीचा तुडवून क्षितिजावरील अंधःकाराचा पराभव करणारा सूर्यनारायण बराच वर आला. समर्थांच्या पूजेची वेळ टळूं नये म्हणून पळतच गेलें पाहिजे."

हातांतील कुबडीच्या टेकूनें भराभर उड्या मारीत व वरीलप्रमाणें स्वगत विचार करीत तो तरुण तपस्वी चालला असतां, मागें सांगितलेली ती धिप्पाड मूर्ति त्याच्या धांवत जाण्याच्या गतीला विरोध करून उभी राहिली व त्या दोघांचें पुढीलप्रमाणें भाषण सुरू झालें.

"आपण कोण आहांत ? हातांत ही फुलांची परडी घेऊन कोणीकडे चाललांत ? आपलीं वस्त्रें हुरमुजी रंगाचीं असल्याकारणानें आपण तपस्वी आहांत असें मला वाटतें. मला अधिकार नसतां मी हें आपणांस विचारीत आहें या-बद्दल क्षमा असावी."

"या देहाचें मूळचें नांव जरी भिन्न आहे, तरी **श्रीसमर्थ** रामदासांच्या कृपादर्शनानें पवित्र झाल्यापासून, या देहाला त्याच कृपाछत्राकडून **उद्धव** असें म्हटलें जातें. आपणांला ज्याअर्थी माझें नांव समजलें त्याअर्थी आपलेंही नांव समजून घेण्याची मला इच्छा व्हावी हें साहाजिकच आहे."

"**गुरु नानक** यांनीं—हिंदु व मुसलमान—या दोहोंच्या धर्मांचा मिलाफ करून जो शिखांचा धर्म प्रस्थापित केला आहे, त्या धर्माच्या गादीवर जो सध्यां धर्मशिक्षण देण्याकरितां हयात आहे तोच मी. या देहाला अर्जुनसिंह असें म्हणतात. मी आपल्या धर्माच्या बाबतींत पुष्कळ श्रम घेतों आहें, पण अस्सल दर्जाचा व मनाला पटणारा गुरु अजून मला न मिळाल्यामुळें मीं सध्यां वनवास पत्करला आहे व गुरूचा शोध करीत भटकतों आहें. ऐहिक गोष्टी-सारख्या रंगीबेरंगी स्थितींत गुरफटून गेल्यामुळें आत्मानात्मविचाराचा पत्ता लागत नाहीं व तो लावून देणारा वस्ताद गुरुही मिळत नाहीं."

"अशा गोष्टी जे समर्थ असतील त्यांच्याचकडून समजावून घ्याव्या लागतात."

"तुमचे गुरु श्रीरामदास समर्थ या नांवानें प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांचा लौकिक फार वाढला असून, ते मारुतीच्या अंशानें अवतीर्ण होऊन हिंदूंच्या धर्मराज्याची स्थापना करविणार आहेत असें ऐकतों. अशा त्या थोर विभूतींच्या सत्संगतीनें माझ्या आत्म्याची शांति होईल असें वाटतें."

माझी मनोकामना तृप्त करून ते आपल्या समर्थ या नांवाचें चीज करतील का ? ”

“ परमेश्वर हा जसा परमेश्वर या नांवाला पात्र आहे तसेंच ते समर्थ या विशेषणाला योग्य आहेत. ”

“ तर मग अशा त्या साधुश्रेष्ठाकडे मला घेऊन जाऊन त्यांच्या दर्शनाचें सौख्य मला मिळवून दिलेंत, तर मी आपला फारच आभारी होईन. ”

“ कोण कोणाला नेणार? ”

“ आपण मला ! ”

“ मी कोण ! ज्याला जशी स्फूर्ती होते तसें तो करतो ! ”

श्लोक.

**मना संग हा सर्व संगासि तोडी ।**
**मना संग हा मोक्ष तात्काल जोडी ॥**
**मना संग हा साधका शीघ्र जोडी ।**
**मना संग हा द्वैत निःशेष तोडी ॥ ४ ॥**

जय जय रघुवीर समर्थ. ”

अशा प्रकारें त्या दोन पंथांतील दोन पुरुषांच्या भेटी होऊन भाषणें झाल्यावर, श्रीसमर्थशिष्य उद्धव, मोठ्या तांतडीनें तेथून तडक निघाला व त्याच्या मागोमाग मोठ्या लगबगीनें अर्जुनसिंहही झपाट्यानें जाऊं लागला.



# प्रकरण दुसरें.

## दोन पंथ पण काज एक.

—:०:—




तसामस्मि जान्हवी—असें प्रत्यक्ष भगवंतांनीं जिच्या संबंधानें म्हटलें आहे, त्या गंगानदीनें भीष्माचार्यांसारख्या आर्य सुपुत्राला जन्म देऊन हा हिंदुस्तान देश पुनीत केला. विष्णूच्या पदीं नम्र होणारी व जगन्मातेचें सवतपण स्वीकारून जी स्वर्गारोहणाची वैजयंतीच बनली आहे, तिच्या तीरांवरील झाडांच्या ढोलींतून राहणारे पक्षी किंवा जंगलांत विहार करणारे मत्स्यादि प्राणी ह्यांची योग्यता फारच मोठी आहे. महायुद्धानें विजयी झालेल्या राजापेक्षांही जास्त जिचा श्रेष्ठपणा आहे व जी मोक्षसंपत्तीची प्रत्यक्ष पताकाच आहे अशी जी भागीरथी नदी ती हिमालयांतून द्रुतगतीनें धांवत येऊन आपल्या तरंगांनीं आम्हांला काय शिकवते आहे तें पाहा! तिच्या त्या शुभ्र तरंगांत ती आपली शुद्ध कीर्ती दाखवून तसें होण्याचा आपल्याला धडा देते आहे. वृष्टि करणारे मेघ, प्रफुल्लित कमलिनी, सुपुष्पित कमलांनीं व लतांनीं भरलेलीं सरोवरें, हंसांचा मधुर शब्द, क्रौंच पक्ष्यांचा संघोष, तीरप्रदेशावर इतःस्ततः पसरलेले वृक्ष, समाधींमध्यें तपस्वी व सिद्ध तद्रूप बनलेले, विपुल उदकानें भरलेल्या असून—सिंह व गज यांनीं जलक्रीडा केल्यामुळें गढूळ उदक झालेल्या नद्या, मदोन्मत्त हत्ती, गाई, बैल व गेंडे—अशी ज्या नगाधिराजाच्या अंगावरील दागिन्यांची शोभा व गंगेसारख्या अलौकिक नदीला जन्म देणारा जो भूधर त्या हिमवानाची बरोबरी कोण करणार?

अशा तऱ्हेच्या हिमालयांतील श्रीनगराजवळील एका शैलशिखरावर एके दिवशीं सकाळीं एका भव्य वृक्षाच्या छायेंत–अंगांत एक कौपीन, हातांत कुबडी, डोक्याला जटा व तोंडावर दाढी असा एक मध्यम आकाराचा, गौर वर्णाचा व तालीम केलेल्या सुदृढ अंगाचा, हुरमुजी रंगाचीं वस्त्रें परिधान केलेला वनविहारी पुरुष स्वगतच कांहीं तरी पुटपुटत बसला होता.

फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे ॥
दिसंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे ॥
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ॥
विचारी मना तूंचि शोधोनि पाहे ॥ ५ ॥

रघुवीर ! रघुवीर ! रघुवीर ! अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार अशीं जीं या देहांतील पंचतत्त्वें आणि प्रभंजनाचे अंश जे पंचप्राण ते मिळून बाकीच्या ह्या देहांतील ज्या पंधरा मात्रा त्यांना विषयविलास असतात; परंतु असे पंचवीस प्रकार मिळून जो हिरण्यगर्भ झाला त्याची मातृका उकार असून अभिमानी विष्णु आहे. स्थितिअवस्थेचा प्रतिपाल तोच करतो. त्याला धर्मरक्षणाकरतां जो अवतार घ्यावा लागतो त्याचें कारण हेंच. ह्याच हेतूनें सध्यां त्यानें अवतार धारण केला असून—देशभर होणाऱ्या अधर्माचें खंडण करण्याचें योजिलें आहे. कोठें काय चाललें आहे त्याचें या तीर्थयात्रेच्या मिषानें अवलोकन करून, जागोजाग आर्यधर्माची स्थापना करण्याची आम्हांला जी आज्ञा झाली आहे, तिला अनुसरून या देहांतील आत्मा, बारा वर्षांत तेरा कोट पुरश्चरणानें वज्रवत् करून, आतांपर्यंतच्या प्रवासांत चारशेंपेक्षां जास्त मठ स्थापन केले आणि आतां या प्रांतांतील शीख धर्मालाही आर्यधर्माची मात्रा पाजून, स्वजनहिताकरतां आपल्याकडे वळवून घेण्याचा जो विचार आहे तो सिद्धीस गेला म्हणजे दक्षिणेंत जाण्यास कांहीं हरकत नाहीं. मनुष्यानें नेहमीं मितभाषणी राहून विचारांत मग्न असावें. विनाकारण वटवटीनें राज्यकारणें विस्कटतात. सध्यांच्या आमच्या राजकारणाची स्थिति फार नाजूक आहे. त्याचें कोणचें पारडें खालीं व कोणचें वर केव्हां होईल याचा नेम नाहीं. दिल्लीचें तक्त दिवसेंदिवस जरी पोंकळ होत चाललें आहे, तरी त्याच्या सर्व गोष्टी सध्यां इभ्रतीवर चालल्या आहेत. विजापूरची बादशाही तर काय ? दोनचार रणमस्त सेनापतींशिवाय युक्तीनें राजकारणांतील कांटे काढणारे मुत्सद्दी नसल्यामुळें पतिहीन स्त्रीसारखी झाली आहे. अशा या श्रीमान् परंतु दुबळ्या विजापूरच्या बादशाहींत भाग्यश्रीचें अधिष्ठान आतां चंचल झालें असून तिला स्थलांतर करण्याची वासना झालेली आहे असें दिल्लीपती औरंगजेबाच्या वर्तनावरून स्पष्ट होतें. संधी हीच आहे !"

गाण्याचा सूर एकदम कानांवर पडल्यामुळें स्वगत विचारांना फांटा मिळून ती कुबडीधर मूर्ति जागृतावस्थेंत आल्यासारखी मुद्रा धारण करून ज्या दिशे-कडून तो गाण्याचा मंजुळ स्वर येत होता त्या दिशेकडे पाहूं लागली. " काय ! उद्धव सांगितलेली कामगिरी करून आला ? होय ! आलाच यांत शंका नाहीं." ती स्वारी पुन्हां स्वगतच पुटपुटली.

त्या मूर्तीच्या कानावर जो गाण्याचा आवाज पडला तो जरी प्रथम बराच दूरवरून ऐकूं आल्यासारखें वाटत होतें, तरी तो आवाज आतां अगदीं जवळ-जवळ येऊं लागला होता.

श्लोक.

**नव्हे पिंड-ज्ञानें नव्हे तत्व-ज्ञानें ॥**
**समाधान कांहीं नव्हे तानमानें ॥**
**नव्हे योग योगें नव्हे भोग त्यागें ॥**
**समाधान तें सज्जनाचेनि योगें ॥ ६ ॥**

जय जय रघुवीर समर्थ.

घनदाट वृक्षाखालीं बसलेल्या मूर्तीचें पादवंदन करतां करतांच " जयजय रघुवीर समर्थ " असे शब्द—अर्जुनसिंहाला आपल्या मागें येण्यास भाग पाडणारी मागील प्रकरणांतील तरणी मूर्ति बोलली तेव्हां " कल्याण " असें ते बसलेले कुबडीवाले बोलले.

" महाराज़, शीखधर्माच्या गादीवर सध्यां असलेले " तो तरणा तापसी म्हणाला, " शीख गुरु अर्जुनसिंह हे समर्थदर्शनार्थ आले आहेत. "

" चला, आपणही त्यांच्या दर्शनाला सामोरे जाऊं."

ते दोघे कुबड्यावाले जरा पुढें गेले नाहींत तोंच अर्जुनसिंहानें पुढें होऊन मोठ्या आद्यतेनें जेव्हां " ज्या खाणींत कोळशाची उत्पत्ति होते तीच खाण रत्नालाही जन्म देऊं शकते असें म्हणतात ! " असें म्हटलें तेव्हां थोरल्या कुबडीवाल्यानेंही मोठ्या शांत व गंभीरपणानें अशाच तऱ्हेचें पण तोंडीस तोड असें एक वाक्य उच्चारलें.

" महोदधीसारखा बाप, चंद्रासारखा भाऊ, लक्ष्मी प्रत्यक्ष बहीण, मेहुणा द्वारकाधीश कौस्तुभधारी गोपाळकृष्ण—असें गोत असतां, शंख दारोदार भिक्षा मागत हिंडतो हें खरें आहे. "

मोठ्या तोऱ्यानें "याचें कारण दैवाधीनतेपेक्षां कांहीं नाहीं," असें अर्जुनसिंह बोलला.

"येथेंच चुकतां! जरा स्वस्थ व्हा. खालीं बसा. हें पहा, स्वभाव संगतीनें बनतो." थोरले कुबडीवाले बोलूं लागले. "तुम्हांला जें कांहीं हवें आहे तें संगतीनेंच प्राप्त होणार आहे."

"अशा अमूल्य संगतीचा लाभ होत नाहीं." अर्जुनसिंह म्हणाला, "त्याला काय करावें?"

"आधीं संत ओळखून त्याच्या समागमानें अंगीं साधेपणा आणावा लागतो." थोरले कुबडीवाले बोलले, "तो साधेपणा पूर्ण दशेला पोंचला म्हणजे अंगीं साधूपणा येतो. अशा त्या साधूपणाच्या पूर्णावस्थेला जऊन आपण पोंचलों म्हणजे मग आपल्याला जें पाहिजे असतें तें आपोआप प्राप्त होतें; असा साधूंचा अनुभव आहे."

"तोच अनुभव घेण्याला मीं पात्र व्हावें म्हणून या पहाडांत मीं आज एक महिनाभर आपला शोध करीत हिंडतों आहें; पण आज आपल्या या शिष्याच्या भेटीनें माझें पूर्वपुण्य उदयाला येऊन आपली गांठ पडली. शीख गुरू जे नानक त्यांच्या गादीवर अर्जुनसिंह नांवाचा जो देह सध्यां धर्माध्यक्ष-तेचें काम चालवीत असतो तें नांव याच देहाचें आहे व तो हा देह या आपल्या चरणीं मी अर्पण करतों आहें!" इतकें बोलून तो त्या साधूच्या पायां पडला व पुन्हां बोलूं लागला. "मी रंगबुरंगीच्या घेऱ्यांत जों सांपडलों आहें त्यांतून बाहेर पडण्याचा खरा मार्ग आपण कृपा करून मजला दाखवा आणि ज्या योगानें आत्मानात्मविचाराचें पूर्ण स्वरूप मला ओळखतां येऊन-मी मुक्ती-पंथाला जाऊन मिळेन-असें शिक्षण मला द्या."

"तो पहा!" साधू बोलूं लागले, "तो पलीकडे तुटका कडा दिसतो आहे त्यावरून खालीं उडी मारा, म्हणजे तेथें तें शिक्षण मिळेल."

"कड्यावरून उडी टाकली असतां या देहाचे शतशः तुकडे तुकडे होतील" अर्जुनसिंह मोठ्या दिलगीर आवाजानें बोलला, "आणि मग तेथें तें शिक्षण घ्यायला कोण शिल्लक राहील?"

"शिक्षण घेणारा आत्मा असतो. देह नसतो. आत्म्याला कशापासूनही मर-ण्याची भीति नसते. तो चिरंजीव आहे. या गोष्टींचा विचार न करतां, आतां

तुम्ही बोलतांत तसेच विचार जोंपर्यंत तुम्ही करीत राहाल तोंपर्यंत तुमच्या हातून कांहींच होणार नाहीं. व्यर्थ देहकष्ट मात्र होतील. तुम्ही आपल्याला शीखपंथाचे धर्मगुरु म्हणवतां आणि असल्या अप्रबुद्ध विचारांना हृदयांत थारा देतां याला काय म्हणावें ! जोंपर्यंत असल्या विचारांना झुगारून देऊन तुम्ही खरा मार्ग धरणार नाहीं, तोंपर्यंत, तुम्ही ज्याचा शोध करीत आहांत तें तुम्हांला सांपडणें कठीण आहे." थोरले साधु जरा थांबून पुन्हां बोलूं लागले, " या देहासारखे आत्म्याला दुःखभोग नसून जो अविनाशी आणि अविकारी आहे, अशा त्या आत्म्याची प्रथम ओळख करून घेतल्याशिवाय आत्मानात्मविचार कळणें फार कठीण आहे. "

" तीच ओळख करून घेण्याचें शिक्षण घेण्याकरितां आपला गुरुपदेश देऊन या दासाला आपलासा म्हणवावें अशी माझी मनापासून इच्छा आहे आणि येवढ्याच करितां मी आपली सेवा करण्याकरितां येथें हजर झालों आहें.' अर्जुनसिंह मोठ्या लीनतेनें शेवटीं विनम्र होऊन म्हणाला. " या पतित दासावर अनुग्रह करून याला पावन करून घ्यावें. "

" बाबारे, या जगांत या जिव्हेपासून आजपर्यंत अनेक तत्त्वरूपरत्नें जरी निर्माण झालीं आहेत, तरी त्या सर्वांत जें एकच मुख्यतत्त्व आहे तेंच शुद्ध जाणावें. " साधुवर्य बोलूं लागले, "**नाना तत्त्वें लहान थोर ॥ मिळोनी अष्टही शरीर ॥ अष्टधा प्रकृतीचें नीर ॥ निघोनी जात ॥**

ज्याप्रमाणें हवा नसतां गगन त्याप्रमाणें परब्रह्म सघन होय. याच दाखल्यावरून अष्ट देहांचें निरसन करून पाहावें. ब्रह्मांडपिंड उभारतो आणि संहारतो. ब्रह्म हें या दोन्ही स्थितींपासून भिन्न असून तें विमल आहे, परंतु विमल असें जें ब्रह्म तें निश्चल व निर्मळ असून अनंत आहे व तें **विचारोनि विवरे तत्काळ ॥ तद्रूप होय ॥** पदार्थ, मन, वाचा, मी, तूं—सर्व कांहीं देवाचें आहे—असा जो विचार तेंच आत्मनिवेदन. प्राणीमात्रांमध्यें दिसणाऱ्या चंचलतेचा जो कर्ता, त्याचेच प्राणीमात्र जरी अंशभूत आहेत, तरी त्याचा ठाव कोठेंच लागत नाहीं. चंचळता ही स्वप्राकाराप्रमाणें असून, निश्चल देव निराकार व अव्यय असून अनंत आहे. जेथें आपल्यासच ठिकाण नाहीं तेथें आम्ही आपण आणि तूंपण हीं कोठून येणार ? जेथून मीपणाचा अहंकार नष्ट झाला तेथें भांडण्याला दुजाभाव कधींही राहात नाहीं. सर्व तें आपण आणि आपण

तें सर्व असा भास मात्र राहिला. लहान मुलें दगडांना देव करून ते एका जागीं मांडतात व त्यांची पूजा करतात, किंवा पाणी भरलेल्या घटांत दिसणारीं चंद्र-सूर्यांचीं प्रतिबिंबें पाहून ते देव आपल्या घरांत सांठविले आहेत असें म्हणतात; परंतु तो जसा भास, त्याचप्रमाणें अंधेराचा जरी मोठा पर्वत पुढें उभा असला, तरी तो उल्लंघून जाण्याला जसें आकाश आडवीत नाहीं, तद्वतच आत्मज्ञानाला भेटायला जायाला जे मध्यंतरी अडथळे दिसतात ते निव्वळ आभास असून त्यांना तुडविलें कीं, मग अंतीं जें सुख मिळतें व जी शांती प्राप्त होऊन आपला आत्मा आनंदमग्न होतो–तेंच तें होय. ”

झाडाखालीं बसून स्वस्थांतःकरणानें साधुपुरुषाचे हे विचार ऐकत असतां अर्जुनसिंहाच्या चेहऱ्यावरचे रंग फारच भराभर बदलत होते. मोठ्या गहन अशा वेदांताच्या भाषेंत ब्रह्मज्ञान सांगणाऱ्या अनेक विभूतींशीं आजपर्यंत अर्जुनसिंहाची गांठ पडली होती; परंतु इतक्या सरळ, सोप्या भाषेंत अगदीं प्रचारांतले दाखले देऊन समजूत पटविणारा एकही महंत त्याला भेटला नव्हता, त्यामुळें तो जो निरुत्साही झालेला होता, तो आतां उत्साहपूर्ण होऊन मोठा सतेज दिसूं लागला. एक राष्ट्र बनविण्याच्या त्याच्या ध्येयाला स्फूर्ती येऊन आपल्या देशबांधवांच्या भावी स्वातंत्र्याची त्याला पूर्ण आशा आली व त्याचा कंठ प्रेमातिशयानें व अलौकिक विभूतीच्या दर्शनानें जरी सगद्गद झाला होता, तरी त्यानें जो थोडासा उपदेश ऐकला, तो ऐकल्यानंतर त्याच्यानें बोलल्याशिवाय राहावेना.

“ आहाहा ! ” तो बोलला. “ सद्गुरूंच्या मुखांतून निघालेल्या अमृताच्या पर्जन्यानें या देहांत उडालेल्या भडक्याची शांति झाली. परमेश्वराचें तीर्थ जसें गोमुखांतून बाहेर पडून अनेक भाविकांचे आत्मे थंड करण्यास समर्थ होतें, तद्वतच आपल्या मुखांतून निघालेली दिव्यवाणी या कानांतून या मस्तकांत जाऊन पोंचल्यामुळें वीज जशी एकदम अंधकाराचा नाश करते त्याप्रमाणें मस्तकांतील किंतुरूप घनघोर अंधार नाहींसा झाला आहे. आतांपर्यंत जी नजर गढूळ होती ती सूर्यप्रकाशाप्रमाणें स्वच्छ झाली. ‘ वसुधैव कुटुंबकम् ’ या न्यायानें आपपरभाव या देहांतून विलयाला गेला. जें कांहीं दिसतें तें न दिसणाऱ्याचेंच अशाश्वतरूप असून ही सर्व ब्रह्माची माया आहे व माया आणि ब्रह्म हीं एकच आहेत अशी खात्री पटली. जगताची उलाढाल

करणारा जो कोणी आहे तोच परमेश्वर असून ह्या आमच्या नजरेपुढचा सर्व पसारा त्याचा संसार आहे आणि आम्ही सर्व विश्वबंधुत्वाच्या नात्यानें परस्परांशीं संबद्ध झालेले आहोंत, याबद्दलची खात्री झाली. यापूर्वीचे ह्या हृदयांत सांठवलेले जे विचार ते व सध्यां गुरूपदेशानें उत्पन्न झालेले विचार, यांतलें अंतर जर पाहिलें, तर भूत आणि मनुष्य अथवा राक्षस आणि देव यांच्यांतल्या अंतराइतके ते एकमेकांपासून दूर आहेत. महाराज, आपण दाखविलेल्या सयुक्तिक मार्गानें आतां मी जाणार व सार्थक करून घेणार! पहाडामध्यें गंगामातेच्या कांठच्या इतर जिवांत राहून आत्मानंदांत मग्न होणार. आपला अनुग्रह व्हावा. "

" तुम्हांला तुमच्या पंथांतला अनुग्रह पूर्वींच झालेला आहे." ती साधुमूर्ति म्हणाली, " आतां वेगळ्या अनुग्रहाची जरूरी नाहीं."

ज्या ठिकाणीं कांहीं अलौकिकपणा आहे अशा स्थानाला मी गुरुस्थान समजतों." मोठ्या उत्तेजित आवाजानें व शांत मुद्रेनें अर्जुनसिंह बोलला, " याकरितां आपण मला उपदेश करून पावन करून घ्यावें."

" अनुग्रहाविषयीं दुराग्रह करूं नये! कारण एकवार अनुग्रह झाला असतां पुन्हां घेऊं नये अशी शास्त्रमर्यादा आहे. तथापि तुमची मर्जीच आहे, तर श्रीरघुपतीची उपासना करावी म्हणजे झालें." ते थोर साधु गंभीर अशा चित्तवृत्तीनें बोलले.

" तो मार्ग उघड करून दिल्याशिवाय त्या मार्गानें जाणें दुरापास्त आहे." मोठ्या काकुळतीनें जरी हे शब्द अर्जुनसिंह बोलला, तरी त्यांकडे दुर्लक्ष्य केल्यासारखें मुद्दाम दाखवून ते साधुश्रेष्ठ बोलूं लागले. पण त्यांनीं आपलें बोलणें दोनच वाक्यांत थांबविलें.

ते म्हणाले, " श्रीरघुपतीच्या उपासनेचा जगद्वंद्य मार्ग परंपरेनें चालत आलेला आहे. तो दाखवायला या रामदासाची जरूरी नाहीं."

" परंपरेचे रस्ते तर अनेक आहेत." अर्जुनसिंह निश्चयी स्वरानें बोलला, " परंतु त्या परंपरेचा उपयोग कोणाला? ज्याला जें मुख्य ध्येय गांठायचें आहे तें चांचपडत शोधीत हिंडणाऱ्याला परमेश्वरी कृपेनें, देवाच्या प्रेरणेनें व माझ्या पूर्वपुण्याईनें सरळ मार्ग दाखविणारी परब्रह्मस्वरूपी संजीव मूर्ती जर आज मी माझ्या या डोळ्यांनीं माझ्यापुढें पाहतों आहें, तर मला परंपरेच्या

गुंतागुंतीच्या मार्गांचा अवलंब करून, पुन्हां न मिळणाऱ्या आयुष्यांतील काळाचा व्यर्थ क्षय करून घेण्याचें कारण काय? मीं आपल्याला माझे गुरु या हृदयांत म्हणविलें आहे. मी आपला शागीर्द झालों आहें. गुरुकडून त्याच्या शागीर्दाला जर खऱ्या रस्त्याचा मार्ग समजला नाहीं, तर शागीर्दाला शागीर्द या नांवाचा फायदा न मिळतां, त्याची त्या रस्त्यांतील गति खुंटते. म्हणून या शीखपंथी अर्जुनसिंहाला आपला शागीर्द म्हणवून आत्मानात्मविचाराचा रस्ता साफ दाखविण्याची कृपा करा आणि या देहाकडून अनुज्ञेप्रमाणें सेवा-चाकरी घ्या. "

इतकें आस्थेवाईक व प्रेमळ भाषण ऐकून कोणचा सच्छील प्राणी दुराग्रह धरून बसेल! जें कार्य ज्याला घडवून आणायचेंच आहे तें जर थोड्या कष्टानें उत्तम तऱ्हेचें पार पडतें आहे, तर इतर कामांकडे दुर्लक्ष्य करून कोण अधिक श्रम करण्याच्या व्यर्थ भानगडींत पडेल! ज्याला स्वजनहिताचा संसार मांडून स्वधर्माच्या रसानें त्याचें परिपोषण करायचें आहे व त्या संसाराचें चित्र स्वराज्यसंस्थापनेसारख्या दिव्य स्वरूपांत दाखवायचें आहे तो चालून आलेली कायमची शिकार कशी दवडणार! तेव्हां याच संधीचा फायदा घेऊन आमच्या साधुमूर्तीनें यापुढें अधिक आढेवेढे न घेतां त्या शिखांच्या गुरूला गुरूपदेश देण्याचें एकदम आपल्या मनाशीं ठरविलें.

" श्रींचें शिष्यत्व, " ती मूर्ती बोलूं लागली, " पत्करण्याचा तुमचा इरादा ज्याअर्थी दिसतो आहे, त्याअर्थी **श्रीचा दास हा रामदास** तुम्हांला गुरूपदेश द्यायला तयार झाला आहे. उद्धवा, पूजेचें साहित्य पुढें करून यांना पूजा सांग. "

समर्थांच्या आज्ञेप्रमाणें उद्धवानें पूजेची तयारी केल्यावर त्यानें सांगितल्या-प्रमाणें योग्य दक्षतेनें अर्जुनसिंहानें श्रीसमर्थ रामदासस्वामींची पूजा केली. समर्थांनीं त्याला भगवीं वस्त्रें देऊन त्याच्या कानांत श्रीरघुपतींच्या जगद्वंद्य अशा उपासनेच्या मार्गाचा गुरूपदेश केला व समर्थ बोलूं लागले.

" अर्जुनसिंह, कामक्रोधमत्सरादि षड्रिपु अंतःकरणांत जागृत होऊन जसजसे बळावत जातात तसतसें द्वैतांचें प्रस्थ वाढत जातें व तें इतकें वाढतें कीं, जें कांहीं करावयाचें तें आत्मसुखार्थच करावयाचें व परसुखाला लाथां-खालीं तुडवायचें असेंच अंतीम ध्येय होऊन बसतें. हेंच त्याचें पर्यवसान.

फार कशाला ! सध्यां ह्या हिंदुस्थानाची स्थिति जर तुम्हीं पूर्णपणें व बारकाईनें अवलोकन केलांत तर सर्वत्र तुम्हांला हेंच आढळून येईल. जित आणि जेते हीं दोन्हीं माणसेंच आहेतना ? त्यांचा ईश्वरनिर्मित धर्म एकच आहेना ? मनुष्यांनीं तयार केलेलीं धर्मबंधनें जरी अनेक असलीं तरी ईशनिर्मित धर्म एकच आहे व त्या धर्मांतील मूलतत्वें सर्व मानवी प्राण्यांना पटणारीं आहेत ना ? मग जित आणि जेते यांच्यांत सध्यां दिसत असलेला इतका राक्षसी फरक कां दिसावा ! याचें कारण अहंकार ! आत्म्याला होणारा जो अहंभाव तोच अहंकार. अहंकार हा जरी एक प्रकारचा रोगच आहे, तरी हा अहंकारच सत्र प्राणीमात्रांचे उत्पत्तिस्थान आहे. अहंकार तीन प्रकारचे आहेत. भूतादि अहंकार म्हणजे तामस अहंकार. राजस् अहंकाराला वैकारिक अहंकार म्हणतात. प्रवृत्यात्मक रजोगुणाचा हा विकार आहे. सांख्यसूत्र, सांख्यसार व सांख्यकारिका यांत यांसबंधानें स्पष्टपणा विशेष खुलाशानें केलेला आहे. अहंकाराला सचेतन धातु अथवा पुरुष असेंही म्हणतात. हाच सात्विक अहंकार. राजस् अहंकार पृथ्वीचें पालन करून भूतादिकांकडून क्रिया करवितो आणि सात्विक अहंकार आपल्या तेजानें सर्व जगाला रमवितो. सध्यां प्रचारांत—प्रपंचांत—सर्वस्वी तमोगुणात्मकच प्रवृत्ति दृष्टीस पडते. या तमोगुणात्मक अहंकारामुळेंच सध्यांचा दिल्लीपतीचा अधिकारी वर्ग मगरमस्त झालेला असून त्याच्याकडून जे सर्वत्र दडपशाहीचे अत्याचार होत आहेत ते सर्व अहंपणाचेच द्योतक आहेत. स्वार्थाकरितां—रक्तपात, खून, परनिंदा, परवित्ताभिलाष, परदाराहरण, बलात्कार वगैरे गोष्टींचें जें सध्यां हिंदुस्तानांत साम्राज्य सुरू झालेलें आहे तें अहंपणाच्या मंदिरेचें शिखर आहे. या शिखरावर आतां काय तो कळसच बसायचा राहिला आहे.

धर्मराजाचा सात्विक् व राजस् अहंकार व दुर्योधनाचा राजस् व तामस अहंकार ह्यांची भारतीयुद्धांत अखेर काय झाली त्याचा इतिहास महर्षि व्यासांनीं साद्यंत चित्रित करून ठेविला आहे. अहंकार—महत्वाकांक्षा ही अलबत प्रत्येकाला असलीच पाहिजे; परंतु ती त्रिगुणात्मक—त्रिगुणमिश्रित अशी मर्यादित असली पाहिजे. ज्याला महत्वाकांक्षा नाहीं तो मनुष्यच नव्हे. महत्वाकांक्षेनें देवलोक किंवा नरक यांची प्राप्ति होते. तद्वतच ती देव जोडते अथवा तोडते. याचें कारक अहंकाराचा भिन्न गुणधर्म

हेंच होय. याकरितां त्या अहंकाराचा मार्ग आणि सीमा हीं सुविचारांनीं आणि मर्यादित अशींच असलीं पाहिजेत. एक राजा दुसऱ्यावर स्वार्थप्रेरणेनें चाल करून जाऊन त्याचें सिंहासन बळकावतो. महत्वाकांक्षेनें व्यापारी, सट्टेबाज, जुगारी वगैरे लोक थोड्याफार फरकानें अहंकारप्रेरित झालेले असतात. लेखक आणि वक्ते यांच्या चळवळीचें सूक्ष्मरीतीनें निरीक्षण केलें असतां, ते सर्व स्वसुखाच्या लालसेनें प्रेरित होऊन महत्वाकांक्षेलाच बळी पडलेले स्पष्ट दिसतात. एकंदरींत काय, कीं, अहंकाराची चळवळ जगांत अक्षय चालू आहे, म्हणूनच हें जग अस्तित्वांत आहे. सुंदर नगरें, देवालयें, तलाव, धरणें, कालवे, सरोवरें, अनेक प्रकारच्या घडामोडी, राजकारणें, राज्यें, लढाया, राज्यांचा लय आणि संस्थापना या सर्वांचा लय होऊन अव्यवस्थित असें वाढलेलें रान अथवा उकीरडा याप्रमाणें हें जग होऊं नये अशीच मानवी महत्वाकांक्षा असते. अनंत कालाच्या अगाध उदरांत या पृथ्वीवर किंवा आकाशांत ज्या घडामोडी एकसारख्या चालू आहेत, आजपर्यंत घडल्या आहेत किंवा भविष्यत् काळीं घडतील त्या सर्वांचें मूळ या महत्वाकांक्षेतच आहे. अहंपणा हें एक तेज आहे. त्या तेजाचा प्रकाश निरनिराळ्या भावनेप्रमाणें निरनिराळ्या रंगांचा पडलेला अनुभवाला येतो व त्याच मानानें त्याचें पर्यवसानही भिन्न रंगांतच झालेलें दृग्गोचर होतें. रावण व रामचंद्र हे दोघेही तेजस्वी व महत्वाकांक्षी होते; पण त्यांच्या महत्वाकांक्षेच्या मूर्तीचें स्वरूप भिन्न होतें, त्यामुळें त्यांच्या त्या महत्वाकांक्षांच्या तेजांचा प्रकाश परस्परविसदृश असा पडलेला आपण पाहातों. जगांत जे अनेक अन्याय घडतात, अपराध्यांनीं तुरुंग भरतात, रक्ताच्या नद्या वाहतात, हाडांच्या राशी पडतात, सहस्रावधि धर्मपत्न्या विधवा होतात, लक्षावधि निरपराधी मुलें पोरकीं होतात, या सर्वांचें आदिकारण हें द्वैतच आहे. ”

हें सर्व बोलणें शांतपणें ऐकून घेतल्यावर **अर्जुनसिंह** स्वस्थचित्तानें म्हणाला, “ अशा तऱ्हेच्या या रंगबिरंगीच्या फेऱ्यांत सर्व जग सांपडल्यामुळेंच बघावें तिकडे भांडण—तंट्यांचेंच साम्राज्य—पसरलेलें दिसून येतें. हें द्वैत हें एक मोठें जालीम वीषच आहे. मोठमोठ्या असाध्य रोगांवर अलौकिक हकीमांनीं जशीं औषधें निर्माण केलीं आहेत—”

“ तद्वतच, ” **समर्थ** म्हणाले, “ या मानसिक रोगावर महात्म्यांनीं ‘विचार-

विवेक' ह्या औषधी योजून त्याचें निवारण होईल असें केलें आहे. मुख्य साधन भावना चांगल्या आणि दृढतम होणें हीच गोष्ट यांत मुख्य आहे. मनुष्य कितीही दुष्ट आणि स्वार्थवादी असला तरी त्याच्या कुटुंबांतलीं माणसें जशीं त्याला आत्मवत् वाटतात, म्हणजे त्याच्या कुटुंबांत त्याच्या द्वैताचा अंतर्भाव होतो, तीच स्थिति राष्ट्रासंबंधानें राजाची आहे. राजाच्या मनांत जसा त्याच्या कुटुंबाच्या बाहेरच्या माणसांचा समावेश होतो तद्वतच राजगुरूचा अंतर्भाव राजासकट राष्ट्राचा होतो. आर्य आणि महंमदी या दोन धर्मांच्या एकीकरणाचा जो तुमचा शीख धर्म तो जर सध्यां तुम्ही आपल्याला राजगुरु म्हणवून चालवीत आहांत, तर तुम्हीच तुमच्या शीख राष्ट्राचे अंतर्भाव ठरत आहांत."

मोठ्या उमेदीनें, "आणि आपण माझे ज्याअर्थी गुरु झालां आहांत," **अर्जुनसिंह** बोलला, "त्याअर्थी आपणही आमच्या शीख धर्माचे अंतर्भाव झालां आहांत!"

"यावरूनच," **समर्थ** म्हणाले, "आतां सहज लक्षांत येईल कीं, मनुष्य पूर्ण द्वैतवादी झाला म्हणजे तोच अद्वैतवादी ठरतो, आणि ह्याच द्वैताच्या सुखाचें चिन्ह आत्म्याची पवित्रता होय. या आमच्या स्वच्छ-निष्कलंक— आत्म्याच्या पावित्र्याची खूण जगाला पटविण्याकरितांच आम्ही हीं अग्नीच्या रंगाचीं हुरमुजीं वस्त्रें परिधान करीत असतों व तुम्हांलाही ही भगवी कफनी याच उद्देशानें दिली आहे."

"आतां आपण" **अर्जुनसिंह** मोठ्या नम्रतेनें म्हणाला, "जे माझे प्रत्यक्ष आत्मे बनलां आहांत त्या पवित्र आत्म्याची प्रखरता अग्निशिखेप्रमाणें असते असें जगाला समजावें म्हणून आपण जी ही कफनी मला प्रसाद म्हणून दिली आहे तिनें जरी मी कृतकृत्य झालों आहें, तरी ज्या सत्पुरुषापासून अशा तऱ्हेचा हा बिनमोल खजीना मिळाला आहे त्याची कांहीं तरी खूण—ज्या आमच्या शीख धर्माला खरा रस्ता दाखवून आपण पुनीत केलें आहे—त्याच्या मस्तकावर शोभण्यासारखी सदोदित असावी अशी माझी इच्छा आहे. इतकेंच नव्हे, तर हा देह **श्रीसमर्थांचा** बंदा गुलाम असून यांतील आत्मा शागीर्द आहे हें इतिहासांत नमुद व्हावें म्हणून आपलेपासून कांहीं तरी निशाणीची चीज मला मिळावी."

आपल्या अंगावरची छाटी **अर्जुनसिंहाला** देऊन **श्रीसमर्थांनीं** कुबडी-तला सळ बाहेर काढला व ती कुबडी नागव्या सळासह त्याच्या हातांत देऊन म्हटलें कीं, " जोंपर्यंत तुमचा शीख पंथ कायम आहे, तोंपर्यंत तुमच्या अमृतसरच्या मुख्य देवालयाच्या शिखरावर या छाटीचें भगवें निशाण फडकावून ही कुबडी व हिच्यांतील सळ हेंच तुमचें दैवत असें तुम्हीं समजावें. "

" याबद्दल " **अर्जुनसिंह** प्रेमानें म्हणाला, " गुरुदक्षिणा काय दिली असतां **समर्थांना** बरें वाटेल ? "

" आर्यधर्मसंरक्षकांशीं अद्वैतानें वागण्याच्या कबुलायतीनें आम्हांला गुरु-दक्षिणा पावेल. " **समर्थांनीं** गंभीरपणानें उत्तर दिलें.

" आर्यांचा वैदिक धर्म, " **अर्जुनसिंह** आनंदानें बोलूं लागला, " आणि आमचा शीख पंथ यांचा अंतरंग आपल्या गुरूपदेशानें एकच झालेला आहे. यास्तव आजपासून आम्ही शीख पंथाचे लोक आर्यधर्मीयांशीं बंधुत्वाच्या नात्यानें वागून या जगांत आपला बंदा शागीर्द या बाण्यानें अंगीकृत कार्य आतां मी मोठ्या उल्हासानें करीन. "

" या तुमच्या भाषणानें, " **समर्थ** बोलले " आम्ही गुरुदक्षिणा घेऊन पावलों. सध्यां सर्वत्र चालू असलेल्या अनेक तऱ्हांच्या स्वार्थी बंडाळ्यांना नामशेष करण्याकरितां परमेश्वरानें दक्षिणेंत भोसल्यांच्या घराण्यांत **शिव** नांवानें अवतार धारण केलेला आहे. अवतारकृत्य मानवी स्वरूपांत राहून पार पाडण्याच्या कामीं स्वाभाविक सृष्टीनियमाप्रमाणें अनेक अडचळे हे यायचेच. त्याचप्रमाणें **शिवबालाही** स्वधर्म रक्षण करून स्वराज्यस्थापना करण्याच्या कामीं अनेक विघ्नें येतीलच. हिंदुस्तानचें एकछत्री साम्राज्य आर्यांनीं करावें अशी सध्यां प्रभूची इच्छा दिसते आहे. या कामीं आमच्या **शिवबावर** जर या प्रांतांत मार्गेंपुढें एखादा भयंकर प्रसंग आला, तर तुम्ही त्याला त्यांत मदत करून आर्यधर्मरक्षणाला हातभर लावला पाहिजे. "

" या आपल्या आज्ञेचें उल्लंघन कधींच होणार नाहीं याबद्दल शपथ प्रमाण. " **अर्जुनसिंह** मोठ्या अभिमानानें बोलला.

" असें करण्याचें ब्रीद जोंपर्यंत तुम्ही कायम ठेवाल, तोंपर्यंत तुमच्या-सारख्या श्री रघुपतीच्या दासाकडे वक्र दृष्टीनें पाहण्याची कोणाचीही ताकद

होणार नाहीं!" **समर्थ** म्हणाले, " हाच आमचा आशीर्वाद तुमच्या हृदयांत जतन करून ठेवा."

**" समर्थाचिया सेवका वक्र पाहे।**
**असा सर्व भूमंडळीं कोण आहे॥**
**जयाची लिला वर्णिती लोक तीन्ही।**
**नुपेक्षी कदा रामदासाभिमानी॥ ७॥**

जय जय रघुवीर समर्थ!"

**समर्थ** एकदम उठून उभे राहिले व नेहमींच्या पद्धतीप्रमाणें झपाटयानें त्या पाहाऱ्यांतून चालूं लागले. त्यांच्या मागोमाग **उद्धवही** वरील ' **समर्थाचिया०** ' हा श्लोक म्हणत निघाला. त्या दोघांच्या चालण्याच्या त्वरित गतीबरोबर चालणें **अर्जुनसिंहाला** कठीण होतें. **समर्थ** एकदम उठून चालूं लागले, ते थोडक्याच अवकाशांत **उद्धवासह** दिसेनासे झाले. त्यांच्या त्या अलौकिक तेजानें स्तिमित झालेला **अर्जुनसिंहही** घडलेल्या सर्व प्रकाराबद्दल विचार करीत रस्ता आक्रमूं लागला. याप्रमाणें ' पंथ दोन पण काज एक ' म्हणून, **समर्था**सारख्यांनीं शीख **गुरुकडून श्रीशिवराया**करतां उत्तर दिशेला हें प्रथमचें महत्कार्य करून ठेवलें.



# प्रकरण तिसरें.

## परके मालक आणि आम्ही चोर काय?



वनांनीं रजपूत घराण्यांची रजपुतान्यावर अनेक स्वाऱ्या करून जी दुर्दशा उडविली तिचा परिणाम असा झाला कीं, तीं घराणीं देशोधडीस लागलीं. त्यांनीं परकीय यवनांची जरी थुंकझेली केली, तरी येणाऱ्या प्रसंगाला न भितां छाती ठोकून त्यांच्याशीं सामना देणें हें जें क्षत्रियाचें कर्तव्यकर्म त्याला अनुसरून, त्यांनीं आपलें वर्तन ठेवून स्वधर्माचें रक्षण केलें. हा काळ म्हणजे असा चमत्कारिक होता कीं, आर्यांचे सर्व वर्ग लुप्तप्राय होऊन त्यांचा चाहांता मानवी कोटींत कोणीच राहिला नव्हता. जसवंतसिंहासारखे रणबहाद्दरही ह्या काळीं दिल्लीपतीचे बंदीजन बनलेले होते. यवनांच्या गोषांत—खुषीनें अथवा बलात्कारानें—रजपूत स्त्रिया नाइलाजानें खेंचल्या गेल्या होत्या. वाटेल तसे कर लादल्यामुळें प्रजा हताश व बेदील झालेली होती. हिंदु स्त्रियांना एकटेंदुकटें नदीनाल्यांवरून जाणें फारच धोक्याचें झालें होतें. 'राजा बोले दळ हाले' या न्यायाचा अंमल सर्वत्र पसरला असल्यामुळें आणि विजापूरची बादशाही सर्वस्वी इष्कबाज बनल्यामुळें राज्यांतील अधिकारी व त्यांचें मनःपूत वर्तन हेंच काय तें प्रजेच्या एकंदर सुखासमाधानाचें साधन होऊन बसलें होतें. विजापूरची बादशाही म्हणजे तिनें प्रजेच्या कल्याणाकरितां नेमलेल्या अधिकाऱ्यांच्या मनःपूत इच्छेवर राजकारभार करणारी एक विषयविलासांत लोलुप झालेली मुरदाड संस्थाच होऊन बसली होती. अशी ही यावेळची अंमलदारांच्या अधिकारशाहीची स्थिति अन्यायमूलक तत्त्वांवर सुरू असल्यामुळें प्रजेवर केव्हां व कसा जुलूम होईल याचा कांहींच नेम राहिलेला नव्हता. ज्ञानवान माणसांची जर ही स्थिति होती, तर मुकीं जनावरें आणि निरुपद्रवी पांखरें यांची दुर्दशा विचारूंच नका. आर्यधर्मीयांचा प्राण, कलेजा, पावित्र्य, धर्मधन आणि जीविताचें साधन अशा ज्या अत्यंत पवित्र मानलेल्या गोमाता त्यांचा वध भर रस्त्यावर दिवसाढवळ्या हिंदूंच्या छातीवर पाय

देऊन यवनप्रजा करीत होती व हिंदु लोक तें सर्व मुकाट्यानें सहन करीत होते. विजापूरचा दरबार ज्यांनीं आपल्या हुकमतींत ठेवला होता व जे विजापूरची बादशाही कायम राखण्यासाठीं रात्रंदिवस आपलें शिर तळहातावर घेऊन झटत होते अशा त्यावेळच्या मराठे रणधुरंधरांना ही सर्व स्थिति समजत नव्हती असें नाहीं, परंतु त्यावेळचे ते मराठे दिल्लीपतीच्या स्वैर आचरणाला त्रासून देशोधडीं लागलेले मूळचे क्षत्रिय वीर असतांही त्यांच्या धमन्यांतील रक्त परिस्थितीच्या अनुषंगानें व शांतपणानें जरी वाहात होतें, तरी त्यांतला त्वेष व सूड यांचा नायनाट झालेला नव्हता. शहाजीराजांच्या शब्दाशिवाय विजापूरच्या बादशाहीचें पानही हालत नव्हतें. असें जरी होतें, तरी ज्याला स्वजनबांधवांची काडीमात्रही मदत नव्हती असा एकटा शहाजीसारखा पुरूष दरबारांतील आपली वजीरी संभाळणार किंवा देशद्रोही अशा आपल्या जातभाई मराठ्यांना आपलेसें करून राजकर्त्यांना वळणावर आणण्याचें काम करणार आणि फितुरीच्या पाशांत सांपडून सर्वस्वाची होळी करणार ? करणार तरी काय ? लिंबाळकरासारख्या यवनपक्षीय मराठ्यांनीं स्वधर्मावर लाथ मारून विजापूरच्या बादशाहींतल्या एखाद्या बटिकेवर आषक होऊन स्वजनद्रोह आणि जन्मभूमातेची विटंबना ज्याकाळीं मोठ्या ताठ्यानें चालविली होती अशा वेळीं एकटा बिचारा विजापूरचा वजीर शहाजी हताश न होईल तर काय होणार ! याचमुळें जे रोज अत्याचार होत होते व राजधर्मीयांचें कोड पुरवून हिंदूंना अन्यायानें वागविण्यांत येत होतें तें त्या बहाद्दराला निमूटपणें सहन करावें लागत होतें.

एके दिवशीं सकाळींच राजकारभारांतील कांहीं गुंतागुंतीचे प्रश्न स्वतःशींच शहाजीराजे सोडवीत बसले असतां, त्यांच्यापुढें एक हलकाऱ्या येऊन उभा राहिला व त्यानें मुजरा करून तरूण शिवाजीला गिरफदार करीत असल्याची बातमी दिली. ही बातमी ते ऐकताहेत तोंच त्यांच्या वाड्याबाहेर मोठा गल्का चालला असल्याचा आवाज त्यांच्या कानांवर येऊन आदळला. ते एकदम उठून उभे राहिले. त्यांनीं हातांत तमंचा घेतला व हलकाऱ्याला पुढें होण्यास सांगून ते त्याच्या पाठोपाठ रस्त्यावर जाण्यास निघाले.

" सोडा, हरामखोरांनो, सोडा मला ! " बाल शिवाजीचे हे शब्द होते; पण ते कोठें व केव्हां होते ? ज्यावेळीं शहाजीराजे हलकाऱ्याकडून आपल्या

दिवाणखान्यांत शिवाजीसंबंधानें बातमी ऐकत होते त्यावेळचे त्यांच्याच वाड्यापुढील रस्त्यांत निघालेले होते व ते त्यांच्या कर्णरंध्रांत शिरले होते. त्यांनीं हातांत तमंचा धरून निघण्याचें कारण तरी हेंच. त्यांच्या मुलाच्या जिवावरचें हें संकट होतें. रस्त्यांत अनेक लोक जमले होते व त्यांचा भयंकर तंटा सुरू होता. शिवाजीला मुसलमान खाटकांनीं धरला होता. तो तेरा चौदा वर्षांचा बच्चा त्यांच्याशीं मोठ्या हिकमतीनें झुंजत होता. वरील शब्द त्याचेच होते.

"सोडा, हरामखोरांनो, सोडा मला!" शिवाजी मोठ्या त्वेषानें बोलला. "या आर्यभूमातेवर गोवध करतां काय? चोरांनो, परक्याच्या देशांत घुसून चोरट्या टोळधाडीप्रमाणें आमचा फन्ना उडवूं पाहातां होय? चला सोडा, दूर व्हा! नाहींतर ही बालरवीप्रमाणें आपली रक्तप्रभा फांकविणारी समशेर—ही त्या शिवाजीची तलवार—उष्णतेचा ताप सहन न झाल्यामुळें भुंगा जसा कमळाची कळी वरून फाडून बलात्कारानें कमळांत घुसतो व थंड होतो, त्याप्रमाणें तुमच्या काळजाचा ठाव घेईल हें पक्कें लक्ष्यांत ठेवा!"

"अरे, जा जा!" एक खाटीक मगरुरीनें बोलला. "असले चुव्वे पुष्कळ बघितले आहेत! मोठ्या लंग्याचवड्या जवान मर्दांच्या बाता मारणारे कोल्हे असे पुष्कळ बघितले आहेत. मगरुरीच्या गोष्टी कोणाला सांगतोस?"

"त्याचे ते खून चढलेले डोळे तर पाहा." दुसरा खाटीक बोलला.

"हत्तीचें गंडस्थळ फोडणाऱ्या सिंहाचे डोळे असेच असतात!" असें शिवाजीनें त्याला उत्तर दिलें.

"आतां तोंड बंद करतोस कीं घालूं कोलदांडा? वय किती आणि शेखी केवढी! सिंहाच्या गोष्टी सांगून आम्हांला भेवडावतोस होय! तुझी ती शेखी बस् कर." तिसरा खाटीक मोठ्या तोऱ्यानें बोलला.

"काय, शेखी?" शिवाजीनें जोरानें विचारलें.

"हो हो शेखी! तुझी ती घमेंड पुरे कर!" चवथा खाटीक बोलूं लागला. "आदिलशाहींत या असल्या मगरूरीच्या गोष्टी चालायच्या नाहींत, समजलास! अतांच्या आतां तुला कोतवालींत नेऊन गरिबनवाज बादशहाच्या तक्तापुढें उभा करतों. चला, याला घेऊन चला! गांठ आम्हां राजकर्त्यांशीं आहे हें ध्यानांत ठेव!"

"कुठले रे तुम्ही चोरटे राजकर्ते आणि कोठला तुमचा कोतवाल! बेबंद-

शाहींतल्या असल्या नोकरशाहीच्या जुलमी कायद्यांची अम्मलबजावणी हें आमच्या नाशाचें उद्योग आणि स्वतःच्या चैनीची कर्तबगारी आहे हें न समजण्याइतके आतां आम्ही भोळे राहिलों नाहींत हें पक्कें लक्षांत ठेवा. हा बच्चा ईश्वराच्या हुकुमाशिवाय दुसऱ्या कोणाच्याही हुकुमाला आणि कायद्याला मान देणार नाहीं, समजलांत ? तुमचा बादशहा आमचा कोण ? ना एक धर्मीय, ना एक जातीय ! त्याला लवून मुजरा करणारे आम्ही जिंकलेले शिपाईगडी नसून जात्याच स्वधर्म रक्षक शिपाई आहोंत. आम्ही आर्यवीर तुमच्या बादशहाच्या ताटाखालचीं मांजरें नसून स्वतंत्रतेंत विहार करणारे रणशूर आहोंत. आम्ही बंदीजनांप्रमाणें तुमच्या बादशहाला खडी ताजीम देऊन त्याच्या तंबाखूच्या पिचकाऱ्या झेलण्याकरितां पिकदाण्या त्याच्यापुढें करणारे नसून त्याच्या मिरवणुकींतल्या हत्तीवरच्या हुक्याचे नेचे धरून पायदळ चालणारे त्याचे गुलामही आम्ही नाहीं हें पक्कें लक्षांत ठेवा ! आम्ही तुमच्या बादशहाकडून खडी ताजीम घेणारे आर्यवीर आहोंत हें तुम्ही विसरलां आहांत. त्याचीं फळें तुम्हांला लवकरच चाखायला मिळतील. ”

अशा तऱ्हेची बाचाबाची व धिंगामस्ती रस्त्यांत चालली असतां **शहाजी**राजे मागें सांगितल्याप्रमाणें आपल्या दिवाणखान्यांतून निघून तेथें आले व त्यांनीं तो तेथील प्रकार पाहून एकदम “ खामोष ” म्हणून रणांगणांतील फौजेला देण्याच्या हुकुमाच्या आवाजानें ओरडले व त्या गर्दींत शिरून बोलूं लागले. त्यांच्या पाठोपाठ त्यांचे शिपाईप्यादेही हत्यारें घेऊन गर्दींत घुसले.

“ चला हटा ! काय दंगा आहे ! एकदम खामोष ! ” **शहाजीराजे** मोठ्या गंभीर आवाजानें ओरडले. पुढें ते बोलले, “ सोडा त्याला । असल्या बादशाही रस्त्यावर ह्या **शहाजीराजा**च्या मुलाशीं तुम्ही मारामारी करतां, याची तुम्हांला शरम नाहीं वाटत ! बादशाही कायद्यानें एका घटकेच्या आंत तुम्हां सर्वांना कोलदांडे घालून फरमास तंबी देण्याची माझ्या अंगांत ताकत आहे हें तुम्ही विसरलां होय ? बादशाही अंमलाची अमलबजावणी करणाऱ्या ह्या मुख्य वजीराला तुम्ही ओळखत नाहीं काय ? ज्याला घाणही नाहीं आणि वासही नाहीं अशा भयोत्पादक रणभूमीची आठवण करणारा गुलतुऱ्याचा किंवा शंकासुराचा मोहोर छाटून टाकायला माझ्यासारख्याला वेळ किती लागणार ! ”

हें भाषण ऐकून गर्दीतली सर्व मंडळी स्तिमित झाली. त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. शहाजीराजांचा तो वजनदार आवाज व ती क्रोधायमान झालेली वचक बसवणारी मुद्रा पाहून रस्त्यांतील गर्दी हलके हलके पातळ होऊं लागली. आपण या दंगलींत जर कदाचित् पऱ्हेज झालों, तर सरकारमार्फत काय शासन होईल या भीतीनें गर्दी फारच लवकर कमी होत जाऊन शेवटी शहाजीराजांच्या शिपायांनीं ती पार मोडून टाकली. त्या ठिकाणीं फक्त चार खाटिक, शहाजी, शिवाजी आणि आठचार शिपाईप्यादे इतकीच मंडळी शिल्लक राहिली.

"साहेब, खाविंद," एक खाटीक बोलूं लागला. "आपल्या या छोट्या मुलानें आमच्या घरांतील एका आमच्या नातेवाईक जवान खाटकाचा विनाकारण प्राण घेतला!"

"हें बोलायला तुला शरम नाहीं वाटत?" शहाजीराजे बोलले. "याचें वय काय? तुम्ही केवढे? हा एकटा! तुम्ही किती तरी!"

"एकटा माणूस पाहून," दुसरा खाटीक बोलूं लागला, "यानें त्याला ठार केला."

"असें कसें होईल?" शहाजीनें प्रश्न केला.

"झालें तर खरें." तिसरा खाटीक बोलला.

"तो केवढा होता?" शहाजीनें चबकस मुद्रेनें व आवाजानें विचारलें.

"पंचवीस वर्षांचा जवान होता." चवथ्या खाटकानें उत्तर दिलें.

"तो इतका मोठा जवान गडी असतां त्याला यानें मारलें?" शहाजी म्हणाला, "अगदीं झूट!"

"खुदाकसम," पहिला खाटीक बोलूं लागला, "हें अगदीं सत्य आहे. हें आमचें म्हणणें खरें आहे कीं खोटें आहे हें यालाच विचारावें!"

शहाजीनें शिवाजीला विचारलें "कायरे, खरी हकीकत काय आहे?"

"मीं खून केला ही गोष्ट खरी आहे!" शिवाजीनें सांगितलें! "पण तो न्यायानें केला हेंही खरें आहे!"

"काय, न्यायानें?" शहाजीनें विचारलें, "तो कसा काय!"

"खऱ्या मराठ्याला कधीं गोवध खपेल काय?" शिवाजीनें प्रश्न केला.

"नाहीं." शहाजीनें उत्तर दिलें.

" तर मग इथेंच न्याय झाला. " शिवाजीनें सांगितलें.

" हा न्याय मराठी राज्यांतला आहे. " शहाजी बोलूं लागला. " मुसलमानी रियासतींत हा मोठा अपराध गणला जातो. "

" आपण माझे जन्मदाते आहांत ! ' शिवाजी मोठ्या लीनतेनें व कष्टी मनानें बोलूं लागला. " वाटेल तें आपण बोललां तरी चालेल. पण मी मात्र आपल्याप्रमाणें बोलणार नाहीं. हीं हाडें परकीय सत्तेच्या अन्नानें पोसलीं आहेत असेंही आपण बोललांत, तरी तें सध्यांच्या आपल्या पेशाला शोभेल. मात्र मी आपल्या या बोलण्याला मान तुकविणार नाहीं. कारण ' अंदरकी बात राम जाने.' बागेंतल्या झाडांना पाणी घालून त्यांची शुश्रूषा जरी माळी ठेवतो, तरी तें पाणी कोणाचें असतें ? जंगलांतलीं स्वेच्छेनें वाढलेलीं झाडें उपवनांतल्या झाडांप्रमाणें जरी गोंडस दिसत नाहींत, तरी सृष्ट्युत्पादक परमेश्वर त्यांचा पोषणकर्ता असल्यामुळें कृत्रिम उपवनापेक्षां त्या नैसर्गिक रचनेचीच जास्त शोभा दिसते. तेव्हां अशा ह्या झाडांच्या पोषणासंबंधानें जो न्याय तोच न्याय इथें लागू पडत नाहीं काय ? आपल्या म्हणण्याप्रमाणें जरी धरून चाललों, तरी हा देह अशा तऱ्हेनें या जगांत दृष्टीस पडण्यास परकीय राजसत्तेची कर्तबगारी खास उपयोगी पडलेली नाहीं ! "

" तुझी जीभ फार चवचाल झाली आहे ! " शहाजी रागानें बोलूं लागला, " आतां तुझ्या बाबतींत गम खाणें इष्ट होणार नाहीं. काळ वेळ तुला कांहीं एक समजत नाहीं. तुझी धिंडका इथून पुण्याकडेच रवाना करतों, म्हणजे सगळाच बाजार आटपला. नाहींतर एखादे दिवशीं माझ्याच प्राणावर येऊन बेतायची. ए खाटकानों, जा, तुम्ही आपापल्या घरोघर जा. घडलेल्या गोष्टीबद्दल पूर्ण चवकशी करून तुम्हांला योग्य न्याय देण्यांत येईल. बिलकूल काळजी करूं नका. अगदीं बेफिकीर असा ! चल रे घरांत ! "

याप्रमाणें त्या चौघा खाटकांना आश्वासन देऊन आपल्या शिपाईप्याद्यांसह शहाजीराजे शिवाजीला बरोबर घेऊन आपल्या वाड्यांत निघून गेल्यावर ते चौघे खाटीक आपापल्या घरांकडे जातांना आपसांत पुढीलप्रमाणें बोलत चालले होते.

" काय चमत्कार ! एवढेंसें पोर, पण जशी बिजली ! कायरे, परगोलखां, त्या पोराच्या चपळपणाची स्तुतीच करायला नको का ? "

" हां हां अंगरखा ! यांत काय संशय ! सशानें आपलीं नखें वाघावर चालवून त्याला गतप्राण करणें ही गोष्ट कांहीं सामान्य नाहीं. "

" अगदीं असामान्य ! सामान्य कोण म्हणेल ? " दुसरा खाटीक आश्चर्यभरित मुद्रेनें म्हणाला. " पण आश्चर्याची गोष्ट ही आहे कीं, या लडक्याचा बाप शहाजी आपल्या बादशहाच्या तख्तापुढें रोज हजारों वेळां मुजरा करणारा असतां, त्याचा मुलगा बादशाही अधिकाराकडे करड्या नजरेनें बघणारा निघावा याचें कारण काय ? हें असें कसें विपरीत झालें ? अल्ला हुताला अशी कशी पैदाषत करतो ! गरीब मांजरापाशीं वाघाचीं नखें असावीत अशांतलाच हा प्रकार नाहीं का ? काय ही परमेश्वरी योजना ! "

" चला ! आज या शहाजीच्या पोरानं जी धुमाकूळ केली आहे त्याचा बदला मिळण्याकरितां आपण आतां खुद्द गरीबनवाज बादशहांकडे आत्ताच्या आत्तां दाद लागून घेण्याकरतां असेंच जाऊं या. " तिसरा खाटीक रोषयुक्त मुद्रेनें बोलला. " या बाबतींत आपण जर आतां शहाजीकडून न्याय मिळणार म्हणून स्वस्थ बसलों तर आपण राजाचे धर्मबंधु व जातबंधु कसले ? सगळं जग आपल्या तोंडावर थुंकेल. इतकेंच नाहीं तर या मराठ्यांचा–या हिंदूंचा–वरचष्मा आमच्यावर होऊन आम्हांला लज्जेनें माना खालीं घालाव्या लागतील ! "

" यांत काय संशय ! "

" काय भांचोद एवढ्याशा काटर्याची जवामर्दी ! "

" चेहेरा तरी किती उग्र ! प्रति सूर्यच ! "

" आपण तर बुवा त्याला बघितल्याबरोबर घाबरूनच गेलों ! "

" अरे, मी तर पळ काढण्याच्याच बेतांत होतों ! "

" पण झपाट्यासरसा याच बहाद्दरानें त्याला प्रथम गिरफदार केला. "

" पण शेवटीं काय ! त्याच्या बापानें त्याला तुझ्यापासून सोडवून नेला ! "

" चला, गरीबनवाजसाहिबाकडे समक्ष जाऊन सर्व हकीकत रुजू करूं ! "

वरीलप्रमाणें बोलत बोलत ते चौघे खाटीक रस्त्यानें जातां जातां राजवाड्याकडे वळले. बादशहाच्या वजीराच्या मुलाच्या हातून खुनासारखा जरी गुन्हा झाला होता, तरी शहाजीच्या मुत्सद्देगिरीमुळें शिवाजीला पुढें विजापुराहून त्याच्या जहागिरीच्या गांवावर हद्दपारीची जी शिक्षा झाली ती

भविष्यत्काळीं घडून यावयाच्या ईश्वरी संकेताचा पाया उकरण्याची कुदळच पडली असें म्हणायला कोण नाकारील ? **शहाजी शिवाजीला** बरोबर घेऊन जो आपल्या वाड्यांत गेला तो थेट **जिजाबाईंच्या** महालांत येऊन थडकला ! **शहाजीचा** क्रोधायमान झालेला चेहेरा व **शिवाजीचे** रक्तानें भरलेले कपडे पाहून **जिजाबाईसाहेब** अगदीं भ्रमिष्टासारख्या मतिमंद होऊन गेल्या. त्यांच्या दृष्टीस पडलेल्या देखाव्यानें त्यांच्या पोटांत एक चमत्कारिक गोळा उभा राहिल्याप्रमाणें त्यांना वाटलें. इतक्यांत **शहाजीराजे** रागानें बोलूं लागल्यामुळें **जिजाबाईसाहेबांचें** चित्त तिकडे वेधलें.

" लहान आहे जाऊं दे ! असें म्हणतां म्हणतां याचे चार फारच वाढायला लागले. आतां जर या बाबतींत गम खाल्ली, तर माझ्या सर्वस्वावर एखादे दिवशीं येऊन बेतेल ! पुणें परगण्यांतल्या माझ्या जहागिरीची व्यवस्था बघणारे **दादाजी कोंडदेव** हिशेब देण्याकरतां आयतेच इथें आले आहेत. त्यांच्या-बरोबर तुमच्यासह याला धाडावें असें माझ्या मनानें ठरविलें आहे. "

" मला बाई मोठें नवल वाटतें ! " **जिजाबाईसाहेब** आश्चर्यपूर्ण गंभीर मुद्रेनें व जरा खोंचदार आवाजानें बोलूं लागल्या. " भुंग्यानें कमळाला पीडा करण्याच्याऐवजीं कमळानें भुंग्याला ग्रासलें हें ऐकणें म्हणजे घोड्याला गाडी ओढूं लागली असें ऐकण्यांतलेंच नव्हे का ? ह्या माझ्या बाळानें त्या खाटकाला ठार मारला अशी जी बातमी आली आहे त्यांतलें गुपित मला कांहींच कळत नाहीं. माझा आबासाहेब जळांत राहून माशाशीं वैर करूं लागला हें खरें का ? "

" आई, काय सांगावें ! " **शिवाजी** संतापतप्त होऊन कर्कश्य सुरांत बोलूं लागला. त्याचे डोळे खदिरांगाराप्रमाणें लालभडक झाले. " आमच्या या आर्य-भूकमळांतला मकरंद चोरणारे हे नीच लुटारू–कृतघ्न–घातकी–यवनभुंगे दृष्टीस पडले म्हणजे तळपायांची आग मस्तकाला जाऊन, रणमदानें हें मस्तक भ्रमण पावूं लागतें ! हरघडीं घडणारीं गोवधसारखीं यांचीं अनन्वित कृत्यें लक्षांत आलीं म्हणजे ते जसे आमच्या गोमतांच्या नरडया कडाकड फोडतात, त्याच-प्रमाणें या दातांनीं त्यांच्या कडाकड फोडाव्याशा वाटतात ! आमच्या देव-तांच्या भग्न केलेल्या मूर्ती व जमीनदोस्त केलेलीं देवळें पाहिलीं म्हणजे त्यांच्या मशीदी, दर्गे पाहून त्याच दगडांनीं आपलीं देवळें उभारण्याचा

प्रयत्न करण्याविषयीं हे हातपाय स्फुरण पावूं लागतात. यांचा हरएक माणूस मिजाशींत असलेला दृष्टीस पडला म्हणजे आमच्या हिंदूंचें अस्थिपंजराचें चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें. करवसूली, शेतसारा वगैरे गोष्टींतली नौकरशाहीची अंमलबजावणी सुरू असतां आमच्या देशबंधु शेतकऱ्यांचे जे हाल होतात ते बघितले म्हणजे पोटाला पीळ पडतो ! पण उपाय काय ! ज्याचा धर्म त्याला प्यारा असून दुसऱ्याच्या धर्माचा उच्छेद करणें हें आर्यवीराचें काम नसल्यामुळें या बाबतींत स्वस्थ राहण्याशिवाय इलाज नाहीं. माझी कोणचीच कृति बाबांना पसंत होत नाहीं त्याला मी काय करणार ! "

जरा शांत होऊन, " माझ्या मताप्रमाणें वागलास, तर तुझी कृति माझ्या पसंतीला आलीच पाहिजे ! " **शहाजीराजे** बोलले.

" आपण, " **शिवाजीनें** प्रश्न केला, " कोणच्या मार्गानें मला वागायला सांगणार ? "

" परवां दरबारांत " **शहाजीराजे** खिन्न होऊन म्हणाले, " तूं बादशाही तख्ताला मुजरा केला नाहींस ! त्यामुळें हुजूरचा गुस्सा होण्याचा प्रसंग आला होता. दरबारच्या वहिवाटीला अनुसरून तुला राजसिंहासनाला मुजरा केलाच पाहिजे. "

" हें कृत्य " **शिवाजी** संतापानें म्हणाला, " आपल्या घरांत शिरून चोरी करणाऱ्याला प्रोत्साहन दिल्याप्रमाणें होणार असल्यामुळें तें मी अनीतिमूलक समजतों. "

" ऐका ! " **शहाजीराजे** उद्वेगानें बोलले. "ऐका ! आतां याचें हें भाषण तुम्हीच ऐका ! "

" बाळ, असें बोलूं नये ! " **जिजाबाई**साहेब कनवाळूपणानें बोलल्या.

" कां बरें ? " **शिवाजीनें** प्रश्न केला.

उत्तरादाखल " आपण विजापूरच्या तख्ताच्या कृपाछत्राखालीं आनंदांत राहातों म्हणून ! " **जिजाबाई** बोलल्या.

पुन्हां " असें कोण म्हणतो ! " म्हणून **शिवाजीनें** प्रश्न केला.

**शहाजीराजे** क्रोधायमान होऊन त्यांनीं एकदम " मी—मी—म्हणतों ! " असे उद्गार काढले.

**शिवाजीनें** " तें कसें ? " असें विचारिलें.

हात जोडून " हें असें ! " असें **शहाजीराजांनीं** सांगितलें. यावर त्या दोघांची पुढीलप्रमाणें बाचाबाची झाली.

" हा मार्ग बरा नव्हे ! "

" तें तूं मला शिकवायला नको ! "

" मी कोण आपणांस शिकवणार ! देवच तशी आपल्याला बुद्धि देवो ! "

" तूं आतां इथून पुण्याकडे जावेंस अशी माझी इच्छा आहे. "

" आपणही हा ' जी सरकार ' चा मार्ग सोडून तिकडे चलावें ! "

" तूं महामूर्ख आहेस ! "

" हें मात्र साफ खोटें ! आपल्या पोटीं मीं जन्म घेतला आहे. खरा मराठ्याचा बच्चा असेन तर याचा प्रत्यय आपल्याला आणून देईन ! "

" तो रे कसा काय ? आईबापांच्या मर्जीबाहेर वागणारा मुलगा शतमूर्ख नव्हे काय ? "

" नैसर्गिक राजमार्गावर निवडुंगाचें रान माजूं देऊन कृत्रिम मार्गाचा अवलंब करण्याचा उपदेश करणारीं आईबापें, स्वच्छ सूर्याच्या लख्ख प्रकाशाला तुच्छ मानून, दिवटीच्या प्रकाशाला सूर्यप्रकाशाची उपमा देणारीं नव्हेत काय ? "

" पालखींत बसून घरीं येत असतां मध्येंच उडी मारून त्या खाटकाचा प्राण घेतलास. हाच ना तुझा नैसर्गिक राजमार्ग ? "

" ह्याला खोटा कोण म्हणेल ? "

" खरा कसा ? " **जिजाबाईनीं** मध्येंच प्रश्न केला.

" आमचें पूर्वीचें रजपूत कुळ केवढें ! त्यांचा नांवलौकिक केवढा होता ! पण त्यापैकीं आतां कांहीं तरी राहिलें आहे का ? तारुण्यांत जर आपले हातपाय हालवून गेलेलें मिळवण्याच्या प्रयत्न करायचा नाहीं, तर काय म्हातारपणीं करायचा ? भयाचें पांघरूण घेऊन चोराला मलीदा खाऊं द्यायचा आणि आपल्या सध्यांच्या थुंकझेलीच्या वर्तनानें आपल्या पवित्र कुळाची, धर्माची व जन्मभूमातेची होत असलेली विटंबना आपल्यासारख्या थोर व मानी सरदारांनीं जास्त करून ध्यायची व ती आपल्या डोळ्यांनीं निमूटपणें बघून स्वस्थ बसायचेंना ! आम्ही सरदारलोकच जर असें वागायला लागलों, तर बिचाऱ्या अनाथ गरीब लोकांनीं काय करावें ? आपल्या देशमातेला त्या परकीय जुलमी हातांनीं ज्या दिवशीं आपल्या गोषांत जबरदस्तीनें खेंचली—तिच्या

वैभवी वक्षस्थलावरचा पदर बाजूला सावरून ज्या दिवशीं तिच्या भ यश्रीच्या अधिष्ठानाचा उपभोग घेण्यास अविंधांनीं प्रारंभ केला-त्या दिवशीं तिच्या पुत्रांच्या देहांतील रक्तानें तिचें वस्त्र कोणच्या बरें रंगाचें झालें असेल ? '

" बाळ, **शिवबा,** " **शहाजीराजे** मृदुस्वरांत बोलूं लागले. " तुझें म्हणणें अक्षरशः खरें आहे. पण उपाय काय ? सर्वतोप्रकारें हताश झालेल्या या आर्यभूमीच्या स्वातंत्र्याची आशा धरण्यांत आतां कांहीं अर्थ नाहीं, अशी जेथें गोष्ट आहे तेथें आपला जीव विनाकारण धोक्यांत घालून शांततेंत मग्न असलेल्या घराला स्मशान बनविण्यांत अर्थ काय ? "

" आपल्या एकट्याच्या घरापेक्षां आपल्याला आपल्या अखिल देशबंधूंच्या घरांची प्रथम काळजी घेतली पाहिजे, स्वदेशाच्या स्वातंत्र्याकरितां आपले प्राण जरी धोक्यांत पडले तरी हरकत काय आहे ? ईश्वरी न्यायाचे कायदे हेच आमच्या देशमातेचे हक्क आहेत. आम्ही तिचे सुपुत्र आहोंत! तिच्या होत असलेल्या हालांतून तिला जर आम्हीं सोडवली नाहीं, तिचे लचके तोडणाऱ्या रक्तलोभी राक्षसांच्या सपाट्यांतून तिला मुक्त करण्याचे जर आम्हीं प्रयत्न केले नाहींत, तर आमच्यावर मातृहत्येचा दोष येणार आहे. माझे देशबांधव ज्यांच्या गुलामगिरीच्या शृंखलेनें बद्धपरिकर झाले आहेत ती शृंखला दिवसेंदिवस जास्त जोरानें त्यांना आवळींत असून कांहीं दिवसांनीं तर ती शृंखला त्यांच्या देहावरील मांसांत घुसून, ह्या आमच्या हाडांचा चक्काचूर उडविणार आहे. आम्हाला ती नामशेष करणार आहे. मी जातीचा जर आर्य आहें तर माझ्या आर्यभूमातेच्या रक्षणाकरतां वाटेल तेव्हां हत्यार उचलायचा मला माझा जन्मसिद्ध हक्कच आहे. आणि त्याच हक्काच्या अधिकारानें मीं हें आजचें कृत्य केलें आहें. "

**शिवाजी**चें हें भाषण ऐकत असतां, **शहाजी**राजांचे नेत्र अश्रूंनीं भरून येऊन त्यांचा कंठ दाटून आला होता. त्यांच्या अंगांत वाहणारें रक्तच अशा तऱ्हेनें-शिवस्वरूपानें-बोलत असून भविष्यत् कालचें चित्र जणूं त्यांच्या दृष्टीपुढें उभें आहे असा त्यांना भास होत होता. त्यांचे नेत्र मध्येंच तलवारीकडे फिरत होते. त्यांच्या मुठी वळत होत्या व त्यांच्या छातीचे बंद तटाटत होते. अशा स्थितींत मध्येंच **जिजाबाई** बोलल्या.

" **शिवबा,** तुम्हांला आज झालें आहे तरी काय ? अलीकडे हें स्वदेश-

सेवेचें खूळ तुमच्या पोटांत फारच घाईनें कां शिरूं लागलें आहे? स्वदेश-सेवेला कोणचें साहित्य लागतें याची तुम्हांला कल्पना आहे का?"

"याच्या मनांत असले हे विचार जागृत होण्याला मुख्य कारण तुम्हीच आहांत!" शहाजीनें जिजाऊकडे पाहून म्हटलें. "याच्या वेळचे डोहाळे मला पक्के आठवतात. गर्भारपणांत रामायण व महाभारत ऐकण्याचा तुम्हांला जो नाद लागला होता त्याचाच हा परिणाम—अभिमन्यूप्रमाणें याच्यावर गर्भावस्थेपासून झाला आहे!"

"पण अभिमन्यूला," जिजाबाई उपरोधिकपणानें म्हणाल्या "चक्रव्यूहांतून परत येण्याचें माहित नव्हतें!"

शिवाजी छातीला हात लावून बोलला कीं, "मला तें सर्व माहीत आहे!"

"ठीक आहे तर मग! ह्या तुमच्या मातोश्री आणि तुम्ही त्यांचे चिरंजीव—संभाळा आतां! दादाजीच्या बरोबर निघण्याची उदयिक तयारी करा. हें पहा, दादाजीच इकडे आले." दादोजी कोंडदेवांकडे वळून शहाजी बोलूं लागले. "दादाजी, या बसा! तुम्ही इथें ज्या कामाकरितां आलांत तें काम कालच संपलें. आतां उदयिक पुण्याकडे जाण्याला निघण्याची तयारी करा. कारण या आमच्या आबासाहेबाला आतां इतउत्तर येथें ठेवण्याची सोयच राहिली नाहीं. तेव्हां याला याच्या मातोश्रीसह आमच्या पुण्याच्या जहागिरीवर तुमच्या शिक्षणांत ठेवण्याचा आम्हीं विचार केला आहे."

"हुजूरचा विचार युक्तच आहे!" दादाजींनीं सांगितलें. "असा विचार हुजूरनीं आतां करावा असें मी सुचविणारच होतों. इतक्यांत हुजूरचीच आज्ञा झाली!"

"कां बरें? असें सुचविण्यास कारण काय झालें होतें?" शहाजीनें रोखानें विचारलें.

दादाजी शांतपणानें म्हणाले, "सरकार, कारण पूर्वीच घडलेलें आहे. आजचा खून किंवा परवांचा दरबारचा अपमान—ह्या सगळ्या गोष्टी शिवरायांचा जन्म होण्याच्या आधींच ठरलेल्या आहेत! 'आपण स्वतां आपल्या पत्नीच्या पोटीं मानवरूपानें अवतार धारण करणार असून, गोब्राह्मणप्रतिपालक व राज्याश्रममुनि बनणार आहोंत' असा प्रसन्न होऊन श्रीशंभुमहादे-

बानीं यांच्या जन्माच्या आधींच आपल्याला दृष्टान्त दिलेला आहे. त्याचवेळीं ' यांना बारा वर्षांनंतर संनिध ठेवूं नये ' असेंही दृष्टांतांत सांगितल्याचें हुजूरला स्मरत असेलच. तेव्हां आतां काय ? यांना पंधरा वर्षे पुरीं होत आलीं. ईशाज्ञेप्रमाणें दूर करणेंच श्रेयस्कर आहे ! "

" शंभुमहादेवाच्या कृपेनें " जिजाबाई बोलल्या, " आणि तुळजा-पुरच्या जगदंबेच्या दयेनें—आतां होणाऱ्या ताटातुटीचा शेवट गोड होवो म्हणजे झालें ! "

" बाईसाहेब, " दादोजी बोलले, " तो होणारच ! त्यांत विशेष काळजी ती कसली ? रात्रीचा नाश होण्याची वेळ जसजशी समीप येऊं लागते तसतशी पूर्वदिशा लालभडक होते, व रात्रीचा पुरता नाश झाल्यावर, ती रक्तिमा पूर्ण नाहींशी होऊन, रात्रीच्या दुःखांत विलीन झालेल्या वस्तु प्रभात-काळीं वर्षणाऱ्या शुद्धदवानें प्रफुल्लित होऊन, सूर्योदयाच्या ऐश्वर्यांत चकाकूं लागतात. हीच स्थिति—यावनी तिमिराचा नाश आणि वैदिक धर्ममार्तंडाचा उदय—यांची होणार आहे ! "

" या दोघांनां तुम्ही बरोबर घेऊन गेल्यावर पुढें व्यवस्था कशी काय करा-यची, याबद्दलचा सर्व बंदोबस्त जरी मी तुम्हांला सांगणार आहें, तरी तुम्ही योग्यच आहांत ! " शहाजी प्रेमानें बोलला. " सर्व सुरळीत चालेल व तुमच्या शिक्षणानें हा आमची जहागीर उत्तम तऱ्हेनें वहिवाटून आमच्या आश्रित जनांची सहानुभूति मिळवील अशी आमची खात्री आहे. माझी आतां दरबारला जायची वेळ झाली. मी जातों आतां ! "

याप्रमाणें भाषण करून शहाजीराजे तेथून उठून निघून गेल्यावर पुरा-णिकबोवांकडून घरांतून पुराणश्रवणाला येण्याचा निरोप आला म्हणून जिजा-बाईसाहेब व दादोजी कोंडदेव तिकडे जाण्यास निघालीं. जातांना शिव-रायालाही त्यांनीं बोलाविलें.

" बाळ, पुराणिकबोवा आले ! येतोस ना तूं पुराण ऐकायला ? "

" चला—कपडे बदलून पाठोपाठ आलोंच ! " शिवबानें उत्तर दिलें.

जिजाबाईच्या पाठोपाठ दादोजी कोंडदेव घरांत निघून गेले व त्यांच्या मागोमाग शिवाजीही जाऊं लागला. शिवाजीनें जामदारखान्यांत जाऊन कपडे बदलले व कपडे बदलतांनां त्याचे जे स्वगत विचार चालू होते ते—' आतां आपण पुण्याकडे गेल्यावर असें असें करूं. आपण आतां लवकरच या

पिंजऱ्यांतून सुटून रानटी वाघाप्रमाणें स्वातंत्र्यांत इतस्ततः भ्रमण करूं वगैरे वगैरे' पुढील मासल्याचे होते.

" रामायण आणि महाभारत या पुराणांचें बारकाईनें श्रवण केल्यामुळेंच तर असले हे तरंग माझ्या हृदयांत एकावर एक उठत नाहींत ना? भरतखंडाची सांप्रतची स्थिति ऐकून व अवलोकन करून स्वदेश आणि स्वधर्म यांच्या वात्सल्याचें तीव्र विष या देहांत इतकें जोरानें पसरलें आहे कीं, त्याच्या उतानखाट वेगानें या शरीरांतल्या सर्व धमन्या व स्नायू जोर करूं लागून, गोब्राह्मणप्रतिपालनार्थ या देहावरच्या असंख्य द्वारांतून—सूड—सूड—असा शब्द बाहेर पडत आहे. माझ्या स्वदेशबांधवांचा गाढ झोंपेंत निमग्न झालेला उत्साह, पतन पावलेलें धैर्य, अस्तंगत झालेली जन्मभूमातेच्या सेवेची दक्षता आणि स्वातंत्र्यप्रियता—या सर्व गोष्टी अखिल भरतभूवर एकदम उदय पावणें जरी शक्य नाहीं, तरी आळशाप्रमाणें एकत्र कूट करून बसणाऱ्या अमावास्येचा खून करून, सूर्यनारायण जसा आपल्या तेजानें हलके हलके चंद्राच्या कला वाढवितो त्याप्रमाणें तें होईल यांत शंका नाहीं. पुण्याला गेल्यावर तेथले मावळे, गडकरी वगैरे मराठे लोक जमा करून त्यांच्या डोळ्यांत सद्यःस्थितीचें चरचरीत अंजन प्रथम घालायचें आणि मग त्यांच्याच साहाय्यानें गड, कोट, किल्ले वगैरे स्वाधीन करून घेऊन साधुसंतांच्या सेवाशस्त्रानें धर्मसंस्थापना आणि मराठी राज्याची प्राणप्रतिष्ठा ह्या गोष्टी आधीं उरकायच्या. वैभवाच्या उष्णतेच्या तापानें घर्मभरित झाल्याकारणानें अंगीं उठणारी कंडु शमन करण्याकरितां जे प्रमत्त यवनकीरे आमच्या भाग्यश्रीलतेशीं घर्षण करीत आहेत त्यांचे प्रथम तुकडे उडवून कोल्ह्या–गिधाडांनां मेजवान्या देण्याचा सपाटा सुरू केला पाहिजे. असलें हें कृत्य करायाला श्रीरामचंद्राप्रमाणें मायापाश तोडून संकटांनां या देहाची ढाल बनविली पाहिजे. सध्यां सर्वत्र जो षंढत्वाचा बाजार भरला आहे त्याला मर्दाईचें रूप देऊन, हा देह–स्वधर्म आणि स्वदेश यांच्याकरितां चंदनाप्रमाणें आमरणान्त झिजवून, ही आर्यभू परकीय लांडग्यांच्या तडाक्यांतून सोडवण्यांत खर्ची घालीन तरच नांवाचा शिवाजी! वगैरे, वगैरे. "

अशा तऱ्हेचे विचार करीत, ती कपडे बदललेली बाल शिवमूर्ती देवघराच्या मंडपांत जाऊन आपल्या मातोश्री जिजाबाईसाहेब बसल्या होत्या त्यांच्या जवळच्या आसनावर जों जाऊन बसते आहे तोंच " या कुंदेंदु तुषार हार धवला " या सरस्वतीच्या प्रार्थनेला पुराणिकबोवांनीं सुरुवात केली व प्रस्तावना केल्यावर भीष्मपर्वाचें आख्यान सुरू केलें.

# प्रकरण तिसरें.

## पातिव्रत्य—खड्ग.

वालीनें सुग्रीवाच्या स्त्रीचा अभिलाष केला व जीवाला मुकला. रावणानें सीतेवर बलात्कार करण्याचा घाट घातला व चौदा-चौकड्यांच्या राज्याला अंतरला. दुर्योधनानें द्रौपदीला भर-सभेंत नग्न करण्याचा प्रयत्न करून आपली डावी मांडी उघडी करून दाखविली आणि सर्वस्वाची होळी करून घेतली. हे तिघे राजे होते. हे राजेच जर असे बदमाष होते, तर त्यांचें लाडकें प्रजाधिकारीमंडळही तसेंच असेल यांत नवल तें काय? अकबरानें रजपूत कन्यांशीं हरप्रयत्नानें लग्नें लावण्याची जी खटपट केली तिचा प्रसार त्याच्या राज्यांतील उन्मत्त अधिकाऱ्यांनींही केला त्यांत नवल तें काय? पुढें पुढें तर राजकर्त्यांची मजल या बाबतींत इतकी पुढें गेली कीं, ते लग्न झालेल्या तरुण स्त्रियांवरही बेलाशक अधिकाराच्या जोरावर नजर ठेवूं लागले. ह्याचा परिणाम अखेरीस राजसिंहासनावर होऊन त्याचे शतशः तुकडे तुकडे झाले. आम्हां वैदिक धर्मीयांवर यांच्या इस्लामी धर्माच्या दीक्षेची फूस लावून बाटवाबाटवी करण्याची खटपट तर एकसारखी सुरूच होती. याचेंच प्रत्यक्ष प्रमाण फुसलावून मुसलमान बनविलेल्या निंबाळकर सरदाराचें होय! या यवनांनीं कित्येक हिंदु स्त्रियांची नाहक अब्रू घेऊन त्यांस भोळ्या हिंदूंच्या घरांना पारख्या केलेल्या सर्वत्र दृग्गोचर होत होत्या. अशाच ह्या सतराव्या शतकाच्या मध्यकाळाच्या स्थितीचा आदर्श दाखविण्याकरितांच जणूं काय—तो पाहा—एक फक्कड-रंगेल मुसलमानगडी त्या पलीकडच्या नदीच्या कांठानें आपल्याच रंगांत गुंग होऊन चालला आहे! त्याच्या मुद्रेवरून तो कोणच्या तरी इष्कबाजीच्या शिकारीच्या नादांत असावा असें म्हणायला भीति वाटत नाहीं. ती पाहा, त्यानें एक शिशी खिशांतून काढून तोंडाला लावली. स्वारी आतां मात्र रंगांत येणार खास! झाली—त्या रंगेल गड्याची स्वगत बडबड सुरू झाली. त्याची

ती बडबड ऐकून त्यावरून तो तेथें कशाला आला होता हें आपल्याला सहज समजेल.

"वाहव्वा! लाहोल्‌बिला!" तो रंगेल मुसलमान बडबडूं लागला. "इतक्या दिवस मी टपून बसलों होतों, पण अशा तऱ्हेचा मोका अचानक असा मला आजपर्यंत कधींच मिळाला नाहीं. अहाहा! काय हें सौंदर्य! जशी अस्मानची परी! खरोखर या सुंदरीला प्रत्यक्ष परमेश्वरानें या बहद्दराकरितांच निर्माण केली आहे यांत शंकाच नाहीं. असें असतां, इच्यावर आपल्या नवरेपणाचा हक्क सांगणारा तो निळो खानदेव कोण? ठीक आहे! सांग म्हणावें आपला हक्क! या कोतवालाशीं गांठ आहे हें पक्कें लक्षांत ठेव! आतां ही रंगेली, रसेली, छबेली, सूरत प्यारी असणारी माझी दिलरमाई सोडून कशी काय गमूखारी करते ती मला पाहिलीच पाहिजे ही जी बरोबर शराफ आणिली आहे ती आतां पिऊन लौंडी चंद्राचा मुकाबला—मोठ्या खुषीनें मोहबतीकरतां मेहरनजरेनें घ्यायला तयार झालें पाहिजे. अहाहा! माझ्याप्रमाणें दारू पिणारे या दुनियेंत किती तरी अशी आहेत! पण ही शराफ पिऊन माझ्याप्रमाणें मजा करणारे चैनी ऐषआरामांत दंग झालेले किती दृष्टीस पडतील! या शराफच्या आनंदी नशेंत मश्गूल होऊन सुंदर स्त्रियांसह जो क्रीडा करतो त्याला शुक्रमौलाच्या दरबारांतल्या सौख्याचाच प्रत्यक्ष अनुभव येतो. स्वर्गांतलें सौख्य येथेंच प्राप्त होतें. आतां हें बरोबर लपवून आणलेलें मांस त्या परीनें लुगडीं धुऊन ठेविलेल्या त्या पातेल्यांत हलकेंच युक्तीनें नेऊन ठेवावें. म्हणजे तिचे रिश्तेदार तो प्रकार पाहून ती बाटली असें समजून तिला घरांतून हांकून देतील ही माझी सुंदरी मळकट कपडे धुण्यांत यावेळीं अगदीं गुंग होऊन गेली आहे. आपलें काम साधायला हीच वेळ ठीक आहे. असें वाटतें कीं, असेंच पुढें जाऊन, या भुजपंजरांत तिला एकदम गिरफदार करावी. आहाहा! काय हें लावण्य!"

मनांतील विचारांची पूर्तता करण्याकरितांच जणूं काय त्या मुसलमानानें आपल्यापाशीं लपवून आणलेलें मांस, त्या चंद्रबाईनें धुऊन ठेवलेल्या कपड्यांच्या पातेल्यांत मोठ्या युक्तीनें ठेवून तो स्वतःला स्वतांच्या कर्तबगारीबद्दल धन्य मानूं लागला. या वेळीं चंद्राबाई पाठमोरी असून प्रखर रवीच्या तापांत ती नदीवर धुणीं धूत होती. त्यामुळें बरीच दमल्यासारखी दिसत होती. गुरांना

नदीवर पाणी प्यायला न्यायची गुराख्यांची हीच वेळ होती. तो मुसलमान आपलें काम उरकून जों जरासा बाजूला होतो आहे तों एक गुराख्याचें पोर त्याच बाजूला ओरडत येत असलेलें त्याच्या प्रत्ययाला आलें. त्यामुळें तो जरासा दचकून आडबाजूला झाला. इतक्यांत एक गाय जोरानें चौखुर पळत पळत येऊन **चंद्राबाई** नदींत धुवीत होती तिच्याजवळ जाऊन पाणी पीत उभी राहिली व तिच्या पाठोंपाठ एक गुराख्याचें पोर ओरडत तेथें आलें.

" ह-ह-ह-ह-ह-ह-ह-हर्णि, हर्णि, हर्णि ! का करावं इचि भन इक्त पाठी लागलोंया तरी बी ही गाय गवसत न्हाय. अं ! अरं, ह्या तर आमच्या बाईसाब **चंद्राबाई** धुनी धुत्याती ! आन् ती हर्नी बी त्येंच्या पुढं सवास्त नदींमंदी पानी पीत उभी हाये ! अं ! अर हा र कोन दाढीमिय्या तथं लपून-शेनी उभा है ? अरं हा तर ह्या वांईगांवचा कोतवाल **बेषकखां** ! हा हतं कशापाई आला हाये ? ह्या कोतवालानं तर आमच्या गावामंदी कहार मांड-लाया ! तरनी छबाकडी आवा पगितली कीं, लागलाच तिच्या पाठी. नग बाबा ह्ये परकी लोकांचं राज्य ! आमच्या **चंद्राबाई**साबांवर तर ह्येची नजर नसलना ? निस्ता दाढी बोकुड है दाढी बोकुड. आतां असं न्हाय ! बाईसाहेबांप जाऊनशेनी त्येनां घरीं घ्येवून जावं म्हजी सम्दाच आंदे-सा ग्येला. "

**चंद्राबाई**च्याजवळ जाऊन तो गुराख्याचा पोर तिला म्हणाला "बाईसाब, इक्त्या उन्हामंदीं आपुन एकल्या या **किसनाबाई**वर कशापाई धुन्याला आलांत ? "

" अरे, झालें माझें धुणें ! " **चंद्रा**, म्हणाली. " अरे, पण ही हर्णी इथें कशी आली ? अन् ही अशी भीतीनें कांपते आहे का ? "

" काय सांगू, बाईसाब, " गुराख्याचा पोर मोठ्या चिंतातुर मुद्रेनें व कळ-कळ्यानें म्हणाला, " ह्यो पगा दाढीवाला. त्येला पगूनशान, ही हर्णी जी उभाळली म्हनता ती आपल्या म्होरं येऊनशान सवास्त पानी पीत उभी राहली हाये ! "

" कोण रे तो मेला ? " **चंद्रा**नें तिटकाऱ्यानें विचारलें.

" ह्या वांईगांवचा कोतवाल नव्हका त्यो ! " गुराख्याच्या पोरानें लगेंच उत्तर दिलें.

चंद्रेनें पुसलें, " मग तो आतां इथें कशाला आला आहे ? "

" आला असल मासंबिसं माराया ! आपलं धुनं झालं असलं तर चला घरीं ! "

गुराख्याच्या पोराचे हे शब्द ऐकून तो कोतवाल चपापला. आपल्या हातची शिकार जाण्याची त्याला भीति वाटूं लागली. तो दारू पिऊन बेहोष व मदांध झालेला असल्याकारणानें तसाच पुढें होऊन—लाज, लज्जा, शरम–यांचें ओझें राजकर्त्यांच्या मस्तकावर ठेवून पुढें सरसावला आणि बेमुर्वतपणें बोलूं लागला.

" अबे ए लौंडे, तूं काय ह्या नाजनी परीचा लौंडा आहेस होय ? मी इथें मासे पकडण्याकरतां आलों नाहीं, समजलास ! काय ? आलें का ध्यानांत ? या खुबसूरत छबेलीवर मी जसा आषख झालों आहें तशीच हीही माझ्य मुखचंद्रावर लोलुप झाली आहे. माझी बीबीसाहेब बनण्याचा हिचा इराद आहे. आमची दोघांची आज कितीक दिवस आपसांत मोहबत सुरू आहे. यांतलें गौप्य तुला काय ठाऊक असणार ? हे घे तुला पांच होन इनाम. हें बघ. ही इथली गोष्ट फुटतां उपयोगी नाहीं, समजलास ! "

" अर–वार–वा ! का म्हन्तोसर इचि भन ? आमच्या बाईसाब भन् तूं— "

तें गुराख्याचें पोर मोठ्या विस्मयानें तिच्याकडे व त्या मुसलमानाकडे घाईघाईनें भरभर टकमक बघत असतां चंद्रा मोठ्या घोंटाळ्यांत पडलेली दिसत होती ! तिची मुखश्री अगदीं म्लान होऊन तिचे सर्व अवयव थरथर कांपूं लागले होते. तिची भयभीत झालेली दृष्टी उर्ध्वदिशेला वळली होती, त्यावरून ती परमेश्वराची करुणा भाकीत असावी असेंच बघणाऱ्याला दिसलें असतें.

" परमेश्वरा, " चंद्रा स्वगत म्हणाली, " काय हा घोरप्रसंग माझ्यावर आणलास ? चंद्राचें ग्रहण सुटल्यानंतर ज्या आनंदी आणि आतुरतेच्या नजरेनें सर्व दुनिया चंद्राकडे बघते, त्याप्रमाणें मी ज्यांना माझी दुनिया म्हणतें त्या माझ्या पतींना, असली ही खोटी फसवेगिरीची बातमी कळल्यावर, त्यांचे नेहमींचे माझ्या भेटीसाठीं आतुर असलेले ते डोळ माझ्याकडे कोणत्या बरें

आतुरतेनें बघतील ! भयंकर तिरस्काराच्याच ना ? गोमाते, मी जर खरी पति-व्रता असेन, मानासिक सृष्टींतही कोणा पुरुषाचें चित्र आजमावलें नसेन, किंवा पतीशिवाय इतर कोणच्याही पुरुषाला मी भावाप्रमाणेंच लेखला असेन, तर तूंच माझें आतां रक्षण कर ! मजवर येणाऱ्या खोट्या कलंकांतून मला वांचीव ! ”

अशा तऱ्हेनें **चंद्राबाई** आत्मगत परमेश्वराची आणि गोमातेची स्वगत प्रार्थना करीत असतां कोतवाल त्या गुराख्याच्या पोराशीं बोलूं लागला.

“ अरे ए छोरा, असा काय तूं भ्रमिष्टासारखा पाहातो आहेस ? तुला इथें बघितल्याबरोबर ही तुझी मालकीण घाबरून गेली आहे. आतां पुढें काय होईल तें पाहा ! इथली ही हकीकत हिच्या नवऱ्याला समजल्याबरोबर तो हिला घरांतून हाकून देईल, अशी हिला भीति पडली आहे. पण यांत एवढें भिण्यासारखें तें काय आहे ? नवऱ्याची ती एवढी डर कशाला पाहिजे ! अहाहा ! हा माझा बुल्बुल्, चंदेमेहेताब आहे ! सुंदरी, तूं इतकी डरतेस काय म्हणून ? तुझ्या नवऱ्यानें तुला घरांतून हाकून दिली तर मी स्वतां या खांद्या-वर तुला बसवून घेऊन जाईन आणि अशा तऱ्हेनें गोशांत ठेवीन, कीं, तुझें नखही कोणाच्या दृष्टीस पडणार नाहीं. चल माझ्याबरोबर ! ”

संतापानें लाल झालेली **चंद्रा** त्या कोतवालानें पुढें केलेल्या हातांना उद्दे-शून म्हणाली “ हे अदृश्य देवतांनो, हे माझ्यापुढें सरसावलेले या नरपशूचे हात तुमच्या अतर्क्य आणि अद्भुत अशा अदृश्य स्वरूपाप्रमाणेंच एकदम अदृश्य करून टाका ! आपल्या गोड दुधानें तुम्हांला रोज संतुष्ट करणाऱ्या या गोमातेकरतां तरी तुम्ही माझें रक्षण करा ! अरे मेल्या धटिंगणा, माझ्या-सारख्या गरीब साध्वीला फुकट कां छळतो आहेस ? अगदींच कसा निर्लज्ज झाला आहेस ? ”

“ देख लौंडी, ” कोतवाल ऐटीनें बोलला, “ आतां असलें हें ढोंग करणें बेफायदा आहे ! अब्रूची गोष्ट काय आहे ! मी पातशाहाचा एवढा मोठा अधिकारी असतां माझ्या घरीं कसली कमतरता असणार ! चल माझ्याबरोबर ! या छोकऱ्यालाही घेऊन चल ! याची सुंता करवून याला मुसलमान लौंडा करून टाकूं ! तुझी गोष्ट तर कांहीं निराळीच आहे ! तूं तर या बेपकरखांची पडदानशीन बीबीजान बनणार आहेस ! ”

हे ऐकून गुराख्याचें पोर मोठ्या विस्मित अंतःकरणानें त्या कोतवालाला म्हणालें, " का हो कोतवालसाब, आपुन म्हंगता कीं, या आमच्या बाईसाब तुम्हांवर फिदा हैति, अन् मी हतं है म्हून या तुमाच्नी भियात हये का तुम्ही गांवचं अमलदार म्हून खरं म्हनायचं व्हय ? ठीक हाये यो जबरदस्ताचा न्याव ! ती पल्याडली गायबी आपलीच म्हनाना ! "

" अबे लौंडे, " बेषरखखान बोलला, " तूं आपली जीभ फारच सैल सोडली आहेस ह्या बेषरखखानाच्या पुढें ? पण हें चांगलें नाहीं, समजलास !"

" तसं नव्हं कोतवालसाब ! " गुराख्याचें पोर खोंचून बोलूं लागलें. " सरकारी नौकर कंदीबी झूट बोलत नाहींत. कारण त्येनी तशीच शपथ घेतल्येली असत्ये ! अन् त्येंतल्यात्यांत शिपाई गडी तर कंदीबी जुलूमजबरी आन् ख्वाटं काम करीत न्हाईत. आपुन तर काय राव शिपायांचं राज ! आपन कसं ख्वाटं बोलणार ? "

" अरे साले, हें पाहा ! तूं तर या ठिकाणीं आत्तां आलास ! इतका वेळ आमचें खाणेंपिणें, मजा मारणें वगैरे गोष्टी किती तरी मजेनें झाल्या ! तुला त्या काय माहीत ! तुला दुरून बघितल्याबरोबर या माझ्या लाडकीनें खाण्यापिण्याच्या सर्व वस्तू लपवून ठेवल्या आहेत. तें धुण्याचे पिळे करून ठेवलेलें तिचें पातेलेंच हवें तर जाऊन पाहा ! " बेषरखखानानें त्या गुराख्याच्या पोराला असें सांगितल्यावर तो पोर पातेल्याजवळ गेला व त्यानें त्यांतलें मांस पाहून स्वगतच म्हटलें, " ह्येच्यांत काईबी डाव दिसतोया ! आतां हतं काम युगात करावी ! "

" काय, माझ्या धुणीं धुऊन ठेवलेल्या पातेल्यांत मांस आहे ? " चंद्रा फारच उद्विग्न चित्तानें आणि क्षोभानें बोलली, " आतां मात्र माझें नशीब फुटलें खरें ! गोमाते, तुला तरी आतां दया येऊन हा माझा देह तूं आपल्या लत्ताप्रहारांनीं छिन्नविछिन्न करून टाक, म्हणजे तेवढी तरी मी माझी पूर्वपुण्याई समजेन ! नाहींतर आतां ह्या देहाचे जे धिंडवडे होतील, ते ह्या डोळ्यांनीं मी बघत असतां, हे माझे डोळे फुटून बाहेर येतील ! परमेश्वरा, हें असलं कुभांड तूं कां बरें माझ्यावर रचलें आहेस ? "

" आपल्या पतिव्रतापनाची परिक्षा पगन्यापाई ! " गुराख्याचें पोर बोललें.

" अरे सटव्या, " चंद्रा करुणवाणीनें बोलली, " हा माझ्यावर निष्कळ आळ आला आहे रे ! "

" गन्येस चवथीचा चंदर तर आपुन रात्रीं पगितला नव्हताना ? " सटव्यानें विचारलें.

" होय रे बाबा ! " चंद्रा दुःखी अंतःकरणानें म्हणाली, " गेल्या गणेश चतुर्थीचा चंद्र मीं रात्रीं बघितला होता हें खरें ! "

" मग बाईसाब, त्येचंच हे फळ है असं समजा ! " सटव्या पुढें आणखी बोलला, "-बाईसाब, डुकरासारखा हलका परानी, पन् त्येबी त्ये दिशीं राती चंदर दिसेनासा व्हयीतो आपलं त्वांड गुमान जमीनींत घुसवून शेनी उभा -हातो—"

" अन् मग " चंद्रा म्हणाली, " शिकारी त्याची सहज शिकार करतो!"

" येनं बी आपली तशीच आतां चालवली हाये ! " असें म्हणून तें सटव्या स्वगत विचार करूं लागला. " पन् आपलं इंगित राखन्यापायीं ही आवा असं म्हंगत नसेल कशावरून ? हुंः—ही पल्डी आवाची जात ! लई धूरत, कवाच गुंगारा मारून काय करूनशान यइल त्येचा न्येम कोनी सांगावा ! "

अशा तऱ्हेच्या चमत्कारिक विचारांनीं जरी सटव्याचें डोकें भरकटलें होतें, तरी पुन्हां मूळ मुद्यावर तो आला आणि त्यानें चंद्राला विचारलें—

"बाईसाब, आपन म्हनतां त्ये समदं जरी खरं असलं, तरी आतां ह्या गोष्टीचा निकाल तर लागला पाहिजे ना ? तो कसा व्हनार ? हा बेपरवां तर आतां आपल्याला सोडीत न्हाइ. तवा ही गोष्ट आतां धन्याप -हेल्याबिगार कशी तुटणार ? "

" झालें, आतां मात्र सगळेंच आटपलें ! " चंद्रा अगदींच रडकुंडीस येऊन बोलली, " सासूबाई म्हणजे प्रत्यक्ष कडक जगन्माता ! त्यांना हें कसें सहन होणार ! "

" बाईसाब, " सटव्या म्हणाला, " ह्यो समदा परकार मी घरीं जाऊनशान धन्यांना समजावतों, आन् त्येंना हतं घेऊन येऊनशान न्याब करूं म्हंजी संपलं ! "

" देवा, " चंद्रा स्वहृदयस्फुरणानें म्हणाली, " मीं जर कोणचेंच पातक

केलेलें नाहीं, तर मीं एवढी भीति तरी कां धरावी! देव न्यायी आहे! तो अनाथांचा वाली असतो असें म्हणतात! त्याच्यावरच आपल्या अब्रूचा सगळा भार टाकावा म्हणजे झालें. मी जर खरी पतिव्रता असेन, तर माझी लाज ही गौमाताच रक्षण करील आणि माझें पातिव्रत्यखड्ग ह्या नराधमाचे तुकडे तुकडे उडवील!"

चंद्राचे अशा तऱ्हेचे स्वगत विचार चालले असतां, सटव्याही आपल्या मनाशीं म्हणाला, "आतां, अपुन हतून ग्येल्यावर येनं जर कांहीं वाकुंड तकुंड क्येलं तर! तवा आतां हातून येक युगात करूनशेनी धन्याप जावं!"

सटव्या कोतवाल बेषरखांला म्हणाला, "कोतवालसाब, ह्यो पगा, येवी त्योवी आपुन ह्यंच्या संग सम्दी म्होबत क्येली म्हंता--अं? असंच नव्हका?

"यांत काय संशय?"

"तर म आतां असं करा! सटव्या बोलूं लागला, "ह्ये पगा, ह्या आवाच्या मर्दाला मीं हतं घेऊनशान येतो. त्येनं ह्यो हतला परकार पगितला की त्यो देईल इला सोडूनशान! अन मंग काय राव! करा चैन! घुसवा गुमान गोशांत!"

बहोत अच्छा!" आनंदानें बेषरखान बोलला! "काय बांचोद या कारट्याचा मगज काम करून राहिला आहे! इन्शा अल्ला-लाहोलबिला! ही सर्व तुझी कुद्रत आहे!"

"पन् वचन द्या!"

"कसलें वचन?"

"कीं, ह्या अवाचा मर्द हथ यईपर्यंत तुम्ही हिच्या एका क्येसालाबी शिवनार न्हाई! कारन असं पाहा! हिच्या मर्दाद्येखत तुम्ही इला आपली बीबीजान बनवलींत म्हंजी त्येंत तुमचं नांव जे बेषकखां है त्ये बराबर सोभल! कां? माझं म्हननं खरं का ख्वोटं!"

"अगदीं खरं!"

"द्या तर मग वचन!"

"हे घे!"

वचन घेऊन सटव्या तेथून निघून गेल्यावर, मदोन्मत्त झालेला तो कोतवाल चंद्राची अब्रू घेण्याचा विचार करून स्वगत विचार करूं लागला.

" वचन आणि शपथ ! ह्या गोष्टी काय आहेत ! ही एक प्रकारची भाषा आहे ! भाषा बोलणें म्हणजे हवेवर आघात करून शब्द उमटविणें. हवा अशी अदृश्य तसेंच तिच्यावर उमटविलेले शब्दही अदृश्यच ! जें अदृश्य तें खरें मानणें हा निव्वळ मूर्खपणा आहे. शिवाय, जी गोष्ट आमच्या बापजाद्यांनींच नव्हे तर आमच्या धर्माच्या राजानेंही आजपर्यंत गुळचट थापा मारण्यापलीकडे कधींच केली नाहीं ती मी तरी कशी करणार ! आनुवंशिक कायदा जर आम्ही मोडूं लागून ह्या हिंदूंच्या मताप्रमाणें वागूं लागलों, तर आम्हांला आमच्या राज्याचें चंबूगवाळें लवकरच काखोटीला मारून ह्या देशांतून पळ काढावा लागेल, त्याची गत काय ? इथलें सौख्य अरबस्तानच्या वाळवंटांत कसें मिळणार ! तेव्हां तें कांहीं नाहीं ! ह्या सुंदरीला आतां जबरदस्तीनें ह्या मदनरज्जूरूप बाहुपाशांत बद्ध करून हरप्रयत्नानें मुर्गीमुर्गीचा झगडा उरकून घ्यावा हेंच आतां इष्ट आहे "

आतां त्या कोतवालाच्यानें दम धरवेना. तो मदांध एकदम **चंद्रेच्या** जवळ जाऊन तिला म्हणाला—

" आय् मेरी दिलजान् नाजनी परी, माझा दिल, तुझ्या खुबसुरतीनें आज कित्येक दिवस गिरफदार करून ठेवला आहे. तुझ्यासारखी गुलाबाची कळी अलगत रहावी म्हणून मी त्या कळीखालचा हिरव्या रंगाचा प्याला होऊं पाहातों आहें, इतकेंच नव्हे तर तसें होण्याची माझी इच्छा आहे. तुझ्यासारखी गुलाबाची कळी जर ह्या वेषखबांरूप हिरव्या रंगाच्या प्याल्यांत बसून त्याची अंकित होईल, तर खरोखर मी आपल्याला मोठा नशीबान समजेन ! मग मला गुलचमनची मजा आजमावायला वेळ तो किती लागणार ! चल मेरी प्यारी ! तुला मी दिल्लीची गुलेनार साडी देईन ! पण कृपा करून गमखवारी मात्र करूं नकोस !

" अरे बेवफा, " **चंद्रा** संतापानें बोलली, " पवित्र अशा परमेश्वराला अपवित्र बनवूं पाहणाऱ्या माकडा, मला काय आहे तुझी कदर ! जा मेल्या महालावर आणि झाड रांडेची चादर ! तुझी आई आणि माझी आई यांत काय अंतर ! "

" अल्ला-अल्ला ! " कोतवालानें दीनवाणीनें विचारलें, " काय तर मग मी तुझा भाऊ आहें होय ? "

" अलबत ! "

" तर मग माझ्या विनंतीला तूं मान देत नाहींस म्हणायची ? " कोतवालानें निराशेनें विचारिलें.

" म्हणूनच इथून चालता हो ! "

" जाऊं कुठें ? "

" रौरव नरकांत ! "

" नाहीं–नाहीं ! माझें राहाण्याचें ठिकाण या तुझ्या पायांपाशीं आहे ! "

बेषरखान इतकें बोलून चंद्रेच्या पायांपुढें डोकें ठेवून गुडघे टेंकून बसला असतां, सटव्या आणि निळो सोनदेव तेथें आले. तेथला तो प्रकार पाहून, निळो सोनदेव फारच संतापतप्त झाले. त्या रागाच्या जोरांतही त्यांच्या मनाची स्थिति कशी होती, ती–त्यांच्या तोंडून त्यावेळीं जें सहज पुटपुटणें बाहेर पडलें,—त्यावरून सहज समजण्यासारखी आहे.

" हर हर ! मी हें काय पहातों आहें. त्या मुसलमानानें तिच्यापुढें मान बांकविली असून ती त्याच्यापुढें उभी आहे. याचा अर्थ काय बरें असावा ! हिचा चेहरा तर अगदीं क्रोधानें खवळलेला दिसतो आहे ! ही क्रोधाविष्ट दिसत असून तो दीन झालेला आहे. मी हिची थट्टा केली असतां ही जेव्हां चिडून रागावत असे त्यावेळीं जशी मनोरमा दिसे, तशी कांहीं ह्या रागावण्यांत ही मनोमोहिनी दिसत नाहीं. तेव्हां या उभयांच्या स्थितीचा अर्थ कांहीं तरी निराळाच असला पाहिजे यांत संशय नाहीं. पुढें होऊन त्या मुसलमानाला जरा फटकारून काय प्रकार आहे तो समजावून घेतलाच पाहिजे."

निळो सोनदेव पुढें सरकले व त्यानीं त्या बेषरखानाला सवाल केला.

" क्यौं बे ए अल्लाके दोस्त ! हें तूं काय करतो आहेस ? आपल्या आईच्या पायां पडतो आहेस होय ? "

" आई ये—आई ये—साहेब ! " कोतवाल उठून उभा राहिला व खिजवण्याच्या स्वरांत बोलूं लागला. " ही सुंदरी आतां माझी बीबीजान झाली असून तुझीच अम्माजान बनली आहे ! काय ? आलें का लक्षांत ? बीबीजानच्या पायां पडणें, तिला अलंकारांनीं भूषित करून तिच्यावर फुलांचा शेरा चढवणें, अत्तरांनीं तिचा देह सुगंधित करणें आणि नंतर मेहेलांत तिच्याशीं शृंगारासक्त होणें, या गोष्टींतलें माधुर्य, तुझ्यासारख्या फत्तराची पूजा करणाऱ्याला काय समजणार ! "

" परमेश्वरा, माझ्या डोळ्यांचें पारणें फिटलें. रांडेनें सूर्यनारायण आणि गोमाता यांना साक्ष ठेवून बदकर्म केलेंन, त्यापेक्षां अंधेरांत राहून एकीकडे हवें तें केलें असतेन, तरी कांहीं हरकत नव्हती. रांड प्रत्यक्ष हजामाचा आरसा बनली. आतां त्या आरशांत हवें त्यानें आपलें तोंड पाहावें ! परमेश्वरा, केवढी ही माझी दीन स्थिति केलीस ! माझ्या आत्म्याला आतां ह्या देहाचें मंदिर नकोसें वाटतें ! माझ्या आत्म्याला जर ह्याचवेळीं ह्या देहाच्या ऐवजीं दुसरा देह मिळेल, तर त्याच कवच्याच्या जोरावर आर्य स्त्रियांवर डोळा ठेवणाऱ्या आणि त्यांनां भ्रष्ट करण्याचा प्रयत्न करणाऱ्या या परधर्मीय लांडग्यांचे तुकडे तुकडे उडवायला मी तयार होईन. पण आतां ही कष्टतर स्थिति बघवत नाहीं. हिचा गळा दाबून हिला अशीच ठार मारूं का ? "

निळो सोनदेवाला आलेला त्वेष त्याच्या पोटांत मावेनासा होऊन त्यानें त्या क्रोधाच्या उन्मत्ततेंत उडी मारून चंद्राचा गळा दाबला व तिला जों--ती उभी असलेल्या जागींच—तो ठार करून पाडणार—तोंच पलीकडे उभी असलेली गाय एकदम खालीं पडून हातपाय झाडूं लागली. गायीची ती स्थिति पाहून निळो सोनदेवाच्या विचारांनां पुन्हां दुसरीच दिशा मिळाली.

" अरे, पण ही गाय कां बरें एकाएकीं पडली ! " निळो सोनदेव विचार करूं लागला. " ही स्त्री शुद्ध असल्यामुळें, माझ्या हातून घडत असलेलें स्त्रीहत्येसारखें अघोर कर्म हिला सहन न होऊन तर ही अशी तडफडत पडली नसावी ना ! "

" अबे ए हरामखोर, " बेषकखान रागानें बोलला, " कोणाच्या स्त्रीचा गळा दाबतो आहेस ? माझ्या बायकोचा खून करतोस होय ? "

" काय ? ही स्त्री याची असून, मी परस्त्रीस्पर्शानें अधमाधम ठरलों ! पण याचा अर्थ तरी काय ! मी बघतों आहें ही माझी बायको चंद्रा नव्हे काय ?" निळो सोनदेव चंद्राच्या गळ्यावरचा आपला हात काढून भ्रमिष्टासारखा बावरलेल्या नजरेनें पाहूं लागला.

" आजपर्यंत, " चंद्रेनें अंगीं धारिष्ट आणून बोलण्याची सुरुवात केली, " जरी अशा स्थितींत मला आपल्याला 'प्रिया' असें म्हणण्याचा प्रसंग आला नाहीं, तरी असल्या तऱ्हेची ही वेळ पहिलीच असल्याकारणानें ह्याही वेळीं मी आपल्याला प्रियाच म्हणतें ! प्रियकरा, ऐकायचें थोडें-माझें म्हणणें !

मी अद्यापि शुद्ध—निष्कलंक—पतिव्रता आहे कीं नाहीं त्याबद्दल—तो पाहा आपल्या पूर्ण एश्वर्यानें वर प्रकाशत असलेला सूर्यनारायण आणि ही गोमाता साक्ष आहेत. माझ्या आंगच्या पवित्रतेची साक्ष पटवण्यासाठीं परमेश्वरानें ह्या नीच दाढीवाल्याला ही बुद्धि दिली आहे असें वाटतें! तेव्हां खरें काय आहे तें बघण्यासाठीं आतां श्रीसीतामातेप्रमाणें माझ्याकडून दिव्य करून घ्यावें म्हणजे आपली खात्री होईल!"

"अग सटवे, प्रत्यक्ष मांस खायला सोकलेली तूं गिधाडीण. दिव्य कसलें करतेस आपल्या बोडक्याचें! कायरे सटव्या, मांस लपवून ठेवलेंस तें पातेलें कुठें आहे?"

"हें घ्या सरकार!"

"कोंब तें त्या रांडेच्या तोंडांत, म्हणजे माझ्या डोळ्यांचें पारणें फिटेल!"

निळो सोनदेव याप्रमाणें रागानें बोलला खरा, पण त्याच क्षणीं विस्मय-चकीत होऊन तो पुन्हां बोलूं लागला.

"अरे, पण हा काय चमत्कार! ज्या पातेल्यांत मांस आहे अशी माझी दृढभावना या सटव्यानें केल्यामुळें मी माझ्या स्त्रीला हवें तसें टाकून दुःशब्द बोललों त्यांतच मांसाच्या एवजीं हे फुलांचे हार माझ्या दृष्टीस पडताहेत! हें काय गूढ आहे! माझ्या दृष्टीचा तर हा दोष नसेल ना?"

"अल्बत्!" कोतवाल बोलला, "हें सर्व तूंच केलें आहेस! तूंच या फुलांच्या माळा जादूनें उत्पन्न केल्या आहेस! तूं मोठा जादूगार आहेस!"

"अरे जा बद्माष!" निळोपंत त्वेषानें बोलला.

धुण्याच्या पातेल्यांत असलेल्या फुलांच्या माळांपैकीं एक चंद्रेनें आपल्या नवऱ्याच्या गळ्यांत घातली व ती मोठ्या उल्हासामिश्रित करुणस्वरानें बोलूं लागली.

"प्रिया, आतां अंत किती बघायचा? ती दुसरी माळ पुन्हां एकदां लग्नां-तल्यासारखी माझ्या गळ्यांत घालून मला 'खरी पतिव्रता' म्हणा, म्हणजे माझ्या जन्माचें सार्थक होईल."

"अग, आतां मी कशाला म्हणायला पाहिजे!" निळोपंताचा कंठ दाटून आला. तो पुढें बोलला, "हा सूर्यनारायणच आपल्या तेजाप्रमाणें तुझें पातिव्रत्यखड्ग निष्कलंक व अढळ आहे असें सर्वांना सांगेल!" इतकें बोलून त्यानें तिच्या गळ्यांत दुसरी फुलांची माळ घातली.

हा सर्व चमत्कार पाहून बेषखखान कोतवाल आश्चर्यचकित होऊन मूढ बनला. तो सगद्गदवाणीनें लाचाराप्रमाणें बोलूं लागला.

" काय तरी चमत्कार आहे! मांसाचीं फुलें आणि फुलांचे दोन हार! ह्या माझ्या नजरेसमोरचा हा प्रकार ना! ह्या चमत्कारापेक्षांही अजब गोष्ट ही कीं, माझी पूर्वीची इष्कबाजीची भावना ह्या हृदयांतून पार नाहींशी होऊन ही चंद्राबाई माझ्या मातेप्रमाणें मला दिसत असून मी ह्या निळो सोनदेवाला पितृवत् मानावें असें माझें मन मला सांगूं लागलें आहे. हिंदूंच्या पतिव्रता स्त्रियांची योग्यता फारच मोठी आहे यांत संशय नाहीं. ज्या देशांत अशा स्त्रिया निर्माण होऊं लागल्या आहेत अशा ह्या हिंदुस्तानांत आतां आमच्यासारख्या परधर्मीय परकीयांच्या राज्यसत्तेचा निभाव लागणें कठीण आहे. आम्हांला आमचा गाशा आतां लवकरच इथून गुंडाळावा लागणार असें दिसतें. ह्या स्त्रिया नुसत्या आपल्या नजरेनेंच जर मांसाचीं फुलें बनवूं शकतात, तर यांनां आमचें राजशाही तख्त पालथें पाडणारीं मुलेंही सहज निपजवितां येतील यांत शंका काय आहे! आय खुदा, आय नबी, अलबत् मीं तुझा गुन्हेगार आहें. मीं या स्त्रीच्या दहा हजार वेळां पायां पडावें हीच मला शिक्षा योग्य आहे! "

इतकें करुणरवानें बोलून तो तिच्या पायां पडला व त्यानें एक फार्सी भाषेंतला ईश्वरी क्षमेचा कलमा म्हटला. त्या कलम्यांतला भावार्थ पुढीलप्रमाणें होता.

" प्रभो, माझ्या हातून आजपर्यंत जीं पातकें घडलीं आहेत त्यांची याद तुझ्या सेवकांनीं आपल्या चोपडींत जरी लिहून ठेवली आहे, तरी मला त्यांची आठवण नाहीं, मी तुला शरण आलों आहें. कृपा करून त्या तुझ्या नोकराच्या चोपडींत लिहिलेल्या माझ्या पातकांच्या यादीवर आपल्या लेखणीनें काट मारून मला दोषमुक्त कर. "

याप्रमाणें देवाची प्रार्थना करून त्यानें चंद्राबाईच्या पुढें जमीनीवर आपलें मस्तक ठेवलें. तें पाहून चंद्रा म्हणाली—

" अरे बाबा, तूं माझ्या पायां कशाला पडतोस? अशी मला छळण्याची जर तुला बुद्धि झाली नसती, तर पातिव्रत्य म्हणजे काय असतें तेंही ह्या

काळांत जगाला समजलें नसतें. परमेश्वरानें ती तुला सुबुद्धीच दिली होती! म्हणून उठ आणि पुन्हां एकवार परमेश्वराला शरण जा!"

"आय झुके मौला," कोतवालानें देवाची पुन्हां प्रार्थना केली. "तूं सर्व-साक्षी आहेस! दुष्ट वासनांचा शास्ता आहेस! सुष्टांचा त्राता आहेस! मला पुन्हां दुष्टवासना देऊं नकोस! मी तुला शरण आलों आहें! पापापासून माझें रक्षण कर."

त्यानें जी फारशी भाषेंत देवाची प्रार्थना दुसऱ्यांदा केली तिचा मतलब असा होता. त्याची प्रार्थना संपल्यावर **निळो सोनदेव** बोलूं लागला.

"आज माझ्या स्त्रीनें पातिव्रत्यखड्गधारेकडून जो अमर जय प्राप्त करून घेतला आहे त्याच्याच तेजानें मी जरी अगदीं दिपून गेलों आहें, तरी इत-उत्तर ह्या दांडग्या, अडदांड, नीच आणि अनीतिमत्त परकीय राजकर्त्यांना या भूमीवरून पिटाळून लावायला ह्याच माझ्या दिव्य शक्तीचा मी उपयोग करून, स्वदेशमातेच्या ऋणांतून मुक्त होण्याला **शिवराजाला** मदत करीन, तरच नांवाचा खरा **निळो सोनदेव**!"

**निळो सोनदेवानें** जी ही प्रतिज्ञा केली तिची पूर्तता करण्यासाठीं त्यानें त्याच दिवसापासून तेथून आपल्या स्त्रीसह घरीं गेल्यावर सुरुवात केली. **बेपरवखान** कोतवाल त्या वेळीं जो फजीत झाला होता त्याचा भडा त्यानें उत्तम तऱ्हेनें जरी गिरवला तरी तो आपल्या व दुसऱ्याच्या धर्मांतलें अंतर विसरला नाहीं. त्याची धर्मबुद्धि परस्त्रीच्या बाबतींत जरी पालटली होती तरी तो मूर्ति-पूजकांचा द्वेष्टा याच नात्यानें कांहीं कालपर्यंत आपल्या अधिकाराच्या जोरावर वागत होता. सद्यःकालीं सर्वत्र पसरलेल्या आर्यधर्मीयांच्या अनाचारासंबं-धानें जो घोंटाळा माजला होता त्याचें खरें कारण परकीय सत्ता हेंच असून आर्यधर्मीयांनीं स्वधर्माचें रक्षण करण्याचें सोडून परधर्मीयांचें जें दास्यत्व स्वीकारलें होतें तेंही होतें! अशा प्रसंगीं हताश झालेल्या वैदिक धर्माचें अधिष्ठान डळमळूं लागलें असतां, 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे' हें जें भगवंतांनीं वचन दिलेलें आहे तें खरें करण्याची जबाबदारी त्यांच्यावरच पूर्ण असल्यामुळें, अशा या अधर्माच्या आणि वर्णसंकराच्या काळीं, त्यांनीं आर्यधर्मी-यांची भूमि तयार करण्याचें काम कसें चालविलें होतें व समर्थांच्या आणि

शिवरायांच्या कृपानें त्यांनीं स्वधर्मजागृतीचें बीज पेरून आर्यधर्मीयांकरितां स्वराज्यस्थापनेचें कार्य कसें हलकें हलकें चालविलें होतें हें आतां स्वच्छपणें दिसणार असून भगवंताचे वरील शब्द कसे प्रत्ययाला येतात ह्याचेंही प्रतिबिंब पुढील प्रकरणावरून वाचकांना स्पष्ट दिसणार आहे. वैभवहीन परंतु खऱ्या पतिव्रता स्त्रियांची योग्यता राज्याची संस्थापना करण्यास कशा तऱ्हेची उपयोगी पडेल हेंही पुढील प्रकरणांवरून विशद होणार आहे.



# प्रकरण चौथें !

## ' देउळें म्हणजे नाना शरीरें. '



"ब्राह्मणाचा धर्म म्हणजे त्यांनीं दुसरें कांहीं एक न करतां इतरांनीं त्यांचें संरक्षण करावें व त्यांनीं इतरांचें संरक्षण करावें, हाच त्यांचा विहित धर्म होय. ब्राह्मणांनीं स्वकर्म केलें असतां त्यांना ब्राह्मसंपत्ति प्राप्त होते. ब्राह्मणानें शूद्राचें कर्म न करितां वेदाध्ययनादि विहित गोष्टी केल्यास त्यांचा उत्कर्ष होतो, त्याची बुद्धि वाढते व त्याला दिव्य तेज येतें. इतकेंच नव्हे, तर त्याच्या अंगीं दुर्धर शक्ति उत्पन्न होते. ब्राह्मणाचें जें कांहीं थोर सामर्थ्य तें त्याला स्वाध्यायापासूनच मिळतें. जें कांहीं देवलोकीं किंवा मनुष्यलोकीं आहे तें सर्व ब्राह्मणाला तपश्चर्येनें, ज्ञानानें व व्रतवैकल्यांनीं प्राप्त व सुसाध्य होतें. ब्राह्मणाच्या ठिकाणीं राजाप्रमाणेंच विलक्षण शक्ति वास करते. तपश्चर्या करणारे ब्राह्मण जितके उग्र असतात, तितकेच ते मायाळू असतात. त्यांच्या समीप जाणें अवघड असतें; कारण, त्यांच्या अंगीं भयंकर त्वेष व त्वरा हीं विद्यमान असतात. कित्येक ब्राह्मणांच्या ठिकाणीं सिंहाचें, वाघाचें, वराहाचें अथवा हरिणाचें सामर्थ्य असतें. कांहीं ब्राह्मण सर्पदंशाप्रमाणें भयंकर असतात, कांहीं मगरमिठीप्रमाणें दुसऱ्याला संकटांत घालतात, कांहीं शापवचनानें दुसऱ्याचा घात करतात आणि कांहीं तर नुसत्या दृष्टिपातानेंच दुसऱ्याला ठार करतात. या जगांत ब्राह्मणांचीं चरित्रें मोठीं विलक्षण व नानाविध आढळून येतात. मेकल, द्राविड, ल्याट, पौन्ड्र, कान्वशिर, शौंडिक, दरद, दार्व, चौर, शबर, बर्बर, किरात, यवन आणि इतर अनेक क्षत्रिय जाती ब्राह्मणांच्या कोपामुळेंच शूद्र झाल्या. ब्राह्मणांच्या कोपामुळेंच असुरांना उदकांत आश्रय करावा लागला व ब्राह्मणांच्या प्रसादामुळेंच देवांना स्वर्ग लाधला. आकाशाला स्पर्श करितां येणार नाहीं, हिमालयाला हालवितां येणार नाहीं, गंगेला धरण बांधून आडवितां येणार नाहीं आणि या भूतलावर ब्राह्मणांना जिंकतां येणार नाहीं

ब्राह्मणांशीं विरोध ——— फार वेळ टिकत नाहीं. ज्याला समुद्रवल- यांकित पृथ्वीचें राज्य करणें असेल त्यानें ब्राह्मणांनां संतुष्ट ठेवलें पाहिजे."

ह्याप्रमाणें पितामह भीष्माचार्यांनीं राजा धर्माला शरशय्येवरून उपदेश केलेला आज आपल्याला महाभारत स्पष्टपणें सांगत आहे. अशी जी ब्राह्म- णांची कीर्ति, ती लोपत जाऊन सर्वत्र जरी भ्रष्टता पसरली होती, तरी कांहीं तेजस्वी ब्राह्मण होतेच. त्यांच्याच अनुग्रहप्रसादानें शिवराजाला धर्मराजा- प्रमाणें राज्य प्राप्त झालें. कांहीं ब्राह्मणांनीं यवनांच्या अमलामुळें जरी स्वधर्म सोडून पाखंडी मतांचा अवलंब केला होता, तरी समर्थांसारख्या ब्राह्मणांनीं स्वतःच्या तपश्चर्येच्या बळावर त्यांच्या डोळ्यांत अंजन घातलें व त्यांना अखे- रीस शुद्धीवर आणलेंच. "ब्राह्मणकुळांत जन्म झालेलें· असतें इतक्यामुळेंही ब्राह्मणाला महाभाग मानितात," असें जें ब्रह्मदेवानें प्रत्यक्ष सांगितलें आहे, त्याचाच फक्त फायदा घेऊन सतराव्या शतकाच्या मध्यकाळांतले कांहीं ब्राह्मण स्वकर्म सोडून नुसत्या जन्मसिद्धहक्कानेंच वाटेल त्याला कसें छळीत असत याचीं सप्रमाण उदाहरणें क्षेत्रांत हरघडी जशीं बघायला सांपडत असत तशीं जरी आजमित्तीला दृष्टोत्पत्तीस येत नाहींत, तरी सध्यांचे क्षेत्रस्थ ब्राह्मण नुसते लक्ष्मीभक्तच बनलेले असल्यामुळें ते यजमानाच्या तंत्रानें चालून स्वतःचा खिसा गरम करणारीं लटपटीत वैदिक मंत्रांचीं यंत्रेंच बनलेलीं आहेत. एकं- दरींत काय कीं, खऱ्या ब्राह्मण्याचा ऱ्हास झाल्यामुळेंच "**तीर्थें क्षेत्रें तीं मोडलीं। ब्राह्मण स्थानें बिघडलीं ॥ सकळ पृथ्वी आंदोळली। धर्म गेला**" अशीं वाक्यें **समर्थांना** उच्चारावीं लागलीं आहेत. अब्राह्मण्याचे प्रसंग दृष्टिपथांत अवलोकन केल्यामुळेंच **समर्थांनीं पैठण**क्षेत्रांतल्या जगद्वंद्य **एकनाथ** महाराजांना ज्या ब्राह्मणांनीं छळिलें त्यांचीं मस्तकें ठिकाणावर आणलीं.

**समर्थ श्रीन**गरच्या पाहाडांतून जे निघाले ते तीर्थयात्रा करीत करीत यावेळीं **वाराणशी** क्षेत्रांतून **पैठण** मुक्कामीं येऊन पोंचले होते. याच वेळीं त्यांच्या दोघी शिष्यिणी-**अक्का** आणि **वेणु**-ह्या बालविधवा स्त्रिया **समर्थांचा** शोध करीत करीत **पैठण** मुक्कामीं आलेल्या होत्या. तें क्षेत्र यावेळीं फारच भर- भराटींत होतें, त्यामुळें तेथील ब्राह्मणही बरेच उच्छृंखल झालेले होते.

नित्य नियमाप्रमाणें **गंगा**तटाकावर प्रातःकाळीं नरनारींचा समुदाय स्व- सामर्थ्यांप्रमाणें स्वधर्माचरण करण्यांत गुंतला असतां त्यांनां संकल्प सांग-

त्यांच्या ब्राह्मणांपैकीं कांहीं ब्राह्मण विकल्पा....स्त झालेले दिसत होते. अशा विकल्पित ब्राह्मणांपैकींच दोन ब्राह्मण आपापसांत तंटा करीत असलेले श्रीगोदातटाकीं आज सकाळीं दिसत होते.

" काय हो, काल गंगेवर फारशा चक्रा मारीत होतां ? " एका ब्राह्मणानें दुसऱ्याला प्रश्न केला.

" गंगेवर, " दुसरा ब्राह्मण बोलूं लागला, " यात्रेकरूंना तुम्ही आपल्या नांवाप्रमाणेंच संकल्प सांगत होतां कीं काय तें पाहात होतों ! "

" मग, कसें काय पाहिलेंत ? "

" अगदीं हुबेहुब-दपटशास्त्री तुरतुरे-ह्या आपल्या नांवाला साजेसेंच चालविलें होतेंत ! "

" तें हो कसें काय ? उगीच कांहीं तरी बोलण्यांत अर्थ काय ? "

" अहो, तर तुम्ही ज्या दोघी सकेशा विधवांना संकल्प सांगत होतां, तो शास्त्रोक्त होता का ? अशा या पवित्र क्षेत्रीं केशवपनाशिवाय संकल्प सांगितलांत, यांत दपटशास्त्रीपणा नाहीं का केलांत ? तें कर्म आणि तो संकल्प शास्त्रविहित झाला का ? "

" तरी म्हटलें आमचे हे तिरपिंड घे चक्करशास्त्री पिंडावरच्या कावळ्यासारखे तेथें चक्रा कां मारीत होते ? अहो, त्या दोघी स्त्रियांना केशवपन करावयाला मीं सांगितलें नाहीं असें का तुमचें मत आहे ? "

" अलबत् ! " तिरपिंडशास्त्री ऐटीनें बोलले, " विधवांचें केशवपन झाल्याशिवाय त्या तीर्थयात्रेला पवित्रच ठरत नाहींत ! "

" हा आपला आधार बहुतेक धर्मसिंधूतलाच असेल ? "

" यांत काय संशय ! हा आधार कोठला असावा हें सुद्धां तुम्हांला पक्कें माहीत नसावें ना ? केवढी ही तुमच्या ब्राह्मण्याला शरमेची गोष्ट आहे ? संकल्प कशाला सांगतां बोडक्याला तर मग ! तुम्ही काल हें असें धर्मबाह्य कृत्य केलेंत ! आतां आजउद्यां बाऱ्यांना जातींत घ्यायला लागाल ! छेः ! तें कांहीं नाहीं ! तुम्हांला प्रामण्यांतच काढले पाहिजेत ! "

" आपण जें हें भाषण चालविलें आहे तें बहुतकरून धर्मसिंधूच्या आधाराऐवजीं आपण आपल्या अनुकूलसिंधूच्याच आधारानें पाठ केलेलें आहे असें दिसतें ! स्वराज्य ह्याच तत्त्वाच्या ज्ञानानें जाऊन द्वैताच्या फेऱ्यांत सांपडून

अंत:कलहानें यवनांची गुलामगिरी करीत आहांत हें ढळढळीत दिसत असतां अजून ऐक्यभावाला लाथा मारीत आहां-खऱ्या वैदिक धर्माला लाथाडून मनःकल्पित आचारांना धर्माच्या बाबतींत पुढें करीत आहांत-म्हणूनच तिरपिड करीत चक्रा मारीत आहांत, समजलें! अहो, त्या स्त्रिया म्हणजे प्रत्यक्ष जगन्माता आहेत-जगन्माता! आलें लक्षांत! त्या स्त्रिया मानवी ज्ञानाच्या मर्यादेला जाऊन पोंचल्या आहेत, समजलें!"

"छेः छेः! आपल्यासारख्या धर्ममार्तंडांच्या बोलण्याबद्दल शंका कोण घेणार? त्या स्त्रिया मर्यादेच्या पलीकडे गेलेल्या आहेत असें त्यांच्या स्वैर वर्तनावरूनच दृष्टीस पडतें आहे. ह्या गांवच्या त्या गांवाला त्या ज्या मनःपूत भटकत फिरत आहेत तें त्यांचें भटकणेंच मर्यादोल्लंघनाची साक्ष पटवतें आहे! त्यांची मैत्री जी हवेप्रमाणें वाटेल त्याच्याशीं जमते, त्याचें कारण तरी हाच त्या सकेशांचा स्वैरसंचार आहे! त्यांच्यासारख्या त्याच पवित्र अन् दुसरें काय?"

"त्यांच्या त्या पवित्र वेषाकडे जरा नजर द्या. उगीच दोषारोप करण्यांत अर्थ काय?"

"अहो, नुसतें लक्षच नव्हे तर अगदीं बारकाईनें न्याहाळून पाहिलें आहे समजलें? जें कांहीं आहे तें त्या भगव्या रंगांतच आहे. हवें तें करावें आणि त्यावर त्या भगव्या किरमिजी सोदेगिरीच्या रंगाचें पांघरूण घालावें कीं, झाली दृष्टीआड सृष्टी. आपणांसारख्यांच्या मदतीनें सध्यां हुरमुजी रंगाच्या आडपडद्यांत जीं कर्में चाललीं आहेत तींच कर्में उद्यां भगवा रंग झुगारून देऊन इतर भपकेबाज रंगांत होऊं लागतील. असो. कलिकाळाचा वेष असाच आहे. पण काय हो, **बपटशास्त्री तुरतुरे**, तुम्ही त्या दोघींचा पक्ष घेऊन आपल्या जिव्हाचापल्याची जी एवढी तुरतुर चालविली आहे, तिचा अर्थ तरी काय?"

"तुम्ही आपल्याला मोठे व्युत्पन्न समजतां, आणि भाषेचा अर्थ तुम्हांला समजू नये म्हणजे मोठेंच आश्चर्य आहे! अहो, कमळ आणि त्याचें सौंदर्य अथवा कस्तूरी आणि तिचा सुवास अथवा, **कालिदासानें** म्हटल्याप्रमाणें पार्वतीपरमेश्वरांचें ऐक्य हीं ज्याप्रमाणें एकवटलेलीं असतात-त्यांचें एकमेकांपासून दूरीकरण जसें होत नाहीं—तद्वतच भाषा आणि तिचा अर्थ ह्या दोन्ही गोष्टी एकमेकांत मिसळलेल्या असतात. भाषेचा अर्थ तिच्यांतच असत.

तेव्हां इतका वेळ मी जें कांहीं बोललों त्याचा अर्थ त्यांतच होता हें तुमच्या-सारख्या व्याकरणावर चक्का मारणाऱ्या वैय्याकरणी **तिरपिंड घे चक्कर-शास्त्र्याला** समजूं नये हें मोठें आश्चर्य ! "

" कळला, आतां तुमच्या भाषाचमत्काराचा अर्थ पुरा समजला ! "

" आतां अगदीं पुरी समजूत पटली ना ? "

" हो, हो, अगदीं पुरी समजूत पटली ! "

" कशी काय पटली ती सांगा पाहूं ? "

" अहो, त्या दोघी कमलिनी आणि तुम्ही त्यांचें सौंदर्य ! त्या दोघी कस्तुऱ्या आणि तुम्ही त्यांचा सुगंध ! त्या दोघी पार्वत्या आणि तुम्ही पशुपति ! पण हें पाहा बोकेशास्त्री, असलीं ही धर्माच्या बाबतींतलीं **दपट-शास्त्र्याचीं** धर्मबाह्य कृत्यें या **पैठण**क्षेत्रांत तरी निदान चालायचीं नाहींत, समजलांत ? "

" किती क्षुद्रबुद्धीचे आहांत हो ! असलीं म्हणजे कसलीं ? "

" पुन्हां कसलीं म्हणून काय विचारता हो ? लाज नाहीं वाटत ! तीर्थविधी-करितां त्या सकेशा या पवित्र क्षेत्रांत **गो**दातटाकीं आल्या असतां त्यांचें वपन न करवितां त्यांच्याशीं मन मानेल तसा व्यवहार करण्याचीं कृत्यें-समजलांत ? पण जाऊं दे ! आतां जातों गांवांत, भरवतों सभा आणि पाहातों मग तुमच्या चेष्टा कशा काय चालतात त्या ! "

" हें पाहा, उगीच व्यवहारशून्यतेची आणि पोंकळ धर्मावडंबराची तिर-पिंड करीत चक्का खात जाऊन, माझ्याऐवजीं आपल्याच फजीतीच्या चमत्का-राचें प्रदर्शन करण्यांत मतलब काय ? त्या पाहिल्यात का ? त्याच दोघी इकडे येत आहेत. त्यांची समक्ष गांठ घ्या, म्हणजे त्यांची पवित्रता, त्यांची विद्वत्ता आणि त्यांचें आत्मज्ञान कसें आहे तें कळेल ! "

" काय म्हणे ' त्यांची पवित्रत्ता, विद्वत्ता आणि आत्मज्ञान पाहा. ' **अरुं-धतीचेच** हे कलियुगांतले दोन अवतार म्हणायचे ! आग लावा त्यांचा त्या आत्मज्ञानाला ! तें पेटत कसें नाहीं अजून ! "

" म्हणजे मोठेंच आश्चर्य आहे ! अहो, आग पेटली असें जगाच्या निद-र्शनास आणणारा जो अग्नीचा धूमदूत तो तुमच्या नाकातोंडांत जाऊन तुमचें एवढें मस्तक फिरून गेलें असतां, अद्याप अग्नि पेटलाच नाहीं म्हणतां ?

आश्चर्य आहे ! पाण्याच्या पृष्ठभागावर उठणाऱ्या पोकळ बुडबुड्यांप्रमाणें बटबटीत दिसणारे ते तुमचे निस्तेज डोळे, आत्मज्ञानशून्यतेच्या थंडीनें गारठून त्यांवर तुमच्या मस्तकांतल्या द्वैतोदकाचे नेत्ररंध्रांतून थर बसून ते थिजल्यामुळें, त्यांना धग देऊन साफ करण्याकरितांच ह्या दोन अग्निशिखा इकडे येत आहेत असें मला वाटतें ! ह्या, जरा शेक ह्या ! म्हणजे अंजन घातल्याप्रमाणें दृष्टी साफ आणि निर्विकार होईल ! ”

ज्यांचीं मुखकमलें दृष्टीस पडलीं असतां मनांतील भावना निष्कलंक होऊन दुष्ट मनोविकार निर्मूळ होतात, अशा तऱ्हेचे ते दोन—**अक्का-वेणू** यांचे चेहेरे-दृष्टीस पडल्याबरोबर **तिरपिंड घे चक्करशास्त्री** स्तिमित अंतःकरण होऊन मूक बनला. त्याची वाचाळता साफ नाहींशी झाली. तो आपल्या शेजारीं **दृपटशास्त्री** उभा असून आपण त्याच्याशीं जो वादविवाद केला तें सर्व विसरून गेला, व तेथें आपसांत बोलत येणाऱ्या **अक्का** आणि **वेणू** यांच्या मूर्तींच्या अवलोकनांत जणू काय समाधिस्थितींतच उभा आहे असें दिसूं लागलें. **अक्का** व **वेणू** त्या ठिकाणीं एकमेकींशीं बोलत बोलत त्या लटपटाध्याय भिक्षुकांच्या बऱ्याच जवळ येऊन ठेपल्या. त्या परस्परांशीं बोलण्यांत मग्न झालेल्या होत्या.

“ **मिरजेस** मला अनुग्रह देऊन **समर्थ** तीर्थयात्रेला गेल्याला बारा वर्षें होत आलीं. ” **वेणु** म्हणाली, “ अजून त्यांचें दर्शन होत नाहीं. आतां जर लवकर दर्शन होणार नाहीं, तर अन्नग्रहण करायचें नाहीं असा माझा निश्चय झाला आहे. ”

“ **वेणु,** ” **अक्का** बोलूं लागली, “ माझाही संकल्प तसाच झाला आहे, **एकनाथ**महाराजांच्या देवळांत जाऊन धरणें घेऊन बसायचा माझा विचार आहे !

“कोठें ? **एकनाथ** महाराजांच्या देवळांत ?” **तिरपिंड घे चक्करशास्त्री** संतापानें पुढें होऊन बोलला. “ तुम्ही तेथें धरणें घेऊन बसणार होय ? ”

“ कां बरें ? तुम्ही कोण ? ” **वेणूनें** प्रश्न विचारला.

“ मला तुम्हीं ओळखलें नाहीं वाटतें ! ” **तिरपिंडशास्त्र्यानें** मोठ्या ऐटीनें विचारिलें.

" हो हो ! आपण मनुष्य असून या क्षेत्रांतले ब्राह्मण आहांत, हें ओळखलें ! " वेणूनें तिरस्कारानें उत्तर दिलें !

" म्हणजे ? " तिरपिडनें विचारलें.

" पशू नव्हेत, दुसरें काय ! " आक्का बोलली.

" वैदिक–वैदिक ब्राह्मण आहें ! या क्षेत्रांतला हक्कदार वतनी ब्राह्मण आहें. समजलें ? " तिरपिडशास्त्री छातीला हात लावून रागानें बोलला.

" आपण कोण आहांत तें आपल्याला सांगावें लागतें एवढें बरें आहे. ब्राह्मणांनीं वतनें स्वीकारण्याचा परिपाठ सुरू झाल्यापासून त्यांचें ब्रह्मकर्म बहुतेक संपुष्टांतच आलेलें आहे ! पण आम्हांला तुमच्या त्या वैदिकपणाशीं काय करावयाचें आहे ? " वेणू तुच्छतादर्शक आवाजानें त्याच्याकडे दुर्लक्ष्य करून बोलली.

" काय करायचें आहे ?" तिरपिड फारच संतापून बोलला. "या तुमच्या ठोल्यासह तुमच्यावर बहिष्कार घालायचा आहे ? "

" काय म्हणतां ? " अक्का व्याजोक्तीनें बोलली. "तो आमचा ठोल्या, अन् तुम्ही कोण ? "

" शुद्ध वैदिक ब्राह्मण ! " तिरपिडनें झोंकांत सांगितलें.

" हें वेदांत सांगितलें आहे वाटतें ? " वेणूनें पृच्छा केली.

" तोंड किती करतेस ? " तिरपिडशास्त्री पुढें सरसावून रागानें बोलला. " एकनाथमहाराजांच्या देवळांत पाय तर ठेवण्याचा प्रयत्न कर, म्हणजे वेदांत काय सांगितलें आहे तें सांगेन ! "

" हें पाहा, माझें मन देवळांत गेलें आहे असें समजून आतांच एखादी वैदिक ऋचा म्हणून मोकळे व्हानांत ? कारण, आपल्याला तें पोपटपंची ज्ञान घोकंपट्टीनें मिळालेलें ! त्यांतला अर्थ जाणण्याचा हवाला परमेश्वरावर ! अर्थाशीं तुम्हां नदीवरच्या डोमकावळ्यांना काय कर्तव्य आहे ! पण काय हो, भट्टजीमहाराज, " वेणू एखाद्या ज्ञात्याप्रमाणें बोलते आहे असा भास होत होता, " सध्यां तुम्ही आणि आम्ही कोठें आहोंत ? अहो—

**देउळें म्हणजे नाना शरीरें । तेथें राहिजे जीवेश्वरें ।**
**नाना शरीरें नाना प्रकारें । अनंत भेद ॥**
**चालती बोलती देउळें । त्यांमध्यें राहिजे राउळें ।**
**जितकीं देउळें तितकीं सकळें । कळलीं पाहिजे ॥**

मग, कसें काय ? आपण जे कोणी आहांत ते सध्यां या ठिकाणीं देवळांतच आहांत, नाहीं का ? "

" हो—हो ! " तिरपिडशास्त्री नाक फेंदारून वांकडें तोंड करीत बोलला, " सागरगोट्यांनां कधीं कधीं द्राक्षें मानावीं लागतात ! "

अशा तऱ्हेचा संवाद चालू असतां त्या ठिकाणीं एक जटाधारी व दुसरा एक जवान असे दोघे पुरुष हुरमुजी रंगाच्या कफन्या घातलेले व हातांत कुबड्या असलेले तेथें एकदम आले. त्यांनां बघतांक्षणींच वेणू व अक्का यांनीं जटाधारी पुरुषाच्या पायांवर मस्तकें ठेवलीं व त्या दोघी हात जोडून मोठ्या लीनतेनें उठून बाजूला उभ्या राहिल्या. हा चमत्कार पाहून तिरपिड घे चक्करशास्त्री आनंदानें नाचूं लागून टाळ्या वाजवूं लागला आणि—

" वाहव्वा—वाहव्वा ! ठीक—उत्तम—नामी–फारच मनोहर जमलें हें त्रिदळ ! अहो, त्रिदळ कसलें ! हा त्रिफळा ! " असें घमेंडखोर आवाजानें म्हणाला.

" त्रिफळ्यानें प्रकृति साफ होऊन मन स्वच्छ बनतें ! " वृपटशास्त्री बोलूं लागला, " त्रिदळ जरी म्हटलें तरी तें त्रिगुणात्मक असतें ! "

" मुलींनो, काय तंटा आहे ? " थोरल्या जटाधारी साधूनें विचारलें, " मी तुमच्या तंट्याचें निवारण करतों ! "

" हे आमचे तुंडमुंड मुंडलेले वृपटशास्त्री तुरतुरे " तिरपिड तुच्छतेनें बोलूं लागला, " आणि हे जटादाढीमिशावाले बोकेसाधु महाराज ! आतां काय उशीर ! सांगा वेदान्त आणि मारा दोघे दोघींना काखोटीलान् दुसरें काय ? उडवा पांखरें ! "

" पांखरेंच उडायचीं ! " थोरले साधु बोलले " माणसें उडतांना तुम्हीं कधीं पाहिलीं आहेत काय ? "

" हो—हो ! पुष्कळ वेळां ! " गर्वोद्धत आवाजानें तिरपिडशास्त्री बोलला.

" एकूण, तुम्ही शुक्राच्या ताऱ्यावर वस्ती करणारे आहांत म्हणायचे ! " व्याजोक्तीनें जटाधारी थोरले साधू बोलले. " पण चुकतां तुम्ही ! सर्व गोष्टी तो एकटा जगन्नियंताच करतो ! "

" हें तुमचें ब्रह्मज्ञान पुरें करा ! " तिरपिडशास्त्री मत्सरग्रस्त वाणीनें

बोलूं लागला. " या दोघींची कड घेऊन तुम्ही जे ऐटीनें पुढें सरकलांत, तें आपलें सरकणें आतां पुरें करा ! "

" तुमचें म्हणणें तरी काय आहे ? " थोरल्या साधूनें प्रश्न केला.

" केशवपनाशिवाय, " शास्त्रार्थ सांगण्याच्या मिजाशीनें तिरपिंडशास्त्री बोलूं लागला, " विधवा स्त्रिया आमच्या शास्त्रानें पवित्र मानलेल्या नाहींत ! त्यांनां देवळांत जाण्याचाच नव्हे, तर कोणचीही धार्मिक गोष्ट करण्याचा अधिकार शास्त्रानें कुंठित केलेला आहे. केशवपनाशिवाय देवाचें नामोच्चारण करण्यससुद्धां त्या अपवित्र आहेत असें आमचें शास्त्र स्पष्ट सांगतें आहे ! "

" बरेच मोठे जाडे शास्त्री दिसतां ! " जटाधारी थोरले साधु बोलूं लागले, " आपलें शास्त्राध्ययन अकटोपासून विकटोपर्यंत झालेलें दिसतें ! आपण वैदिक ब्राह्मण आहांत ना ? "

" दिसत नाहीं का? " तिरपिंडशास्त्री जोरानें बोलला.

" नाहीं बोवा ! आपल्या चेहेऱ्यावर तें कुठें लिहिलेलें वाचायला दिसत नाहीं ! " थोरले साधुमहाराज बोलले.

" सांगितल्याशिवाय तें कोठें दिसतें कीं काय ? मला-बचंभट्ट उर्फ तिरपिंड घे चक्करशास्त्री वेदान्ती असें म्हणतात ! " तिरपिंडशास्त्री घमेंडीखोरीच्या ताठ्यानें बोलला.

" तुम्हांला मिळालेल्या टोपण नांवावरूनच तुमचें वेदान्ताचें स्वरूप प्रकट होतें आहे ! " थोरले साधू लाक्षणिक आवाजानें बोलले, " असो ! आपण काय म्हणतां ? केशवपनाशिवाय स्त्रियांनां पवित्रता येत नाहीं ! असेंच ना ? "

" पुन्हां पुन्हां काय हो विचारतां ?" जरा अधिकारी वाणीच्या ऐटीनें तिरपिंडशास्त्री बोलूं लागला, " पण तें असूं द्या ! आधीं तुम्ही असें सांगा कीं, या दोघींशीं आमचें भाषण चाललें असतां, मध्येंच पाचर मारल्यासारखे घुसून 'मी तंट्याचें निवारण करतों ' असें जें आतां म्हणालांत, तें आधीं करा. आणि मग पुढचा विचार पुढें ! हें पाहा, हे आमचे दोघे—तदनंतर आणि परंतु शास्त्री—आले आहेत, त्यांच्यापुढें आपल्या ज्ञानाचें भांडवल ओता ! "

त्याच क्षेत्रांतले-तदनंतर शास्त्री व परंतु शास्त्री या टोपण नांवाचे—दोघे भिक्षुक वरील वाद चालला असतां तेथें आले. त्यांनां पाहून थोरले साधू बोलूं लागले.

" ह्या दोघी स्त्रिया श्राच्य[illegible]त. तेव्हां त्यांचा जो छल तोच आमचा असें आम्ही समजतों ! "

" समजत असाल ! परंतु आपलें पुढें म्हणणें काय तें बोला ! " परंतु-शास्त्री बोलले.

"हूं, चालूं द्या तर मग आतां श्रींचें म्हणणें काय आहे तें !" तिरपिंडशास्त्री मान वांकडी करून घमेंडीनें बोलला.

" ऐका तर मग वेदान्ती भट्टजी ! " थोरले साधु बोलले.

" हे पाहा, हे कान पुढें केले आहेत ! चालूं द्या श्रींचें म्हणणें ! " तिर-पिंड बोलला.

" कान लांबल्यासारखे दिसताहेत खरेच ! " थोरले साधु बोलूं लागले, " हें पाहा भट्टजीमहाराज, परमार्थाची वाट सुगम करणारी महत्वाची पायरी म्हणजे आत्मज्ञान—"

" तदनंतर कोणची पायरी ? " तदनंतरशास्त्रयानें विचारलें.

" चौऱ्यायशीं लक्ष योनींच्या फेऱ्यांत प्राणी सांपडला म्हणजे तो पाप-पुण्याप्रमाणें निरनिराळे देह धारण करतो—"

" परंतु ब्राह्मण्य यायला त्या योनींत निराळीच कर्तबगारी करावी लागते !" परंतुशास्त्री मध्येंच बोलले.

" तदनंतर आपलें म्हणणें काय आहे ? " तदनंतरशास्त्रयानें विचारलें.

" नरदेह धारण करण्यास पुष्कळच पूर्व पुण्याई पाहिजे ! " थोरले साधु बोलले.

" परंतु हें शिक्षण बाल्यावस्थेंतच मिळत असल्यामुळें तें तुम्हीं आम्हांला शिकवण्याचें कारण नाहीं. " परंतुशास्त्री बोलले.

" तदनंतर आपलें काय म्हणणें आहे? " तदनंतर शास्त्रयानीं पृच्छा केली.

" देह हा अनित्य असून आत्मा हा नित्य आणि सर्वव्यापक आहे ! "

" आमचे वेद असेंच म्हणतात ! " तिरपिंडशास्त्री बोलला.

" याच न्यायानें, " थोरले साधु बोलूं लागले, " देव जसा देवळांत तसाच आत्मा देहान्तर्यामीं असायचा हें ठरलें. आत्मा जरी एकच आहे, तरी तो संयोगपरत्वें गुणांमध्यें भिन्नत्व पावतो. पाणी एकच असतें. परंतु तेंच उंसाच्या शेताला घातलें असतां त्याच्या अंगीं माधुर्य येतें ! पण तेंच विषवल्लीला पाजलें

असतां त्याचा विषरस बनतो. म्हणून आत्म्याच्या गुणांत जर कांहीं फेर आढळत असेल, तर तो संगतीमुळेंच असला पाहिजे. ''

'' तदनंतर ?''

'' जीवात्मा आणि परमात्मा यांत भिन्नत्व नाहीं.—''

'' परंतु,''

'' भेद भ्रामक आहे !''

'' मग तदनंतर काय !''

'' याकरितांच जे अपूर्ण ज्ञानी आहेत त्यांना द्वैत कीं अद्वैत असा विकल्प इत्पन्न होतो. माया आणि ब्रह्म यांची सांगड कशी बनली आहे, दृश्य तें मिथ्या आणि विनाशी कां व अदृश्य ब्रह्म जें तें निर्विकार कसें, ह्या गूढ विचारांचें ज्ञान झालें असतां अद्वैताच्या जयजयकारानें आत्मा डोलूं लागतो !''

'' परंतु—''

'' जगाच्या उत्पादक आणि चालक अशा परमेश्वराला, मूढ जन कोण्या समजुतीनें निरनिराळ्या देवता मानतात— ''

'' जितक्या प्रकृती तितक्या विकृती ! ह्याच न्यायानें असंख्य देवता अस्तित्वांत आलेल्या आहेत ! ''

'' परंतु, एवढ्यानें कसें भागेल ? ''

'' अहो, '' तिरपिड बोलूं लागला, '' त्यांच्या बोलण्याचा भाव असा कीं, आत्मा हा देव आणि देह हें त्याचें देऊळ ! असेंच कीं नाहीं तुमचें म्हणणें साधुबुवा ? ''

'' हेंच सत्य आहे ! ''

'' असें जर आपलें ठाम मत आहे, तर मग या दोघींना श्रीएकनाथ महाराजांच्या देवळांत धरणें धरून बसण्याकरितां आतां इथून जाण्याचें कारणच उरलें नाहीं ! '' तिरपिड घे चक्रशास्त्री मोठ्या ताठ्यानें बोलला.

'' हा न्याय सांगायला आतां इथें एखादा न्यायशास्त्री येण्याचें कारणच उरलें नाहीं. '' साधुवर्य बोलले, '' पण काय हो, परीट कसे असतात व त्यांची कृति कशी असते हें तुम्ही सांगूं शकाल काय ? ''

'' हो–हो ! '' तिरपिडशास्त्री मोठ्या तोऱ्यानें बोलला, '' ते अडाणी असून लोकांचे मळलेले कपडे स्वच्छ करून देतात ! ''

" ते जसे अडाणी असतात तसाच त्यांचा धंदा! " साधु श्रेष्ठ शांतपणें बोलूं लागले. " लोकांचे मळके कपडे आपल्या घरीं जमवून प्रथम ते आपलें घर भरून टाकतात,—"

" तदनंतर—"

" ते त्यांना क्षारानें साफ करून त्याच्या घड्या घालतात,—"

" तदनंतर—"

" घड्या घालणें संपलें म्हणजे पुन: ते ज्याचे त्याला ते परीट देऊन टाकतात. "

" तदनंतर—"

" कपडे परत देऊन टाकले कीं पुन: त्या परटाचें घर रिकामें तें रिकामेंच ! "

" होत असेल रिकामें; परंतु पुढें काय ? "

" तदनंतरची हकीकत समजलीच पाहिजे! "

" जे आहेत्तर ते तदनंतर जसे रिक्तसदन बनतात तद्वतच बेअकली लोकांची स्थिति असते. ते लोक म्हणजे निव्वळ धोबीच. दुसऱ्याचे विचार ऐकायचे, कृती बघायच्या आणि कर्तबगारीच्या नांवानें भोंपळ्याएवढें पूज्य असायचें—ही त्यांची वहिवाट. त्यांचें विचारगृह नेहमीं परटाच्या रिक्तसदनाप्रमाणें कोरडें ठंठणीतच असतें. तें असो म्हणा ! तुमच्या डोळ्यांवरचा द्वैताचा चष्मा जोंपर्यंत बाजूला झाला नाहीं तोंपर्यंत तुम्हांला त्यांतलें माधुर्य समजायचें नाहीं ; पण या एकंदरींतल्या गोष्टींतला न्याय काय तो तुम्हांला समजला ? "

" हो–हो ! " तिरपिंडशास्त्री बोलूं लागला, " मलाही याच न्यायाचे असले निराकार ईश्वरवादी––आमच्या नाथांच्या पवित्र देवळांत—ह्या झगझगीत पवित्र सोंवळ्या स्त्रियांसह यायला नको आहेत। पण काय हो, तुम्ही पायांत पादुका, हातीं माळ, गळ्यांत मेखळा, मस्तकीं जटाभार, त्यावर टोप, तोंडावर लांब वाढलेल्या दाढीमिशा, कांखेंत कुबडी, अंगावर हुरमुजी रंगाचीं वस्त्रें, आणि पाठीशीं गलोल असा वेष धारण करून वेदान्त सांगत हिंडतां, तेव्हां असा हा आश्रम आपणांला वेदांतच कोठेंतरी आढळला असावा असें दिसतें."

" ह्या आश्रमाला ब्रह्मचर्याश्रम म्हणतात. हा आश्रम वेदोक्त यज्ञयागान्तर्गताचा आहे. आम्ही श्रीरघुपतीचे दास असून स्वेच्छाविहारी आहोंत !

आणि म्हणूनच खेळण्यासाठीं हा गलोल बाळगला आहे ! " साधुवर्यांनीं स्पष्ट शब्दांत सांगितलें.

" आपण याचा अभ्यासही केला असेलच ? " तिरपिंडशास्त्र्यानें विचारलें.

" यांत संशय तो कसला ! " साधुश्रेष्ठानीं उत्तर दिलें.

" तर मग, " तिरपिंडशास्त्री बोलूं लागला, " ती वर घार उडते आहे तिला पाडा पाहूं खडा मारून जमीनीवर ! "

तिरपिंडशास्त्र्यानें इतकें म्हणण्याचा अवकाश ! त्या साधुश्रेष्ठानें तावड-तोब अस्मानांत घिरट्या मारीत विहार करीत असलेल्या घारीला गलोलांतून खडा मारून भूमंडळावर निश्चेष्ट करून पाडली. तेव्हां तें कृत्य पाहून दपट-शास्त्री तुरतुरे स्वतःशींच म्हणाला, " काय तरी या तिरपिंड्याची शकल आहे पाहा ! मुद्दाम हत्या करवून दक्षिणा उपटण्याची खूबच युक्ति काढलीन् केकानें ! "

" ब्रह्मचर्याश्रमांत राहून अशी हत्या करावी असें श्रीरघुपतीनेंच तुम्हांला सांगितलें आहे वाटतें ? या पापाबद्दल तुम्हांला सक्षौर प्रायश्चित्त घेतलें पाहिजे ! " तिरपिंडशास्त्री मोठ्या आढ्यतेनें बोलला.

" आपण भूदेव आहांत ! " साधु बोलूं लागले, " सांगाल तसें प्रायश्चित्त घेण्याला मी तयार आहें. हा जटाभार व ह्या दाढीमिशा, यांची किंमत काय आहे ! हा देह मृत झाला म्हणजे त्याला सरणावर ठेवून अग्नि लावला म्हणजे याला विस्तवानें स्पर्श होण्याच्या आधींच हे केश भुरकन् जळून जाणार आहेत. "

" परंतु—"

" परंतु सक्षौर प्रायश्चित्त घेतलें असतां केलेल्या पातकाचें क्षालन होतें काय ? " साधुवर्यांनीं प्रश्न केला.

" हें तर शास्त्रानें स्वच्छच सांगितलें आहे ! " तिरपिंडशास्त्री बोलला.

" ठीक आहे. करा तयारी प्रायश्चित्ताची ! " साधूंनीं बजाविलें. " प्राय-श्चित्त घेतल्याबरोबर घार मात्र स्वस्थानीं उडून गेली पाहिजे ! "

" शास्त्राज्ञा प्रायश्चित्त देण्यापुरतीच आहे. मृत जीव उडणार कसा ?" तिर-पिंड घे चक्करशास्त्री बोलला.

" असें काय ? " साधुवर्य रोषानें बोलले, " तुम्हींच वेदार्थशून्य पोटभरू भिक्षुकांनीं श्रीनाथमहाराजांना याच पैठणक्षेत्रीं एकावन्न वेळां प्रायश्चित्तें दिलींत व त्यांनीं शांतपणें साधुवृत्तीला अनुसरून तीं घेतलीं—"

" परंतु—"

" पण हा रामदास तसा नव्हे ! मृत जीव उठतो कीं नाहीं तें तुम्हांला आतांच दाखवितों ! "

रामदासांनीं जमीनीवर पडलेल्या घारीला उचलून घेतलें व कृपापूर्ण दृष्टीनें तिच्याकडे अवलोकन करून तिच्या अंगावरून ममतेनें हात फिरविला व तिला म्हटलें, " घारूबाई, तुम्ही पूर्वी आकाशमार्गे जसा विहार करीत होतां त्याप्रमाणेंच आतां स्वस्थलीं जाऊन स्वातंत्र्याचा उपभोग घ्या ! " झालें. समर्थांनीं घारीला वर अस्मानांत फेंकून दिल्याबरोबर ती पूर्ववत नभोमंडळांत मंडळें घेऊं लागली. हा सर्व चमत्कार दृष्टीस पडतांक्षणींच तेथील त्या चारी ब्राह्मणांचीं मुखकमलें समर्थरूप सूर्याच्या तापानें कोमेजल्यासारखीं दिसूं लागून, समर्थरूप चंद्रप्रकाशानें—अक्का, वेणू व उद्धव यांचीं तोंडें कुमदांप्रमाणें सतेज, रमणीय आणि पूर्ण विकसित दिसूं लागलीं. हे दोन्ही प्रकार एकाच विभूतिदर्शना दोन प्रकारांनीं एकदम घडले. तिरपिंड घे चक्करशास्त्री, परंतुशास्त्री, तदनंतरशास्त्री आणि दपटशास्त्री तुरतुरे यांनीं श्रीसमर्थांच्या पायांवर लोटांगणें घातलीं. त्यांनीं आपले कान उपटून घेऊन, तोंडांत मारून घेतल्या व पश्चात्तापानें त्यांनीं आपलीं मनें पुनीत करून घेतलीं. ते सर्व एक सुरांत म्हणाले, " महाराज, क्षमा करा ! आम्ही चुकलों ! आपल्याला न जाणतां आपल्याशीं वितंडवाद केला ! "

" तुम्ही साक्षात् भूदेव ! " समर्थ संतोषानें बोलले, " तुम्ही मूर्तिमंत वेद आहांत. श्रीरामकर्ता समर्थ आहे. तो काय न करील ! घार जिवंत झाली हें सामर्थ्य तुमचेंच आहे. "

" अपराध माफ करणें आपल्याकडे आहे ! " तिरपिंडशास्त्री हात जोडून तिरपिंड्या आवाजानें बोलला.

" भट्टजीमहाराज, " समर्थ गंभीर वाणीनें बोलूं लागले, " आतां या श्रींच्या मुलींना वपन करणें नकोना ? हें पाहा:—

अभंग.

**अंतरीं गुरुवचन । बाह्य नापीत वपन ।**
**अंतर्बाह्य शुद्ध झाला । रामदर्शनें निवाला ॥**

**मन मुंडिल्या उन्मन झालें । शिर मुंडिल्या काय केलें ॥**
**रामदासी तीर्थविधी केला । रामीं पिंड समर्पिला ॥**

आतां तरी ह्या श्रीच्या मुली पवित्र आहेत ना ? ”

“ हें सांगणेंच नको ! ” **तिरपिंड**शास्त्री नम्रतेनें बोलला.

एकदम एक वाटसरू पुढें होऊन व नमस्कार करून बोलला, “ आपण जांबेंतील **सूर्याजीपंतांचें** चिरंजीव **नारायणबावा** आहांत काय ? ”

“ होय ! ” **समर्थ** बोलले, “ आपण अंबाड प्रांतीचे आहांत हें मीं ओळखलें.

“ तुम्ही असे प्रांतोप्रांतीं हिंडून धर्मजागृतीचें काम करीत आहांत, ” तो वाटसरू बोलला, “ ह्याचाच फायदा दक्षिणेंतील पुणें प्रांतीं वाढलेला **शिवाजी** घेत असून, त्यानें एकामागून एक किल्ले, प्रांत काबीज करण्याचा सपाटा चालविला आहे. **रामदासी**पंथाच्या साह्यानें ऐक्यभाव वाढवून, स्वदेशांत स्वराज्यस्थापना करण्यास, त्याला जी तुमची मदत मिळते आहे, ती योग्यच आहे; परंतु तुमच्याकरतां तुमचे श्रेष्ठ बंधु व मातोश्री बहुत श्रमी होऊन आज चोवीस वर्षे एकसारखा शोक करीत आहेत ! त्या शोकानें तुमच्या मातोश्रींचे डोळेही गेले. तेव्हां आतां त्यांच्या भेटी घेऊन त्यांचें समाधान करणें योग्य आहे. ”

“ फार चांगलें ! ‘ न मातुः परदैवतम् ’ ! ” **समर्थ** बोलले, “ आपल्या सूचनेप्रमाणें त्या उभयतांच्या भेटीस जाण्याची तयारी करतों ! ”

“ उत्तम आहे ! ” वाटसरू बोलला, “ आम्हीही तीर्थयात्रा करीत हिंडत आहोंत. अनायासें तुमची गांठ पडली म्हणून हकीगत कळविली. आतां आम्ही येतों. ”

“ श्रीराम समर्थ ! ” **समर्थ** बोलले, “ आम्हीही घरीं जातों. ”

**समर्थांचें** हें भाषण ऐकून **उद्धवानें** एक श्लोक म्हटला व तेथील सर्व मंडळी आपापल्या कामाकरतां निघून गेली. **उद्धवानें** श्लोक म्हटला तो:—

**“ सदा सर्वदा सज्जनाचे नियोगें ।**
**क्रिया पालटे भक्तिभावार्थ लागें ॥**
**क्रियेवीण वाचाळता ते निवारी ।**
**तुटे वादसंवाद तो हीतकारी ॥**

जय जय रघुवीर समर्थ ! ”

---

# प्रकरण पांचवें.

## ' शरण असावें रामदासाळागीं.



प्रतापगड श्री शिवरायानें स्वमताप्रमाणें बांधून तेथें जगदंबा-भवानीच्या मूर्तीची संस्थापना केली त्यावेळीं तो प्रांत व तेथले पर्वत अनुपम शोभेनें विलसत होते. त्या किल्ल्यावर सुंदर उपवनें निर्माण केलेलीं होतीं. त्या उपवनांतील वृक्ष प्रफुल्ल झाले असल्यामुळें तीं चित्रविचित्र दिसत होतीं. तेथील अत्युच्च पहाडांतून धो धो आवाज करीत भूप्रदेशाकडे वेगानें धांव घेणारे सर्पगतितुल्य जलौघ, वृक्षसंपन्न अरण्यें व चिखलानें माखलेल्या मदोन्मत्त हत्तींचे–दानोदक गळूं लागल्यामुळें वृष्टि होणाऱ्या मेघांप्रमाणें दिसणारे–कळप नेत्रांचें सार्थक्य करीत होते. चंचलनेत्रप्रांतयुक्त व बरोबर हरिणी असलेले असे हरिण तोंडांत गवताचे घांस घेऊन कड्यांवरून विहार करीत होते. महिष, वराह, व्याघ्र इत्यादिकांचा संचार असलेल्या त्या पर्वतावर, नानाप्रकारच्या पुष्पांचा गंध येत असलेले व आरक्तवर्ण अशा कोमल पल्लवांनीं युक्त असणारे त्या बनांतील वाऱ्यानें हालविलेले वृक्ष जणुं त्या क्रूर श्वापदांची प्रार्थनाच करीत होते. ज्यांनीं आपले कमलरूपी हात जोडले आहेत व ज्यांस बनें आणि तीर्थें प्रिय आहेत अशा मदोन्मत्त झालेल्या भ्रमरांनीं सेवन केलेल्या कमलवल्लींनीं त्या प्रांताला फारच शोभा आली होती. फुलून गेलेल्या वृक्षांनीं युक्त असलेल्या अनेक कड्यांवरून मधमाशांच्या मधाचीं अनेक पोळीं लोंबत असल्याकारणानें तेथील हवा फारच स्वच्छ होती असें तीं पोळीं निदर्शनास आणीत होतीं. ही वेळ माध्यान्हकाळच्या प्रखर उन्हाची जरी होती तरी तेथील घनदाट वृक्षराजीनें आपल्या मस्तकावर सूर्यकिरणांना विसावा दिल्यामुळें त्या प्रांतांत वस्ति करणाऱ्यांना उन्हाचा मुळींच ताप होत नव्हता. किल्ल्यावर एक अतिरमणीय सरोवरतुल्य तलाव होता. तृषितहरिणांचे समुदाय यावेळीं जिकडेतिकडे फांकण्याच्या पंथास लागले होते. त्या प्रांतांतून जो एक मोठा जलौघ त्या पर्वताला वेढा घालून वाहात होता त्या जलप्रवाहांत

सुवर्णकमलें विपुल होतीं व तेथें सारस, कारंडव वगैरे पक्षी विहार करीत असल्यामुळें तो पर्वत स्वच्छ अशा कमळांची माळाच गळ्यांत धारण करून शिवछत्रपतींच्या प्रतापगडाचा शुद्ध प्रताप जगाला दाखवितो आहे असें दिसत होतें. गडावरील तलावांत अंतःकरणांत आनंद उत्पन्न करणारें, बालसूर्या प्रमाणें कांती असलेलें सौगंधिक कमलांचें विशाल वन असून त्या तलावाच्याच कांठाला लागून एक सौंदर्यसंपन्न उपवन होतें. तें उपवन राजस्त्रिया व त्यांचा गोशा एवढ्यांच्याकरितांच मुद्दाम तयार करविलेलें होतें. तें उपवन आसमंताद्भागीं असणाऱ्या नानाप्रकारच्या लतांनीं आणि वृक्षांनीं व्याप्त झालेलें असून अनेक तऱ्हांच्या पुष्पफलांनीं ओथंबून गेलेलें होतें. तेथील तो दिव्य तलाव हिरव्यागार अशा शेवाळाच्या पृष्ठभागावर सुवर्णमय कमलांनीं प्रफुल्ल झालेला असल्यामुळें तो भ्रमरांना विश्रांति घेण्यास निसर्गसुंदरीनें स्वहस्तें गालिचाच पसरलेला होता असें दिसत होतें. त्या तलावांतील उदक अतिशय स्वच्छ असल्यामुळें फारच रमणीय दिसत होतें. किंबहुना तो डोंगर मूर्तिमंत आश्चर्यच होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. तलावांतील कमलांचे पराग तेथील हवेनें सर्वत्र वारंवार पसरत असल्यामुळें त्या गडावरील हवा शुद्धपूर्ण व अक्षयसौगंधि बनलेली होती. अशा त्या गंधपूर्ण हवेंतच त्यावेळीं मधून मधून मधुमालतीच्या फुलांचा सुवास वाहात होता. हा मधुमालतीचा वेल त्या तळ्याच्या कांठच्या उपवनांतील दोन आम्रवृक्षांवर चढलेला असून त्या दोन वृक्षांच्या मधल्या अंतरावर त्या वेलाचा झोंपाळा बनलेला होता. एके दिवशीं सकाळीं त्या झोंपाळ्यावर तिघी स्त्रिया ओंव्या म्हणत बसलेल्या होत्या. त्यांतील एक स्त्री राजवैभवांकित चिन्हांची दिसत असून बाकीच्या दोन तिच्या मैत्रिणी असाव्या असें त्यांच्या वर्तनावरून दिसत होतें. ह्या तिघी स्त्रिया कोण असाव्या हें आतां त्यांच्या भाषणांवरून आपल्याला कळून येईल.

" ही वेल फुलांनीं फुलल्यामुळें किती मधुर सुगंध सुटला आहे ! " तिघींपैकीं एक स्त्री प्रेमानें बोलली.

" आणि त्या फुलांतला मकरंद चाखण्याकरितां भुंग्यांच्या रांगा गुणगुणत असल्यामुळें सुरांत ओंव्या म्हणायला ही एक स्वाभाविकच सूरदार वेल बनली आहे. " दुसरी स्त्री अलंकारपूर्ण भाषेनें बोलली.

" हं, आतां ओंवी म्हणायची कोणाची पाळी आहे ? " तिसऱ्या स्त्रीचा मंजुळ ध्वनि निघाला.

" चंद्राबाईची आहे ! "

" म्हणा चंद्राबाई ! "

ओंवी.

**मुखकमलीं नेत्र कमळ । तसा पोटीं पुत्र विमळ ॥**
**होउनीयां यवन सकळ । निर्दाळील ॥ "**

चंद्राबाईनें ओंवी म्हटल्यावर राजचिन्हांकित स्त्रीनें तिला विचारलें,

" चंद्राबाई, कोणाच्या पोटीं असला मुलगा होणार ? "

" आपल्या, बाईसाहेब ! " चंद्रानें उत्तर दिलें.

" कशावरून म्हणतां हें ! " बाईसाहेबांनीं विचारलें.

" मी सांगू का ? " तिसरी स्त्री बोलली.

" हं ! " बाईसाहेबांनीं हुकार दिला.

" पण ओंव्या म्हणायची एक पाळी झाली म्हणजे सांगेन. "

" करा तर मग तुम्हीच सुरवात. "

" बाईसाहेब, आतां आपलीच पाळी आहे. "

" तुम्हीं का म्हणांना अगोदर, गिरजाबाई ! " चंद्रेनें विनंति केली.

" खरेंच, तुम्हीच म्हणा गडे आधीं. " राज्यलक्षणसंपन्न स्त्री बोलली.

ह्या तीन स्त्रिया म्हणजे एक राजचिन्हांकित जी स्त्री होती ती शिवछत्रपतींची स्त्री सईबाई असून, वांईक्षेत्रीं बेषखखाना वी ज्या स्त्रीच्या पातिव्रत्य-खड्गानें फजीति केली होती ती निळो सानदेवाची गृहिणी चंद्रा होती आणि तिसरी गिरजाबाई ही बाळाजी आवजीची धर्मपत्नि होती. त्या तिघी जणी उकाड्याचा ताप होऊं नये म्हणून त्यावेळीं मधुमालतीच्या वेलाच्या झोंपाळ्यावर मजेनें ओंव्या म्हणत बसल्या होत्या. सईबाईनें आणि चंद्रानें आग्रह केल्यावरून गिरजाबाई पुढील प्रमाणें ओंवी म्हणूं लागली.

**"राणी चोरुन खाई माती ॥ "**

" कोणाची राणी. ? " सईबाईनें विचारलें.

" दिलीप राजाजी राणी सुदक्षिणा गर्भारपणीं माती चोरून खात असे."

" मग पुढें ? " चंद्रानें पुसलें.

" राणी चोरुन खायी माती ॥
परी उमगे चोरी पति ती ॥ "

" ती हो कशी ? सईबाईनें विचारलें.

इतक्यांत सईबाईची दासी तेथें आली व तिनें " येवं काय बाईसाब ! बोलायला सुरवात केली, " माझं धनी हैतं पक्कं रामाचं श्येवक. त्येंनी कांदा, लसुन कंदीबी न्हाई ठाव ! "

" अन् मग तूंही खात नसशील ? "

" तसं नव्हं बाईसाब ! माझ्या लहानपनापून माझ्या बापाच्या घरीं मला त्ये खाण्याची है चट—"

" तर मग तें तूं चोरून खातेस होय ? "

" योक्दां खाल्लं व्हतं ! पुन्हां रामाचं नांव ! धन्यान्नीं त्यें तवाच उमाग्लं !"

" तें ग कसें ? "

" माझ्या संगं त्ये पिरमानंदीं आलं तवा ! "

" ओवी संपली नाहीं अजून, गिरजाबाई ! "

" राणी चोरुन खाई माती ॥ परी उमगे चोरी पति ती ।
मुका हेर बात्मी कथि ती ॥ शिवाजीराजांना "

गिरजाबाईनें अशी पुरी ओंवी म्हटल्यावर मनःकल्पित आनंदानेंही जी टवटवी मुखकमलावर येणार नाहीं अशी प्रसन्नता सईबाईच्या चेहेऱ्यावर जरी एकदम दिसूं लागली तरी ती टवटवी—प्रसन्नता—मुग्ध बालेप्रमाणें लज्जान्वित होती. सईबाई तशाच स्थितींत अस्फुट आवाजांत लडिवाळ-पणानें बोलूं लागली.

" इश्श ! बऱ्याच आहांत हो गिरजाबाई ! दिलीपराजावर ओंवी म्हणतांना तिकडचें नांव कशाला हवें होतें ओंवींत म्हणायला ? मी का चोरून माती खातें ? "

" मग काय, " चंद्रा बोलली, " दिलीप राजाच्या ऐवजीं शिवराज म्हटलें तर नाहीं का चालणार ? "

" तें कसें बरें चालेल ! " सईनें विचारलें.

" कसें म्हणजे ? अगदीं माजलेल्या हत्तीच्या गजगतीप्रमाणें चालेल बरें !" गिरजेनें चंद्राकडे डोळे मिचकावित उत्तर दिलें.

" सांगा पाहूं कसें तें ! " सईनें मुद्दाम प्रश्न केला.

" गोसेवा आणि ब्राह्मणप्रतिपाळ यांपासून दिलीप राजाला जशी रघु नांवाच्या पुत्राची प्राप्ति झाली तशीच ! " गिरजेनें ठासून उत्तर दिलें.

" आलें हो लक्षांत माझ्या ! "

" मग आतां आपण म्हणायची ओंवी ! "

" तुमच्यासारखी अलंकारिक नाहीं बाई मला म्हणतां यायची ! "

" जशी येईल तशीच म्हणायची ! "

" ऐका अं माझी आपली वेडीवांकडी ! "

याच वेळीं तेथला तो प्रकार चालला असतां, शिवराज सहज त्या बाजूला कांहीं कारणाकरतां स्वगत विचार करीत हिंडत आले होते ! त्यांनीं त्या ओंव्या ऐकल्या होत्या, पण तिकडे त्यांचें विशेषसें लक्ष गेलें नव्हतें. कारण ते कोणच्या तरी विचारांत मग्न असल्याची छटा त्यांच्या वदनावर दिसत होती. अशा त्या स्थितींत त्यांच्या अर्धांगीचे थोडके पण अस्फुट शब्द त्यांच्या कानीं पडले व त्यामुळें नैसर्गिक प्रेमाच्या लाटेनें त्यांचें मन क्षणभर त्या त्यांच्या अर्धांगीच्या मंजुळ शब्दांकडे वेधलें व ते पुढील प्रकार अवलोकन करण्याकरितां एका मल्या मोठ्या बकुलवृक्षाच्या आड येऊन उभे राहिले होते. हीच वेळ सईबाईनें ओंवी म्हणण्याच्या पाळीची होती. सईबाईनें ओंवी म्हटली.

" शमी प्रसवे अग्निज्योंती । शमी निकटी गणपती ॥
शमी दोघां संभाळीती । पतिपुत्र ॥ "

" अरे रे ! भावी स्थितीचें हें द्योतकच आहे असें म्हणायला काय हरकत आहे ! " शिवाजीनें आडून वरील ओंवी ऐकल्यावर निरुत्साहानें उद्गार काढले, " कोणच्याही तऱ्हेच्या विलासांत गर्क होऊन व्यर्थ वेळ न दवडतां स्वबांधवांकरतां अश्रान्तश्रमानें स्वराज्यस्थापनेच्या अनंत खटपटी करीत असतां, माझ्या अर्धांगीच्या पोटीं ह्या हिंदुस्तानच्या भूमातेच्या उरावर येथें नाचणाऱ्या परकीय सत्तेला जाळून खाक करण्याकरतां, अग्नि उत्पन्न न होतां ज्योतीचीच उत्पत्ति व्हावी काय ? आतां माझ्या लाडकीनें जी ओंवी म्हटली त्या ओंवींत ' अग्निज्योंती'च्या ऐवजीं ' अग्निमूर्ति ' आणि ' शमी ' ह्या

ऐवजीं ‘ जगा ’ असें जर सरस्वतीनें बदवलें असतें तर मला मोठा आनंद झाला असता ! पण उपाय काय ! जें व्हायचें तें कधीं चुकायचें नाहीं ! पण अशा तऱ्हेचे व्यर्थ कुतर्क काढण्यांत तरी अर्थ काय ? आपण भविष्यवादी थोडेच आहोंत ! कर्ताकरविता तो एक परमेश्वर आहे ! ”

**शिवाजी**चे हे आत्मगत विचार चालले असतां **गिरजाबाईचें** आणि दासीचें लक्ष एकसमयावच्छेदेंकरून त्या बकुलवृक्षाआड लपून उभ्या असलेल्या व्यक्तीकडे गेलें व त्या दोघींचा आपसांत नेत्रसंकेत होऊन **गिरजेनें सईबाईला** थट्टेनें विचारलें——

“ बाईसाहेब, तें त्या बकुळीच्या झाडाआड काय लकाकतें आहे तें बघितलेंत का ? ”

“ हत्ती आपलें गंडस्थळ त्या झाडावर घाशीत असतां, त्याचें मस्तकभूषण त्या झाडाला अडकून राहिलें असून तेंच चमकतें आहे असें वाटतें ! ” **चंद्रा** मध्येंच बोलली.

“ अव, तसं नव्हं, **चंद्राबाई** ! शिकारखान्यामधला राजहंस सुटला हये, राजहंस ! त्याचे त्ये पर चमकत हैती ! आलं ध्येनांत ? ”

“ **चंद्राबाई,** ” **सईबाईनें** नीट पाहून म्हटलें, “ स्वारीच इकडे आली आहे. आपलें इतक्यावेळचें बोलणें स्वारीनें ऐकलें वाटतें सारें ? ”

“ महाराज कितीवेळ तरी त्या बकुळीच्या वृक्षाच्या आड उभे आहेत. बाईसाहेबांनीं ओंवी म्हणायला सुरुवात केली त्यावेळेपासून महाराज तिथें उभे आहेत ! ” **गिरजा** बोलली.

“ हें हो काय ? ” **सईबाई** जरा भिंवया चढवून पण अंतःप्रेमानें बोलली. “ स्वारी आली आहे हें मघांच कां नाहीं मला सांगितलेंत ? ”

“ आपल्याला जर मघांशीच तशी सूचना केली असती, तर आपण ओंवीच म्हटली नसतीत. आणि मग अशा तऱ्हेची इथें चाललेली गम्मतही क्षणभर अवलोकन करून रात्रंदिवस स्वराज्यस्थापनेच्या विचारांत मग्न असलेलें महाराजांचें मन आयतेंच जें रममाण झालें तें झालें नसतें; म्हणून आपल्याला तसें सुचविलें नाहीं. ” **गिरजेनें** चोख जबाब दिला व पुन्हां म्हणाली, “ बाईसाहेब, महाराजांची इच्छा इकडेच येण्याची असावी असें दिसतें, तर आतां आम्ही येतों. ”

असें बोलून, **गिरजा** व **चंद्रा** झोंपाळ्यावरून जों खालीं उतरताहेत तोंच **शिवराज** पुढें होऊन त्यांनां म्हणाले, " कां, उतरलांत कां ? चालूंद्या तुमच्या ओंव्या ! आम्ही आल्यानें तुमच्या रंगांत भंग होत असेल तर आम्ही आपले परत जातों हवें तर ! "

" महाराज, आतां बाईसाब दमल्याती ! " दासी मध्येंच तोंड घालून बोलूं लागली, ' बाहुलच्या ओंव्या म्हणत बसल्या हैत ! '

" मग, तुझें काय म्हणणें आहे ? ' **शिवाजी** थट्टेनें बोलूं लागला, " झोंपळ्यावरून खालीं उतरवून वाड्यांत नेऊं होय ? छे:, आपल्याला हें दुप्पट ओझें नाहीं उचलायचें ! " -

" मग म्यानासकट खांडा कसा उचलतां ! त्ये नव्हं का दुप्पट ओझं ? " दासीनें खुबीनें प्रश्न केला.

" पुरे ग ! तोंड किती करावं ! थट्टा कुणी कोणाची करायची ! " **सईनें** उसन्या रागानें म्हटलें.

" **चंद्राबाई**, **गिरजाबाई**, चला, महाराजांची बाजू राणीसरकार सावरूं लागल्या ! आतां हतं आपला टिकाव लागणार नाहीं ! आपुन जाऊं या ! "

**सईबाई** व **शिवाजी** या दोघांशिवाय त्या तिघीजणी तेथून निघून गेल्यावर **शिवाजी सईबाईजवळ** जाऊन तिला म्हणाला " दासी बोलली ते खोटें का ? "

" खोटें नाहीं तर काय ? "

" तिचें म्हणणें खोटें असेल तर मारा पाहूं उडी ! "

" शिडी नसेल तर उडी ! "

" खरें आहे बुवा ! " असें म्हणून **शिवाजीनें सईबाईला** वेलीच्या झोंपाळ्यावरून हात देऊन उतरवली व तो तिला म्हणाला " पण आधीं तें लडबडलेलें तोंड पुसा पाहूं ! किती तरी लडबडलें आहे तें ! कमलाचा जन्म जरी चिखलापासूनच झालेला असतो तरी त्याच्या स्वरूपांत चिखलाचा स्पर्शही झालेला दृग्गोचर होत नाहीं आणि तुमचें हें मुखकमल पाहा ! "

" माझें तोंड चिखलानें का लडबडलेलें आहे ? "

" अहो, चिखलानें काय आणि मातीनें काय ? एकच ! मातींत पाणी

पडलें तरी चिखल बनतो आणि माती तोंडांत पडली तरी चिखलच तयार होतो !"

"म्हणजे काय ?"

"गिरजाबाईनीं मघाशीं ओंवींत काय म्हटलें तें आहेना लक्षांत ?"

"ती त्यांनीं आपली गमतीनें कवितांत लाक्षणिक थट्टा केली !" सई-बाई मुरकत बोलली, "मी का पोरबीर आहें माती खायला ?"

"पोर नाहीं म्हणून तर ठीक आहे. नाहींतर आम्हांला जिंकून घ्यायला सुईच्या अग्राइतकीसुद्धां या दुनियेंत मृत्तिका शिल्लक राहिली नसती ! बाकी आतांशें घशांत माती उतरविण्याचा जो सपाटा सुरू आहे तो मात्र मोठा अजब आहे यांत शंका नाहीं !"

"कुणी ? मीं का घशांत माती उतरविण्याचा सपाटा चालविला आहे ? हें आपण करून दुसऱ्यावर ढकलणें चांगलें !"

"कोण तर मग—मी का माती खातें ?"

"नाहीं का ?"

"तें कसें काय ?"

"आज हा किल्ला घेतला, उद्यां दुसऱ्याला मोर्चा लावला. परवां चंद्रराव मोऱ्याची जहागीर बरबाद केली. राजगड घेतला, कीं लगेच विजापूर-करांवर स्वारी करण्याची तयारी करावयाची. उद्यां कोंकण जिंकलें, कीं परवां मोंगलांचा चुराडा कसा उडवावा याबद्दलच्या मसलती करायाच्या असें जें रात्रंदिवस चालवलें आहे तें, दिसेल ती जमीन आपल्या घशांत उतरवणेंच नव्हे का ? मग, आतां मी माती खातें का इकडूनच खाणें होतें तें सांगायचें!"

"आम्हांला जरी तुम्हीं आडवलें आहे, तरी आम्ही म्हणतों त्या बाबतींत परीक्षा द्यायला आम्ही तयार आहोंत !"

"ती कशी काय !"

"आम्ही माती खातों का तुम्ही खातां याची साक्ष तोंडाच्या वासावरून पटेल !!" शिवाजीनें आपलें मुकमल सईबाईच्या मुखारविंदाजवळ नेऊन म्हटलें, "घ्या आमच्या तोंडाचा वास !"

"ही आडवण्याची चांगली युक्ति काढली. पुरुषापुढें स्त्रियांचा टिकाव कितीसा लागणार ! अबलांनीं बलवंतांना कधीं हटवलें आहे का ?"

" शंका आहे कीं काय ? नुसतें पाणी कधी तरी पेट घेईल काय ! त्यांत तेलाचें मिश्रण असलेंच पाहिजे ! "

" पण पाण्याच्याच पोटांत विस्तव असतो असें म्हणतात ! "

" अगदीं खरें आहे ! पुरुषाला स्त्रीरूप शक्ति जर साहाय्य नसेल, तर त्याच्या हातून काय होणार ? वेदधर्म न मानणाऱ्या हूणांचें निर्दालन करण्याला परमेश्वराला प्रत्यक्ष जगन्माता शक्तीची सेवा करून तिला वश करून घ्यावी लागली, मग आम्हां मानवांचा तेथें काय पाड ! आम्ही आमचा हा देश परकीय सत्तेचें जूं झुगारून देऊन आमच्या स्वदेशबांधवांना येथें यथेच्छ विहार करण्याला मोकळा करीत आहों, तों तुम्ही—"

" गडे, पण आतां पुरे नाहीं का झालं हें ? जाऊं का मी ? "

• " सुईला दोरा कुठें सुटला आहे का ? तो तिच्या मागोमाग–ती जाईल तिकडे–जाणारच ! "

" आज थट्टा तरी किती करायची ठरवली आहे ? सईबाईनें रुसल्याचा आविर्भाव केला.

" अहाहा ! आतां तर चेहेऱ्यांत अधिकच खुलावट दिसूं लागली ! रात्रीचा नाश होत असतां एक दोन तारे अर्धवट चमकताहेत—इतक्यांत सूर्यकिरणांनीं त्या दिशेला दिसणारा तो पांडुरवर्ण–हा पाहा–हा येथें दिसतो आहे. अगदीं त्याच रंगाची हुबेहुब लकेर या मुखमंडळावर दिसते आहे. "

" अजून नाहीं का पुरे होत ती थट्टा ! जातेंच मी इथून ! " थट्टेनें चिडल्याचा भाव करीत सईबाई बोलली !

" झाला, आतां मात्र अगदीं रात्रीचा नाश होऊन पुरा सूर्योदय झाला ! " शिवाजी जास्तच थट्टेनें बोलूं लागला, " सूर्योदयाबरोबर सूर्यकमलें प्रसन्न होतात आणि त्यांतला मकरंद प्राशन करण्यांत गढलेले भृंग सूर्यास्तामुळें बंदीवान होऊन स्वतांच्या बंधमुक्ततेसाठीं परमेश्वराची सूर्योदय करण्याकरितां प्रार्थना करतात; परंतु सूर्योदय झाल्याबरोबर बंधमुक्त होऊन येथून फरारी होण्याच्याऐवजीं त्यांतला मकरंद पुन्हां ते अधाशीपणानें तेथेंच प्राशन करीत बसतात. त्यावेळीं ते सुवर्णाच्या तबकावर चमकणारे नीलमणीच दिसतात. तें जसें जगांतलें एक कौतुक आहे त्याचप्रमाणें परंतु त्या कौतुका-

चाही धिक्कार करणारे सद्यःस्थितींतले तुमच्या कंचुकीच्या शिवणींना तटाद्न सोडणारे हे तुमचे— "

" दिल्लीची पातशाही रसातळाला कशी पोंचेल या विवंचनेंत नेहमीं निमग्न असलेलें तें मस्तक " सईबाई तोडीस तोड असें कवित्वांत बोलूं लागली, " हबशांचा चुरडा उडविण्याची संधी साधणारे ते डोळे, विजापुरचें तख्त पालथें घालण्याविषयीं स्फुरण पावणारे ते बाहु, स्वराज्य आणि स्वधर्म यांची योग्य संस्थापना करण्यास योग्य अशी ' मीच एक आहें ' असें म्हणून त्या लालसेनें तटाटणारी ती छाती, गोब्राह्मणांचा छल करणाऱ्यांच्या उरावर थैमान करायला नेहमीं पवित्र्यावर उभे असलेले ते पाय— "

" बस्-पुरे तें आतां आपलें कवित्व ! "

" आपलें पुरे झालें का आधीं ? "

" त्या पलीकडच्या जाईच्या लतामंडपाची कींव येते म्हणून पुरें करतों ! " आपण जशा ह्या इथें उभ्या आहांत तसाच तोही तिकडे आपल्या सुगंधमय धवलकीर्ति पुष्पभारासह आपल्याला खडी ताजीम देत आपल्या आगमनाची वाट बघत, शीतल पल्लवछायेसह हात जोडून आपल्याकरतां उभा आहे. "

" म्हणजे, माझ्या एकटीचीच का सेवा करायला तो उभा आहे ? "

" असें कोण म्हणेल ! आपण बसलांत कीं, मी आपल्या मागोमाग आपल्या उजवीकडे येऊन बसलोंच, समजा ! "

" पुरे आता हा विनोद ! " सईबाईनें शिवाजीचा डावा हात आपल्या उजव्या हातांत धरून आपल्याशेजारीं त्यांना लतामंडपांत बसविल्यावर त्यांना विचारले, "श्रीतुकाराममहाराजांकडे धाडलेले लोक परत आले का ! "

" पंडितराव आणि मुजुमदार अजून परत आले नाहींत ! "

पण ती दासी कां बरें घाबऱ्या घाबऱ्या इकडे येते आहे ? "

" बाईसाहेबांना, " दम टाकीत टाकीत दासी तेथें येऊन बोलूं लागली, " मासाहेब वाड्यामंदी बलावत्याती ! "

" काय काम आहे ग ? " शिवाजीनें आतुरतेनें विचारलें.

" शिकारखान्याप डव्हाळजेवणापायीं जाण्याची तयारी झाली हाये ! "

" आलें हो ! तूं हो पुढें ! "

" तुमचे डोहाळे आहेत तरी किती प्रकारचे? सध्यां तुम्ही तरुणपणा सोडून बालपणा धरला आहेसें दिसतें ! "

" तें कसें ? मी म्हतारी का झालें आहें ? "

" म्हातारपण आणि बाळपण सारखेंच. तरुणपणा हा त्या दोन्ही अवस्थांतला सांधा आहे. स्त्रियांचें तरुणपण एक मूल होईपर्यंतच असतें. कारण, तेथेंच त्यांची वाढ खुंटते आणि त्या म्हतारपणाकडे धावूं लागून भारदस्तपणाची प्रौढी दाखवूं लागतात ! म्हातारपणाचा शेवट म्हणजेच बाल्यावस्थेचा प्रारंभ ! सूर्य उगवून ऐनमध्यावर आला म्हणजे तो तारुण्यांत असतो; परंतु मग त्याला वृधत्व येऊं लागून तो आपल्या दृष्टीआड होतो आणि पुन्हां बाल्यावस्थेंत दृष्टीस पडतो. तद्वतच हें आहे. बरें, पण हे कोण बरें इकडे येत आहेत ? "

" मी जातें वाड्यांत ! आसाहेब वाट बघत बसल्या असतील ! **पंडितराव** आणि **मुजुमदारच** इकडे येत आहेत ! "

" श्री**तुकाराम** महाराजांकडूनच ते दोघे परत आले आहेत ! बरें, तुम्ही जा वाड्यांत ! काय हकीकत आहे ती मग कळवीन. पोंचवायला येऊं की काय ? "

" कोणाला ? मला का ? अन् इकडून का येणें व्हायचें ? नकोत—इतके कांहीं श्रम नकोत घ्यायला ! रणांगणांत शत्रूला धूळ चारून स्वराज्यस्थापण्याकरतां नेहमीं श्रम चालले आहेत तेवढे पुरेत ! "

" कां बरें ? त्या श्रमाच्या पुढें हे श्रम म्हणजे त्यांचा उत्तम मोबदलाच नव्हेत का ? "

**शिवाजी**चें हें वाक्य पुरें होतें आहे नाहीं तोंच तेथून **सईबाई** निघून गेली व **पंडित**राव आणि **मुजुमदार** तेथें आले.

" पालख्या, अबदागीर, घोडा, जडजवाहीर, पोशाख वगैरे सर्वांकडे नुसत्या नजरेनेंही न बघतां, " **पंडित**राव बोलले, " त्यांचा तिरस्कार करून श्री**तुकाराम** महाराजांनीं आपल्या खऱ्या साधुत्त्वाची साक्ष पटवली असें म्हणायला हरकत नाहीं ! "

" काय ? " **शिवाजीनें** आश्चर्यानें विचारलें, " त्यांनीं यांपैकीं कांहीं-एक न घेतां तिरस्कार दर्शविला ? "

" सरकार, " मुजुमदार म्हणाले, " तिरस्कार केला एवढेंच नव्हे तर त्यांच्या कुटुंबानें दागिन्यांचा स्वीकार केलेला पाहून त्यांना त्यांनीं गोमांसाची उपमा दिली आणि ते परत आमच्या ताब्यांत देऊन '.मी ह्या आकाबाईच्या फेऱ्यांत सांपडूं इच्छित नाहीं. ' असें ते म्हणाले. सरकारला देण्याकरितां त्यांनीं हें पत्र दिलें आहे. "

शिवाजीनें तें तुकाराम महाराजांचें पत्र मोठ्या भक्तिभावानें ग्रहण करून आपल्या मस्तकावर धारण केलें व नंतर मोठ्या सद्गदित आणि प्रेमळ अंतःकरणानें वाचण्यास सुरुवात केली.

**तुकाराम महाराजांचें पत्र.**

**लोडिस्ते बोलिस्ते पलंग सुपती ॥**
**परी नाहीं लंगोटी नेसावया ॥ १ ॥**
**ऋद्धि सिद्धि दासी कामधेनु घरीं ॥**
**परी नाहीं भाकरी भक्षावया ॥ २ ॥**
**पुसाल जरी आम्हां वैकुंठीचा वास ॥**
**परी नाहीं राहायास स्थळ कोठें ॥ ३ ॥**
**तुका म्हणे आम्हीं राजे वैकुंठीचे ॥**
**परी नाहीं कोणाचे उणे पुरे ॥ ४ ॥**
**शरण असावें रामदासालागीं ॥**
**नमन साष्टांगीं घाली त्यांशीं ॥ ५ ॥**

ठीक आहे ! आज्ञा प्रमाण ! महाराजांनीं आज्ञा केल्याप्रमाणेंच करावें हें उचित आहे. आतां श्रीसमर्थ रामदासांना शरण जाऊन श्रीतुकाराम महाराजांच्या आज्ञेप्रमाणें अनुग्रह घ्यावा हेंच योग्य दिसतें. पंडितराव, मुजुमदार, समर्थांचा शोध करून त्यांच्या दर्शनाला उदयिक निघण्याची तयारी करा."

" जी आज्ञा ! " दोघांनींहि मुजरा करून म्हटलें.

# प्रकरण सहावें.

## स्वराज्यस्थापना हेंच ध्येय.

—:०:—




लमानानें शत्रूचे प्रकार तीन मानलेले आहेत. या तिन्ही प्रकारच्या शत्रूंशीं निरनिराळ्या प्रकारचें वर्तन ठेवावें लागतें. असें जरी आहे तरी त्या तिघांशीं ठेवावयाचें वर्तन एकाच मुख्य मुद्याला अनुसरून ठेविलें पाहिजे. शत्रु कशाही प्रकारचा असला, तरी तो आपला अंकित व्हावा किंवा त्याचें सर्वस्व आपल्याला हरण करतां यावें असा तो मुद्दा असला पाहिजे. अमात्य, दुर्ग, कोश, सैन्य व प्रजा ह्या ज्या शत्रूंच्या पांच प्रकृति—त्यांचा उच्छेद झाल्याशिवाय कोणालाही यश:प्राप्ति होणें शक्य नसतें. शत्रूपक्षाचें मूळ तोडून अन्नपानादिद्वारा विषप्रयोगानें त्या सर्व पक्षाचा जेव्हां नायनाट होतो तेव्हां कार्यसिद्धि होते. विजयेच्छु पुरुषानें सदासर्वकाळ शत्रूच्या हालचालींवर लक्ष्य ठेविलें पाहिजे. भगवीं वस्त्रें, मृगचर्म, जटावर्धन वगैरे उपायांनीं शत्रूच्या मनांत पूर्ण विश्वास उत्पन्न करून नंतर शत्रूवर लांडग्याप्रमाणें अचानक उडी मारून त्यांचा संहार करावा लागतो. असलीं दांभिक ढोंगें हीं परापकर्षणाचीं विषदिग्ध हत्यारेंच होत. असल्या या दंभरूप अंकुशानें शत्रुरूप फळांनीं भरलेल्या शाखा वांकवून शत्रुप्राणरूप पक्व फळें काढून घ्यावीं हाच व्यवहारिकांचा मार्ग असतो. मुख्य उद्देशापासून विमुख न होतां, जी जी गोष्ट करणें भाग पडेल ती ती शहाणे पुरुष करतात. ह्यास्तव जोंपर्यंत काळ प्रतिकूळ असतो तोंपर्यंत शत्रूला आपल्या मस्तकावर सुद्धां नाचवावा लागतो; पण तोच काळ अनुकूळ होतांच एखाद्या मृत्तिकेच्या घटाप्रमाणें शत्रूला दगडावर आपटून त्याच्या चिंधड्या उडविल्याशिवाय गत्यंतरच नसतें. शत्रु हातीं सांपडला म्हणजे त्यानें कितीही दैन्य दाखविलें तरी त्याला मोकळा सोडून त्याच्यावर विश्वास ठेवणें म्हणजे आपलें मरण आपणच ओढून आणणें होय. फार सावधपणें हेरांकडून शत्रूचे पाय उंदरांप्रमाणें कुरतुडले असतां शत्रु हताश होतो. पुत्र, मित्र, भ्राता,

पिता अथवा गुरु यांपैकीं कोणी का असेना, तो जर आपणांशीं वैर करीत असेल, तर उत्कर्षेच्छु पुरुषानें त्याचा वधच केला पाहिजे. शपथा घेणें, लांच देणें, विष घालणें किंवा दगा करणें यांपैकीं वाटेल त्या उपायानें शत्रूचा घात केला नाहीं तर विजयेच्छु पुरुष अवनतीला जातो. धनादिकांच्या मदानें अंध होऊन कार्याकार्यविचार न करतां निव्वळ दडपेशाहीचा अवलंब करणाऱ्या राजाला किंवा त्याच्या नोकरशाहीला शासन केलेंच पाहिजे. कोणीही आपलें हृद्गत दुसऱ्याला ओळखूं देऊं नये. आपला राग गुप्त ठेवावा. कोणाशींही बोलणें झाल्यास प्रेमळपणा दाखवून हास्यमुद्रेनें बोलावें. ज्याचे मनांत दुसऱ्याचा घात करावयाचा आहे त्यानें नेहमीं गोड बोलण्याचाच परिपाठ ठेविला पाहिजे. गोड बोलण्यानेंच घात करून दीन जनांविषयीं मोठी दया दाखवावी, खेद करावा किंवा शेवटीं रोदनही करावें. दयादाक्षिण्याच्या गोष्टींनीं शत्रूला स्वस्थानापासून च्युत करूनच घात करावा लागतो. पर्वत जसा मेघडंबरानें आच्छादित होतो तद्वत घोर अपराधावर दांभिकपणाचें आवरण घालावें लागतें. जो राजा प्रजेच्या सुखाची काळजी घेत नाहीं तो दुराचारी समजून प्रजेनें बंड करावें आणि त्याला राज्यहीन करावा शत्रूचा दृढ विश्वास संपादन करणें म्हणजेच त्याला रसातळाला नेणें होय. अविश्वासू पुरुषावर तर विश्वास ठेवूं नयेच; परंतु विश्वासु पुरुषावर सुद्धां बेताबातानेंच विश्वास ठेवावा. विश्वासामुळें जें भय उद्भवतें, तें समूळ नाश करतें.

स्वराष्ट्रांत व परराष्ट्रांत जे हेर नेमावयाचे त्यांची योग्य परीक्षा करून, ज्यांवर आपली पूर्ण श्रद्धा असेल असेच नेमावे. परराष्ट्रांत जे हेर धाडायचे ते पाखंडी, तपस्वी, व्यापारी, कारखानदार वगैरे वेषानें धाडावे. बागबगीचे, क्रीडास्थानें, देवालयें, मद्यशाळा, रस्ते, चौक, विहिरी, पर्वत, वनें, नद्या, समुद्र, सरोवरें, नाटकगृहें इत्यादि ज्या ज्या स्थानीं कांहींना कांहीं तरी कारणाकरितां लोक जमतात, त्या त्या स्थानीं हेरांकडून नित्य टेहेळणी ठेवावी लागते. मंत्री, पुरोहित, युवराज, चमूपति, राजद्वारपाळ, अंतःपुररक्षक, कारागृहाधिपति, धनसंग्रहाधिकारी, धनव्ययाधिकारी, मार्गदर्शक, नगराध्यक्षक, कार्ययोजक, धर्माध्यक्ष, सभापति, दंडपाळ, दुर्गपाळ, सीमारक्षक, व अटवीपालक या अठरा राज्याधिकाऱ्यांच्या मागें नेहमीं गुप्त हेरांची योजना नसेल तर

राज्याची स्थिति अस्थिर अशा हवेप्रमाणें होते. कार्यसाधु पुरुषाची वाणी लोण्यासारखी मृदु असून त्याचें हृदय वस्तऱ्यासारखें तीक्ष्ण असलें पाहिजे. भाषणांत साखर आणि कृतींत आग पाखडणें हीं कार्यसाधूचीं लक्षणें आहेत. त्यानें हात जोडावें, शपथा घ्याव्या, समजुतीच्या गोष्टी सांगाव्या, पायांवर मस्तक ठेवावें, आशा लावावी, जोडे मस्तकावर घ्यावे, दातीं तृण धरावें किंवा अशींच कृत्यें करून कार्य साधून घ्यावें.

वैभवेच्छु पुरुषानें जर कोणाला आशा लाविली, तर ती पूर्ण न करण्याची त्यानें दक्षता ठेवावी. यदाकदाचित् आशा परिपूर्ण करण्याची पाळी आलीच, तर मध्यंतरींच कांहीं विघ्न उपस्थित करावें. आपण खचित कार्य करणार असा बाहेरून विश्वास दाखवावा. परंतु आंतून न करण्याचा पूर्ण निश्चय ठेवावा. डाव फसला तरी हिंमत सोडूं नये.

साहसानें सुखाचे दिवस दिसतात. शत्रु हस्तगत झाला किंवा त्याच्याशीं सख्य झालें म्हणजे स्वस्थ बसणें हा निवळ वेडेपणा होय. शत्रूच्या मर्मावर घाव घातल्याशिवाय विपुल लक्ष्मी प्राप्त होत नाहीं. उत्कर्ष हवा असेल तर मच्छीमार कोळ्याचीच कृति केली पाहिजे. शत्रूचें सैन्य थोडें राहिलें आहे, रोगग्रस्त झालेलें आहे, थकून गेलें आहे, तान्हेलें आहे, उपाशीं मरत आहे किंवा विश्वासानें स्वस्थ बसलें आहे असें पाहून त्यावर छापा घातला नाहीं तर राज्यप्राप्तीला कीड लागते. बाहुबलानें वश करून घेतलेल्या शत्रूवर जो कोणी कृपा करतो, तो गर्भधारण केलेल्या खेचरीप्रमाणें मृत्युमुखीं पडतो. उदयेच्छु पुरुषानें उद्योगरहित केव्हांच असूं नये. देश, काल, प्राक्तन, कर्म आणि धर्म, अर्थ व काम यांच्या अनुरोधानें त्यानें वागावें. पण त्यांत विशेष भिस्त–देश व काल–या द्वयीवर ठेवावी. कारण, खरें कल्याण ह्या दुकळीपासूनच होतें. शत्रु जरी क्षुद्र असला, तरी त्याची उपेक्षा केल्यास तो ताडाच्या वृक्षाप्रमाणें मूळ धरतो आणि अरण्यांत फेंकून दिलेल्या अग्नीप्रमाणें भराभर वाढून आसमंताद्भाग जाळून भस्म करून टाकतो. शत्रुघातक विजयेच्छु पुरुषानें निष्ठुर मन करून छिद्रान्वेषण करीत गुप्त असावें व संधी साधून शत्रूचा निःपात करावा.

वर सांगितलेलीं हीं कणिक नीतींतील मूलभूत सूत्रें ज्याकाळीं उपयोगांत आणणेंच प्रशस्त झालें होतें त्या काळीं **श्रीसमर्थ रामदास** व छत्रपति **शिवराज** यांचीं अवतरणें झालीं होतीं हें मागील पहिल्या तीन प्रकरणांतील

देशस्थिति व कालचक्र यांचीं जी तेव्हांचीं चित्रें वाचकांनीं अवलोकन केलीं आहेत त्यांवरून स्पष्ट समजण्यासारखें आहे.

श्रीसमर्थ रामदास यांचा आत्मा देशस्थितीसंबंधानें किती कळकळत होता हें त्यांच्या आत्मविचारांवरूनच समजून येईल. पैठण मुक्कामाहून ते जे मातोश्रींच्या भेटीला निघाले, ते असल्याच तऱ्हेच्या नीतीसंबंधीं आत्मगत विचार करीत गोदातटाकानें आपल्या जांबगांवीं जात होते. त्यांचे विचार म्हणजे केवळ परार्थाकरितां होते. त्यांत स्वार्थाचा लवलेशही नव्हता. एवढ्याचकरितां त्यांनीं–उद्धव आणि कल्याण–या आपल्या दोघां शिष्यांना कोंकणप्रांताची स्थिति अवलोकन करून जांबेस येण्याची अनुज्ञा देऊन स्वतः एकटेच ते स्वगृहाचा रस्ता चालत होते. अशा त्या वेळीं—

श्लोक.

" निजध्यास तो सर्व तुटोनि गेला ।
बळें अंतरीं शोक संताप ठेला ॥
सुखानंद स्वानंद भेदें बुडाला ।
मना निःश्चयो सर्व खेदें उडाला ॥"

अशा श्लोकवाणीनें पैठणाहून प्रयाण केलें व ते मातोश्रीला जाऊन भेटले. त्या मधल्या दरम्यानच्या त्यांच्या थोडक्याशा प्रवासांत त्यांचे जे आत्मगत दुःखोद्गार चालले होते त्यांतले मूलभूत असे पुढीलप्रमाणें होते.

" आम्ही आर्य असतां, आर्यावर्तरूप जी कामधेनु ती आपल्या ताब्यांतून अक्षयींची गेली असें उगाच खोटें समजून आपल्याला अमृततुल्य गोरसांत स्वतंत्रपणें भाकरी खायला येत नाहीं म्हणून परक्याजवळ ताक मागण्याकरतां दांत विचकायचे–म्हणजे आर्यत्वचिंतामणीला कांच समजून, सेवकत्वाची गुलामगिरीनें थट्टाच करणें नव्हे का? अहो आर्यहो, तुमचे अंतरात्मे जे रामरूप होऊन बसले आहेत–त्यांच्याशीं या विषयांत थोडासा वादविवाद करा, म्हणजे तुम्ही कोण आहांत आणि तुम्हांला अशा या भ्रष्टतेच्या काळीं काय केलें पाहिजे हें तुमचें तुम्हांलाच कळेल. सध्यांच्या काळीं सोंवळ्यांत बसून नुसती स्नानसंध्या करून परकीय अमलाखालीं स्वधर्मरक्षण करून अर्ज, विनंत्या, वगैरे गोष्टींच्या साह्यानें परक्यांच्या हातीं गेलेली स्वराज्याची कामधेनु परत मिळवूं म्हणणें यासारखा मूर्खपणा दुसरा कोण-

चाच नाहीं. अपात्रीं दान कोण व कशाचें करणार ? तुम्ही, आर्यहो, मूळचे पात्र असतां, तुम्हांला तुमचे राज्यकर्ते अपात्र ठरवून तुमच्या परावलंबनाचें ताम्रपत्र जें त्यांनीं घुवाच्या ताऱ्याप्रमाणें असल्याचें सिद्ध करण्याचा आव घातला आहे तो त्यांचा नक्षा उतरण्याच्या खऱ्या उद्योगाला लागणें म्हणजेच आर्यांच्या अंगची पात्रता सिद्ध करणें होय ! सध्यांच्या काळीं—मूळ आर्य-वैदिक धर्मावर रूढीच्या चढलेल्या कवचाच्या अनुरोधानें सर्व वागूं लागतील तर तें वागणें—स्वदेशद्रोहाचें होईल. संध्यावंदनाचा जो उद्देश आहे तो स्वराज्य-स्थापना झाल्यावर पार पडण्यासारखा आहे; शांतता ही त्याची जननी आहे. सध्यां आमचें संध्यावंदन म्हणजे स्वराज्यप्राप्ति हेंच झालें पाहिजे व ती प्राप्ति करून घ्यायचे अटोकाट प्रयत्न चिकाटीनें व एकजुटीनें झाले पाहिजेत ! सर्व वर्णांचो त्यावेळीं बहुतेक एकजूट होत आलीच आहे. जे जूट फाडून अद्यापि मूठभर त्या जुटीच्या बाहेर राहिले आहेत त्यांनीं अजून तरी कांहीं दिवस आपसांतील मत्सर बाजूला ठेवणें अवश्य आहे. इष्टप्राप्ति झाल्यावर मग आहोंतच आपण ! जेथें उदंड राजकारणामुळें जेवायला सुद्धां वेळ नाहीं तेथें जाति-मत्सर, सोंवळेंओवळें, अधिकारप्रामण्यें आणि उच्चनीच जाती—हे काय घोंटाळे करीत बसलां आहांत ? शूद्राचा ब्राह्मण आणि ब्राह्मणाचा शूद्र स्व-क्रियाकर्मानें होऊं शकतो. हें मनांत आणून आमचे देशबांधव जर मत्सर सोडून गुणग्रहाच्या पायावर एकवटून या सेनापुरंदरानें आमच्या **शिवरायाला** मदत करतील, तर मत्सरानें व स्वार्थानें परगृहीं दवडलेली कामधेनु हां हां म्हणतां, आपल्या ताब्यांत येतां येणार आहे. यास्तव आज बरेच दिवस माजलेलें हें यवनांचें बंड दडपून स्वराज्यस्थापनेकरितां दंड थोपटून—रणमस्तांच्या आखाड्यांत—म्हणून स्वतःच्या स्वातंत्र्याकरितां भाला रोखून उभें रहावें आणि—"

या तऱ्हेचा **समर्थां**चा शेवटचा अर्धाच विचार रस्ता चालतांनां मध्येंच एका मंजुळ दोहरेवजा पदाच्या सुरावर गाणें ऐकूं आलें,

**" मना गूजरे तूजला प्राप्त झालें ।**
**परी पाहिजे अंतरीं यत्न केले ॥**
**सदां ऐकतां याविजे निश्चयासी ।**
**धरी सज्जनी संगती धन्य होसी ॥ "**

श्लोक संपतांच एक तरुण तापसी मूर्ति " जय जय रघुवीर समर्थ " असें म्हणून समर्थांच्या पायां पडली.

" उद्धवा," समर्थ म्हणाले " आतां तूं जें गाणें म्हटलेंस तें अक्षरशः खरें आहे. तुझें कल्याण असो. बरें, पण कामगिरी कशी काय बजावलीस ? "

" समर्थांच्या आज्ञेप्रमाणें मी आणि कल्याण स्वामींनीं, " उद्धव नम्र होऊन व हात जोडून म्हणाला, " कोंकण आणि कोळवण या दोन प्रांतांत स्वधर्मवात्सल्य आणि ऐक्यभाव यांची प्रेरणा करून त्या प्रांतांतून परस्परें शिवरायाला मदत करण्याबद्दल विश्वसनीय वचनें घेऊन आलों आहों. कोंकणांतले सर्व किल्लेदार गडकरी मात्र अद्यापि यवनांचच वर्चस्व कायम आहे असें मानीत असून, प्रजा शिवरायांचें श्रेष्ठत्व मानूं लागली आहे ! पण हा जो अधिकारी आणि प्रजा यांच्यांतला मतभेद तो अद्यापि प्रसिद्ध झाला नसून यवनांचे शिशाण अधिकाऱ्यांना जितकें सतेज दिसतें आहे तितकेंच तें प्रजेला निस्तेज दिसूं लागलें आहे । "

" हें तूं कशावरून म्हणतोस ? " समर्थांनीं शोधक प्रश्न केला.

" त्या प्रांतांत यवनांविरुद्ध सुरू असलेल्या मसलती व कट, शिवरायांचा छापा आला असतां, यवनांतर्फे लढायला उभे राहून, शत्रूवर बंदुकांच्या फैरी झाडण्याच्या ऐवजीं अस्मानावर गोळ्यांचा वर्षाव करणें आणि ऐन फत्ते होण्याच्या समयीं धीर सोडून पळण्याचा आविर्भाव दाखवून शिवरायाच्या लोकांनां कांहीं सैनिकांच्या टोळ्यांनीं वाट देणें व कांहींनीं हत्यारें खालीं ठेवून शरण येणें असे जे प्रकार तेथें सुरू आहेत त्यांवरून मी म्हणतों. " उद्धवानें मोठ्या आतुरतेनें सांगितलें.

" बरें, तें असो ! " समर्थांनीं विचारलें, " पण तूं इकडे कसा आलास ? कल्याण कुठें आहे ? "

" आपण मला पैठणाहून निरोप दिला त्याचवेळीं आपण मातोश्रींच्या दर्शनास जाण्याचें ठरलेलें मला स्मरत होतें. त्यालाच अनुसरून मी व कल्याण स्वामी कोंकण व कोळवण येथील परिस्थिति सलक्ष्य अवलोकन करून आपल्या दर्शनाकरितां तांतडीनें इकडे निघून आलों ! रस्त्यांतच समर्थांची गांठ पडेल हा भरंवसा नव्हता; पण पूर्वदैवानें हे पाय मार्गांतच दृष्टीस पडले, त्यामुळें मी धन्य झालों. कल्याणस्वामी नदीवर स्नान करून

येताहेत. मी पुढें शोध करण्याकरतां निघालों तों आपलें वाटेंतच दर्शन घडलें."

अशा तऱ्हेनें ती गुरुशिष्यांची जोडी बोलत चालली असतां **जामगांवची** सीमा ओलांडून आंत घुसली व **समर्थांनां** मूळ उपदेश ज्या **बजरंगाच्या** देवालयांत प्रत्यक्ष **हनुमंतानें** दिला होता त्या देवळांत जाऊन तेथील मूर्तीचें भजनपूजन करून ती जोडी बाहेर पडली. **समर्थांचें घर** तेथून जवळच होतें. **उद्धवानें** तें घर बघण्याचा हा पहिलाच प्रसंग असल्यामुळें **समर्थांनीं** "हेंच आमचें घर! आपण आल्याची **श्रीराम**नामोच्चारानें जागृतता करण्यासाठीं पुढें हो!" असें **उद्धवाला** सांगितलें

लगेच **उद्धवानें**——

श्लोक.

**"विचारूनि बोले विवंचूनि चाले।**
**तयाचेनि संतप्त येणें निवाले॥**
**बरें शोधिल्यावीण बोलों नये हो।**
**जनीं बोलणें शुद्ध नेमस्त राहो॥**

जयजय रघुवीर समर्थ!"

असा श्लोक मोठ्यानें म्हटला व **समर्थांच्या** मागोमाग त्यांच्या घराच्या अंगणांत जाऊन तो उभा राहिला. त्यावेळीं **समर्थांच्या** मातोश्री **राणूबाई** ओसरीवर **रामनाम** घेत स्वस्थ बसल्या होत्या. त्यांनीं ते शब्द ऐकल्यावरून कोणीतरी रामदासी भिक्षेकरी आला आहे असें समजून, "अग, घरांत कोण आहे? बाहेर गोसावी आला आहे त्याला भिक्षा घाला." असें म्हटलें.

"हा गोसावी" **समर्थ** लागलींच बोलले, "धान्याची भिक्षा घेणारा नसून वडिलांच्या आशीर्वादाची घेणारा आहे!"

अहाहा! काय तो मातेचा आनंद वर्णन करावा! अपत्यप्रेमासारखी अलभ्य वस्तु मातेच्या हृदयांत दुसरी कोणचीच नसते! आपण ज्यांना अज्ञानी समजतों असे पशुपक्ष्यादि प्राणी जरी पाहिले तरी त्यांचा अपत्यस्नेह अलौकिक असतो असें जर मोकळ्या मनानें निर्विवादपणें आपण कबूल करतों तर परमेश्वरानें निर्माण केलेला अत्युच बुद्धिवान प्राणी त्या प्रेमाच्या तडाक्यांतून कसा सुटेल! 'वाडिलांच्या आशीर्वादाची भिक्षा घेणारा आहे!' हे शब्द

कानीं पडतांच आवाज ओळखला जाऊन, राणूबाईंच्या अंध नेत्रांतून प्रेमाश्रूंच्या थंडगार नद्या वाहूं लागल्या व त्यांचा कंठ प्रेमातिशयानें दाटून आला यांत नवल तें काय? बाराव्या वर्षी 'सावधान' असे शब्द ब्राह्मणांच्या मुखांतले ऐकतांच गृहस्थाश्रमी बनण्याचें टाकून ज्या ब्रह्मचारी मारुतीरूप नारायणानें लग्नमंडपांत भुभुःकार करून तेथून उड्डाण मारलें व बरोबर चोवीस वर्षांनीं म्हणजे वयाच्या छत्तिसाव्या वर्षी जो नारायण तपश्चर्येनें सुस्नात होऊन रामदासीस्वरूपांत मातृदर्शनाला आला, अशा त्या कुलदीपक पुत्राची वाणी चोवीस वर्षांनीं कानीं पडतांच राणूबाईचा आनंद जर गगनांत मावेनासा झाला तर त्यांत आश्चर्य तें कसलें?

"कोण, माझा नारायण आला कीं काय?" समर्थांचें वरील वाक्य ऐकून राणूबाई एकदम बोलल्या.

"होय, मीच आलों आहें!" असें बोलून समर्थांनीं राणूबाईंच्या पायांवर मस्तक ठेवलें. राणूबाईंनीं नारायणाला मिठी मारली व त्याचें मस्तक अवघ्राण केलें.

"नारायणा," त्या बोलल्या, "तूं केवढा मोठा झालास! तुझ्या डोक्यावरचे आणि तोंडावरचे हे केवढे तरी केश वाढले आहेत! हें तुझें मोठं रूप मी आतां कोणच्या दृष्टीनें पाहूं?"

"आई, दृष्टीला ग काय उशीर!" समर्थांनीं आईच्या डोळ्यांवरून हात फिरवीत म्हटलें, "आई, आत्मदृष्टी तर तुला आहेच! आतां ही घे चर्मदृष्टी!"

"नारायणा, केवढा तरी तूं हा झालास!" राणूबाईंना दिसूं लागल्यामुळें त्या आश्चर्यानें थक्क होऊन म्हणाल्या, "नारायणा, देशांतरीं हिंडून बऱ्याच भूतचेष्टा शिकून आलास! ह्या भूतचेष्टा करणारें कोणचें बाबा भूत तूं साध्य करून घेतलें आहेस!"

"आई," समर्थ बोलले, "ऐक—

पद.

**होतें वैकुंठीचे कोनीं। शिरलें अयोध्या भूवनीं॥**
**लागे कौसल्येचे स्तनीं। तेंचि भूत गे माये॥ १॥**
**आतां कौशिक राउळीं। अवलोकितां भयंकाळीं॥**
**ताटिका ते छळोनि मेली। तेंचि भूत गे माये॥ २॥**

मार्गी जातां वनांतरीं । पाय पडला दगडावरी ॥
पाषाणाची झाली नारी । तेंचि भूत गे माये ॥ ३ ॥
जनकाचे अंगणीं गेलें । शिवाचें धनु भंगिलें ॥
वैदेही-अंगीं संचारलें । तेंचि भूत गे माये ॥ ४ ॥
जेणें सहस्रार्जुन वधिला । तोही तात्काळचि भ्याला ॥
परशु देउनी देह राखिला । तेंचि भूत गे माये ॥ ५ ॥
पितयाचे भाकेशीं । कैकयीचे वचनाशीं ॥
मानुनि गेलें अरण्याशीं । तेंचि भूत गे माये ॥ ६ ॥
चौदा संवत्सर तापसी । अखंड हिंडे वनवासी ॥
सांगातें भुजंग पोसी । तेंचि भूत गे माये ॥ ७ ॥
सुग्रीवाचें पालन । वाळीचें निर्दालन ॥
तारी पाण्यावरी पाषाण । तेंचि भूत गे माये ॥ ८ ॥
रक्षी मरणी बिभीषण । मारी रावणकुंभकर्ण ॥
तोडी अमरांचें बंधन । तेंचि भूत गे माये ॥ ९ ॥
वामांगीं स्त्रियेला धरिलें । धांवुनि शरयूतीरा आलें ॥
तेथें भरताशीं भेटलें । तेंचि भूत गे माये ॥ १० ॥
सर्वाभूतांचें हृदय । नांव त्याचें रामराय ॥
रामदास नित्य गाय । तेंचि भूत गे माते ॥ ११ ॥

"आलें बरें ध्यानांत !" **राणूबाई** कंठ दाटून येऊन बोलल्या, "कुळाचाराला अनुसरून कुळदैवताला सर्वस्वी प्रसन्न करून घेणारा कुळदीपक तूं **नारायणा**, धन्य आहेस ! जें स्वरूप आम्हां अज्ञजनांना अजून दिसत नाहीं तें तूं हस्तगत करून घेऊन त्याच्या कृपेनें निर्जिवाला सजीव करण्याची शक्ति तूं संपादन केलीस, यापेक्षां अधिक तें काय हवें ? तूं खऱ्या चिरंजीव याच पदवीला पुरा शोभतोस ! चल, आतां घरांत जाऊन **गंगाधराला** भेटूं ! तुझी कीर्ति त्रैलोक्यांत दुमदुमून राहील आणि तूं खराच **मारुतीचा** अंश आहेस असें इतिहास साक्ष देईल ! तूं आमचें कुळ असें उद्धरलेंस तसाच तूंही **रघुपतीच्या** कृपेनें उद्धरशील हा माझा आशीर्वाद नेहमीं लक्षांत ठेव !"

मातोश्री **राणूबाईच्या** पदकमलीं **समर्थांनीं** मस्तक ठेवलें व मातोश्रींनीं दिलेल्या आशीर्वादानें स्वतांला धन्य मानिलें; इतक्यांत सोवळें नेसलेले व

हातांत यज्ञोपवीत धारण केलेले **समर्थांचे** वडील बंधु **गंगाधरपंत** जे **श्रेष्ठ** या नांवानें प्रसिद्ध होते ते त्या स्थलीं ओटीवर आले.

" बापा, शाबास आहे तुझी ! " **समर्थांनीं** पायांवर मस्तक ठेविलें त्या-वेळीं **श्रेष्ठ** बोलले, " आमचें समस्त कुळ तूं उद्धारलेंस त्याचप्रमाणें तूं देशो-द्धारही यथासांग करशील यांत संशय नाहीं. तेव्हां आतां—

श्लोक.

**संपन्न लावण्य तारुण्य नारी ।**
**कौशल्यता वैभव चित्त हारी ॥**
**एकांतकाळीं पडतां समंधु ।**
**आसक्त नोहे तरि धन्य साधु ॥ "**

असा प्रश्नरूप श्लोक श्रेष्ठांनीं म्हटला, त्यावर तावडतोब **समर्थांनीं** त्याचें पादवंदन केल्यावर——

श्लोक.

**" स्वर्गांगना ते सन्मूख आली ।**
**लावण्यरूपीं दृष्टी निघाली ॥**
**मुक्ताफळीं शुक्र उघेचराती ।**
**परंतु आरण्य मिरासि त्यासी ॥ "**

असा श्लोक उत्तरादाखल म्हटला, व ' आजपर्यंत ब्राह्मण्याचें रक्षण करून मातोश्रींच्या व आपल्या दर्शनाला आलों आहें ! ' असें सांगितलें.

" **नारायणा**, धन्य आहेस तूं ! " **श्रेष्ठ** बोलले, " आज चोवीस वर्षांनीं आपली ही भेट होते आहे. बारावर्षांनंतर होणाऱ्या भेटी देवतांच्या सन्निध व्हाव्या असें शास्त्र आहे; म्हणून हें यज्ञोपवीत हातांत धरून आलों आहें. यांत सूर्यदेवतेचा गायत्री मंत्र आहे. "

ते दोघे भाऊ भाऊ जेव्हां एकमेकांना दृढालिंगनानें भेटले तेव्हांच्या त्या-प्रसंगीं **राणूबाईच्यानें " रामभरतांच्या** भेटीशिवाय या भेटीला दुसरी उपमा काय यावी ? " हे शब्द उच्चारल्याशिवाय राहावलें नाहीं असें म्हण-ण्यापेक्षां हे शब्द तिच्या तोंडून स्वाभाविकपणें सहज चट्कन् बाहेर पडले असेंच म्हणणें सयुक्तिक दिसेल.

पूर्वी **नारायण** लग्नांतून निघून गेला तेव्हां " **श्रेष्ठ** म्हणाले, " आले तूं शोक करीत होतीस तेव्हां मी जें बोललों होतों तें आज प्रत्ययाला आई, ना ? **नारायणाचें** जन्मसाफल्य कसें होणार हा संकल्प पूर्वीच श्रींनीं दृष्टांतरूपानें दिलेला आहे, हें तुला स्मरतच असेल !"

" देवाची मर्जी असल्यावर काय होणार नाहीं ? " **राणूबाई** बाष्पपूर्ण नयनांनीं व सगद्गद आवाजानें बोलल्या, बरें, **नारायणा**, तूं लग्नांतून निघून गेल्यापासून काय काय केलेंस ? "

" आई, " **श्रेष्ठ** म्हणाले, " प्रथम आतां एका पंक्तीला भोजन करून तें सर्व मग आपण शांतपणें ऐकून घेऊं ! "

हें भाषण झाल्यावर सर्व मंडळी घरांत जाऊं लागली तेव्हां,——

श्लोक.

**" सदा सेवि आरण्य तारुण्यकाळीं ।**
**मिळेना कदा कल्पनाचेनि मेळीं ॥**
**ऋणी देव तो भक्तिभावें जयाचा ।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥**

जय जय रघुवीर समर्थ ! "

असा खड्या सुरांत श्लोक म्हटला. तो ऐकून तेथील सर्व मंडळीनें " अगदीं सत्य ! अक्षरशः खरें ! " असें म्हटलें.



# प्रकरण सातवें.

## पत्रदर्शन.

—:※:—

कर्मसंन्यास आणि कर्मयोग हे दोन्ही मोक्षदायक आहेत; परंतु त्या दोहोंमध्यें कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगच श्रेष्ठ आहे असें भगवंतांनीं पार्थाला जें सांगितलें त्याचा खरोखर निष्पक्षपातबुद्धीनें जर विचार केला, तर हे दोन्ही योग एकच असून मोक्षदायकही आहेत असेंच प्रत्ययाला येतें. जाणता असो अगर नेणता असो, वाटेल त्याला हा संसारसागर तरून जाण्याला कर्मयोगरूप तारूंच तारक आहे. सारासारविचारानें हा कर्ममार्गाचा योगच सुलभ असून याच्या आचरणानेंच अनायासें कर्मत्यागाचें फल प्राप्त होतें असें सिद्ध करतां येतें. हे दोन्ही योग एकच आहेत. ज्याचें अंतःकरण मी आणि माझें याची आठवण देखील करीत नाहीं तोच खरा संन्यासी. अशाच पुरुषाला विषयेच्छा सोडते. अशा पुरुषानें गृहादिक सोडण्याचें कारणच नाहीं. कारण त्याच्या मनानें 'मी निःसंग आहें' असेंच घेतलेलें असतें. विस्तव विझल्यावर त्याची रक्षा जशी बेलाशक पिंजलेल्या कापसावर ठेवतां येते, तद्वतच ज्याच्या बुद्धीला 'मी कर्ता आहें' असा विकार होत नाहीं त्याला सांसारिक कर्मबंधनाचें बंधन होत नाहीं. झरोक्यांतून पडलेल्या एकाच दिव्याच्या प्रकाशांत ज्याप्रमाणें कांहींच भिन्नभाव येत नाहीं, तद्वतच हे दोन्ही योग आहेत. परब्रह्माला ओळखणारा ज्ञानीच फक्त ह्या दोन्ही योगांचें स्वरूप एक आहे असें म्हणेल. ज्ञानयोगापासून जी प्राप्ति होते, तीच कर्मयोगापासूनही होते. या दोहोंत साहजिक ऐक्य आहे. आकाश आणि पोंकळी यांत जसा भेद नाहीं, तसाच या दोन्ही योगांत भेद नाहीं—हें जो जाणतो तोच खरा ज्ञानी. आत्मस्वरूप त्याला कळतें. जो कर्मयोगानें मोक्षरूप पर्वतावर आरोहण करतो तोच त्या पर्वताच्या मोक्षरूप शिखरावर पोंचतो. ज्यानें आपलें मन भ्रांतीपासून माघारें वळवून गुरुवाक्यानें शुद्ध केलें तोच ब्रह्मरूप होतो 'मी कर्ता व मला अमुक कर्म करायचें' ह्या गोष्टी स्वाभाविक-

पर्णेच अशा पुरुषाच्या नष्ट होतात. त्यानें केलेलीं सर्व कर्मे नाहींतशींच असतात; कारण त्याला 'मीपणानें' सोडलेलें असतें.

दिव्याच्या उजेडानें ज्याप्रमाणें अंधेरांतील सर्व व्यवहार चालतात, परंतु दिवा त्या सर्वांपासून जसा अलिप्त असतो, तसेच आत्म्याच्या मदतीनें इंद्रियांचे व्यापार चाललेले असतात, तरी त्यांपासून आत्मा अगदीं अलिप्त असतो. हीच स्थिति ज्ञान्याची आहे. कमलपत्र जसें पाण्यांत राहूनही भिजत नाहीं तसेंच ज्ञानी कर्मांत गुंग असूनही त्यापासून दूरच असतो. ज्यांत बुद्धीची खूण दिसत नाहीं व कर्माचा अंकुर उगवत नाहीं तोच देहव्यापार! लहान मुलांचे व्यापार.देह आणि बुद्धि यांना जसे सोडून असतात तसेच योगी लोक देहानें कर्मे करितात. शरीर जेव्हां निजतें तेव्हां मन हें स्वप्नांतल्याप्रमाणें एकटेंच व्यापार करीत असतें. वासना देहाला आपला व्यापार ओळखूं न देतां त्याजकडून सुखदुःखें भोगवितात. तत्वार्थ काय कीं, निष्कारण जें कांहीं करणें तेंच फक्त इंद्रियांचें कर्म होय. याव्यतिरिक्त जें कर्म तें मनाचें होय. योगी लोक बुद्धीला पुढें करून मनापासून कर्माचें आचरण करितात, परंतु ते कर्मातीतपणाच्या भावापलीकडे असून मुक्त असतात. म्हणून ते शुद्ध कर्मयोगी होत. कर्म करणारा 'मी आहें' असा भाव न ठेवितां जें करणें तेंच नैष्कर्म्य होय. हेंच तत्त्व गुरूपासून कळतें. पूर्वेकडे जरी सूर्य उगवतो तरी तो सर्व दिशांचा जसा अंधार नाहींसा करतो तसेंच गुरूपदेशाचें आहे. वाऱ्यामुळें पाण्यांत पाणी उसळतें, पण त्याला जशा लाटा हें नांव देतात तद्वतच शरीर व नांव हीं जरी जगाप्रमाणेंच आहेत तरी गुरूपदेशामृतपानानें तो साक्षात् ब्रह्म आहे असेंच ज्ञान होतें.

मृगजलाच्या लोंढ्यानें जसे पर्वत वाहून जात नाहींत त्याचप्रमाणें चांगली किंवा वाईट गोष्ट प्राप्त झाली असतां जो विकार पावत नाहीं तोच खरा कर्मयोगी. तोच समदर्शीचें तत्त्व जाणतो. ज्या चकोरपक्ष्यानें चंद्रविकासी कुमुदांच्या पानांत उत्तम किरणांचें यथेच्छ भोजन केलें आहे तो वाळवंटांतली वाळू कशी चोखीत बसेल! मृगजळानें जशीं हरणें फसतात तसेच विषयांत गर्क होऊन पडणारे प्राणी फसतात. विजेच्या चमकण्यानें पडणाऱ्या प्रकाशानें जगाचे व्यापार कां बरें चालत नाहींत? वारा, पाऊस आणि ऊन यांचें निवारण जर अभ्रछायेपासून होईल, तर घरें बांधण्याचें तरी कारण काय? बच-

नागाला गोड म्हणणें म्हणजे विषयाची खोटी कीर्ति बडबडण्याच्या बडबडीसारखेंच होय! भौमाला मंगळ म्हणतात, पण त्याच्या नांवाप्रमाणें त्याच्या कृतीचा जसा अनुभव येत नाहीं तद्वतच मृगजलाला जल म्हणतात; परंतु त्याचा जसा अनुभव तसाच विषयलोलुपतेचा प्रकार आहे. नागाच्या फणीची छाया उंदराला कधीं तरी सुखावह होईल काय? या लोकींच देहपातापर्यंत जो कामक्रोधांपासून उत्पन्न झालेले वेग सहन करण्यास समर्थ असतो तोच योगी व तोच सुखी असतो पाणी पाण्यांत मिसळलें अथवा आकाशांत वायू मिसळून गेला म्हणजे त्यांत जसा द्विधा भाव उरत नाहीं त्याचप्रमाणें, वृत्ति व आत्मा यांच्या ऐक्याचें आहे. **भगवंतानीं पार्थाला** हेंच सांगितलें आहे. ते म्हणतात कीं, ' जो स्वतः आत्मरूपी झाला त्यालाच या कर्मयोगाची खूण पटते. अशा गोष्टीनें जो परिपूर्ण झाला आणि स्वस्वरूपांत तो निमग्न होऊन राहिला तो मद्रूप होऊन ब्रह्मानंदाचा निवळ पुतळाच ओतलेला आहे असें मी समजतों! तो आनंदाच्या स्वरूपसुखाचा अंकुर किंवा आत्मबोधाचें क्रीडास्थानच होय! तोच विचाराचा गांव, तोच परब्रह्माचा स्वभाव आणि तोच परब्रह्मवियोगाचा सुशोभित केलेला देह होय! तोच सत्वाचा सात्विक किंवा जीवात्म्याचा मूर्तिमंत ठसा!"

आत्म्याच्या निर्मळ प्रकाशानें जो आत्मरूपांतच विश्वावलोकन करतो तो देहासह परब्रह्म झाला असेंच म्हणणें सयुक्तिक आहे. त्याच परब्रह्माचें सुख महर्षींकरितां राखून ठेविलेलें असतें; तें विरक्तांच्याच वांट्यास येतें आणि तें जीवांकरितांच निरंतर पिकलेलें आहे. **भगवंतांनीं अर्जुनाला** जो योगशास्त्राचा मार्ग दाखविला आहे तो खरोखर खोल पाण्यांतून पोहून जाण्यापेक्षां, पायउतार जसा सोपा असतो तसा आहे. ही गोष्ट जिच्या मनाला पटली होती व कर्मयोगाचें रहस्य पुरें समजून घेण्यासाठीं जी आतुर झाली होती अशीच एक दिव्य विभूति सतराव्या शतकाच्या सुरुवातीला महाराष्ट्रांत निर्माण झाली होती. त्याच विभूतीनें **भोसल्यांचें** कुळ ललामभूत केलें होतें. त्याच विभूतीला गुरूपदेशाचा अर्जुनाप्रमाणें ध्यास लागलेला होता. **श्रीतुकाराममहाराजांनां** गुरु करण्याचा त्या विभूतीचा विचार–त्यांनींच–**श्रीसमर्थरामदासांकडे** बळविल्यामुळें, **समर्थांच्या** उपदेशामृताचे घुटके घेण्याकरितां ही विभूति अगदीं आतुर झाली होती. अशा त्या आतुरस्थितींतच ती विभूति

लढाऊ पोषाखांत एका कड्यावर आत्मगत विचार करीत करीत चाफळ-खोऱ्यापर्यंत येऊन पोंचली होती. ती विभूति म्हणजे महाराष्ट्रराज्यसंस्थापक **श्रीशिवछत्रपति महाराज** होते हें सांगणें नकोच.

"बस्स, काय होईल तें होवो, **समर्थांचें** दर्शन झाल्याशिवाय अन्नपाण्याचें ग्रहण करायचें नाहीं !" **शिवाजी** स्वगत विचार करीत कडेपठारावर हिंडत होता. "शुचिर्भूत होऊन पवित्रावस्थेंत स्मरण करून व्याघ्रचर्मावर **भवानी** मातेपुढें निजलों असतां तिनें स्वप्नांत दर्शन देऊन स्फटिकाची माळ आणि नारळ प्रसाद दिला. मग असें कां ! प्रत्यक्ष दर्शन कां देऊं नये ? ह्या महाराष्ट्रांतल्या सर्व साधुसंतांच्या भेटी होतात आणि **समर्थांचीच** भेट कां होत नाहीं ? रामेश्वराच्या पलीकडे लंका आणि हिमालयाची धवलकीर्ति जगाला अक्षय दाखविणारीं शुभ्र शिखरें यांमधला जमीनीचा सर्व पट्टा, ज्यानीं तीर्थयात्रेच्या मिषानें बारकाईनें अवलोकन करून चहूंकडे **श्रीरामचंद्र** आणि **श्रीहनुमान** यांच्या उपासना सुरू केल्या व ज्यानीं धर्माच्या जागृतीला उत्साह देण्याकरितां आजपर्यंत पांचश्यांपेक्षां अधिक **रामदासी** मठ स्थापन केले, इतकेंच नव्हे, तर **शीख** धर्मालाही भगव्या निर्मळ अग्निकांतीनें ज्यांनीं आत्मरूप बनवून सोडलें अशा त्या सद्गुरु **समर्थांनीं** मला दर्शन देऊं नये इतका का मी पातकी आहें ? '**शरण असावें रामदासा लागीं । नमन साष्टांगीं घालीं त्यांसीं ॥**' असें सांगून **श्रीतुकाराम**महाराजांनीं आपल्यापासून मला दूर लोटलें आणि **समर्थांनीं** तर हें माझें तोंड जागृदवस्थेंत बघायचेंच नाहीं असा विचार केला आहेसें दिसतें ! मी स्थापन करीत असलेल्या राज्यांतले साधु ज्याअर्थी मला आपल्यापासून दूर लोटतात त्याअर्थी मी खचित पातकी, अधम आहें यांत शंकाच नाहीं. माझ्या हातून गोब्राह्मणप्रतिपाल आणि स्वराज्यस्थापना हीं कामें पुरीं पडतील असें मीं मानणें व्यर्थ आहे. याकरतां आतां पुरे झाला हा व्याप ! आतां **श्रीतुकाराम**महाराजांच्या उपदेशाप्रमाणें ब्रह्माची ओळख करून घेण्याकरितां प्रथम तीर्थयात्रांनीं शरीर पुनीत करून नंतर गिरिकंदरीं वास करावा हेंच उत्तम ! हा लढाऊ पोषाख, हे अलंकार, ही तलवार—ह्या वस्तु त्या ब्रह्मप्राप्तीचीं मुळींच साधनें नाहींत ! हीं मला कशाला हवींत ! हीं अशीं मी फेंकून देणार. वाहवा ! ही इथेंच संसाराची शृंखला तुटली. आतां इथून —"

**शिवराया**चे कान एका मंजुळ ध्वनीनें एकदम भरून गेले. तो मंजुळ ध्वनि पुढील आशयाचा होता—

श्लोक.

**“ न जाये जपाशीं न जाये तपाशीं ।**
**न जायेचि काशी न जाये गयेशीं ॥**
**गुरुचिंतनावीण कोठें न जाये ।**
**त्रिकाळीं सदा पाय त्याचेचि ध्याये ॥**

जय जय रघुवीर समर्थ ! ”

**शिवराजां**चा त्या मंजुळ शब्दाबद्दल पुन्हां आत्मगत विचार सुरू झाला.

“ अं ! हें काय बरें ! हा मंजुळ आवाज कोणाचा बरें असावा ? ह्या आवाजांतलें गाणें कर्णमधुर असून बोधप्रदही आहे ! असा हा बोधरूप श्लोक म्हणणारी व्यक्ति कोण बरें असावी ! ‘ जय जय रघुवीर समर्थ ! ’ हे या व्यक्तीचे अखेरचे शब्द ऐकून मी आतांपर्यंत भ्रमिष्ट होतों असें आतां मला कां बरें वाटायला लागलें आहे ! पण नाहीं ! वाटायला कसलें लागलें आहे ! मी खराच तसा आहें. कारण अमावास्या आणि पौर्णिमा या दोन तिथींवर समुद्राप्रमाणें वेड्यांच्या शरीरांतलें रक्त चंद्राकर्षणानें जसें उधाण पावूं लागून ते किंकाळ्या मारूं लागतात, त्याचप्रमाणें हे आतांचे शब्द ऐकून माझी स्थिति झाली आहे. माझ्या हृदयांत आनंदरसाला भरती येऊन तो मुखावाटे वाहूं लागणार असें वाटत असल्याकारणानें मी त्याला आंतल्याआंत दाबीत आहें—तेव्हां मी वेडा कसा नव्हे ? त्या वेड्यांत आणि माझ्यांत—मी वेडा आहें असें मला समजतें आहे—इतकेंच काय तें अंतर. बाकी ते आणि मी सध्यांच्या घटकेला एकच आहोंत. ”

पुन्हां दुरून एक गाण्याच्या सुरावरचें पद्य ऐकूं आलें. तें ऐकून तर **शिवराजा**चें हृदय फारच उचंबळून आलें. तें पद्य पुढीलप्रमाणें होतें—

**“ मनीहूनिया टाकिला सर्व हेवा ।**
**सदा सर्वदां आदरी नीचसेवा ॥**

**गुरूचे गृहीं झाडितो सारवीतो।**
**जगीं कीं गमे भूतळींचा रवी तो ॥**

**जय जय रघुवीर समर्थ !"**

हें शेवटचें रामनामोच्चाराचें गद्यवाक्य उच्चारित तेथें तीन तरुण तापसी अवतीर्ण झाले. ते तीन तापसी तेथें प्राप्त झाल्याबरोबर **शिवराजानें** त्यांना दंडवत घातलें त्या तीन तापसी तरुणांपैकीं एकानें पुढें होऊन "**छत्रपती-भव**" असा आशीर्वाद दिला. हा आशीर्वाद ज्या तापस्यानें दिला तो तापसी **शिवरायांच्या** जरी परिचयाचा नव्हता, तरी तो त्याच्या भगव्या वस्त्रांवरून आणि त्यानें उच्चारलेल्या रामनामावरून रामदासी दीक्षेंतलाच असला पाहिजे अशी **शिवराजांची** खात्री झाली हा तापसी वाचकाच्या पूर्वपरिचयाचा **उद्धव** आपल्याबरोबर श्री**समर्थांच्या** आज्ञेप्रमाणें दोघां रामदासी तरुण तापास्यांना घेऊन तेथें आला होता.

"**शिवाजाराजे,**" **उद्धव** गंभीरवाणीनें व शांत मुखचर्येनें बोलूं लागला, "तुमच्या हातून स्वराज्य आणि स्वधर्म यांची संस्थापना होऊन, गोब्राह्मणांचा प्रतिपाळ व्हावा अशी **श्रींची** इच्छा असल्यामुळेंच तुमच्या हातून स्वराज्यस्थापनेच्या खटपटी सुरू आहेत; परंतु अद्यापि तुम्हांला गुरूची आवश्यकता आहे व तत्प्राप्त्यर्थ तुम्ही **श्रीतुकाराम** महाराजांच्या आज्ञेप्रमाणें खटपटही करीत आहांत. **श्रीसमर्थ रामदासस्वामी** म्हणजे प्रत्यक्ष मारुतीचे अवतार-त्यांचेही जन्म जगदुद्धाराकरितांच झालेले आहेत. सर्वगामी हवेप्रमाणें सर्वत्र संचार करून, ज्यानीं सद्य:स्थितीच्या दर्शनानें-स्वधर्मस्थापनेसाठीं अभेद्य असें आपलें मत सुदृढ करून नंतर आतां तुम्हांला स्वधर्म आणि स्वराज्य यांच्या संस्थापनांकरितां, मदत करण्याचें योजिलें आहे असे जे आमचे सर्व श्रेष्ठ **समर्थ रामदास** गुरुराज, त्यानीं तुमचा कट्टा भाव जाणून हें तुम्हांला पत्र दिलें आहे. याचा आशीर्वादास स्वीकार करावा."

**उद्धवस्वामींनीं** दिलेलें **श्रीसमर्थ रामदास** स्वामींचें पत्र मोठ्या आदरानें घेऊन **शिवरायानें** मस्तकीं धारण केलें आणि तो स्वगत म्हणाला, "असो. स्वप्नांतल्यापेक्षां या पत्रदर्शनानें भेटीच्या सोपानाच्या दुसऱ्या पायरीवर चढायला सांपडलें. आतां या पत्राच्या वाचनानें-या अन्य मार्गानें-

मला पाप्याला **समर्थांशीं** बोलण्याचा प्रसंग प्राप्त झाला यांतच **कौतुक** आणि आनंद वाटतो ।" इतकें स्वगत बोलून त्यानें अत्यादरानें पत्र वाचण्यास सुरुवात केली.

पत्र.

" **निश्चयाचा महामेरु । बहुत जनांसी आधारु ।**
**अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ॥ १ ॥**
**परोपकाराचिया राशी । उदंड घडती जयाशीं ।**
**जयाचे गुण महत्वाशीं । तुलना कैची ॥ २ ॥**
**नरपति. हयपति । गजपति, गडपति ।**
**पुरंदर आणि शक्ति । पृष्ठ भागीं ॥ ३ ॥**
**तीर्थे क्षेत्रें तीं मोडलीं । ब्राह्मणस्थानें बिघडलीं ।**
**सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥ ४ ॥ "**

इतकेंच वाचून **शिवराज** क्षणैक स्वस्थ झाले. त्यांचे डोळे क्रोधानें लाल-भडक दिसूं लागले, त्यांचा चेहेरा रागानें रक्तवर्ण दिसूं लागला व वीररसाच्या घाईनें मुठी वळूं लागल्या ! अशा त्या स्थितींतच त्यांच्या तोंडून पुढील उद्गार साहजिकपणें निघाले.

"म्हणूनच समोरून वर येणारा हा बालरवि असा लाल दिसतो आहे! त्याचमुळें या वृक्षपल्लवी लोध्रपांडुर अशा प्रकारांत लीन झालेल्या दिसत आहेत. ज्या सनातनआर्यवैदिक धर्माचा वेदघोष ज्या देवालयांतून ऐकूं यायचा तिथें कुराणाच्या वाचनानें दशदिशा घुमून राहून त्याचे प्रतिध्वनि आम्हा आर्यांच्या वक्षस्थलावर उठावेत काय ! पण हे प्रतिध्वनि फार निराळे आहेत बरें ! हे आम्हांला जागे करताहेत. त्याच अवस्थेंत हा पत्ररूप प्रतिध्वनि जो आतां माझ्या तोंडातून निघाला तो ह्या देहाच्या श्वासनलिकेंत सर्व स्नायूंमधून फिरून नंतर घुसला असल्यामुळें गिरिकंदरांत उठलेल्या मृगराज सिंहाच्या गर्जनेचा प्रतिध्वनि जसा हत्तींना भेडावतो त्याप्रमाणें माझ्यासारख्याकडून ह्या देशाच्या आणि आर्यधर्माच्या शत्रूची रग जिरवण्याकरतांच **समर्थां**ची ही पत्ररूप शक्ति सज्ज झाली आहे ! गुलामांनो, आतां सावध असा ! बरें, असो ! **समर्थ** पुढें काय लिहितात ? "

मोठ्या आवेशानें पुन्हां विचारपूर्वक पत्र वाचूं लागला.

" देवधर्म गोब्राह्मण । करावयाशीं रक्षण ।
हृदयस्थ झाला नारायण । प्रेरणा केली ॥ ५ ॥
या भूमंडळाचे ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ।
महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं । तुम्हांकरितां ॥ ६ ॥
आणखी कांहीं धर्म चालती । श्रीमंत होऊन कितेक असती ।
धन्य धन्य तुमची कीर्ति । विश्वीं विस्तारली ॥ ७ ॥

शिवाजी थांबला ! क्रोधोद्भूत होऊन कपाळावर त्रिशूलासारख्या आठ्या पडल्या ! त्या आठ्या यमराजाच्या दरवाजावर टांगलेल्या त्रिशूलाला तुच्छ करणाऱ्या होत्या ! कान तर [illegible] रंगालाही लाजवीत होते. नाकपुड्या क्रोधमत्त सिंहापेक्षांही अधिक जोरानें फुरफुरत होत्या. अशा त्या स्थितींत **शिवरायानें** पुढील उद्गार काढले —

" ह्या देशाचे खरे मालक आम्ही आर्यवीर—ह्या महाराष्ट्रभूमीचे बच्चे—जिवंत असतां ह्या स्थलीं आमच्या आर्यधर्माची पायमल्ली करणारे दुसरे धर्म वरचढ होऊन त्या धर्मीयाच्या थुंकझेलीनें श्रीमंत होऊन, सुखविलासांत गर्क होणार बरेच कमअस्सल सध्यां जे विहार करीत आहेत त्यांचा समाचार घेतलाच पाहिजे. बरें, पुढें **समर्थ** काय म्हणतात ? "

**शिवराज** पुन्हां पत्र वाचूं लागले.

" तुमचे देशीं वास्तव्य केलें । परंतु वर्तमान नाहीं घेतलें ।
ऋणानुबंधें विस्मरण झालें । बा काय नेणु ॥ ७ ॥

" महाराज, काय हें माझें प्रारब्ध ! " **शिवराजानें** मोठ्या दुःखानें उद्गार काढले. " शेवटीं दोषाचा वांटेकरी मीच व्हावा ना ! "

" उदंड राज कारण तटलें । तेथें चित्त विभागलें ।
प्रसंग नसतां लिहिलें । क्षमा केली पाहिजे ॥ ८ "

" महाराज, " उदासीनतेनें **शिवाजी** बोलला, " सर्वस्वी मला अपराधी ठरवून शेवटीं आपणच माझ्यासारख्या मूर्खापाशीं क्षमा मागायची हा न्याय कुठला ? अथवा ' थारांचें सर्वच थोर ' अशी जी म्हण आहे त्याचेंच हें प्रत्यंतर आहे असें म्हणण्यास हरकत काय ? "

" राजा," उद्धव बोलला, " आम्हांला स्वामी समर्थांच्याकडे जाण्याची तांतडी आहे ! ह्या दोघां नव्या शिष्यांनां कर्नाटकाकडे धाडायचे आहेत. यांची व्यवस्था लावून मला परत लवकर समर्थदर्शनाला गेलें पाहिजे. म्हणून आम्ही त्रिवर्ग आतां येतों. तुझें कल्याण असो ! "

" या देशांत साधुवृंद पुष्कळ आहेत ! " शिवाजी उदासवाणीनें बोलला, " त्या सर्वांचें दर्शन घेऊन यथाशक्ति सेवा आणि भाषण करीत आहें; परंतु आजपर्यंत समर्थांची भेट झाली नाहीं आणि त्यांचा समाचारही घेणें घडलें नाहीं. तेव्हां मी केवढा अभागी आहें ? असो; महाराज, आपण येथपर्यंत येण्याची जी दगदग या समर्थदर्शनेच्छु शिवाजीकरितां घेतली तीबद्दल हा शिवाजी आपला उपकारबद्ध आहे. आतां याच्यावर कृपा करून आपण सातार्‍यास चलावें ! थोडीशी सेवा घेऊन नंतर परत आपल्या कार्याकरितां प्रयाण करावें. समर्थांनां देण्याकरितां मी एक पत्र लिहून देतों तें आपण घेऊन जाण्याची कृपा करावी. मी समर्थांचा अत्यंत अपराधी आहें. ते क्षमावंत आहेतच. त्यांनीं कृपावंत होऊन हें आशीर्वादयुक्त पत्ररूप अंजन माझ्याकडे धाडलें आहे, तें डोळयांत जाऊन माझी दृष्टी साफ झाली आहे. हें पत्ररूप दर्शन घडल्यामुळें माझ्यावर अमृतवृष्टि होऊन मी परमानंदी झालों आहें. प्रत्यक्ष दर्शन आणि संभाषण झालें त्यामुळें मी स्वतःला धन्य समजतों. आतां साक्षात् दर्शन घडावें इतकीच इच्छा आहे ! "

" इच्छेप्रमाणें सर्व घडून येईल ! " उद्धव बोलला, " कारण श्रींचीच तशी इच्छा आहे.

श्लोक.

जनीं भक्त ज्ञानी विवेकी विरागी ।
कृपाळू मनस्वी क्षमावंत योगी ॥
प्रभू दक्ष व्युत्पन्न चातुर्य जाणें ।
तयाचे नियोगे समाधान बाणें ॥

जय जय रघुवीर समर्थ ! '

ते तिघे तपस्वी शिवराजाच्या मागून सातरच्या रस्त्याला लागले.

# प्रकरण आठवें.

## सद्गुरूपदेश.


मेळ अशा ब्रह्मज्ञानाचा बोध करण्यांत चतुर, विद्यारविंदाचें विकसन करणारा भास्कर आणि सकलज्ञानाचें भांडार असा सद्गुरूशिवाय कोण सांपडणार! संसाररूपी अज्ञानांधकाराचा नाश करण्यांत सूर्याप्रमाणें सामर्थ्यवान् व तारुण्यभरांत असणाऱ्या तुर्यावस्थेशीं विलास करणारा जो सद्गुरु तोच कल्याणरूप रत्नाचा ठेवा होय. सज्जनरूप वनांत चंदनासारखा श्रेष्ठ असून ज्याचें स्वरूप आराधना करण्यास योग्य आहे असा एक सद्गुरूच होय! भक्तचित्तचकोराचा चंद्र, ब्रह्मानंदरूप अनुभवाचा राजा, श्रुतिविज्ञानाचा सागर आणि मदनांतक असा सद्गुरूशिवाय कोण असणार! भावयुक्त ज्ञान्यांच्या भजनास पात्र, संसाररूप हत्तीचें मस्तक विदारण करणारा व भ्रमपटलांचा निरास करणारा जो सद्गुरु त्याच्या कृपारूप सर्वमांगल्याचा जेव्हां प्रसाद होतो, तेव्हां लहान बालकालाही शास्त्रांच्या गुह्य सिद्धांतांचें ज्ञान होतें. सद्गुरूच्या उदार अशा अभय वचनाचा प्रसाद मिळाल्याशिवाय नवरसामृताच्या महोदधीचा थांग लागणें शक्य नाहीं. सद्गुरूची प्रेमरूप सरस्वती मुक्याचाही अंगिकार करूं लागली म्हणजे तो बृहस्पतीशीं सुद्धां प्रतिज्ञा करूं लागतो. इतकेंच नव्हे तर, ज्यावर सद्गुरूची कृपादृष्टि होते किंवा ज्याच्या मस्तकावर सद्गुरूचा वरदहस्त पडतो तो मृत्युवश असतांही ईश्वराची साम्यता पावतो. अशा त्या सद्गुरूचा महिमा कोणच्यां वाणीनें कोण पुरापुर करूं शकेल! सूर्याच्या अंगाला उटणें लावणें शक्य नाहीं. कल्पतरू जर सदोदित फलद्रूपच आहे तर त्याला नेहमीं फुलें येण्याची इच्छा करणें व्यर्थ होय! क्षीरसागराला कोण कशाची मेजवानी करणार! कापुराला दुसऱ्या कशाचा सुवास देतां येणार! चंदनाला कशाची उटी लावतां येईल! अमृताला कसें शिजवावें? गगनापेक्षां कांहीं तरी उंच करितां येईल का? ह्या गोष्टी जशा अशक्य तद्वतच श्रीसद्गुरूमहिमा

समजण्याचें साधन कोठून मिळणार? बुद्धीच्या जोरावर जर सद्गुरूच्या सामर्थ्याचें वर्णन करूं म्हटलें तर तें मोत्यांबरोबर अभ्रकाचें तेज लावण्यासारखें होईल. यास्तव गुरुचरणीं नम्र होऊन त्याच्या पदीं नुसतें मस्तक ठेवणें हेंच योग्य आहे. सद्गुरुमहिमा अगाध आहे! सद्गुरूच्या संवादरूप गंगौघांत उठणारा नुसता पोंकळ फस होण्याचें जरी नशीबीं आलें तरी तें पूर्वपुण्यच फळाला आलें असें समजलें पाहिजे. सच्छिष्याची समजूत सद्गुरुशिवाय कोण करणार! सद्गुरु म्हणजे प्रत्यक्ष ईश्वर! उपमन्युसारख्या बालकानें 'मला दूध द्या' म्हटल्याबरोबर-क्षीरसमुद्राची वाटी त्याच्यापुढें कोणीं ठेवली? ध्रुव रुसलेला पाहून त्याला अढळपदाचा खाऊ कोणी खाऊं घातला? ब्रह्मविद्येंत श्रेष्ठ व सकलशास्त्रांचें वसतिस्थान अशी जी अध्यात्मविद्या ती अर्जुनाला कोणीं समजावून दिली? ज्या भाषणाच्या रानांत हिंडत असतां प्रत्येक अक्षराचें सार्थक झाल्याचें प्रत्ययाला येऊन त्याच अक्षराचें मंडल विचाररूप कल्पतरू बनलेलें दृष्टोत्पत्तीस येतें-तें सर्व सद्गुरुकृपेचेंच फळ होय! ज्या बुद्धीची गति देहापलीकडे जात नाहीं तिला सद्गुरूचा उपदेश झाल्याबरोबर ती ब्रह्मानंदरूपी भांडाराची खोलीच बनते. बोधरूप क्षीरसागरांत जलमंदीर बांधून देऊन तेथें शिष्याची स्थापना करण्याचें काम सद्गुरुवांचून इतर कोणीही करूं शकणार नाहीं. गुरुदेवाची करणी अगाध असल्यामुळें त्याच्या कृतीचें वर्णन कोण करूं शकणार? वसिष्ठाच्या छाटीनें सूर्यासारखा प्रकाश पाडला, विश्वामित्रानें प्रतिसृष्टि निर्माण केली, रामचंद्रानीं समुद्रावर सेतु बांधून सर्व वानरदळ पार उतरविलें, मारुतीनें जन्मतःच आकाशांत उड्डाण मारून सूर्याला फळ म्हणून हातांत धरलें, अगस्ती ऋषीनें एकाच आचमनानें समुद्र प्राशन केला, मुक्याकडून अगम्य ब्रह्म बोलाविलें हीं सर्व सद्गुरूचीच कृपा होय!—"

श्रीसमर्थ **रामदास**स्वामींची योग्यता वरील ज्ञानबोधांतील सद्गुरूच्या लक्षणांपैकींच होती आणि म्हणूनच श्री**शिवराया**ला त्यांचा उपदेश घेण्याची श्री**तुकाराम**महाराजांनीं आज्ञा केली होती. **समर्थां**नींही देशी भाषेच्या सुंदरपणानें अलंकारशास्त्राला भूषणभूत होईल असा जो **दासबोध** निर्माण केला त्याचें मुख्य कारण सच्छिष्य **शिवराज** हेंच होत. ज्याप्रमाणें शरिराच्या सौंदर्यानें दागिन्याला शोभवावें त्याचप्रमाणें संस्कृत भाषेची मुलगी जी मराठी भाषा ती कशी शोभते तें **समर्थां**नीं दासबोधाची रचना करून

प्रत्ययाला आणून दिलें. देशी मराठी भाषेचें सौंदर्य आणि यौवन लुटून **श्रीसमर्थांनीं शिवबा**करितां दासबोधाची रचना केली. जे स्थावरजंगमाचे परमगुरु, जे प्रत्यक्ष मारुतीचा अवतार, जे चतुरजनांच्या चित्ताला आनंद देणारे व जे स्वधर्मस्थापना करून स्वराज्यस्थापनेला **शिवराजाला** मदत करण्यासाठींच अवतरले होते असे जे **समर्थ रामदास**स्वामी त्यांचा गुरूपदेश घेण्यासाठीं **शिवराज** फारच उतावीळ झाले होते हें मागील प्रकरणावरून वाचकांनां स्मरत असेलच.

**उद्धव** गोसावी यांजबरोबर **शिवाजीनें सातार्‍याहून** जें **समर्थांनां** पत्र धाडिलें होतें तें **कल्याण**स्वामींच्या हवालीं करून **उद्धव** गोसावी आपल्याबरोबरच्या मुख्य दोघां **रामदासी** तरूणांसह आणखी दहापांच **रामदासी** तरुणांनां घेऊन यावेळीं **कर्नाटक**चा रस्ता चालत होते व **शिवराज** आपल्या परिवारासह **समर्थां**चा शोध करीत **चाफळ** मुक्कामीं येऊन पोंचले होते. **शिवरायाच्या** परिवारांत **बाळाजी आवजी** चिटनवीस आणि **निळो सोनदेव** मुजुमदार हेच दोघे मुख्य होते. **श्रीतुकाराम** महाराजांच्या साधुत्वाची परीक्षा बघण्यास पूर्वी हेच दोघे नजराणा घेऊन गेले होते. **शिवराज** आपल्या लवाजम्यानिशीं ज्यावेळीं **चाफळ** मुक्कामीं येऊन समर्थशिष्यीण **अक्काबाई** यांच्यापाशीं **समर्थांची** चवकशी करीत होते त्यावेळीं **श्रीसमर्थ शिंगणवाडीच्या** मारुतीच्या देवळांतून नुकतेच खिडीखालील बागेंत येऊन बसले होते. तें **समर्थांचें** त्यावेळचें बसण्याचें स्थल एका भव्य अशा औदुंबराच्या वृक्षाच्या तळवटीं होतें. **समर्थांच्या**पुढें दासबोधाचें लेखनाचें सामान व्यवस्थितपणानें ठेवलेलें होतें. **कल्याण**स्वामींनीं **शिवराजांचें** पत्र याचवेळीं **समर्थां**कडे आणलें होतें; परंतु **समर्थांना** तहान लागली होती, त्यामुळें पत्रवाचनाच्या आधीं ते **समर्थां**करितां पाणी आणायला जवळच्या झर्‍यावर गेले होते. अशा त्या एकांताच्या स्थितींत **समर्थांचे** आत्मगत विचार नेहमींच्या परिपाठाला अनुसरून चालले होते.

" अहाहा! काय ही ह्या वनश्रीची शोभा आहे! परमेश्वराच्या गुप्त हातांनीं पेरल्या गेलेल्या बियाण्यापासून, स्वातंत्र्यांत जन्म पावलेले हे वृक्ष, या लता, हीं झुडपें आपल्या पोषणाचा हवाला परमेश्वरावर टाकून झंझावातासारख्या प्रबळ शत्रूशीं झुंजून आपल्या फलपुष्पकंदमूलादिकांनीं ज्याप्रमाणें

जगावर उपकार करीत आहेत, त्याचप्रमाणें परमेश्वराच्या अत्युच्च कुशलतेनें निर्माण झालेले जे आम्ही मानवी प्राणी त्या आम्ही आपल्या उदात्त कृत्यांनीं उदात्त तत्त्वांचें मराठी साम्राज्य स्थापन करून, जगावर भूतदया दाखविण्याचा प्रयत्न करूं नये काय ? ही सर्व भरतभूमि बारावर्षांच्या अवधींत कोनाकोंपऱ्यासुद्धां अवलोकन केली; परंतु सर्वत्र स्वधर्माला हद्दपार केलेलेंच निदर्शनाला आलें. चहूंकडे पारतंत्र्यांत निमग्न झालेल्या स्वातंत्र्याचा राक्षसी प्रकार दृष्टीस पडला. स्वातंत्र्य आणि मरण ह्या ज्या प्राणीमात्राच्या परमेश्वरनिर्मित दोन सनदा जीवमात्र जन्माबरोबर घेऊन येतो त्या आमच्या या सध्यांच्या परकीय राज्यकर्त्यांनीं हिसकावून घेतल्यामुळें त्या परत मिळविण्याची खटपट करायला, त्यांना उद्युक्त करण्याकरितां, त्यांचा स्वधर्म काय आहे तो त्यांना कळावा म्हणून, जागोजाग मठ स्थापून शिष्यसांप्रदाय सुरू केला आणि शरण येईल त्याला, मग तो स्वधर्मी असो अगर परधर्मी असो, **रामदास** करून सोडला. रडत असलेलें मूल, त्याची आई दळीत बसली असतां, तिच्या मांडीवर डोकें ठेवून, दळणाच्या प्रेमळ, रसाळ आणि मधुर घरघरीच्या ध्वनींत जसें गाढ सुखाची झोंप घेतें त्याचप्रमाणें स्वातंत्र्यशब्दोच्चाराच्या शब्दब्रह्मांत प्रेम आहे; परंतु ती गोडी लहानपणापासूनच ज्यांनां घरांत आणि शाळांतून परदास्यत्वाच्या गुलामगिरीचें शिक्षण मिळविण्याची संवय झाली त्यांना स्वातंत्र्यामृताच्या घुटक्याचा काय अनुभव असणार ! "

**कल्याण** पाणी घेऊन पुढें येतांक्षणींच विचारसाम्राज्याच्या ओघाला एकदम आळा पडला व **समर्थां**नीं पाण्याचा चंबु तोंडाला लावला ! तेव्हां **कल्याणा**नें एक श्लोक म्हटला.

**नव्हे तेंचि झालें नसे तेंचि आलें ।**
**कळों लागलें सज्जनाचेनि बोलें ॥**
**अनिर्वाच्य तें वाच्य वाचें वदावें ।**
**मना संत अनंत शोधीत जावें ॥**

जयजय रघुवीर समर्थ ! "

" **कल्याण** ! " **समर्थ** बोलले, " **शिवाजी** राजाकडून काय पत्रोत्तर आलें आहे तें वाच पाहूं ? "

**कल्याण**स्वामी पत्र वाचूं लागले.

अभंग.

सद्गुरु बापा तूं माहेरा ॥ मातें तुझाची उबारा ॥
पार कीजे भवसागरा ॥ पूर्ण दारा स्वामीया ॥ १ ॥
अनन्याच्या प्रतिपाळका ॥ दारुण भवभयहारका ॥
रक्षा आपुल्या बालका ॥ नका नका उपेक्षुं ॥ २ ॥
भव सर्पें गुंडाळिलें ॥ तेणें मन हें व्याकुळ झालें ॥
हित अहित विसरलें ॥ सांभाळिलें पाहिजे ॥ ३ ॥
मोकलिलें तुम्ही जरी ॥ निरवावें म्यां कवणें परी ॥
तुम्हांविण गति दुसरी ॥ मातें नाहीं दयाळा ॥ ४ ॥
शुद्ध करोनियां मन ॥ पूर्ण निजरूप जाणून ॥
रामदासीं लोटांगण ॥ शिवराजानें घातलें ॥ ५ ॥

" काय. " **समर्थ** प्रसन्नचित्तानें बोलले, " **शिवबांची** मर्जी दर्शन घेण्याची आहे काय ?– "

ते इकडेच येताहेत ! " **कल्याणानें** दूरवर पाहून सांगितलें, " पुढें सेवेकरी **दिवाकर**भट्ट आणि मागून परिवारासह **शिवाजी** राजे येताहेत ! "

" सदा आर्जवी प्रीय जो सर्व लोकीं ।
सदासर्वदा सत्यवादी विवेकी ॥
न बोले कदा मिथ्य वाचा त्रिवाचा ।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥

जयजय रघुवीर समर्थ. "

**दिवाकर** गोसावी यांनीं वरील श्लोक म्हणत म्हणत येऊन **समर्थांच्या** पायांवर डोकें ठेवून 'जयजय रघुवीर समर्थ' असें म्हटल्यावर **कल्याण**स्वामींनीं पुढील श्लोक म्हटला.

सदा सेवि आरण्य तारुण्यकाळीं ।
मिळेना कदा कल्पनाचेनि मेळीं ॥
चळेना मनीं निश्चयो दृढ ज्याचा ।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥

जयजय रघुवीर समर्थ ! '

**दिवाकर** गोसावी उठून हात जोडून बोलूं लागले असतां, **शिवाजी** राजे, **बाळाजी आवजी** चिटणवीस, व **निळो सोनदेव** हे तेथें आले व त्यांनीं साष्टांग नमस्कार घातल्यावर तेही उठून हात जोडून उभे राहिले.

" चाफळच्या मठांत, " **दिवाकर** गोसावी हकीगत सांगत होते, " हे **शिवराज** आपल्या परिवारासह **आक्काबाईंच्या**कडे आल्यावर तेथें त्यांना **समर्थांची** स्वारी **शिंगण**वाडीच्या मठांत **श्रीमारुती**रायाच्या संनिध आहे अशी बातमी लागली तेव्हां तेथें राहून सर्व मंडळीसह भोजन करून जाण्याबद्दल **अक्काबाईनीं** यांना आग्रह केला; परंतु यांनीं '**समर्थांचे** चरण दृष्टीस पडल्याशिवाय अन्नग्रहण करायचें नाहीं ! ' असें जेव्हां सांगितलें तेव्हां **आक्कानीं** उत्तर दिलें कीं, ' आपण मंडळीसह गेल्यावर गांठ पडेल न पडेल, यास्तव जलदी करूं नये. पूर्वी कळवून जावें हें बरें ! ' असें म्हणतांच **शिवरायानीं** सांगितलें कीं, ' मी एकटाच जातों. मजबरोबर कोणी एक माहीतगार द्यावा ! ' याप्रमाणें **आक्काबाईंची** बहुत प्रार्थना केली तेव्हां त्यांनीं मला यांच्या समागमें दिलें. आम्ही तेथून निघालों तेव्हां **शिवराजांनीं** आपला परिवार मागें ठेवून या दोघांना बरोबर घेतलें आणि आम्ही चौघे जण तेथून निघालों. रस्त्यांत जाळ्यांची दाटी बहुत, झाडीही विशेषच आणि मार्गही लहानसाच, अशा अडचणीच्या प्रांतांतून आम्ही **शिं**गणवाडीस आलों तों तेथें बातमी समजली कीं, **समर्थ दासबोध** लिहीत खिंडींतील बागेंत बसले आहेत. विश्रांति न घेतां तसेच तडक इकडे आलों ! "

" **शिवाजी** राजे, " **समर्थांनीं** मंद स्मित करून विचारलें, " पत्र आणि तुम्हीं लागोपाठ येण्याची घाई कां केलीत ? तुमच्या देशांत आम्हीं आहोंत ! आमचा परामर्ष तुम्हीं बराच घेतलात ! "

" महाराज. मी सर्वस्वी अपराधी आहें." **शिवाजी** विनम्र होऊन लीनतेच्या स्वरानें म्हणाला, "स्वामी **समर्थ** क्षमाशील आहेत. दासाला क्षमा करून कृपानुग्रहानें पुनीत करावा. आजपर्यंत प्रत्यक्ष दर्शनाची इच्छा होती, ती आजच पूर्ण झाली. आतां दुसरी इच्छा आहे ती पूर्ण करावी ! "

" मंदवारीं रात्रीं **प्रतापगडीं** " **समर्थ** गंभीर वाणीनें बोलले, " जें सांगायचें तें सांगून माळ व नारळ प्रसाद द्यायचा तो देऊन आलों. आतां त्याव्यतिरिक्त काय इच्छा आहे ? "

" आज्ञा झाली ती प्रमाण ! " **शिवाजी**नें खालीं मान वांकवून बद्धांजलीनें विनंति केली, " परंतु **समर्थां**नीं कृपापूर्वक अनुग्रहप्रसाद देऊन पावन करावें ही इच्छा आहे ती पूर्ण करावी. बराच काळ आई न भेटल्यामुळे मूल जसें रडून रडून दमतें आणि त्याच वेळीं मातेचें दर्शन झालें असतां अमृतवत् स्तनपान करीत असतांच तें सौख्यमग्न होऊन निद्रावश होतें, त्याचप्रमाणें **समर्थां**च्या भेटीसाठीं तळमळणाऱ्या **शिवाजीला समर्थांचें** दर्शन झालें आहे. आतां कृपानुग्रहाच्या सौख्यांत रममाण व्हावें ही इच्छा आहे. मुलाचे चोज आईशिवाय कोण पुरवणार ! स्वामी **समर्थ** आहेत.—"

" **कल्याण,** " बाजूस उभा असलेल्या **कल्याणाला समर्थांनीं** विचारलें, " **शिवाजी** राजे काय म्हणतात ? "

" हे सत्पात्र खरे ! " **कल्याणानें** उत्तर दिलें, "मूळचा संकल्पही असाच आहे ! तो **समर्थांना** विदित आहेच ! **समर्थांनीं** कृपा करावी ! "

" बहुत बरें ! " **समर्थांनीं** उदार मनानें सांगितलें, " **श्रींची** इच्छा आहे तसें करावें ! "

" स्वामी **समर्थांची** इच्छा, " **शिवाजीला कल्याण** म्हणतो, " आपल्या मनोदयाप्रमाणें झाली आहे. पूजासामुग्री आणवावी. सोय नसल्यास अरण्यांतलीं फुलें आणून व्यवस्था करतों ! "

" टप्याटप्यावर माणसें ठेवण्याचा हुकूम दिलेला आहे. " **शिवाजी** आनंदानें बोलला, " सर्व साहित्य सिद्ध आहे. आतांच आणवितों. चिटणीस, मुजुमदार, सामुग्री घेऊन या ! "

" आम्हीही स्नान करून येतों. " इतकें बोलून तेथून **समर्थ** उठून स्नानाकरितां गेले व चिटणीस व मुजुमदार पूजासामुग्री आणण्यासाठीं **शिवाजी**च्या आज्ञेप्रमाणें तेथून निघून गेले.

" ज्याप्रमाणें, " **शिवाजी** आत्मगत म्हणाला, " आठ महिनेपर्यंत रोज सूर्यनारायण ह्या पृथ्वीतले रस शोषून, पावसाळ्यांत मेघडंबराकडून सहस्रपट जास्त व शुद्ध असे परत करतो, त्याप्रमाणें **समर्थां**च्या दर्शनाच्या लालसेनें शोषण केलेले ह्या शरीरांतले रस **समर्थ** दर्शनाकडून परत मिळाल्यामुळें हा देह त्यांतल्या मनासह सौख्याच्या रमणीय मंदिरांत वर्षाऋतूंतल्या चातकाच्या आनंदाप्रमाणें सौख्यांत निमग्न झाला आहे ! "

चिटणीस व मुजूमदार पूजासामुग्री, नजराणा वगैरे घेऊन येतात व **शिव-राजां**पुढें तो ठेवून हात जोडून ते उभे राहिल्यावर **शिवाजी** त्यांना म्हणतो, " काय, आणली सामुग्री ? "

" होय सरकार ! " दोघांनीं उत्तर दिलें.

**समर्थ** स्नान करून इतक्यांत तेथें आले व **कल्याणाला** म्हणाले, " **कल्याणा, शिवाजी** राजांना पूजाविधि सांग ! "

**रघुपतीं**च्या जगद्वंद्य मार्गातल्या रामदासी पंथाचा विशिष्ट पूजाविधि **कल्याणानें** सांगितल्यावर **शिवाजीनें** यथासांग पूजा केली व नंतर **समर्थांनीं शिवाजीं**च्या कानांत गुरूपदेशाचा मंत्र सांगितला; तेव्हां तो **समर्थां**च्या चरणीं अनन्यभावानें वंदन करून बोलूं लागला.

" काशी मिश्वरादि पवित्र स्थानांची यात्रा पूर्ण झाली असतां आपल्या जन्माचें सार्थक झालें असें मानतात; परंतु माझ्या जन्माचें सार्थक या अनु-ग्रहप्रसादानेंच झालें असें मी मानतों. आतां परमार्थाविषयीं दोन शब्द ऐकावे अशी इच्छा आहे, ती स्वामी **समर्थ** पूर्ण करणारे आहेत. "

" राजा, " **समर्थ** गंभीर वाणीनें बोलूं लागले, " प्रत्येकाला आत्मानात्म-विचार कळलाच पाहिजे ! म्हणजेच ऐक्यामृताचें पान करण्याला प्रत्येक माणूस तयार होतो. तें काय आहे तें ऐका. आम्हीं सध्यां **दासबोधाची** रचना **श्रीं**च्या दासांना बोध व्हावा म्हणून चालविली आहे. याचें कारण सर्व आर्यावर्त सध्यां **श्रीं**च्या परकीय सत्तेच्या अनिष्ट धर्माच्या खालीं वाकून गेलें असून आपण कोण आहोंत व काय करीत आहोंत हें त्यांतील आर्यधर्मीयांना जें समजेनासें झालें आहे, तें आमच्या देशबांधवांना समजावें म्हणून हा ग्रंथलेखनाचा उद्योग या **रामदासानें** सुरू केला आहे. त्यांतील उपदेशाप्रमाणें जर आमचे धर्मबंधु वागतील, तर खचीत अशा या दुर्बलतेच्या प्रसंगीं आपण काय केलें असतां दास्यत्वांतून मुक्त होऊं हें त्यांना कळेल व ते स्वहित साधण्यास अस्तन्या सारून पुढें येतील. तुम्हांला आतां आत्मनात्मविचार सांगतों तो ऐका. लांबणीचा विचार न सांगतां सारभूत असा सांगतों. याला **लघुबोध** म्हणा-यला हरकत नाहीं.

# आत्मानात्मविचार.

" बाप्पा **शिवबा**, ज्यांनां पंचतत्वें म्हणतात त्यांचीं स्वरूपें स्वानुभवानेंच जाणलीं पाहिजेत. त्यांत शाश्वत कोण आणि अशाश्वत कोण यांचें विवरण झालें पाहिजे. पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं पंचतत्वें होत. पृथ्वी नेहमीं रचली जाऊन खचते, याची साक्ष ह्या सृष्टिरचनेवरून नेहमीं पटते. त्याचप्रमाणें पाणी आटतें. तेजही प्रकाशून नाहींसें होतें. वायूही नष्ट होतो. बाकी राहिलें जें आकाश तें तर नामधारी आभासरूप. तेव्हां तेंही नाहीं म्हटलें तरी चालेल. आकाश हें चारी तत्त्वांचें जननस्थान असें मानिलें जात असतां त्या जननस्थानाचाच जर नुसता आभास, तर बाकीचींही तशींच म्हटलीं पाहिजेत. यावरून जें दिसतें तें नाशवंत असून अशाश्वत आणि सर्वांभूतीं वस्ती करणारा व अदृश्य परंतु ठायीं ठायीं अनुभव देणारा असा जो आत्मा तोच फक्त शाश्वत जाणावा. त्याचें स्वरूप कळण्याला ज्ञान पाहिजे. त्या ज्ञानभांडाराची किल्ली संतजनांशिवाय मिळणें नाहीं. म्हणून त्यांस शरण जावें. आत्म्याला जन्म आणि मृत्यु नसून ता शाश्वत आहे. निराकारांत आकार आणि आकारांत निराकार असा भास होतो, परंतु तें सर्व विवेकज्ञानानें ओळखावें लागतें. त्यालाच नित्यानित्यविवेक असें म्हणतात. असाराच्या ठिकाणीं सार आणि साराच्या ठिकाणीं असार भासतें तेंव सारासार विचार करून ब्रह्मरूप आत्मा ज्ञानचक्षूंनीं अवलोकन करावा लागतो. पंचमहाभूतांपासून झालेलें तें सर्व मायिक व अनेक दिसून अनित्य असतें. आत्मा एकच असून तो नित्य आहे. गगन हें जरी सघन दिसतें तरी वस्तु आणि गगन यांत भिन्नता नाहीं. उपाधि आहे म्हणून आकाश आहे. उपाधीच नसेल, तर सर्वच निराभास. निराभासाप्रमाणेंच गगन हें अविनाशी आहे. जें पाहूं गेलें असतां सांपडत नाहीं तेंच अक्षय होय. परमात्मा म्हणून जो कोणी आहे तो निराकार आहे. मग आपण कोण ? ह्या देहाला वायू सोडून गेला कीं, याचा अंत होतो. त्याचें प्रत्यक्षप्रमाण श्वासोच्छ्वासाचीं इंद्रियें दाबून धरलीं असतां ताबडतोब येतो. देह वायुवेगळा झाला कीं, त्याला प्रेत म्हणतात. प्रेताच्या हातून कर्तृत्व तें काय घडणार ? देह असेल तर वायूचा उपयोग आणि वायू असेल तर देहाचा उपयोग ! प्रत्येक स्वतंत्रपणें कांहींच करूं शकत नाहीं.

तेव्हां वायूचा कर्ता जो कोणी तोच आत्माराम आणि त्याचा सेवक वायु. याच अन्वयें रामचंद्र आणि त्याचा सेवक हनुमान हे जाणावे आपण कर्ते असें जर म्हटलें तर वास्तविक आपल्या इच्छेनुसार घडलें पाहिजे; पण तें जर घडत नाहीं, तर कर्ता आपण नसून भोग तरी कोण आहे? ज्याप्रमाणें प्रकाश आणि अंधकार, विचार आणि अविचार, विकार आणि अविकार-यांतलें अंतर विवेकाशिवाय कळत नाहीं, त्याप्रमाणें जन्मांधाला रत्नाची पारख होणार नसून प्रत्यय म्हणजे न्याय आणि अप्रत्यय म्हणजे अन्याय हेंही अप्रबुद्धाला कळणार नाहीं. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून निर्गुण व निराकार जो आत्माराम त्याच्याशीं वायूच्या मदतीनें जाऊन जो अनन्य होतो तोच ज्ञाता धन्य होऊन आत्मनिवेदनांत परम मान्य असा पुरुष होतो.."

याप्रमाणें स्वामी **लघुबोध** सांगताहेत, राजश्री **शिवराज** श्रवण करिताहेत, तों—श्रवण करतां करतां **शिवरायांस** समाधिसुख प्राप्त झालें. राजश्रींची धारणा पाहून स्वामी **समर्थांची** मर्जी संतोषित झाली. **समर्थांनीं** आपला वरदहस्त **शिवरायांच्या** मस्तकावर ठेवून त्यांच्या समाधीचें उत्थापन केलें व बोलले, " राजा, तूं आत्मसुखातें पावलास."

" **समर्थांनीं** आज मज अनाथाला सनाथ केलें ! " **शिवराज** संतोषपूर्ण मुद्रेनें आणि लीन स्वरानें बोलले.

" शिवबा, स्वानुभवाचें लक्षण ऐका—

**स्वानुभवाचे पालवी । शून्य गाळिले आघवि ॥ १ ॥**
**सघनीं हरपले गगन । सहज गगन तें सघन ॥ २ ॥**
**सदा शुद्ध स्वप्रकाश । अवकाशाविणें आकाश ॥ ३ ॥**
**रामीं रामदास म्हणे । अनुभवाची हे खूण ॥ ४ ॥**

" आतां याउप्पर कांहीं एक इच्छा नाहीं. सदोदित अशीच कृपादृष्टि असावी ! " इतकें बोलून **शिवाजीनें** साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां त्याला उठवून **समर्थ** म्हणाले—

" बाप्पा **शिवबा,** कृपादृष्टि कोण ठेवणार ? तुमच्यावर **श्रीं**चीच कृपादृष्टि आहे. **कल्याणा,** प्रसाद आण. "

आज्ञेप्रमाणें **कल्याणानें** माती, लीद व खडे आणून **समर्थांच्या** पुढें ठेविले. त्यांतील एक मूठ माती, दोन मोठी लीद व चार मुठी खडे **सम-**

**र्थांनीं शिवाजीच्या** शेल्याच्या पदरांत टाकले. **शिवाजीनें समर्थांना** प्रदक्षिणा करून दंडवत घातलें व तो हात जोडून खालीं मान घालून उभा राहिला.

" मी आत्मसुखातें पावलों. " **शिवाजी** शांतपणानें बोलला, " हीच स्थिति निरंतर असावी. हल्लीं राज्याचा व्यवहार चालविला आहे हा पुरेसा वाटत असतां, **समर्थांनीं** हा त्याच मार्गाचा प्रसाद दिला; तेव्हां आतां बिचकल्यासारखें होतें. खरी इच्छा, समर्थांच्या इतर शिष्यांप्रमाणें सेवा करून, अक्षय सन्निध असावें अशी आहे ! "

" इच्छेप्रमाणेंच आहे. **शिवबा**, प्रत्येकाच्या आत्म्यासन्निध जें हवें तेंच असतें. मग तुमच्याजवळ आम्ही आणि आमच्याजवळ तुम्ही नाहीं असें कसें होईल ? आमच्या इतर शिष्यांकडून तुमच्या स्वराज्यस्थापनेच्या कामगिरींतला स्वधर्म जागृतीचा अर्धा भाग उरकून तुमच्याकडून क्षात्रधर्माचा जो अर्धा भाग तो उरकवावयाचा आहे. तुमचा तोच मुख्य धर्म असून तुम्ही प्रजेचें पित्याप्रमाणें पालन करावें व देवब्राह्मणांची सेवा करावी. तुमच्या हातून अद्यापि अमानुषीय कर्मे पुष्कळ व्हावयचीं आहेत. पृथ्वी फार दिवस यवनमय झाली आहे, त्याचें निवारण तुमच्या हातून करवून—

**बहुतां दिवसांचें हें बंड । म्लेंच्छ माजले उदंड ।**
**यांशीं करुनी दुखंड । राज्य करावें ॥**

अशी श्रीची इच्छा आहे. म्हणून तो क्षात्रधर्मच तुम्हांला योग्य आहे. श्रीकृष्ण परमात्म्यांनीं भारती युद्धांत भीष्म पर्वाच्या प्रारंभीं सच्छिष्य अर्जुनाला जो उपदेश केला आहे त्यालाच **श्रीमद्भगवद्गीता** असें म्हणतात. तें सर्व तुम्हांला माहीत आहेच. तुम्हांला म्लेंच्छनिवारणार्थ उत्पन्न केलें आहे, अशी आम्हांला पंचवटींत श्रीची आज्ञा झाली आहे. तुम्ही वर्णाश्रमधर्मेकरून श्रीच्या आज्ञेप्रमाणें स्वराज्य आणि स्वधर्म यांची संस्थापना करावी, त्यांतच तुमचा परमार्थ आहे. स्वधर्म आणि स्वराज्य यांचें रक्षण करणारे राजे पूर्वी होऊन गेले. त्यांच्या कृती तुम्ही रोज पुराणांतरीं श्रवण करीत आहांतच. तुमचे पूर्वज कोणच्या वंशांतले होते हें तुम्ही लक्षांत आणा. तुमचे पूर्वज शिसोदेसिंह, पृथ्वीपालसिंह, लक्ष्मणसिंह यांच्याच तोडीचे तुम्ही शिवसिंह असल्याकारणानें त्यांच्या मताप्रमाणें तुम्ही क्षात्रधर्म आणि राजधर्म यांच्या

बाबतींत प्रताप गाजवून दशदिशांच्या इतिहासांत आपलें नांव अजरामर करून सोडलें पाहिजे. हें करायचें जें तुमचें कर्तव्यकर्म तें बाजूला सारून तुम्हांला कर्मयोगापासून भ्रष्ट होतां येणार नाहीं. कारण, कर्ते व करवते तुम्ही नसून तुमच्या हातून कर्म करवणारी श्री समर्थ आहे. तुमची कामगिरी कर्मयोगाची आहे. कर्मयोग आणि संन्यासयोग या दोन्ही गोष्टी सूर्य आणि त्याचा प्रकाश यांच्या एकीकरणाप्रमाणेंच ऐक्यांत विलीन झालेल्या आहेत. मी अमुकच करणार असा हट्ट धरून चालायचें नाहीं. ज्याकरितां तुमची उत्पत्ति आहे तेंच कर्म तुम्हांला जरी आपखुषीनें करण्याचें धारिष्ट होत नसेल तरी तें **श्रीसमर्थ** तुम्हांला करायला भाग पाडतील. स्वकर्मापासून च्युत होऊं पाहाणाऱ्याची स्थिति द्रोणाचार्यासारखी होते. द्रोणाचार्यांनीं पत्करलेला क्षात्र-धर्म सोडून त्यानीं ऐन रणमदनाच्या वेळीं हातांतील धनुष्य खालीं ठेवून समाधि लावल्याबरोबर धृष्टद्युम्नानें त्यांचें मस्तक धडावेगळें केलें. हें कशानें झालें? तर कर्मयोगाचा त्याग केल्यानें झालें. तेव्हां कर्मयोगाला झिडकारून तुम्ही जर भलतेंच करूं म्हणाल, तर विपरीत गोष्ट घडून परकीय सत्तेनें गांजलेल्यांचे शाप तुम्हांला लागतील. यास्तव तुम्हांला तुमचा राजधर्मच योग्य आहे."

"आज्ञा शिरसावंद्य आहे. राजधर्माचा बोध व्हावा अशी इच्छा आहे."

"थोडक्यांत सांगतों. ऐकाः—

## राजधर्म.

राज्यभार हा एक प्रपंच आहे. प्रपंचांत सावधपणा ठेवला असतां, सुख-प्राप्ति होते. मोठा कार्यभाग साधण्याकरितां दीर्घ प्रयत्न केले पाहिजेत. कोणताही कार्यभाग पार पडण्याला कार्यकर्त्यांच्या अंगचे गुण उपयोगी पडतात. म्हणून पाहून, समजून कोणचेंही कार्य केलें असतां, उणेपणा येत नाहीं. महत्कार्य साधण्याच्या कामीं विघ्नें यायचींच; परंतु त्यांना न जुमानतां, कार्यभाग उरकून घेतला पाहिजे. यथातथ्य विचार करून अमर्याद फितवेखोर ठरतील त्यांचा बेलाशक संहार करावा. कोणच्या माणसाचा केव्हां उपयोग होतो याचा नेम नाहीं. म्हणून माणसें नेहमीं राजी राखीत असावीं. ऐन प्रसंगीं एखादा माणूस सहज उपयोगी येतो. म्हणून न्याय न सोडतां त्याच्यासाठीं

खस्त खावी. न्यायाची सीमा उल्लंघिली असतां, न्यायाबरोबर उपायही हद्दपार होतो. संकटांत कंटाळूं नये, उपाय करून पार पडावें. ज्यायोगानें चतुर लोक तोंडांत बोटें घालतील असे नीटनेटके बंध बांधावे, म्हणजे कारभार उत्तम होतो. प्रत्येक राजकारणांत आपण धुरीण होण्यापेक्षां अनेक धुरी करून अनेक राजकारणें शेवटास न्यावीं. अनेक प्रकारचीं अनेक डोकीं आश्रयाला ठेवून, त्यांच्याकडून सावधपणानें वेगवेगळालीं कामें करून घ्यावीं. मोहोरा अभिमानाला पेटला असतां तो आपल्या जिवाकडे बघत नाहीं, मोठालीं कामें सहज करतो. म्हणून अनेक मोहरे तयार करून नेहमीं चपेटे करावे. वाघाच्या चपेट्याला भिऊन मेंढरें जशीं बारा वाटां पळतात त्याचप्रमाणें आपल्या देशाचे आणि धर्माचे शत्रु पिटाळून लावणारे मोहरे तयार करून चपेटे करावे. मस्त रेड्याप्रमाणें फुकट भोजनभाऊ जवळून हाकून द्यावे. राजांनीं राजधर्म करून क्षत्रियांनीं क्षात्रधर्म करावा आणि ब्राह्मणांनीं नानाप्रकारें स्वधर्म करून क्षत्रियांनां मदत करावी. तुरंग, शत्रु आणि सैनिक यांची प्रथम व्यवस्था करावी. यांच्या भयानें थोर थोर शत्रू भिऊन पळून जातात. आपले सेवक आपल्या आज्ञेंत राहतील अशी आपली वर्तणूक ठेवावी. या राजधर्मापेक्षां क्षात्रधर्म फार बिकट आणि अत्यंत दुर्लभ आहे.

## क्षात्रधर्म.

ज्याला स्वतःच्या जिवाची भीति वाटत असेल त्यानें क्षात्रधर्माचें अवलंबन न करितां वाटेल तें करून पोट भरावें. समरांगणांत विन्मुख मेलें असतां नरकप्राप्ति होते. शत्रूला पाठ दाखवून, रणांगणांतून पळून आलें असतां इहलोकची कीर्ति आणि स्वर्गसौख्य अशा दुहेरी सुखाला मुकावें लागतें. मारतां मारतां मरून गतीला जावें किंवा विजयी होऊन महद्भाग्य भोगावें. ज्यायोगानें रणशूरांचीं अंतःकरणें सुप्रसन्न होतात असे नजरकरार राखून कार्य पाहून खतल करावें. ज्याप्रमाणें भाड्यांचा गलोला निर्भयपणें भारांत पडून राहतो, त्याप्रमाणें क्षत्रिय परसैन्यांत रिचवला गेला पाहिजे. अशावेळीं रणभेरींच्या गडगडाटांत बळेंच घालून घेतल्याप्रमाणें उसन्या घाईनें आणि निधड्या छातीनें शत्रूच्या छातींत—जिवाची परवा न धरतां भाला रोवला पाहिजे,

म्हणजे सहज निःशंकपणें मार फुटतात आणि शत्रूचे तबके तुटतात. अशा शौर्यानें सर्व वीर एकदम उठले असतां, शत्रूच्या पराक्रमाची काळजी रहात नाहीं. चित्ता जशीं हरणें लोळवतो तसे शत्रु रणांत धूळ फाकीत पडतात. मर्दांनी तकवा धरला म्हणजे जयश्री खात्रीनें माळ घालते. लोक राजी राखून दबून युद्ध करावें, म्हणजे तें युद्ध खबरदारीचें होतें. विघ्नांनां न जुमानतां हर उपयांनीं पार होऊन जावें नेहमीं कार्यप्रसंग ओळखून डाव केला पाहिजे. लढाई हातघाईवर आली असतां, मिश्र शस्त्रांच्या लखलखाटांत बेहद्द युद्ध करावें. देवांचा उच्छेद, गाईंचे वध आणि ब्राह्मणांचा छल झालेला ऐकून स्वस्थ बसणाऱ्याला बाटगा प्रेतवत मानून तोडून टाकावा. महाराष्ट्रांत राहणारे तितके सर्व मराठे आणि मराठ्यांच्या कृतीचें अनुकरण करण्याला सज्ज होणारे ते सर्व महाराष्ट्राचे अवयवभूत मराठे समजून, त्यांनां क्षत्रियांत घालावें आणि बंधुप्रेमानें व ऐक्यभावानें-संधानें महाराष्ट्रधर्म वाढवावा. असें जर केलें नाहीं तर पूर्वजांकडून धिःकाराचे जे उष्ण श्वास या भूमीवर येतील त्यांनीं हीं तोंडें करपलीं जाऊन काळीं ठिक्कर पडतील ही भीति प्रत्येक महाराष्ट्रीयानें बाळगली पाहिजे. जो जन्माला आला तो मरणाची सनद बरोबर घेऊनच आलेला असतो. म्हणून जन्मल्यानंतर कार्यकर्तृत्वाच्या काळीं प्रत्येक गोष्ट विचारानें करावी. जे स्वतःला कुलवंत म्हणवीत असतील त्या सर्वांनीं ह्याप्रसंगीं स्वराज्य आणि स्वधर्म यांच्या स्थापनेसाठीं आर्यानें आर्यभूमीचें शत्रूपासून रक्षण करण्याच्या स्वाभाविक हक्काला मान देऊन हातांत शस्त्र धरून पुढें सरसवावें. नाहींतर झाले यापेक्षां अधिक हाल यापुढें भोगावे लागणार आहेत. जे देवद्रोही असतील त्यांनां कुतरडीं समजून, जागच्याजागीं उभे चिरावे. तुळजावराच्या कृपेनें रामचंद्रानें रावण मारला. म्हणून त्याचप्रमाणें सावधपणानें विवेक-विचार करून त्याच हरहर महादेवाला मस्तकीं धरून हलकल्लोळ करावा. श्रीतुळजाभवानी रामचंद्राची वरदायिनी आहे. प्रत्येक वीरानें आपल्या देहांतील रक्त तिच्या तीर्थानें वीररसश्रित करून, स्वधर्म हेंच आपलें कार्य आहे असें म्हणून ऐक्यानें शत्रूवर तुटून पडावें. त्यांचा धोशा उडवून द्यावा आणि विजयी होऊन भाग्य भोगावें. त्या शक्तीची अशी तीव्रता असल्यामुळेंच **रघुवीरा**चे आम्ही दास तिची रोज आराधना करतों. असो; **शिवराज**, अशा तऱ्हेच्या राजधर्मानें आणि क्षात्रधर्मानें जो राज्य करतो तोच **धर्मराजाची** योग्यता पावतो.''

" तथास्तु महाराज ! सर्व लज्जा **समर्थांची** आहे ! "

" तुमची सर्व लज्जा श्रीला आहे. काळजी करण्याचें कारण नाहीं. "

" आज्ञा प्रमाण. "

" बाप्पा **शिवबा**, तुम्ही श्रीचेच अंशभूत आहांत. तेव्हां तुमच्या धारशेची काय कीर्ति वर्णन करावी ! " **समर्थांनीं शिवराजा**च्या मस्तकीं वरदहस्त ठेवून म्हटलें, " यावचंद्रदिवाकरौ तुमच्या कीर्तीचा दुंदुभी त्रैलोक्यांत दुमदुमत राहून आपल्या पवित्र आचरणानें आणि नीतीच्या कारभारानें विदेही **जनक** राजाप्रमाणें इहलोक तरून अंतीं मुक्तीला जाल यांत शंका नाहीं. "

" तथास्तु ! "

" संसाराच्या रथवाहकाला, " चिटणीस हात जोडून व कनवाळू स्वरानें बोलले, " स्वामींनीं परम कृपारूप तीर्थानें पुनीत केलें, तेव्हांच त्याजबरोबर नळाहि जरा पवित्र झाला आहे, तरी शास्त्रोक्त विधि झाल्यावांचून आपलें पूर्वसुकृत उदेलें झालें असें तो कसें मानील ? "

" **बाळाजी आवजी**, " **समर्थ** बोलले, " तुम्ही बोलण्यांत आपल्या कामाप्रमाणेंच मोठे चतुर आहांत. तुमच्या चिटणिशींतल्या कारवाईप्रमाणेंच तुमचें आलंकारिक भाषणहि मनोवेधक आहे. अनेक भूषणांपैकीं तुम्ही **शिवराजा**चें एक भूषणच आहांत."

" ईशकृपानुग्रहाशिवाय प्राणीमात्र काय करणार ? कठिण प्रसंग येऊन अन्नदाता जर विपन्नावस्थेंत पडला तर त्याला सेवकांनीं मदत करून प्रसंगांतून पार पाडणें जसें न्यायाचें आहे त्याचप्रमाणें अन्नदात्याला मदत करण्याचें सामर्थ्य सेवकाच्या अंगांत उत्पन्न करण्याचें काम खाल्ल्या अन्नाचें आहे. खाल्लेलें अन्न ज्या किमतीचें असेल त्याच किमतीचा तें पराक्रम दाखवितें. त्यामध्यें ईशकृपानुग्रहाची योग्य भर पडल्यावर सेवक आपल्या कामगिरींत फत्ते पावून धन्याकडून सर्वथैव शाबासकी मिळविण्याला पात्र होतो ! "

" मुजमदार, " **समर्थ** किंचित् स्मित करून बोलले, " तुमचें मुजुमदारीचें काम **शिवराया**च्या राज्यांत कसें काय चाललें आहे याची साक्ष तुमच्या कारेतोल पण खऱ्या कळकळीच्या बोलण्यावरून स्पष्ट पटते. असेच अनेक सेवक जर **शिवराया**ला मिळतील, तर त्याचा सर्वत्र जयजयकारच होईल. "

" या माझ्या दोन्ही दोस्तांचें म्हणणें खरें आहे ! " **शिवाजीनें** विनम्रपणानें सांगितलें.

" **समर्थांनीं** या दोघांनां पुनीत करावें अशी त्यांच्याप्रमाणें **शिवराजांची**ही इच्छा दिसते आहे. शिवाय ते पात्रही आहेत. " **कल्याणस्वामींनीं समर्थांस** विनविलें.

" ठीक आहे. **श्रीची मर्जी** ! "

**बाळाजी आवजी** आणि **निळो सोनदेव** यांनां **कल्याण**स्वामींनीं यथासांग पूजा सांगितली व ती त्यांनीं केली. **समर्थांनीं** आनंदानें त्या दोघांना गुरूपदेशाचा मंत्र यथाशास्त्र दिला. दोघांनीं साष्टांग नमस्कारपूर्वक प्रदक्षिणा केल्यावर ते दोघे बद्धांजलीनें **समर्थांपुढें** माना वळवून उभे राहिले, तेव्हां **समर्थ** त्यांच्याकडे पूर्ण कृपादृष्टीनें पाहून बोलले—

" **बाळाजी आवजी** चिटणीस, **निळो सोनदेव** मुजुमदार, तुम्हां दोघांच्या स्त्रियांप्रमाणें जगन्माता अशा सती—पतिव्रता—ह्या भूमंडळावर सध्यांच्या काळीं आपल्यांत उत्पन्न होऊं लागून आपल्या पतिव्रता—पत्नीरूप-शक्तीच्या साह्यानें, ह्या देशाच्या व धर्माच्या शत्रूंचा मोड करण्यास आमरणान्त झटून **शिवराजांस** मदत करण्याच्या ज्या तुम्हीं प्रतिज्ञा केल्या आहेत त्यांवरून म्लेंच्छनिर्दालनाला आतां फारसा वेळ लागणार नाहीं असें सिद्ध होतें. तुम्ही पतकरलेल्या मार्गानेंच जाऊन **महाराष्ट्रधर्माचा** प्रसार करण्याला आणि स्वराज्यस्थापनेला **शिवबाला** सेवाधर्मानें मदत करावी हेंच तुम्हांला योग्य आहे. ह्यांतच तुमचा मोक्ष आहे. "

" आज्ञा प्रमाण. " दोघांनीं साष्टांग नमस्कारपूर्वक आज्ञांकिततेचे उद्गार काढले.

" महाराष्ट्रधर्म म्हणून जो **समर्थांनीं** सांगितला, त्यांत आणि वैदिकधर्मांत अंतर काय हें **समर्थ**मुखावाटें बाहेर पडलें असतां, तेंच गोमुखांतलें तीर्थ असें जाणून अठरापगड जात त्याचें सेवन करील " **शिवाजीनें** विनंति केली.

" **शिवाजी** राजे, वैदिकधर्म आणि महाराष्ट्रधर्म यांत **बिलकुल फरक नाहीं.** ज्यामध्यें सद्यःस्थितीचा अंतर्भाव होतो असा हा महाराष्ट्रधर्म आहे. या धर्माची -याख्या सद्यःकालाला अनुसरून आहे. हा धर्म फार व्यापक आहे. महाराष्ट्र-

धर्म म्हणजे आर्यवैदिक धर्म + गोब्राह्मणप्रतिपाल + स्वराज्यस्थापना + संमेलन + नायकत्व + मौन व्रताचा योग्य पाठिंबा = ह्या सर्वांचें एकीकरण. महाराष्ट्र धर्माची अशी ही व्याख्या आहे. ह्या सर्व गोष्टींना अनुसरून प्रत्येक महाराष्ट्रियानें वागणें म्हणजेच महाराष्ट्रधर्मी होणें होय. याच धर्माच्या दीक्षेनें स्वातंत्र्यप्राप्ति आणि स्वराज्य हीं प्राप्त होणार आहेत. स्वजनबांधवांत या धर्माचा प्रकाश पाडण्याकरितां आमचे कुबड्यावाले रामदासी शिष्य सर्वत्र गुप्त कार्यार्थ संचार करीत आहेत. या धर्माचा दीक्षा ते सर्वत्र देत असल्यामुळें शिवराजाच्या प्रत्येक जयाला अनेक मनें वश होताहेत. गतवैभव मोठाल्या व्याख्यानांनीं मिळत नसतें. नुसतीं मोठालीं व्याख्यानें देऊन स्वराज्यप्राप्तीकरितां स्वदेशबांधवांकडून पैका गोळा करणें ही निव्वळ सच्चेपणाचा बुरखा घेतलेली भामटेगिरी आणि आत्मश्लाघा-आत्मप्रौढी आहे. यानें कर्मयोग-रहस्याचा अचानकपणें स्फोट होतो व राज्यकर्ते शहाणे होऊन सर्व गोष्टी ऑफस् होतात. जें कांहीं करणें तें गुप्तपणें करून सिद्धि प्राप्त झाल्यावर त्याबद्दलची वाच्यता करण्याचें ध्येय श्रेष्ठ होय ! सध्यां तर—

**कित्येक म्लेंच्छ होउनी गेले । कित्येक फिरंगणांत आटले ।**
**देश भाषेनें रोधिले । कितिएक ॥**
**महाराष्ट्र देश थोडा उरला । राज्यकारणें लोक रोधला ।**
**आवकाश नाहीं जेवायाला । उदंड कामें ॥**

अशी स्थिति झाली असल्यामुळें, हाच कार्यभाग आधीं उरकला पाहिजे. म्हणून—

**मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ।**
**येविशीं करितां तकवा । पूर्वज हासती ॥**

**चिटणीस, मुजुमदार,** तुम्ही आणि राजे **शिवाजी** जरी आज गुरूबंधु झालां आहांत-तरी **शिवाजी**राजे हे लोकनायक असून त्यांचे तुम्ही सेवक आहांत हें विसरतां कामा नये. कारण—

## सेवाधर्म.

सेवाधर्म मोठा बिकट आहे. सेवकपणाचें मुख्य वर्म सेवकाच्या कृतींत कृत्रिमपणा असूं नये. कृत्रिमानें संभ्रम होत नाहीं., पदरीं दारिद्र्य असल्या-

मळेंच सेवकत्व येतें. धन्याचें अन्न खाऊन वाढलेला देह आणि त्याच स्थितींत अनुभवानें मिळविलेलें ज्ञान फक्त स्वहिताकरतांच जर कोणी सेवक उपयोगी पाडील, तर पर्यायानें त्याचेंच त्यांत नुकसान होतें. धन्याचें मनोगत न राखतां जो आपलें बुद्धिवैभव पुढें करण्याची खटपट करतो त्याला पदभ्रष्ट व्हावें लागतें. यजमानापुढें गोड बोलून मागें कुचेष्टा करणारे सेवक अधमाधम जाणावे. सेवकानें आपले पाहिले दिवस विसरून गर्वानें फुगूं नये. कारण, सेवकाचें वैभव अशाश्वत छायेप्रमाणें दुसऱ्याच्या प्रकाशावर अवलंबून असतें. जो सेवक आपला इतबार ओळखतो त्यालाच कालांतरानें धनीपणा येतो. नोकरानें यजमानाच्या श्रेष्ठत्वाचा हेवा करूं नये. धनी बोलेल तेंच खरें मानून नंतर धनी खुषींत असेल तेव्हां विनीत होऊन जें सांगणें तें सांगावें. श्रेष्ठांना आपण होऊन बुद्धि शिकवूं नये. धन्याच्या आज्ञेवेगळें वागून मी मी करून पुढें पुढें करूं नये. स्वतः स्वतंत्रपणें स्वतःचें शहाणपण आजमावून पाहिल्याशिवाय धन्यापुढें त्याचा प्रकाश पाडण्याच्या खटपटी करूं नयेत. लांचलुचपती खाऊन धन्याच्या नुकसानासारखें अन्यायाचें वर्तन करणारा नोकर दगलबाज होय. ज्याच्याकरतां प्राणी वाढले त्यालाच जर ते आडवूं लागले, तर वेळेस मोलवान घोडा अडला असतां त्याचे जसे पाय तोडावे लागतात, त्याचप्रमाणें ते आपल्या प्राणांस मुकतात. स्वार्थी तत्पर राहून यजमानाचें कार्य बुडविण्यानें सेवक स्वार्थालाही बुडतो. असा हा सेवाधर्म मोठा बिकट आहे. हा धर्म समजावून घेऊन आणि अनुभवून पाहूनही जे सेवक त्यापासून पराङ्मुख होतात त्यांना कोठेच गति मिळत नाहीं." अंगाला शहारे देऊन समर्थ एकदम उठून उभे राहिले व पुनः बोलूं लागले." हा सेवाधर्म केवळ तुम्हांलाच सांगितला असें नाहीं. शिवबांच्या सर्व सेवकांना तुमच्याकडून हा समजून तुम्हांसह सर्वांनीं याप्रमाणें वागावें."

"समर्थ सर्व जाणतच आहेत." **बाळाजी आवजी** चिटणीस हात जोडून बोलले, "आज्ञेप्रमाणें यथामति आणि यथाशक्ति सेवा करीतच आहें. सेवेंत अंतर पडल्यास योग्य न्यायानें शिक्षा किंवा क्षमा होईलच.!"

"ह्या देहांत जीव असेपर्यंत, श्रवण केलेल्या सेवाधर्माप्रमाणेंच वागेन!" **मुजुमदारांनीं** विनम्र होऊन भाषण केलें.

"तुम्ही सर्व कुलीनच आहांत. जें सांगणें तें कुलीनांसच सांगावें. वास्तव

तुम्हीं सर्व मिळून राजसेवा करीत आहांत ती तशीच पुढें करावी. त्यांतच कल्याण आहे. " **समर्थांनीं** सांगितलें.

" तथास्तु ! " **चिटणीस** व **मुजुमदार** बोलले.

" आतां सर्वांनीं आमच्या **कल्याण** स्वामींच्या बरोबर जावें. **कल्याण**, तुम्ही राजेश्रींच्या बरोबर जाऊन, श्री**रघुपतींचें** दर्शन करवावें आणि **शिवबांना** स्वतः प्रसाद द्यावा अशी श्रीचरणीं आमची विज्ञप्ति सादर करावी. मंडळीला चिराल राहून घेऊन नंतर निरोप द्यावा. आम्ही आतां इथून परस्पर मिरजेला जातों. **जयराम**स्वामींनीं आमची मिरजेस आठवण केली आहे. त्यांच्या-वर तेथें मोठा प्रसंग गुदरला आहे. तो सर्वांना नंतर कळेलच. "

" आत्मानात्मविचार, स्वानुभव, राजधर्म आणि क्षात्रधर्म या चौकड्यांचें शिष्याला आंदण देऊन गुरुत्वाचा गंडाही दंडांत बांधला; पण मी मात्र गुरु-दक्षिणेची विनंति करायला विसरलों, याबद्दल क्षमा असावी. " **शिवाजीनें** साष्टांग नमस्कार घालून प्रार्थना केली.

" हो खरेंच ! गुरुदक्षिणा घेणें राहिली खरी. ठीक आहे. मागतों ती द्यावी. "

" आज्ञा प्रमाण. "

" श्रीचा सांप्रदाय वाढविण्यासाठीं आमच्या पांच शिष्यांना निरनिराळ्या गांवीं पांच मठ स्थापून द्यायचे आहेत. तेव्हां **भोळाराम** याला **करजगांव** प्रांत वऱ्हाड येथील, **मुसळरामाला** बेदर प्रांतीची, **जयरामाला बाळ**-घाटीं निलंग येथील, **त्रिंबक गोसावी** याला **औरंगाबादेची** आणि **देवी-दासाला देवगांवची**, अशा पांच सनदा करून द्याव्या, म्हणजे आम्हांला गुरुदक्षिणा पोंचेल."

" हीं सर्व ठिकाणें सध्यांच्या आपल्या राज्यमर्यादेच्या बाहेरचीं आहेत. "

" **शिवबा,** हें तुम्ही आम्हांला काय सांगतां ? सध्यां जेथपर्यंत तुमच्या राज्याचा विस्तार आहे तेथपर्यंत श्रीचा संप्रदाय पूर्णपणें वाढला असून, उत्त-रेस **अर्जुनसिंह** नांवाच्या सध्यांच्या शीखधर्मीय गुरूनें सुद्धां रामनामाचा संप्र-दाय वाढवला आहे. त्यांच्या अमृतसरच्या देवालयावर कर्तव्यजागृतीच्या डुरमुजी रंगाचें निशाण फडकूं लागलें आहे. तुमच्याकरतां शीख धर्म तेथें

बंधुत्वाच्या नात्यानें तुमच्या कर्तबगारीची वाट पाहत आहे. तेव्हां जेथें तो संप्रदाय नाहीं तेथें तो वाढविण्याची आमची इच्छा असल्यामुळें आम्हीं भिन्न अशा दूरच्या पांच गांवांचीं नांवें मठस्थानेकरितां सांगितलीं. देणें असेल तर द्या. नाहीं तर नाहीं म्हणा."

" त्या गांवांवर दुसऱ्या राजांचा ताबा आहे. "

" ते राजे कोण आहेत ? "

" अविंध—म्लेंछ आहेत ! "

" मग, तुम्हीं हातीं कोणचें काम घेतलें आहे ? "

" क्षमा असावी. आज्ञेप्रमाणें सनदा करून देतों. त्या गांवीं सनदा घेऊन शिष्यवर्ग जाण्याच्या आधींच ते प्रांत जिंकून आपल्या राज्याला जोडले आहेत असेंच **समर्थांनां** ऐकूं येईल. "

" शाबास, **शिवबा**, शाबास ! सध्यांचा वेळ जेवणांतसुद्धां खर्ची घालण्यासारखा नसून, म्लेंच्छनिर्दालन करून स्वराज्य वाढविण्याचा आहे. तेव्हां बोलल्याप्रमाणें करावें. आम्ही आतां जातों. मिरजेच्या दलालखान सुभेदाराला तुमच्या पुढच्या कामगिरीकरितां श्रीरामसेवक करावा अशी आम्हांला श्रीची आज्ञा झाली आहे. "

**शिवाजी**चे नेत्र भरून आले. त्याच्या मस्तकावर चमकणारा धर्म मौक्तिकबिंदूंप्रमाणें चमकूं लागून त्याचा शब्द अस्फुट निघूं लागला. त्याचें सर्वांग रोमांचयुक्त झालें.

" **समर्थ**चरणीं एकच विज्ञप्ति आहे ! " **शिवाजी** कंपित स्वरानें बोलला.

" काय इच्छा आहे ! " **समर्थांनीं** विचारलें.

" माझ्या हातून नित्य जो व्यवहार घडेल तो **समर्थ**चरणीं नित्य निवेदन करून नित्य दर्शनसुख आणि तीर्थप्रसाद घडावा अशी इच्छा आहे ती पूर्ण व्हावी. "

" **शिवबा**, आम्ही अरण्यवासी, तुम्ही राजे लोक. तुम्ही जसे नेहमीं स्वाऱ्याशिकाऱ्यांत दंग राहून, राज्यविस्तार करण्याच्या कामीं गुंतलेले राहाणार, तद्वतच महाराष्ट्रधर्माचा प्रसार करून, मराठ्यांच्या हृदयांत स्वदेशवात्सल्य उत्पन्न करण्याच्या कामीं आम्ही श्रीच्या आज्ञेचे बंदेगुलाम नेहमीं रानावनांत, तर कधीं नगरांत-खेड्यांत राहून श्रीची आज्ञा बजावणार. तेव्हां श्रीची इच्छा कशी पूर्ण व्हावी ? ".

" तोंड काढणार **समर्थ** आहेत ! '

" **कल्याण, शिवबांच्या**बरोबर त्यांच्या मातोश्रींस देण्याकरितां जें पादोदक दिलें आहे त्यांत गंध उगाळून त्याची एक गोळी करून **शिवरायाला** द्यावी. **शिवबा**, ती गोळी तुम्ही ताइतांत घालून तो ताईत नेहमीं गळ्यांत ठेवावा. त्याचीच नेहमीं पूजा करून तीर्थ घ्यावें. ती पूजा आम्हांला पावेल. त्याच ताइताला ऊद दाखवून आमचें स्मरण केलें कीं, आमची भेट होईल. आतां काळजी करूं नये. '

इतकें बोलून **समर्थांनीं** पूजासामुग्री उधळली. पूजेच्यावेळीं **शिवराजानें** वस्त्राभरणें, जवाहीर, मोतीं, पोंवळीं, पुतळ्या वगैरेंचा **समर्थांना** जो अभिषेक केला होता तीच ती पूजासामुग्री होय. पूजासामुग्री चोहोंकडे उधळून स्वामींनीं **कल्याणाला** सांगितलें कीं, " रानांतील गुराख्यांचीं पोरें बोलावून आणून त्यांना हें द्रव्य नेण्यास सांगावें. " **समर्थांची** ही आज्ञा होतांच **कल्याणानें** रानाचा रस्ता धरला व **समर्थ** हंहं म्हणतां मिरजेस जाण्यासाठीं घोडोबाचा डोंगर चढून जाऊन दृष्टीआड झाले.

नंतर, स्वामींनीं जी पूजासामुग्री उधळली होती ती **कल्याण**स्वामींनीं गुराख्यांच्या पोरांकडून जमा करवून **समर्थाज्ञे**प्रमाणें त्यांना बक्षीस दिली व वाटेस लावलें. जी कांहीं सामुग्री तेथें शेष राहिली होती ती **दिवाकर** गोसावी यांनीं गोळा करून घेऊन **कल्याण** गोसावी व **शिवाजी**महाराज, **चिटणीस** व **मुजुमदार** यांसह मठांत आले. **कल्याण**स्वामींनीं **समर्थाज्ञे**प्रमाणें **शिवराजांस** श्रींचे दर्शनास देवालयांत नेलें. सर्वांनीं **रघुपतीला** साष्टांग वंदन केलें व सर्व मंडळी हात जोडून उभी राहिली. **कल्याण**गोसावी यांनीं **समर्थाज्ञे**प्रमाणें श्रींची प्रार्थना केली.

" **शिवाजी**राजे यांस प्रसाद स्वतः आपण घ्यावा अशी स्वामींची विनंति आहे. "

**कल्याणाची** ही प्रार्थना संपतांच श्रीरघुपतीचे मस्तकीं मोगऱ्यांच्या कळ्यांचा तुरा होता तो सरकून खालीं पडला. तोच **कल्याण**गोसावी यांनीं उचलून घेऊन **शिवराजांच्या** मस्तकीं खोविला. त्याबरोबर तो मोत्यांचा झाला. हा चमत्कार पाहून सर्वांना परम आश्चर्य वाटलें. नंतर सर्व परिवारांसह

शिवरायांनीं भोजन केलें. नंतर शिवराजांनीं मठांतील सर्व मंडळीचा निरोप घेतला व प्रयाण केलें. तेव्हां कल्याणस्वामींनीं आशीर्वादप्रद एक पुढील श्लोक म्हणून त्यांस निरोप दिला.

" तुटे वाद संवाद तेथें करावा ।
विवेकें अहंभाव हा पालटावा ॥
जनीं बोलण्यासारखें आचरावें ।
क्रिया पालटे भक्तिपंथेंचि जावें ॥

जय जय रघुवीर समर्थ ! "

# प्रकरण नववें

## रामदर्शन



अहाहा! हें दोनच अक्षरांचें **राम**नाम किती महत्वाचें आहे हें पाहा!—

**" फुटेना तुटेना कदा देवराणा। चळेना ढळेना कदा दैन्यवाणा॥**
**कळेना वळना कदा लोचनासी। असेना दिसेना जना मीपणासी॥**

जय जय रघुवीर समर्थ!

**रा** ह्या अक्षराचा उच्चार केल्याबरोबर तोंड उघडलें जाऊन पोटांत सांठविलेल्या सर्व पापांना बाहेर पडण्याला खुला मार्ग मिळून **म** या अक्षराचा उच्चार झाल्याबरोबर तोंडाला कुलुप बसतें. महा-घोर अशा ह्या संसारांत राहून बाह्यरंगी रमणीय रंगभूमीवरविहार करून, अंतीं राम ह्या दोनच पायरींच्या शिडीवरून पाप्याला मोक्षाला जातां येतें. तेव्हां—

**अहा ज्या नरा रामविश्वास नाहीं।**
**तया पामरा बाधिजे सर्वकांहीं॥**
**महाराज तो स्वामि कैवल्यदाता।**
**वृथा वाहणें देहसंसारचिंता॥**

मिरजेच्या रस्त्यांतून अशा तऱ्हेचा रामनामाचा जयजयकार करीत **जयराम** गोसावी चालले असतां त्यांच्या भोंवतीं नागरिकांची बरीच गर्दी जमली होती. नगररक्षक शिपायांना हें सहन न होऊन त्यांनीं त्याची वरदी कोतवालाला दिली व कोतवालानें तो सर्व प्रकार मिरजेच्या **दलेलखान** सुभेदाराच्या कानावर घातला. **दलेलखान** मोठा स्वधर्मरक्षक असून परधर्मीयांचा हरप्रयत्नानें छळ करणारा अविंध होता. त्याला ही **जयरामाच्या** भजनाची बातमी समजतांच तो कोतवालाला बरोबर घेऊन मोठ्या संतापानें

कांहीं शिपायांसह **जयरामाच्या** भोंवतीं जमलेल्या गर्दीतून **" हटो, हटजाव "** असें मोठ्यानें ओरडत अधिकाराच्या जोरावर पुढें घुसला व कोतवालाला म्हणाला—

" क्यौं कोतवाल, यह बम्मन ज. हरगिज रामराम करके टाळ कूटता है और शहरमे धूम मचाता है उस्का मतलब क्या है ? कहां है उस्का राम ? "

" गया अफलागमें उस्का राम ! पेट भरनेकेवास्ते यह ढोंग मचाता है ! आप्ने दरगेमे हम ऐसेही शुके मौलाको हमेषा बंदगी बजाता है तोभी हम्को अल्लाहुताला मिलता नहीं. और यह ढोंग मचानेंवाले बेरामन हरगीज अप्नेको राम मिलता है ऐसे झूटे लब्ज निकालके दुनियाको ठगाते है. ऐसे बदख्तर लोगोंको एकदम सूली चढाना. नहीं तो उस्की चोटिया काटके उस्की सुंता करकर उस्को मुसलमीन बनाना यह बिलकुल दुरुस्त है ! "

**काया हे काळाची घेऊनी जाणार । तुझेनि होणार काय बापा**
**काय बापा ऐसें जाणोनी नेणसी । मी मी म्हणतोसी वायांवीण**
**वायांवीण शीण केला जन्मवरी । दंभ लोकाचारी नागवण**
**नागवण झाली परलोका जातां । स्वहिताची चिंता केली नाहीं**
**केली नाहीं चिंता नामीं कान कोंडे । अंतीं कोण्या तोंडें जात आहे**

**जयरामाचें** हें भजन ऐकून **दलेलखान** फारच खवळला. त्याचे डाळे संतापानें लाल झाले व तो अगदीं हातघाईवर आल्यासारखा दिसूं लागला.

" देख पंडत " **दलेल** बोलला, " खाली गरबड करनेसे मुफ्त मुफलसीमें गिरफ्दार होगा ! तुमारा राम कहां है वो मुजे बताव, नहीं तो गो-गोश्त खाने-को तयार होकर मुसलमीन बनजाव ! "

" सुभेदारसाहेब, आपलें म्हणणें काय आहे ? **रामसमर्थ** कुठें आहेत तें दाखवूं होय ? हा आपला प्रश्न ऐकून मोठा चमत्कार वाटतो ! अहो, शेवाळानें पृष्ठभाग झांकलेल्या सरोवरांत पाणी कोठें आहे असें विचारण्यापैकींच हा तुमचा प्रश्न नव्हे काय ? "

" यह तुमारो इल्म ई हिकमत जानने नहीं चाहते. तुमारा राम कहां है वोह मुजे एकदम बतला दे ! "

" एखाद्या कृपणाचें चित्त जसें सुवर्णराशीकडे एकाग्र असतें तद्वत् आपलें मन **श्रीरामसमर्थांच्या** ध्यानीं लावलें असतां, ते पाय दिसतात."

"देख, ऐसी लंबी चवडी बाते करके तुम् हमारा तन बबूला कर रहा है।"

"कूप-मंडूकाला अगर उंबरांतल्या कीटकाला कूप अगर उंबर यांपेक्षां दुनियेंत कांहीं अधिक मोठें नाहींसें वाटतें. तद्वतच तुम्हां धर्मवेड्यांची स्थिति आहे. सूर्याचें ऊन जेथें जेथें पडतें तेथें तेथें तें एकाकार असतें; पण-पाणी, आरसे, झिलई दिलेले धातूंचे पत्रे-यांसारखे जे चकचकीत पदार्थ असतात, ते त्याचें पूर्ण रीतीनें परावर्तन करतात. हीच स्थिति आत्मज्ञानाची आहे. त्याचा उजेड सर्व हृदयांत सारखा पडतो; परंतु पवित्र साधूंचीं निर्मळ हृदयेंच मात्र त्याचें पुरें परावर्तन करितात, आणि तेंच परावर्तन जर तुम्हांला बघायचें असेल, तर आमचे सद्गुरु **समर्थ रामदास** हे प्रत्यक्ष दाखवितील."

"जरूर देखना है! कहां है वोह तुमारा उस्ताद? बुलाव उसको."

"बोलावणें धाडलें आहे."

"कितने देर उसकी राहा देखना! कोतवाल, बुद्पुरस्तको अप्ने धरम मुआफक, अप्नेमे उसकी सुंता करकर ले लेइंगे, तो अल्ला हुतालाकी अप्ने उपर बडी मेहेरबानी होगी नही? अच्छा, उसको मुसलमीन बनानेकी तयारी करो."

"अल् हॅम्द् उल्लिल्ला! बेरामन वडा ढोंगी! चल तयार हो जाव! हजामको अब्बि बुलाताहूं!" कोतवाल मोठ्या ऐटीनें व मगरूरीनें बोलला, कौन है रे? फकीर महंमद्, हजामको ले आव!"

"काय हा माझ्यावर प्रसंग! सद्गुरु समर्थ **रामदास** स्वामी महाराज, आपल्या या शिष्याला हे यवन, आज आपल्यामधून फरकर ओढून न्यायला तयार झाले आहेत, याची लाज राखणें आपल्याकडे आहे. यावनी धर्माचा उच्छेद न करतां आपला धर्म प्रस्थापित करून या परकी अमलाचा अंगीकार करण्याचें जें आपलें ब्रीद तें आज आतां ह्या ठिकाणीं गलितधैर्य होऊं दिलें असतां आम्हां ब्राह्मणांची वाट काय होणार!

अभंग

**आतां शरण कोणा जावें। सत्य कोणातें मानावें॥**
**नाना पंथ नाना मतें। भूमंडळीं असंख्यातें॥**
**आतां कोठें धरूं भाव। बहूसाल झाले देव"**

**जयराम**स्वामी अगदीं हताश होऊन वरील अभंग म्हणत असतां-त्यांच्या व तेथील सर्व मंडळींच्या कानांवर-दुरून मोठ्या धिटाईच्या वाणीनें उच्चारलेले

शब्द आले. ते शब्द पूर्ण अशा अधिकारी वर्णोच्चाराचे होते, ते शब्द काय होते बरें? —

अभंग.

"शरण जावें संतजना ॥ सत्य मानावें निर्गुणा ॥
नाना मतीं काय चाडी ॥ करणें सत्याचे नीवडी ॥

श्लोक.

समर्थाचिया सेवका वक्र पाहे ।
असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥
जयाची लिला वर्णिती लोक तीन्ही ॥
नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥

जयजय रघुवीर समर्थ !"

"वाहव्वा ! वाहव्वा !

अभंग.

भावनेचा देव भावार्थे भावीला ॥ देव भक्त झाला भावनेचा ॥
भावनेचा देव भावनेचा भक्त ॥ भावनेने मुक्त भावीतसे ॥"

"देवाचें भजन न करतां या संसारांत–माझें तुझें करून शेवटीं बरोबर कांहीं न नेतां, एकदम अधोगतीला जाण्यापेक्षां, रामनामाच्या भजनानें संसार-यात्रा शेवटास नेणें चांगलें!" **समर्थ** एकदम तेथें येऊन बोलले. यावेळीं समर्थांचे वरील सर्व शब्द जरी अधिकारपूर्ण वाणीचे व शांत आणि गंभीर-पणाचे होते, तरी त्यांच्या हृदयांतला क्रोधवह्नी त्यांचे डोळे बाहेर टाकीत होते असें त्यांच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होतें. **समर्थ**दर्शन झाल्याबरोबर **जय-रामानें** त्यांच्या पायांवर मस्तक ठेवलें व तो हर्षातिशयानें वरील अभंग म्हणत नाचूं लागला. आपल्यावरचें अरिष्ट आतां खास टळलें अशाबद्दल त्याची खात्री झाली. हा सर्व प्रकार पाहून **दलेलखान** तर मूढचित्त झाला. **समर्थांच्या** नुसत्या दृष्टिक्षेपणानेंच तो विमूढ होऊन बावऱ्या बावऱ्या दृष्टीनें सर्वत्र अव-लोकन करूं लागला. त्याच्याच्यानें एकदम असें जरी कांहींच बोलवेना तरी तो उसनें धैर्य अंगीं आणून बोलला,—

"आप कौन हो?"

"जातीचा अस्सल ब्राह्मण आहें!"

"यह अभी आपने पैछान्का है?"

"अलबत्!"

"उस्की और आप्की बिरादरी है!"

"हेच आमचे सद्गुरु समर्थ **रामदास**स्वामी! आतां तुला काय हवें तें त्यानांच विचार!" **जयराम** छाती पुढें काढून जोरानें बोलला.

"अच्छा, तो फेर बतला दे तुम्हारा राम कहां है?"

"सुभेदार **दिलेलखां**साहेब, आपलें म्हणणें काय आहे?" **समर्थ** मोठ्या गंभीरपणानें परंतु आवेशयुक्तवाणीनें बोलूं लागले, "राम बताव" बाबारे, मक्काशरीफ एकदम जशी या ठिकाणीं कागदावरील चित्राशिवाय दिसायची नहीं तद्वत्च रामदर्शनाचें आहे. मक्काशरीफला जाण्याचे जसे प्रवासाचे हाल भोगावे लागतात, तसेंच रामरूप दृष्टीस पडण्यास या देहाला अत्यंत कष्ट सोसावे लागतात. वास्तविक पाहिलें असतां तुमचा रहिम आणि आमचा राम हे एकच आहेत. सरडा जसा प्रत्येकाला भिन्न रंगांत निराळ्या रंगाचा दिसतो, तद्वत्च सर्वसाक्षी परमात्मा अनेक रूपांत दिसत असल्यामुळें त्याला अनेक लोक अनेक रंगाचा समजून त्याप्रमाणें जरी स्वबुद्धीनें अनेक नावें देतात, तरी तो मूळचा एकच आहे. मतमतांतरानें ह्या भूमंडळावर जरी आज भिन्न पंथ वास्तव्य करताहेत, तरी गारगोटीच्या पोटीं जसा एकच विस्तव गुप्त असतो, तसा तो परमात्मा सर्वांतर्यामीं एकच असून तीच शक्ति भिन्न रीतीनें या जगांतले भिन्न चाळे करवते."

"यह तुमारे गोईके तरकीबसे, तुम् अपी गरूरी छोडके, यह् सुभेदार दिलेलखांके हवाला होने चाहता है, ऐसा समज आता है! क्यौं कोतवाल साहेब, इस् बारेमे यह हमारा कहना दुरुस्त है या नहीं?"

"आपका कहना तो बिल्कुल दुरुस्त है!"

"बहोत् अच्छा" ऐटीनें पुढें होऊन मिशीवर उजव्या हाताचीं बोटें फिरवीत **दलेल** म्हणाला, "बुत्-पुरस्ती बिल्कुल् झूट है! बुत् और बुत्-पुरस्तीका बुबानु मचाने वालेकों नामोहरम करना ऐसा हमारे दीनका होक्म है!"

"आमच्या आर्यधर्माप्रमाणें, जो न वागेल त्याला आम्ही हूण म्हणतों. त्याच्याशीं आम्ही कोणताही व्यवहार करीत नाहीं. त्याच्यापासून दूर राहून

मतमतांतरें शोधीत न बसतां शक्य असल्यास आमच्या धर्माच्या आड येणारास आम्ही योग्य शिक्षा करतों. दुसऱ्या धर्माचा उच्छेद करणें आमचें ब्रीद नाहीं. परधर्मी आमच्या केंद्रंत जरी असला, तरी त्याला त्याच्या धर्माप्रमाणेंच आम्ही वागायला सांगतों. स्वधर्मच्युत होण्यासारखी आम्हांला दुसरी चीड नाहीं. तुमचा किंवा इतर कोणचाही धर्म-धर्म या दृष्टीनें-आमच्या धर्माच्या खालच्या पायरीचा जरी आहे तरी त्यांतलीं नीतितत्वें चांगलीं आहेत. आम्ही कोणच्याही धर्माचा द्वेष करीत नाहीं; परंतु त्या धर्मांतल्या तत्त्वांप्रमाणें न वागणाऱ्याचा द्वेष करतों. बलात्कारानें किंवा पायमल्लीनें दुसऱ्या धर्माचा उच्छेद करणारीं तत्त्वें कोणच्याच धर्मांत नसतां तुमच्यासारखे मूढ लोक आमच्या धर्मीयांचा उच्छेद करण्याला अधिकाराच्या जोरावर प्रोत्साहन देतात म्हणून आम्ही तुमचा द्वेष करतों. ते पाहा, ते तुमचे काजीसाहेब इकडे येताहेत. तेच मोकळ्या मनानें कोणच्या धर्माची प्रशंसा करतां येईल तें सांगतील अशी आमची खात्री आहे."

हे काजीसाहेब म्हणजे मिरजेच्या प्रसिद्ध दरग्यांतील **मिरा**साहेब होत. **समर्थांची** आणि या **मिरा**साहेबांची जेथें प्रथम भेट झाली त्या स्थळाला अद्यापि **समर्थ दरवाजा** असें त्या दरग्यांत नांव आहे. **मिरा**साहेब हे खरे अल्लाचे भक्त असून मोठे संत होते. त्यांच्या कानांवर **जयराम**स्वामींच्या छत्रवादाची गोष्ट गेल्यामुळेंच ते तेथें स्वयंस्फूर्तीनें आले होते. **समर्थांचें** भाषण ऐकून ते मोठ्या सदय अंतःकरणानें पुढें झाले व बोलूं लागले.

" सच है के हिंदूओंका वैद्रिक धरम-इन्सानियत्का और इल्म-ई-हिक्मत्का प्यारा मकान है! और इस् उर्जके ऊपरके सब् दीनोंसे आला है!"

" यह् बात तो दुरुस्त है!" कोतवाल मध्येंच बोलला, " लेकिन् तुम्हारे सब लोक **शिवाजी** लुटारूको अप्ना राजा समज्के उस्को औरउस्के करवाईको बडे दिल् रुबाईसे देखते है-इत्नाही नहीं तो उस्को बडा दीनदार-दानेष्मंद समज्ते है, यह् बात कौन्से इल्मकी है ?"

" हां कोतवाल साहेबका सवाल बरोबर है!" दाढीवरून हात फिरवीत फिरवीत **दलेलखान** बोलला.

" **शिवाजी** राजे जात्या क्षत्रिय असून ते आपल्या क्षात्रधर्माला अनुसरूनच वागत आहेत." **समर्थांनीं** बजावून सांगण्यासारख्या आवाजानें

सांगितलें, " आमच्या धर्माचा उच्छेद करूं पाहाणाऱ्या यवनांना शिक्षा लावण्याकरितांच त्यांनीं हत्यार उचललें आहे. ते यवनांचें कुराण अगर मशिदी यांना लवमात्र त्रास देत नाहींत. जिंकून घेतलेल्या प्रांतांतल्या मशिदींचीं उत्पन्नें त्यांनीं जप्त केलीं नसून उलट ज्या मशिदी अगर दर्गे यांना उत्पन्नें नसतील त्यांनां तीं ते नवीं करून देतात. **शिवराजानें** धर्मभ्रष्टतेचें एकादें उदाहरण केलें असेल तर सांगा ! "

" बस्स, वोह् निमक् हराम है ! " **दलेल** जरा मिजाशीनें बोलला, " जिस्का दादा और पिदर, बिजापूरके पादशाहीका खोराक् खाकर उस्को पैदाष करनेको जिंदे रहे और उस् बदामष्की पैदाष होते हीं—"

" हां खामोष ! " **समर्थांनीं** आपल्या कुबडींतील तरवारीचा सळ अर्धवट उपशीत असतां बजावलें, " खबरदार, माझ्या देखत असले शब्द काढशील तर ! "

" तुम् क्या करोगे ? " **दलेल** चवताळून बोलला, " कोतवाल, काहां है वोह् गो-गोष्त ? "

" हुजूर ! " एका नोकरानें झांकलेलें गोमांसाचें तबक पुढें करून म्हटलें.

" चलो, तयार हो जाव, तुमको हम् मुसलमीन बनाने चाहता है ! "

" काय ? तूं आम्हांला मुसलमान करण्याची इच्छा करतोस ? पण **श्रीरघुपतीची** इच्छा आम्ही ब्राह्मण रहावें अशीच आहे, त्याला काय इलाज ? "

" ऐसा है क्या ? अच्छा ! चलो–तयार होकर वोह् तुमारा राम बताव–नहीं तो यह गो-गोष्त खानेको और सुंतेके वास्ते तयार हो जाव ! " **दलेल** करारी आवाजानें बोलला.

" अरे बाबा, आमच्या गोमातेचें मांस आम्ही जिवंत असतां, कधीं तरी तुम्हां यवनांकडून आमच्यापुढें येईल काय ? "

" यह देख–इधर है या नहीं ! "

" काढ पाहूं त्या तबकावरचें झांकण ! "

तबकावरचें झांकण **दलेलनें** काढलें तों त्यांत फळफळावळ आहे असें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें. तें पाहून तो उर्मीनें जरी शरमिंधा झाला, तरी फजीतीमुळें अधिक क्रोधोद्धत होऊन ज्या नोकरानें तें तबक आणलें होतें त्याची मानगुटी धरून करड्या आवाजानें बोलूं लागला.

" ऐरे बद्माष ! तुमको अभीके अभी सूलीपर चढतांहूं ! कौन है उधर ! इस् हरामखोरको चाबूकके एकसों फुंदने चढाव ! एकदम् उस्को बुल्बुल् बनाव ! गो गोष्त लानेको होकम दिया तो फलियानी लाके ऐसे ऐन मोके-पर हमारी फजीहती किया. ऐसे रिश्वत लेनेवालेको सूली चढानेबिगर दूसरी बराबर सजा बिलकूल नहीं. देखो कोतवाल्, यह् बेरामन्को इस् जायसे एक उंगुलभी हिलने मत् देव. हम् खास् जाकर इस हरामखोर नौकरको अभीके अभी दिवारपर सूळी चढाना है और गो-गोष्त लेकर आता है ! "

जोराजोरानें धक्के मारीत दुलेल नोकरासह गेल्यावर तथील सर्व मंडळी मोठ्या पंचायतींत व चिंतेत निमग्न झालेली दृष्टीस पडली; परंतु समर्थ व जयराम हे दोघे मात्र निर्भयपणें येणाऱ्या प्रसंगाला तोंड देण्यास तयार अस-लेले त्यांच्या मुद्रांवरून लख्ख दिसत होतें व मिरासाहेब आपल्या मनाशींच विचार करीत उभे होते.

" इस् असेंमें यह् बरामन् खुदबखुद् अल्लाके हुकूमसे मेरेका मुलाखत् दे-नेको आया है इस्मे कुछ् शक् नहीं. सुभदार दिलेरखान के अप्सोपर तुबूबूरके मुसेहरी है ! गो-गोष्तकी फलियानी कैसी बनगयी इस्का सबब न कोतसे न सोंचकर, उस् नौकरपर वोह् अप्ना अभी करडा अमल याने अप्ने मजबूत् मगज्का अजवाला फैलान्के उस्को नाहक दुनियापार करदेगा ! या अल्ला तेरी कुद्रत् ! "

मिरासाहेब पुढें होऊन मोठ्या नम्रतेनें समर्थांस म्हणाले "महाराज, अप्ने खातर मेरे दिल्की बराबर खुलावट् होके आज दीन्से मैं आप्का दोस्त् होने चाहाता हैं ! उस् लिये मेरा अर्ज कूबूल करना ! "

" परमेश्वरभजनाशिवाय," समर्थांनीं प्रेमानें सांगितलें, " जोंपर्यंत तुम्हांला कोणतीच इच्छा नाहीं, तोंपर्यंत सर्व जगच जर तुमचें दोस्त आहे, तर मीही त्यांतलाच असल्याकारणानें, तें नातें नवें जोडण्याचें कारणच नाहीं. मात्र प्रसंगीं अविधी जुलमाचा प्रतिकार करून, परमेश्वराच्या खऱ्या स्वरूपाशीं तादात्म्य वागावें. तसें झालें म्हणजे विरोधभाव आपसुखच पतन पावून, आपण एक होणार आहोंत ! "

"आप्का महसुरा सच है ! आप्के कथने मुआफक् आजसे आप दोनो दोस्त बन्यये !" मिरासाहेबांनीं मोठ्या आदरानें व प्रेमानें आपल्या हातांतील केरवा

मण्यांची स्मरणी समर्थांच्या हातीं देऊन त्यांस प्रेमालिंगन दिलें. इतक्यांत दलेलखान सुभेदार एका तकारींत झांकलेले मांस घेऊन मनाशींच पुटपुटत तेथें आला.

"उस् बदमाष्को तो सूली चढाया! लेकिन् यह क्या बात् है के हमारे मिरासाहेब यह् बेरामनके साथ बडे बिरादरीके बाते कर रहे है!" तो पुढें होऊन आश्चर्यचकित मुद्रेनें म्हणाला 'क्यौं साई मिरासाहेब, अप्की और यह् काफीरकी दोस्ती हो गयीं?"

"उनोने हम्को रामदर्सन् कर दिया. उस् लिये हम् उनका बिरादर होगया है!" सांई मिरासाहेबनें उत्तर दिलें.

"क्या, तुम्को उस्का राम मिलगया? वोह् राम तुम्को मिलता है और हम्को कैसा नहीं मिल्ता?" दलेलनें प्रश्न केला.

"गो-गोष्तकी फलियानी बन्गई इस्मेंही हम्को जैसा राम मिल्गया, उस् मुआफक् तुम्काहि मिल्गया है! तुम् जो आप्ने आखोंपरका तूबूरकी सुसे-हरी सफा करदेंगे तो अलबत् तुमारी सफा होनेसे तुमारा राम् ठिकानेपर आजाएगा और तुम्को राम मिलेगा!' मिरासाहेबांनी मनमोकळेपणें चोख उत्तर दिलें.

"क्या वोह् जाने राम? गोष्तकी फलियानी रामने बनाया?"

"तुम्ही त्या नोकराला व्यर्थ सुळावर चढवलेंत! तो मनुष्य शक्य नाहीं. आम्ही खरे रामभक्त असल्याकारणानें आमची अब्रू राखण्याकरताच, परमेश्वरानें मांसाला फळावळींचें रूप दिलें."

"मै तो जान्ता हैं के तुम् बडा जादूगार होगा! इस् वास्ते वैसा होगया! यह् देखो! फेर गोष्त लाया है! बनाव उस्के गुरु! नहीं तो तुमारा राम बताव! अगर्चे यह खाने को तयार हो जाव!"

"तुमचें म्हणणें काय 'राम बताव!' ठीक आहे तुम्हांला कोणत्या तऱ्हेनें रामदर्शन करवूं?',

"चाये उस् तऱ्हेसे!"

"सुभेदारसाहेब, या जगांत ज्यांत राम नाहीं अशी वस्तूच नाहीं. प्रत्येक वस्तूंत–दृश्य अथवा अदृश्य ती कशीही असो–तींत राम या अक्षराचें वास्तव्य असतेंच. तुम्हांला वाटेल त्या वस्तूचें नांव घ्या, तिच्यांत राम ह्या शब्दाच्या

दोहोंचा आकडा कायम आहे असेंच सिद्ध होईल. दोन आणि दोन चार होतात, हें ठरवायला जसें गणिताचें साह्य लागतें तसेंच हवें तर प्रत्येक वस्तूंत **राम** ह्या नांवाचा दोहोंचा आकडा शेष आहे हें सिद्ध करायला गणिताचें उदाहरण घ्या! आमचे वेद चार असून त्यांत पंचमहाभूतांचें वैभव वर्णिलेलें आहे. तीं पंचमहाभूतें माया आणि ब्रह्म यांनीं व्यापलेलीं असून या सर्व जगताचें अष्ट दिक्पाल संरक्षण करतात अशी आमच्या धर्माची पक्की समजूत आहे. तर कोणच्या वस्तूंन तुम्हांला **राम** हा दोहोंचा आंकडा पाहिजे असेल त्या वस्तूचें नांव घ्या, म्हणजे त्यांत **राम** आहे असें सिद्ध करून दाखवितों."

"तुम् बुद्‌पुरस्ती करनेवाले है और तुम् आप्ने अल्लाकी बुत् फत्तरकी बनाते है! उस् फत्तरमे काहां **राम** है वोह् मुजे बताव!"

"फत्तर हीं तीन अक्षरें आहेत. चतुर्वेदांबाहेरचें असें ह्या तीन अक्षरीं फत्तर शब्दांत कांहींच नाहीं म्हणून तीं तद्रूप असलेलीं परंतु भिन्न वाटणाऱ्या तीन अक्षरांनीं त्या चार वेदांना गुणलें असतां बाराचा आकडा तयार होतो. आतां, चारीवेद पंचतत्वांचे पोषक असल्यामुळें तीं तत्वें अर्थातच त्यांत विलीन होतात. म्हणून बारामध्यें पांच मिळविले असतां सतरा हा आंकडा तयार झाला. माया आणि ब्रह्म ही आद्य जोडी सर्व विश्वाला व्यापून राहून हिच्यापासूनच जगाची उत्पत्ति झालेली आहे असें आमचा धर्म सांगतो. तेव्हां गुणाकारानेंच जशी जगदुत्पत्ति होते तद्वत् आताच्या सतरा ह्या आंकड्याला दोहोनीं गुणिलें असतां चौतीसांचा आकडा तयार होतो. सर्व जगताचें रक्षण करणारे जे अष्टदिक्पाल त्या आठांनीं चौतीसाला भागलें असतां बाकी काय राहते तर दोन हा आंकडा. वाटेल तितक्या अक्षरांचें वस्तूचें नांव घेऊन त्याप्रमाणें उदाहरण केलें असतां बाकी दोनच राहिली पाहिजे. याबद्दल—

## दोहा.

**नाम चतुर्गुण पंचजुत द्विगुणित करवसु सेख।**
**रमे राम जायते रामदास कियो लेख॥**

असेंच केव्हांही आम्ही म्हणणार!"

"यह् तुमारा कारकुनीका हिसाब् हम् जानने नही चाहते! और कुछ् तरकीबसे **राम** बतला देव!"

" ठीक आहे ! तुम्हांला **रामदर्शन** हवें असेल, तर मी जातों त्या मार्गानें या; म्हणजे तें घडेल ! "

" **मुजे कुबूल है !** "

" चला तर माझ्या मागून ! "

**समर्थ** आणि **जयराम** तेथून जे निघाले ते मिरजेच्या किल्ल्यावर गेले. त्यांच्या पाठोपाठ **दलेलखान** सुभेदारही गेला. **समर्थ** व **जयराम** किल्ल्यावर तटाच्या एका बुरुजावर जाऊन उभे राहिले. **दलेल** त्यांच्या शेजारीं जाऊन उभा राहिला. **समर्थांनीं जयरामाला** खूण केली त्याबरोबर ते दोघेही ' जय जय रघुवीर **समर्थ** ' असा रामनामाचा जयघोष करून बुरुजाच्या जंगींतून लहान देह करून बाहेर निघाले व तटाखालीं येऊन उभे राहिले. **दलेलखानाला** त्यांच्या मागोमाग येतां न आल्याकारणानें तो तसाच बुरुजावर उभा राहिला व आश्चर्यचकित झाला.

" चल, जलदी चल. **रामदर्शन** पाहिजेना ? " **समर्थांनीं दलेलाला** विचारलें, " बुरुजावर कां उभा ? "

" यह किलेके दिवारके इतने छोटे रंदेसे हम्ने नीचे कैसे आना ? " **दलेलनें** विचारलें.

" आम्ही दोघे जसे आलों तसेच तुम्ही या ! "

" नहीं आने सक्ते ! "

" तर मग **राम**ही दिसत नाहीं. "

" बस्, तुम् बडा जादूगार है ! इसवास्ते तुम् वोह् किलेके दिवारके इतने छोटे रंदेसे यह **जयराम**के साथ निकल गया. वोह् कुछ् नही. यह् गो-गोष्टके फूलों बनाव ! " **दलेलखान** किल्ल्यावर धांवत येऊन बोलला.

" अहो, पण मांस आहे कुठें ? " **समर्थांनीं** विचारलें.

" यह देख ! " **दलेल** ऐटीनें बोलला.

" त्या तकारीवरचा रुमाल काढा पाहूं ? "

**समर्थांनीं** असें म्हणतां क्षणींच **दलेलनें** रकाबीवरचा रुमाल बाजूला केला, तों त्यांत फुलांचे हार त्याच्या दृष्टीस पडले. ते पाहून **मिरासाहेब** त्याला म्हणाले " क्यौं सुभेदारसाहेब, दिल्‌सफाई हो चुकी ! "

" बेषख हो चुकी. महाराज, आपको बहोत तुकलीफ् दियी, उस्वास्ते

आपकी मै बंदगी बजाताहूं. आप तो सच्चे सांई हो ! आज़से मै आपका बंदा ताबेदार शागीर्द बनगया है ! ”

“ शिष्य झालास हेंच बरें झालें ! ” **समर्थ** बोलले, “ तूं आपल्याच धर्मात रहावें आणि परपिडनाचें तत्व सोडून आमचें भूतदयेचें तत्व, यापुढें नेहमीं ध्यानांत ठेवावें असें तुला आमचें सांगणें आहे. तूं आम्हांला उस्ताद मानलें आहेस, तेव्हां आतां आमच्या धर्माचा छल करणारास शिक्षा लावण्यासाठीं जो आमचा **शिवराज** तयार झाला आहे त्याला मदत करण्याच्या वचनाची तूं आम्हांला गुरुदक्षिणा दिली पाहिजे आणि या मिरजेस **रामदासी** मठाची स्थापना करवून तेथें दर गुरुवारीं तूं आपल्या लवाजम्यानिशीं निमाज पढला पाहिजेस.”

“ आपके कहने मुआफक् करनेको मै तयार हूं ! ”

“ ठीक आहे. आमची **वेणु** म्हणून जी शिष्यीण आहे तिलाच मठाध्यक्ष करावी म्हणजे झालें. ”

“ तो फेर वोह फूलोंके शेरे उस्तादके बदनपर चढा देना मंजूर है ! ” **मिरा**साहेब आनंदानें बोलले.

**श्रीरामदास समर्थ** आणि **जयराम**स्वामी यांच्या गळ्यांत **दुलेलखान** फुलांचे हार घालतो व हात जोडून उभा राहतो. “ अहाहा—क्या बहार है ! ”

पद.

**चातुर चातुरसे चुटका ॥ ध्रु० ॥ एक एक गुण परवाडी डारूं ॥ तन मेरी तोरी गयो तटका ॥ १ ॥ सुनत देखत गुण प्रगट लोकनमें ॥ अजब लागे चटका ॥ २ ॥ रामदास सांई सबघटव्यापक॥ आनंदकी घटका ॥ ३ ॥**

**मिरासाहेबांनीं** स्तुती केल्यावर **समर्थ** म्हणाले—

“ सुजनहो ऐका ! ह्या जगांत परमेश्वरानें आपल्याला जें उत्पन्न केलें आहे तें दुसऱ्याला पीडा देण्याकरितां नव्हे. आपल्याला जर कोणी दुःख देईल तर आपण त्याचें योग्य न्यायानें निवारण करून, नंतर परमार्थासारख्या अद्वितीय सुखांत निमग्न होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हीच गोष्ट **शिवराजांचा** आहे. ज्याच्या देशाचें राज्य त्यानें करावें आणि कोणाचें स्वातंत्र्य

कोणी लुबाडून घेऊं नये अशा मतांचे आमचे **शिवराज** आहेत. त्यांच्या देशाचा कारभार त्यांनाच करायला हवा आहे. परकीय अमलाचे ते द्वेषी आहेत. परकीय सत्तेपासून स्वधर्मबांधवांना अत्यंत त्रास होऊं लागल्यामुळेंच **शिवराजांनीं** स्वदेशबांधवांच्या दुःखाचा प्रतिकार करण्याकरितां **श्रीजगदंबा** भवानीला साहाय्यार्थ घेतली आहे. दिवसेंदिवस त्यांचा हेतु साध्य होत चालला आहे याचें कारण, त्यांची स्वधर्मनिष्ठा, स्वदेशवात्सल्य आणि स्वबांधवप्रीति—या तिन्ही गोष्टींची नुसती बडबड करीत बसायचें नसून त्यांनीं केलेली कृति पाहून लोकांनीं थक्क व्हावें आणि वांहव्वा म्हणावें हें आहे. लोकसेवकांच्या पुढाऱ्यांनीं किंवा लोकनायकांनीं नुसती बडबड न करतां कृति करून दाखवून मगच बडबड करावी; कारण कृतीच्या अगोदर केलेल्या बडबडीनें कृति नासण्याचा फार संभव असतो. सध्यांचा वेळ चळवळीचा आहे, परंतु त्या चळवळींत देवाचें अधिष्ठान पाहिजे म्हणजे ती यशस्वी होईल. एवढ्याचसाठीं सर्वत्र बलभीमाची स्थापना करून श्रीचा संप्रदाय वाढविण्याचे अश्रान्त परिश्रम चालले आहेत. त्यावेळीं जिवाच्या भीतीनें परकीय अम्मलच बरा असें म्हणणें म्हणजे लोकनायक **शिवबांच्या** परिश्रमाची निंदा करून गीतेंतील कर्मयोगाला लाथाडण्यासारखें होणार आहे. स्वदेशसेवा म्हणजे स्वधर्मनिष्ठा आणि स्वराज्यस्थापना ह्या गोष्टी ज्यांना करायच्या असतील त्यांनीं जीवित तृणसमान मानिलें पाहिजे. जीवाची ती पर्वा काय ? खरें पाहिलें असतां, जीवित म्हणजे काय आहे ? हा संसार म्हणजे बुडबुडा आहे. फुटला कीं झालें ! सृष्टिनिर्माणकाळीं उत्पन्न झालेल्या ह्या संसाराचें चित्र म्हणजे प्रत्यक्ष अग्नीचा भडका आहे. प्राण्याच्या जननाबरोबरच जसें केशांनें जनन झालेलें असतें तद्वतच ह्या संसारवैश्वानराच्या पोटीं प्राणी जन्माला आला म्हणजे मृत्यूही जन्माला येतो. अग्नि एकसारखा टिकण्याकरितां त्याला जसें सर्पणाचें खाद्य लागतें तद्वतच संसार कृष्णवर्त्म्याचें सर्पण प्राणी होय. संसाराच्या अग्नींत प्राण्याला लांकडाप्रमाणें जळून खाक झालें पाहिजे, हें जरी खरें आहे, तरी तेंच मरण शांत आणि आनंदीवृत्तीचें व्हावें असें जे प्रत्येकाला वाटतें, तें वाटणें प्राप्त करून घेण्यासाठीं—चंद्रासकट पृथ्वी जशी सूर्याच्या भोंवतीं किरण्यांत निमग्न झाली आहे, तद्वत आपण भिन्न नांवांचा जो परमेश्वर त्याच्या ठायीं गुंग झालें पाहिजे. म्हणजे संसाराग्नींत जळणारें हें देहसर्पण सार्थ

होतें आणि अंतीं निरिच्छ आनंदांत आत्मा गढून जातो. या जगाची रह्राटी बघितली तर—

> **बहू ढीग मागेंपुढें मोहरांचे ।**
> **मदोन्मत्त होवोनियां तेथ नाचे ॥**
> **कळेना जळे रूप हें सर्पणीं रे ।**
> **हरे राम हा मंत्र सोपा जपारे ॥**

जयजय रघुवीर समर्थ ! ”

> “ **जगीं होइजे धन्य या रामनामें ।**
> **क्रियाभक्तिऊपासना नित्यनेमें ॥**
> **उदासीनता तत्वतां सार आहे ।**
> **सदा सर्वदा मोकळी वृत्ति राहे ॥**

जयजय रघुवीर समर्थ ! ” जयरामस्वामींनीं श्लोक म्हटला--

सर्व मंडळी गांवांत मठाची स्थापना कोठें करावी म्हणून योग्य स्थल बघण्याकरितां गेली.



# प्रकरण दहावें.

## पहिला बेटा न् सवाई सोटा.



ह्या जगांतला स्वजन्माचा ईश्वरी संकेत ओळखून ब्राह्मी स्थिति प्राप्त करून घेण्याच्या भौतिक मार्गाच्या शिखरास जाऊन पोंचले असतांही, स्वदेशबांधवांची पारतंत्र्यांतून मुक्तता करण्याकरितां स्वधर्म आणि स्वराज्य यांच्या बोधाच्या उपजत बुद्धीला जोरानें वाढण्यास महाराष्ट्रललामभूत **श्रीशिवछत्रपतींच्या** पराक्रमाची जोड घेऊन स्वधर्मजागृतीनें स्वराज्यस्थापना करविणारा **श्रीसमर्थ रामदासांचा** विजयी ब्रह्मचारी मारुती सर्व आर्यावर्तावर भुभुःकार करून उड्डाणें मारीत हिंडल्याला आज तीनशें वर्षें होत आलीं आहेत. याची साक्ष—इतिहास, दंतकथा, वैभवहीनतेनें व पतिपराङ्मुखतेनें भ्रष्ट होऊन आज मित्तीस जमीनदोस्त होऊं पहाणारे किल्ले, तट, मंदिरें, गढ्या, तलाव, बगीचे, राजवाडे वगैरे जे देत आहेत त्यांच्याच खऱ्या वैभवशाली स्वरूपाचा आणि त्यांत नांदणाऱ्या राजलक्ष्मीचा प्रकृत प्रकरणांत जो **प्रतापगड** नांवाचा छत्रपती **शिवरायांनीं** बांधलेला किल्ला त्यांतील **अफ्जुल्खानाच्या** वधाच्या काळचा जो प्रसंग येणार आहे तो निर्मळ असा आदर्श असून त्यांत दिसणारीं तेव्हांचीं चित्रें व त्यांचीं स्वभाववैचित्र्यें हीं स्पष्ट दृग्गोचर होणार आहेत.

धर्मजागृति, ऐक्य, दृढनिश्चय, बाहुबल, पातिव्रत्य, अटोकाट धोरण, अतुल प्रतापाच्या दिग्विजयी राष्ट्रीय झेंड्याचा थयथयाट, परकीय सत्तेच्या रणमस्तीची हवेलंडी, ज्याचा त्याला धर्म प्यारा असणारें तत्त्व, परकीय सत्ताधिकाऱ्यांना रामभक्त करून अहंकाराची केलेली गर्दनछाट, प्रपंचांत राहून परमार्थ करण्याची अजब युक्ति, साम्राज्याचीं उदात्त कल्पना, जशास तसें वर्तन ठेवण्याची शैली, अंधपरंपरेच्या रूढींतील कर्दमाची ज्ञानाधारें केलेली उरफोड,

बिकट प्रसंगीं न डगमगतां स्वदेश, स्वधर्म आणि स्वराज्य यांबद्दलच्या स्वदेशबांधवांच्या सुखसोई करण्याच्या कामीं पडणाऱ्या दगदगींत व प्राण तृणवत् मानण्याचें क्षात्रतेज, मूठभर सेनेचें सेनापत्य स्वीकारून परकीय सत्तेच्या मदोन्मत्त सेनारूप हत्तींच्या कळपांना गनिमी काव्यानें जर्जर करण्याची अजब शैली, विजयश्रीचा विजयी स्वयंवर, स्वभाषेला उन्नति देऊन स्वराज्यस्थापनेची कर्तबगारी, सेवाधर्माचा अमोल कित्ता—वगैरे ज्या गोष्टी—त्या शिवकालीं एकसमयावच्छेदेंकरून कां व कशा घडून आल्या हें इतिहासाच्या वाचनानें अगर भविष्यकथनानेंही तंतोतंत कळणें शक्य नाहीं. याचें कारण हें कालचक्र असेंच अद्वितीय आहे.

ह्याच कालचक्राच्या फेऱ्यांत पवित्र आणि पुण्यकारक अशा देशसेवेमध्यें ज्यांनीं आपलीं शिरें तळहातावर घेऊन अखेर जे विजयी झाले, अगर रणशय्येवर सुखाची व अक्षयची निद्रा घेत पहुडले, अशांचीं चरित्रें श्रवण करणें पुण्यकारक नाहीं असें कोण म्हणेल?

स्वातंत्र्यप्राप्तीकरितां झगडणें हें आज सृष्ट्युत्पत्तीपासून सुरू असून त्यानें सर्व जगताला आक्रमण केलेलें आहे. स्वदेशसेवेस वाहिलेल्या सर्व नरपुंगवांची राष्ट्रीयत्वाबद्दल नेहमीं एकच कल्पना असते असें नाहीं. त्या कल्पना जशा भिन्नभिन्न असतात तशाच त्या रंगवल्या असतां त्यांच्या कृतींचा विपर्यास न होतां, धडा घेऊं पाहाणाराला त्या मार्गदर्शक होतात. सृष्ट्युत्पत्तीपासून आजपर्यंत स्वातंत्र्याचें भांडण मिटलेलें नाहीं आणि प्रलयकालपर्यंत तें मिटणेंही शक्य नाहीं. जगाच्या स्वास्थ्याकरितां आम्ही लढतों, त्यांत आमची बिलकुल स्वार्थबुद्धि नाहीं, गरीब राष्ट्रांचें स्वातंत्र्य रक्षण करण्याकरितां आणि उन्मत्त क्षात्रतेजाला विझवून टाकण्याकरितां आम्हीं हातीं शस्त्र धरलें आहे वगैरे जरी कोणी कांहीं गोष्टी सांगितल्या, तरी त्या निःशस्त्र गुलाम सुद्धां मनापासून कधींही खऱ्या मानणार नाहीं. भविष्यत्कालीं स्वातंत्र्याला असा कांहीं एक दिवस दिसणार आहे कीं, ज्यांच्याकरितां स्वातंत्र्य मिळविलें त्यांनांच भ्यालें पाहिजे.

भिन्न भिन्न राष्ट्रांच्या राष्ट्रीय खटपटी व उलाढाली यांची ऐतिहासिक माहिती मिळवण्याची इच्छा करून त्या खटपटींतील व उलाढालींतील उद्देशांची ओळख करून घेण्याची ज्यांची खटपट सुरू असते अशा ज्या वृद्ध तरुणांचीं

मनें इतिहासांतील जागोजागच्या धाडसी आणि अंगावर रोमांच उठविणाऱ्या गोष्टींनीं पूर्णपणें अकर्षिलीं जातात तेच पुरुष धन्य होत. स्वातंत्र्यप्रेम मनांत दृढ धरून त्याच्या प्राप्तीकरितां झुंजणारे व त्या झुंझारांच्या कृतीबद्दल आदर व्यक्त करणारे असे जे कोणी असतात त्यांना पुण्यवानच समजले पाहिजेत.

अशाच पुण्यपुरुषांपैकीं आमचे **श्रीछत्रपति शिवाजीराज** महाराज हे होत. प्रतापगडासारखे किल्ले त्यांनीं अनेक बांधले, परंतु प्रतापगडावरील जगदंबेप्रमाणें मात्र अनेक ठिकाणीं अनेक जगदंबांच्या स्थापाना केल्या नाहींत. कारण त्यांना एकच जगदंबा व अनेक किल्ले स्वराज्यरक्षणाकरितां पाहिजे होते. ह्या प्रतापगडावरील देवीचें ध्यान मनोभावनेप्रमाणें दिसेल असा त्या मूर्तीच्या ध्यानांत चमत्कार आहे. याच मूर्तीच्या पुढील सभामंडपांत **शिव-राजांच्या** राजघराण्यांतील व त्या राजघराण्याच्या आश्रयांतील चौघी स्त्रिया व पुरुष नोकर अशी मंडळी **समर्थांकडून शिवराज** केव्हां येतात म्हणून वाट बघत बसलीं असतां त्यांच्यांत पुढीलप्रमाणें संवाद चालला होता:—

" नव्हेका, तो प्रसंग फारच बहारीचा! **पिराजीरावांच्या** मागून आमचे मालक जेव्हांका कडाबीन घेऊन निघाले तेव्हां कांहीं विचारूं नका मासाहेब! फारच थोडक्यांत गेलें. नाहीं तर प्रसंग मोठा बिकट आला होता."

" **जिवा**, नाहीं तर कायरे झालें असतें? " **जिजाबाईनीं** विचारलें.

" **पिराजीरावांमागून** तेही पण— "

" अरे, असं अभद्र बोलूं नये! " **गिरजाबाईनीं** जरा रागानें बजावलें.

" ह्याचा साराच धोपट मार्ग! **चंद्राबाईनीं** टीकात्मक टोला दिला.

" बरें, मग पुढें रे काय झालें? " **जिजाबाईनीं** विचारलें, " तो **पुरंदरचा** किल्ला हस्तगत कसा झाला? "

**जिवा** म्हाल्या बोलला " आई जगदंबेच्या कृपेनें, महाराजांच्या पुण्याईनें आणि **पिराजीरावांच्या** मरणानें.

**जिवा** म्हाल्यानें सांगितलेली ही बातमी ऐकून **सईबाईंना** म्हणजे **शिव-राजांच्या** गृहिणीला मोठा आनंद झाला. त्या जास्त माहिती मिळविण्याच्या इच्छेनें बोलल्या, " पण तूं रे त्या लढाईत काय करीत होतास? "

" मी तिथें काय करीत होतों म्हणतां बाईसाहेब? अन् मी काय करीत होतों तें या तोंडानें सांगूं म्हणतां होय? नकोरे देवा! महाराजांनीं जर माझी

बढाई माझ्या तोंडून बाहेर पडलेली ऐकली, तर ही जीभच जाईल. मी तेथें काय करीत होतों तें महाराजच सांगतील; पण एवढें मात्र खरें कीं, मी तेथें होतों म्हणूनच तो किल्ला घेतांना महाराजांच्या जिवावरचा प्रसंग टळला. "

" जिवा, धन्य आहेस! " जिजाबाई उपदेशाच्या भाषेनें बोलल्या, "पण एवढें मात्र लक्षांत ठेव कीं, तूं होतास म्हणून शिवबा वांचला असें मात्र त्याच्या देखत किंवा परोक्ष पुन्हां केव्हांही कधींच बोलूं नकोस. हेच शब्द एखादेवेळीं तुझा जीव घ्यायला कारणीभूत होतील. आतां बोललास तो बोललास. अरे, तुझ्यासारख्या बाळगोपाळांचें माझ्या शिवबाला साह्य आहे म्हणूनच तो भगवद्वचनाप्रमाणें फलाशा न करतां आत्मयज्ञ करून स्वकर्म करण्याला झटत आहे. मागें सूर्यवंशी आणि चंद्रवंशी राजे असेच ह्या आर्यावर्तांत होऊन गेले. गोब्राह्मणांचा प्रतिपाळ करून यथासांग स्वकर्म बजावणारे राजे ह्या आर्यावर्तावर जे होऊन गेले त्यांच्याच माळेंत माझा शिवबा मेरूमणी होणार आहे. "

" यांत तर बिलकुल संशय नाहीं. पण आतां होणारे आमचे धाकटे धनी-साब कसे होणार ? "

" म्हणजे ? आतां महाराजांना मुलगा का होणार ? " गिरजाबाईनें विचारलें.

" यांत कांहीं संशय आहे कीं काय ? " जिवा मोठ्या ऐटीनें मान वांकडी करून बोलला.

" कशावरून रे ? " जिजाबाईनीं प्रश्न केला.

" मी कांहीं ज्योतिषी थोडाच आहे ? ह्या चंद्राबाई रोज म्हणतात म्हणून मीं म्हटलें. त्या का खोटें बोलतात होय ? पण मी म्हणतों तसें झालें तर त्यांत बिघडलें कोठें ? "

" अरे, त्यांत बिघडलें कांहींच नाहीं. " गिरजाबाई बोलल्या, " पण पहिली बेटी न् तूप रोटी ! "

" आहे कुठे तूप न् रोटी ? परक्या राजसत्तेच्या भाईबंद पशूंच्या मनसोक्त चरण्यानें ती आमची तूपरोटी आम्हांला मिळत नाहीं म्हणून तर आमचे महाराज त्यांच्याशीं रात्रंदिवस झुंज करताहेत. तेव्हां आतां तुम्हीच सांगा, कीं, ह्या वेळीं

तूपरोटीची फुकट बेटी हवी, का शत्रूला मारणारा **पहिला बेटा न् सवाई सोटा हवा ?** " **जिवानें** विचारलें.

" अरे, तूं कवित्व सुद्धां करतोस ? " **जिजाऊनें** म्हटलें.

" ह्या **चंद्राबाई** कवित्व करतात ! मी नाहीं ! यांनीं आमच्या आतां होणाऱ्या धाकट्या धन्यांचे डोहाळे मोठे छान रचले आहेत. घरीं केव्हां केव्हां म्हणतानां मीं ऐकले आहेत. "

" खरेंच कांहो **चंद्राबाई** ? " **जिजाऊनें** विचारलें.

" तुला रे कोणीं सांगितलें हें इथें बोलायला ? "

" अँ ! अन् रागावायला काय झालें ? धनीणीची कीर्ति नौकरानें गाऊं नये तर काय ज्याची त्यानेंच गावी ? माझा सूर गोड असता तर मींच ते डोहाळे म्हणून दाखवले असते. माझे सद्धां पाठ झाले आहेत. पण मी पडलों करड्या आवाजाचा शिपाई गडी; तेव्हां काय करावें ? "

" **चंद्रबाई**, म्हणा पाहूं ? ऐकूं द्या तर खरें आमच्या सूनबाईवरचें तुमचें कवित्व ! "

" कवित्व कसलें तें ! कांहीं तरी केलें आहे झालें ! पुरतेंसें आठवत सुद्धां नाहीं. चांगलें पाठ झालेलें नाहीं, त्यामुळें जरा कुठें कुठें चुकतें. "

" तुम्ही आरंभ तर करा. चुकाल तिथें आठवून द्यायला हा **जिवा** आहेना इथें हजर. "

" तें गाणें कांहीं पुरें झालेलें नाहीं; पण झालें आहे तेवढेंच म्हणतें. **जिवा,** सूर देतोसना ! "

" तर मग जरा दम धरा. घेऊन येतों. "

" काय तें ? "

" सारंगी नाहींतर तंबोरा. "

" काय तरी थट्टेखोर आहे ? घरीं मी सारंगीतबुऱ्यावर का म्हणतें ! "

" तुम्हीं सूर मागितला म्हणून मीं तसें म्हटलें. हवें तर जातें घेऊन येतों. त्याच्या घरघरींत म्हणा. "

" पुरे कर रे. " **जिजाबाई** बोलल्या, " तशाच म्हणा हो तुम्ही आपल्या ! " **चंद्रा** डोहाळे म्हणूं लागली.

## डोहाळे

### जिल्हा-धुमाळी.

( बन् बन् कर चलेरे गौळणी पेनका साजे० या गौळणीच्या चालींवर. )

**नव शशिकर उदयिं दृष्टि ती लावि जन जैशी ॥ राजाचि राणिवर तैशी ॥** ध्रु० ॥ **नवमास कांति ती वदनीं चढत कशा रंगीं ॥ चढत कशा रंगीं ॥ रविउदयीं रात्रिच्या ढंगीं ॥ १ ॥ षट्पद कसे रवीच्या कमलकोशि ते दिसति ॥ कोशिते दिसती ॥ कुचमुखें घिक् तया वदती ॥** चाल ॥ **खाय चोरुनि रगड आड माती ती ॥ परि नृपा उमगे ती ॥** चाल ॥ **वसंत ऋतुमधिं गज जैसा तो ॥ ससित पल्वलिं तो ॥ बहु आधाशि स्नान जैं करितो ॥ तत्सम कितिक तरि चुंबि ॥ कितिक तरि चुंबि ॥ बळें तो राणी॥ मुखगंधिं गुंग होवोनी ॥ मुख लोध्रवर्ण ॥ जणुं रात्र जीर्ण ॥ दावि प्रसू तूर्ण ॥ भाविचें स्वर्ण ॥ संतृप्त होइ नृपमन पूर्ण ॥ २ ॥ शारिकीं सूर किति राहे मंजु तो ॥ भाषणीं मिश्र जणुं राहे अर्थ तो ॥ सागरांबरेच्या उदरिं गुप्तसा ठेवा ॥ गुप्तसा ठेवा ॥ राजास वाटतें राणिकडुनि तो घ्यावा ॥** चाल ॥ **पुढति तो म्हणुनि हो जायी ॥ राणिच्या ॥ निरखि तो दृष्टिनें ग बाइ प्रीतिच्या ॥** चाल ॥ **मग लाजूनि ॥ मान वळवूनि ॥ स्वमत दावूनि ॥ मुग्धची राहे ॥ हळुच ती पाहे ॥ लक्ष्मीसि श्रीपती लाहे ॥ ३ ॥**

“ बाईसाहेबांच्या सध्यांच्या स्थितीचें वर्णन मात्र अगदीं हुबेहुब केलें आहेत हो **चंद्राबाई !** ” **गिरजा** बोलली.

“ प्रसिद्ध कवींच्या तोंडीचें थोडेंच होणार आहे ? ” **चंद्रा**, जरा मानेला झटका मारून व नाकाला नथ उडविणारा मुरका देऊन बोलली !

हा विनोदाचा प्रकार जगदंबेच्या मंडपांत चालला असतां तेथील मंडळी-च्या कानांवर शिंगें, तुताऱ्या, ढोल वगैरे वाद्यांचा आवाज आला. तो ऐकून **जिजाबाई**साहेब आनंदानें म्हणाल्या, “ **समर्थांचा** प्रसाद घेऊन आमचा **शिवराजाच** आला असावा असें वाटतें ! ”

" होय मासाहेब ! " **जिवा** म्हाल्यानें आपला उजवा पंजा दूरचें बघण्यासारख्या ऐटीनें भिवयांवर ठेवून म्हटलें, " आमचे महाराज, **चंद्राबाईचे** धनी आणि **गिरजाबाईचे** यजमान सर्वच मंडळी येताहेत. "

**जिवा** म्हाल्यानें सांगितल्याप्रमाणें **शिवराज**—चिटणीस, मुजूमदार वगैरे लवाजम्यासह तेथें येऊन पोंचल्यावर **सईबाई, चंद्राबाई** व **गिरजाबाई** उठून उभ्या राहिल्यावर दासींनीं **शिवरायांचें** लिंबलोण केलें व नंतर तेथें आलेले सर्व पुरूष **जिजाऊसाहेबांच्या** पायां पडले व हात जोडून उभे राहिले. **शिवराज** मात्र मातेच्या पायां पडून शेजारीं बसून बोलूं लागले.

" आई, मी **समार्थांचें** वर्णन काय करूं ? खरोखरच ते **समर्थ** या विशेषणाला पात्र आहेत. त्यांनीं परम कृपाळू होऊन माझ्यावर अनुग्रह केला. आत्मानात्मविचाराचा राजदंड हातीं दिला. राजधर्म आणि क्षात्रधर्म या दोहोंच्या उपदेशांच्या छत्रचामरांचें अंदण देणाऱ्या त्या **समर्थांची** थोरवी काय वर्णावी ? हा नारळ, ही माती, ही लीद आणि हे खडे—इतका त्यांनीं मला अखेरीस प्रसाद देऊन त्यांच्यावर मीं ज्या द्रव्याचा अभिषेक केला होता तें सर्व द्रव्य त्यांनीं रानोमाळ उधळून टाकून जंगलांतल्या गुराख्यांच्या पोरांकडून लुटवलें. "

" बाळ, ह्या प्रसादाचा अर्थ लक्षांत आला ना ? "

" हो हो. आई, हें काय विचारावें ! हा नारळ माझ्या कल्याणार्थ असून, ही माती हे पृथ्वीप्राप्तीचें चिन्ह आहे. हे खडे अनेक किल्ल्यांच्या स्वामित्वाची सूचना देत असून, ही लीद अश्वांच्या पागांचा संग्रह माझ्या पदरीं होणार असें सांगते आहे ! "

" ह्या एका गरीब नोकराचा मुजरा घ्यायचा महाराज ! " **जिवा** पुढें होऊन नम्रतेनें बोलला, " धन्यांच्या पदरीं पुरंदरगडासारखे अनेक किल्ले असावेत ही गोष्ट खरीच—"

" अरे **जिवा** म्हाल्या, तूं इथेंच आहेस का ? ह्यानें आमचें फार मोठें काम केलें आहे. पुरंदर गडावरील गडकऱ्यांमधल्या भाऊबंदकीचा फायदा तुम्ही सांगितल्यावरून, तो जिंकून घेत असतां माझ्या जिवलग दोस्त **पिराजीचा** तेथें बळी पडला. त्यावेळींच हा **शिवाजी तान्हाजीच्याबरोबर** परलोकीं गेला असता; पण हा **जिवा** म्हाल्या त्यावेळीं तेथें होता म्हणूनच

मी आज इथें आहें. माझ्या वक्षस्थळाला विदीर्ण करण्याच्या नेमानें शत्रूकडून येणारी गोळी ह्यानें मला चटकन् खालीं बसवून आपल्या मांडीवर जर घेतली नसती तर आज मी ह्याचा ऋणी राहिलों नसतों. तेव्हांचें बक्षीस अजून ह्याला द्यायचें राहिलें आहे. आतांच्या आतां त्याला एक तोडा तर द्या."

**सईबाईनीं** लगेच आपल्या पायांतला एक सोन्याचा तोडा त्याला दिला व तो त्यानें आपल्या पायांत न घालतां मस्तकावर धारण केला. हें पाहून **शिवाजी** त्याला म्हणाला, "हें रे काय? अरे पायांत घाल!"

"महाराज, माझी गरीबाची परीक्षा कशाला बघावी? माझ्या धन्याकडला प्रसाद प्रत्यक्ष लक्ष्मीकडून मला मिळाला आहे. त्याला मी पायांत घालूं होय? छत्! आंब्याच्या मोहोराप्रमाणें हा माझ्या डोक्यावरच नेहमीं राहील!"

"बरें, तुझी मर्जी! **मुजुमदार,** तें **समर्थांनीं** आपलें चरणोदक मासाहे-बांकरतां दिलें आहे तें घ्या पाहूं!"

**समर्थांचें** चरणोदक **मुजुमदारानीं जिजाबाई**साहेबांस दिलें. तें त्यांनीं मोठ्या आदरानें ग्रहण केलें.

"बाळ, **समर्थांच्या** आशीर्वादानें तुझें कल्याण होवो! बरें, आजची चांदण्याच्या डोहाळजेवणाची रात्र ठरली आहे. तूं येणार ना **मुजुमदार, चिटणीस** यांनां बरोबर घेऊन? आयतींच मोठालीं दंपत्यें होतील. पंक्तींत जोडप्यांचीं पानें मांडूं!"

"आपल्या आज्ञेबाहेर कोण जाणार!"

"बरें तर; आम्ही जातों आतां वाड्यांत!"

**जिजाबाई**साहेब—**सईबाई, चंद्राबाई** व **गिरजाबाई** यांच्यासह देवीचें दर्शन घेऊन तेथून निघून गेल्यावर **जिवा म्हाल्या** आड उभा राहिला व **बाळाजी आवजी** चिटणीस **शिवराया**ला म्हणाले "महाराज, आप-ल्याशीं समेट करण्याच्या मिषानें अजस्र सेनेसह **अफजुल्खान** विजापु-राहून निघून मोठाले मुक्काम करीत आपल्याकडे येतो आहे, अशी जी बातमी समजली आहे, तिची आतां प्रथम व्यवस्था केली पाहिजे!"

"**बाळाजी,** तें सर्व लबाडीचें वातावरण आहे हें पक्कें लक्षांत ठेवा. त्या प्रकरणांत भेद केल्याशिवाय गत्यंतर नाहीं!"

"त्याचा तो वकील **गोपिनाथपंत** मोठा हट्टी आणि लांचलुचपतीचा

द्वेष्टा ब्राह्मण असून वचनाचा सच्चा आहे अशी त्याची कीर्ति आहे. त्याला सामील करून घेतल्यास कार्य होणार आहे.'

"**मुजुमदार,** वेड तर नाहीं लागलें तुम्हांला! मेघमंडळाशीं स्पर्धा करणारे प्रचंड पर्वत आणि आपल्या उताणखाट गर्वानें सूर्यावर थुंकण्याचा प्रयत्न करणारे विस्तीर्ण महासागर ओलांडून जे परक्या धर्माचे लोक आज ह्या आर्यावर्तातल्या संपत्तीकडे लाळ घोटीत हजारों कोसांवरून येऊन राज्य करताहेत ते सर्व तुमच्यासारखेच फलाची इच्छा न धरतां स्वकर्मरत झालेले आहेत असें कसें म्हणतां?"

"**विजापुर**करांकडल्या **अफजुलखान** सरदाराचे वकील **गोपीनाथपंत** महाराजांना भेटण्याकारितां आले आहेत!" **जिवा म्हाल्यानें** पुढें येऊन सांगितलें.

"**निळाजीपंत,** सामोरे जाऊन त्यांनां मोठ्या आदरानें घेऊन या."

"वकीली कावा लढवण्याकरतां,' चिटणीस म्हणाले, "वकीलसाहेब तर येऊन ठेपलेच. प्रसंग बिकट दिसतो खरा!"

"चिटणीस, परकीयानीं आमचें स्वराज्य ढेंकर देऊन तें पचविल्याची जरी ऐट चालवली आहे आणि त्यामुळें स्वराज्याचा गड स्वाधीन करून घेणें जरी असाध्य आहे असें आपल्याला वाटतें आहे, तरी प्रत्येकजण जर निराशावादी बनून चिंतामणीसारख्या ह्या भरतभूमीच्या मंदिरांत स्वस्थ बसला तर कसें होईल? होत असलेले माझ्या देशबांधवांचे हाल कोणच्या डोळ्यांना बघवतील? खऱ्या आर्यपुत्राचे हात बंदीजनांप्रमाणें परकीय सत्तेपुढें जोडलेले कोणच्या हृदयाला सहन होतील? प्रत्येक गोष्टींत प्रजाजनाला जळवेप्रमाणें शोषण करणारी परकीय अमलाची चांचेगिरी कोणच्या मनाला सहिष्णुतेची शीतल अशी छाया वाटेल बरें?"

**मुजुमदार गोपिनाथपंत** वकीलाला घेऊन आल्यावर **बाळाजी आवजींनीं** उठून त्यांचा योग्य परामर्ष घेतला आणि त्यांनां स्थानापन्न केल्यावर त्यांच्याशीं ते बोलूं लागले.

"वकीलसाहेब, हे पाहा आमचे महाराज! आपलीच वाट बघत बसले आहेत. आपणांसारख्या थोर माणसांच्या भेटी थोर प्रसंगींच घडतात."

"हुजूर," **गोपिनाथपंत** जरा तोऱ्यानेंच परंतु विनम्र होऊन बोलूं

लागले. " विजापुरच्या तख्ताचे बड्या खानदानीचे सरदार फौजबक्ष अफजुल्खांसाहेब हे आपल्याबरोबर प्रचंड सेनासागर घेऊन आपल्याशीं विजापुरच्या तख्ताचें समेट करण्याकरतां आले आहेत. दिल्लीपतीच्या विनंतीवरून विजापुरच्या तख्ताधिपतींनीं आपल्या वडिलांना बंधमुक्त केलें आहे. आपल्यावरचा सर्व तऱ्हेचा रोष जाऊन आपणांशीं समेट करण्याची बुद्धि विजापूरच्या बादशाही अमलाला उत्पन्न झाली आहे. तिचा फायदा करून घेणें आपलें काम आहे. मी आपणांकडे त्याच कामाकरितां त्यांच्या मार्फत आलों आहें. त्यांनीं आपल्याला अनेक सलाम प्रविष्ट करायला मला आज्ञा केली आहे. आपण त्यांचा स्वीकार करावा. फौजबक्ष अफजल्खां-साहेबांनीं आपल्या गोटांत आपली भेट घेण्याची इच्छा प्रदर्शित केली आहे. आपला आणि विजापूरच्या तख्ताचा समेट व्हावा याच मुख्य उद्देशानें गरिबनवाज पातशहांकडून मोठ्या मेहेरनजरेनें आपल्या तीर्थरूपांना-शहाजी राजांना बंधमुक्त करण्यांत आलें आहे ! "

" समेटच करण्याचाच जर मूळ उद्देश होता तर प्रचंड सेनासागराची काय जरूरी होती ? दिल्लीपतीचा तगादा लागल्यामुळेंच आमच्या तीर्थरूपांना बंधमुक्त करण्यांत आलें असें न सांगतां मेहेरनजरेची खोटी शिफारस सांग-ण्याचें कारण काय ? दिल्लीपती काय किंवा विजापूरची बादशाही काय आम्हांला दोन्ही सारखेंच. परकीयांना आपले कसें म्हणावें ! ज्या ठिकाणीं आमच्या गोब्राह्मणांचा हरघडीं छळ चाललेला दृष्टीस पडतो व आमचीं देवालयें जमीनदोस्त करून ज्या ठिकाणीं मशीदी-दर्गे उभारलेलीं दृष्टीस पडतात तेथें या राज्यकर्त्यांबद्दल आम्हां हिंदूंना प्रेम कसें वाटावें ? तुमचेंच उदाहरण घ्या ! तुम्ही जातीचे ब्राह्मण असतां, तुमच्यासारख्या ब्राह्मणानें स्वकर्म सोडून पर-कीयांच्या दास्याची थुंकझेली करण्यांत प्रतिष्ठा मिरवावी आणि बोलावणें-कऱ्याची कामगिरी पत्करावी हें तुम्हाला योग्य आहे काय ? तुम्हीं सध्य जी कामगिरी करण्याचें अंगिकरलें आहे ती कामगिरी म्हणजे ब्राह्मणांनीं शूद्राचें आचरण करण्यासारखेंच नव्हे काय ? ब्राह्मणांनीं आमच्यासारख्या क्षत्रियांनां मदत करून आपल्या क्रिया निर्विघ्नपणें चालण्याला आमची मदत घेण्याच्या ऐवजीं वैदिक धर्माशीं विरोध करणाऱ्या अविंधाना जर ते मदत करण्याकरतां फितूर होऊं लागले, तर त्यांना कोणच्या धर्माचे अथवा कोणा-

च्या बीजाच मानावें ? गुलामाप्रमाणें परकीय अमलाच्या जुंवाखालीं निमूटपणें मान देऊन, त्यांच्या हांजी हांजीखोरपणाच्या सेवेंत स्वधर्मी क्षत्रियाला जर तुमच्यासारखा एखादा ब्राह्मण त्या परकीय नष्ट गळेकापू अविंधांच्या कपट-जालांत गुंतवण्याचा प्रयत्न करूं लागला, तर तो ब्राह्मण ह्या श्रेष्ठ पदवीला पात्र होईल का ? ''

" आपलें बोलणें मला समजतें, पण उमजत नाहीं त्याला काय उपाय ! कारण, सध्यां स्वातंत्र्य आणि स्वराज्य यांबद्दलचे भविष्यवादाचे पोकळ पेढे खात बसण्याचा आव आणणें म्हणजे वांझेच्या नशीबीं पोरें किती आहेत याचें उदाहरण सोडवण्याच्या शुष्क खटपटीसारखेंच निष्फळ आहे. आम्हां हिंदूंची स्थिति म्हणजे दोन उंच गिरिशिखरांना जोडणाऱ्या अशाश्वत अशा पुलावरील भयप्रद मार्ग कंठणाऱ्या गाड्याप्रमाणें झालेली आहे. दिल्ली आणि विजापूर येथील प्रबल अशा दोन हत्तींच्या पायांपाशीं आम्ही हिंदू आज पूर्णपणें जखडले गेलों आहोंत. म्हणून हताश झालेल्या ह्या आर्यभूला इतउत्तर स्वातंत्र्याचे व स्वराज्याचे दिवस दिसणें अगदीं अशक्य आहे. ज्या पातशाहीच्या वट वृक्षाचीं मुळें आज शेंकडों वर्षांच्या प्रयत्नानें पाताळांतील शेषाच्या मस्तकाला जाऊन भिडलीं आहेत त्या वृक्षांशीं स्पर्धा करण्याला कोणचे वृक्ष टिकणार ? दोन्ही बादशाहींचें सामर्थ्य इतकें प्रचंड आहे, कीं प्रत्यक्ष इंद्रवज्रानेंही तें फुटूं शकणार नाहीं. मग आम्हां यःकश्चित गरीब हताश झालेल्या हिंदूंची त्याच्या-पुढें मात्तबरी ती काय ?

" समशेरीचा उपयोग जसा आणीबाणीच्या वेळीं समजतो, त्याचप्रमाणें सिंहाचा पराक्रम हत्तींच्या कळपांतच समजतो. बिकट प्रसंगीं धैर्यच उपयोगीं पडतें. कोणचाही प्रयत्न युक्तीच्या पायावर चिकाटीनें स्वार्थत्यागपूर्वक केला असतां अंतीं जयप्राप्ति होते या वचनावर ज्यांचा विश्वास आहे ते हताश-अवस्थेंत सुद्धां कर्मयोगाला झुगारून देऊन हरि हरि म्हणत कानांत तुळशी-पत्रें घालून बसत नाहींत. जीवनाश होणार हें स्पष्ट दिसत असतांही रोग्याला औषधोपचार चालूच नसतात काय ! प्रत्येकानें क्रिया करीत राहिलेंच पाहिजे. प्रत्येकानें स्वधर्म ओळखून वर्तन करण्याला जर प्रारंभ केला, तर त्यांत त्याच्या हातून होणारी एखादी चूक त्याच्या फायद्याचीच होते. ईश्वरावर भार टाकून स्वकर्तव्यांत गुंग झालें असतां निराशेची आशाच नको. "

"आपण आरंभलेला उद्योग किती बिकट आहे आणि तो शेवटास जाण्याला रस्त्यांत किती विघ्नें आहेत हें आपण जाणतच आहांत!"

"स्वकर्माचरणांत जे अडथळे येतात त्यांचा मोठ्या धैर्यानें अंगिकार करून जगदंबेच्या स्तवनानें त्यांचें भस्म करून टाकावें आणि तो देवीचा अंगारा समजून कपाळाला लावून यशःप्राप्तीकरितां छाती काढून पुढें उभें राहावें. स्वधर्माची निवड करतांना अवघड मार्ग स्वीकारला असतां उन्नति झपाट्यानें होते."

"स्वकर्म कळत असतांही धैर्याच्या किल्याला भीतीच्या धरणीकंपाचे जोरदार धक्के बसून तो ढासळतो त्याला उपाय काय?"

"धैर्य न सोडतां, सत्पक्षाला मगरमिठी मारून आत्मोन्नति करून घेणें हाच त्याला उपाय! मात्र सत्य जाणण्याची इच्छा पाहिजे; म्हणजे तें आपोआप कळतें. आसपास नजर देऊन जर पाहिलें, तर सर्व जगभर-स्त्रिया आणि पुरुष-आपापल्यापरी आत्मोन्नतीकरितां धडपडत आहेत असेंच दिसेल. असें असतां, अधैर्याच्या कंबरपट्याला जर आपण भीतीची तलवार लटकाविली, तर त्या स्त्री-पुरुषांत आपली गणना करितां येईल काय? ज्यांना स्वकर्तव्य कळलें आहे, परंतु साह्य नाहीं, अशांना आपणांसारख्या ज्ञात्यांनीं साह्य करायला नको काय? ज्याची स्वकर्तव्यांत उन्नति झाली तो सर्व जगभर प्रकाशमान होतो. आपल्या स्वदेशबांधवांना-एक धर्मीयांना-फसवून गोत्यांत घालण्याचें आपलें काम नसून, त्यांना मदत करण्याचें आहे. आज तुम्ही परकीय राजसत्तेची बंदीजनाप्रमाणें हात जोडून नोकरी बजावीत आहांत म्हणून तुम्ही स्वतःला आपण सुखी आहोंत-आनंदांत आहोंत-असें समजत आहांत, ऐहिक सुखाचा पूर्ण उपभोग घेत आहांत, स्वतःची काया परकीयांपुढें द्रव्याशेनें उघडी करीत आहांत, परंतु ह्या स्वार्थसाधुत्वाचें प्रायश्चित्त तुमच्या पुढच्या पिढीला दुःख हेंच आहे. तुम्हीं आपलें स्वत्त्व आणि आपला स्वाभिमान सोडल्यामुळें तुमच्या पिढीपुरतें तुम्हीं जरी सुख भोगिलें तरी त्या सुखाच्या बरकरणी आनंदाच्या वृक्षाला जीं कडू फळें येत आहेत तीं तुमच्या पुढच्या पिढीला चाखण्याकरतां न कळत तुमच्या हातून परिपक्व होत चाललीं आहेत तीं नीट डोळे उघडून पाहा आणि अजून तरी ऐक्यानें स्वराज्याचा उपभोग घेण्यास परकीय अमलाशीं झुंजायला तयार व्हा! आपलें सुख घटकाभर बाजूला ठेवा. आपला देश,

या अडचणींत सांपडला आहे ती त्याची अडचण दूर करा, आपण सर्व एकच आहोंत ही भावना दृढ धरा आणि या विधर्मी परकी अमलाचें जूं बाजूला फेंकून द्यायला तयार व्हा!"

"आपल्या बोलण्याचा सर्व भाव माझ्या लक्षांत आला, पण त्याचा कांहीं-एक उपयोग नाहीं. आपल्या एकंदर राजकीय धोरणाची जी कीर्ति दिल्लीपती-पर्यंत जाऊन पोंचली आहे ती मी आजपर्यंत ऐकतच होतों; परंतु अश कीर्तीचा—जाड्या विद्वानालाही त्याच्या संस्कृत विचारांना मागें टाकणारें आपलें मुद्देसूद भाषण करणारा वक्तृत्वपूर्ण पुरुष—प्रत्यक्ष बघायाला सांपडला हेंही माझें सुदैव समजतों. आपल्या वक्तृत्वपूर्ण भाषणावरून आपल्या विद्वत्तेची तारीफ करावी तेवढी थोडीच होणार आहे. मला आपल्या विद्वत्तेबद्दल पूर्ण आनंद होत आहे; पण हें सर्व व्यर्थ आहे. कारण, ज्याचें अन्न आजपर्यंत खाऊन हा देह वाढविला त्याच्याशीं आपणांप्रमाणें मीही दगा करणें ही गोष्ट परमेश्वराच्या घरीं मोठ्या घोर अपराधाची चूक अशी गणली जाणार आहे."

"एखादा बलाढ्य चोर, आमच्या घरावर दरोडा मारून, आमचें तें आपलेंच असें म्हणून, त्यांतले दोन घांस, आम्हांला आमच्याकडून गुलामा-सारखी सेवा घेण्याच्या उद्देशानें जर देऊं लागला तर ती त्याची लबाडीची व स्वार्थाची मेहेरबानी नाकारून आम्ही जर आमचें गेलेलें सर्वस्व परत मिळवूं लागलों, तर परमेश्वराच्या घरीं आम्ही कोणच्या न्यायानें दोषाला पात्र होऊं तें सांगाल काय? अशा कामांत तुमच्या दुबळ्या मनानें चुकी होत असेल तर ती बेलाशक होऊं द्या. त्याबद्दलचा इश्वरी कोप भोगायला हा **शिवाजी** तयार आहे. पण स्वकर्मपराङ्मुख होऊं नका. त्यानेंच तुम्हांला शांततेच्या घरांत आनंदानें सुख प्राप्त होणार आहे. परकीयांच्या राजवाड्यांतल्या प्रधा-नकीपेक्षां स्वातंत्र्यांतल्या झोंपडीचा धनीपणा बरा."

"तसें होण्याला उपाय काय?"

"ऐक्याची वृद्धि आणि स्वकर्मजागृति!"

"अपार समुद्रगर्जनेशीं शेंकडों नद्यांच्या खळखळाटाचें काय चालणार?"

"शेंकडों नद्यांचीं मुखें एकत्र होऊन तीं जर महासागरावर चाल करून जातील, तर त्याला खात्रीनें कित्येक योजनें मागें हटावें लागून नद्यांच्या

मधुर पाण्याला स्वच्छंदाचें स्वातंत्र्याचें साम्राज्य करूं द्यावें लागेल. गंगा, सिंधु, ब्रह्मपुत्रा, नर्मदा, गोदावरी, कृष्णा वगैरे नद्यांपैकीं, स्वतंत्रपणें प्रत्येकाची प्रत्यक्ष प्रमाणें ध्यानांत आणा म्हणजे झालें!"

"आपलें म्हणणें वास्तविक आहे. बोला तर मग, मीं आपल्याकरतां काय केलें असतां आपलें बोलणें यथार्थ होईल?"

"ज्या धर्मांत आपण जन्मालां येऊन जें ब्रह्मकुल आपण शोभविलें आहे त्या दोहोंच्या उन्नतीकरितां आमरणान्त आपला देह स्वराज्यप्राप्तीकरितां झिजविण्याची शपथ घ्या आणि ती पुरी करा म्हणजे झालें या तुमच्या जन्मभूमातेंचें कार्य! त्यांतच तुमचा धर्माभिमान आणि देशवात्सल्य प्रगट होणार असून आर्यपुत्राचा जन्म सफल होणार आहे आणि तुमच्या ह्या कष्टाचें स्वराज्यरूपी अमृतफळ तुमच्या पुढच्या पिढीला चाखायला मिळणार आहे. आपणांला नरकांतून तरून नेणारी जी आपली पुत्ररूपी आपल्या पुढची पिढी तिच्या पुढें आपण जर परदास्यांतले कोरडे तुकडे चघळायला ठेवले तर ती आपली पुत्रवत् पिढी नरकयातनांतून सुटका करण्याकरितां आपल्या धर्माप्रमाणें कशी तयार होईल?"

"ठीक आहे. आपलें म्हणणें मला पटलें. माझ्या डोळ्यांवरचीं भ्रांतिपटलें खऱ्या कळकळीच्या वक्तृत्ववातानें पार फाटून गेलीं. ह्या जगदंबेचीच शपथ वाहून सांगतों कीं, जा **अफ्जुल्खान** पूर्ण कपटानें तुम्हांला पकडून नेण्याकरतां लोखंडाचा मजबूत पिंजरा बरोबर घेऊन आला आहे, त्याला अचानक आपल्या स्वाधीन करून देतों. मग पुढें तुमचें तुम्ही पाहून घ्या. हें घ्या वचन!" हातावर हात देत देत **गोपीनाथपंत** म्हणाले, "आतां यापुढें मात्र काम खतल होईपर्यंत आपल्याला पूर्णपणें माझ्या सल्यानें वागलें पाहिजे."

"कबूल आहे. 'आपल्या गोटांत यायला **शिवाजी** भितो. आपला सेनासागर पाहून तो अगदीं घाबरून गेला आहे. तो आपली मुलाखत घेण्याला तयार आहे, पण ती आपल्या गोटांत येऊन घ्यायला तो भितो. म्हणून तो प्रतापगडावर मोठ्या नम्रतेनें आपली भेट घ्यायला तयार आहे. ज्या विजापूरच्या तख्ताकरितां राजे **शहाजी** अहोरात्र खटपट करीत असून त्यांनीं

आपला प्रत्यक्ष वडील मुलगा ज्या राज्याकरितां बळी दिला त्या राजसत्तेला नामशेष करण्याचा त्याचा बिलकुल इरादा नसून ज्या सत्तेची जोपासना करून ती वाढवण्याचे श्रम त्याच्या तीर्थरूपानीं केले ती सत्ता जिवंत रहावी अशीच त्याची इच्छा आहे आणि म्हणूनच तो आपण सांगाल तसें विजापूरच्या तख्ताशीं समेट करायला अगदीं उत्सुक झाला आहे.' असल्या तऱ्हेच्या भाषणानें तुम्ही त्याला भुरळ पाडून आमची पूर्ण नम्रता तुम्ही त्याच्या मनांत भरवा आणि तो रडतोंडीच्या घाटानें प्रतापगडावर येण्याची मसलत करा म्हणजे पुढें आम्ही सर्व व्यवस्थित करूं."

"ठरला बेत! घेतों आतां आपली रुक्सत!"

"**निळोपंत**, आपल्या नव्या झालेल्या या मित्राचें योग्य स्वागत करा. यांचा परामर्ष घेऊन यांना वस्त्रेंभूषणें द्या आणि बंदोबस्तानें-समारंभानें-यांच्या छावणींत पोंचते करण्याची तजवीज करा."

**निळोपंतानीं** वकील **गोपीनाथपंतांना शिवाज्ञे**प्रमाणें वस्त्रेंभूषणें देऊन मोठ्या समारंभानें त्यांच्या छावणींत पोंचतें करण्याकरतां बरोबर घेऊन निघून गेल्यावर **बाळाजीपंत** चिटणीस म्हणाले, "योजलेल्या महत्कार्या-पैकीं अर्धे तर उरकलें."

"पण आतां जें कार्य करायचें राहिलें आहे" **शिवाजी** बोलूं लागला, "तें झालें याच्या किती तरी पट अधिक अवघड आहे! स्वानुभवापुढें पुस्तकी विद्या जशी कुचकामाची तसेंच हें आहे. कृमी झालेल्या माणसाला दूध आणि साखर हीं जशीं अहितकारक तद्वतच धैर्य खचूं पाहणाऱ्या माझ्या हृदयाला माझें मन यावेळीं झालें आहे. डोळ्यांपुढें सर्व शून्य दिसत आहे. त्या **अफ्रु-जुल्**च्या अफाट सेनासागरापुढें माझ्या मूठभर लंगोट्यांचा कसा निभाव लागणार? मी दुसऱ्याला धैर्य देणारा, पण माझीच सध्यां कशी अवस्था झाली आहे ती पाहा."

"महाराज, प्रसंगाला पाठ दिलीच पाहिजे. 'सत्पक्ष नेहमींचाच विजयी असतो' असें जें आपण नेहमीं म्हणतां, त्याला हरताळ कसा लागेल! सध्यां दक्षिणेचा वारा जोरदार वाहात असल्यामुळें आम्हां मराठ्यांच्या नुसत्या विजयी आणि एकीच्या फूत्कारानेंच हे परकीय सत्ताधारी लांडगे गुदमरून

जाऊन थंड पहाडांचा त्यांना आश्रय करावा लागणार आहे. असें असतां, आमचीं हत्यारें आमच्या हातांत असतां तीं काय करणार नाहींत ? आपणच असा धीर सोडला तर आम्हीं आपल्या सेवकांनीं काय करावें ? आपल्याच प्रतापरवीनें आम्हांला छाया प्राप्त झाली आहे. मूळचे आम्ही अंधारच ! "

" बाळाजी, ह्यावेळेला जर समर्थदर्शन होईल, तर खचित युक्तीच्या उपदेशाचा चंद्रप्रकाश राजमार्गावर पडून आपल्याला शीतळ प्रकाशांत फार घोर कर्म सुलभपणानें उरकतां येणार आहे. ह्या प्रसंगाला आपण मुंगीप्रमाणें चिरडून टाकूं. "

" महाराज, समर्थ आपल्या स्वाधीन थोडेच आहेत. आज नगरांत तर उद्यां रानांत, अशी त्यांची स्थिति. त्यांना कोठें म्हणून शोधावें ! आलेला प्रसंग सर्वांच्या मसलतीनें पार पाडलाच पाहिजे. "

" कांहीं असो. समर्थांचें दर्शन झाल्याशिवाय कोणचेंच काम कर्तव्य नाहीं. ह्या प्रसंगांत प्राण जावो अथवा राहो. दर्शन झालें नाहीं तर कांहींच कर्तव्य नाहीं. "

ज्यांनीं स्वपादोकांत गंध उगाळून शिवराजाला देण्यास कल्याण-स्वामीला सांगितलें आणि त्या गंधाची गोळी ज्या स्वराज्यसंस्थापक शिव-राजाचें कंठभूषण बनली त्या राज्यसंस्थापक शिवराजाच्या गुरूचें म्हणजे अर्थात् जें मराठ्यांचें राष्ट्र निर्माण होऊन ज्या राष्ट्राचें शिरोभूषण भगव्या रंगानें सर्व जगापुढें फडकूं लागलें त्या राष्ट्राचे जे गुरु श्रीसमर्थ रामदास राष्ट्रगुरु म्हणून इतिहासानें ज्यांचा निःपक्षपातीपणानें स्वीकार केला त्या समर्थ राष्ट्रगुरु रामदास स्वामींचें वर्णन कोणचें तोंड अथवा कोणची लेखणी करण्यास समर्थ आहे ! गुरूपदेशाच्या वेळीं समर्थांनीं सांगितल्या-प्रमाणें ती गोळी असलेल्या ताइताला शिवराजांनीं आपल्या कंठांतून काढून त्याची मानसिक पूजा केली व त्याला ऊद दाखवून ते डोळे मिटून हात जोडून वीरासनावर उत्कंठित अंतःकरणानें बसले असतां तेथें एकदम ' जय-जय रघुवीर समर्थ ' असा शब्द झाला व श्रीसमर्थ रामदास प्रगट झाले. "

" सिंह भीतीनें व्याकूळ झालेला कधीं ऐकलें आहे काय ! तो आपला धर्म विसरून जाऊन भलतीच गोष्ट कशी करील ? राजमार्गानें गेलें असतां हानि होण्याची मुळींच भीति नाहीं, हें तत्त्व लक्षांत ठेवून क्षत्रिय जर आपल्या धर्मानें वागला तर त्याची हानि कधींच होणार नाहीं. युद्धासारखीं कृत्यें म्हणजे क्षत्रियाच्या मनोरंजक गोष्टी. असें असतां, बाळ **शिवबा,** आज हें तूं काय आरंभलें आहेस ? चल, उठ. मन निर्दोष कर आणि युद्धाला तयार हो. प्राप्त झालेलें हें ह्या **अबदुल्याशीं** युद्ध म्हणजे तुझ्या भाग्योदयाच्या बालरवीचा उदय आहे. हें युद्ध म्हणजे तुझें पूर्व सुकृत फळलें असून तुझ्या धैर्यानें निदान तुला प्राप्त झालें आहे. अरे, याला युद्ध कोणीं म्हणावें ! हा मूर्तिमंत स्वर्गच संग्रामरूपानें अवतरला आहे. हा संग्राम म्हणजे तुझ्या गुणांचा लौकिक ऐकून तुझ्यावर अतिशय आसक्त झाल्यामुळें कीर्तिरूप स्त्री फिदा होऊन तुला वरण्याला आली आहे. क्षत्रियानें पुष्कळ पुण्य केल्याशिवाय असा युद्धप्रसंग प्राप्त होत नसतो. ज्याप्रमाणें एखाद्याला मार्गानें जातांना इच्छित फल देणारा चिंतामणि सांपडावा किंवा जांभईनें तोंड पसरल्यावर त्यांत अकस्मात् अमृत पडावें त्याप्रमाणें हा युद्धप्रसंग तुला, **शिवबा,** प्राप्त झाला आहे. ह्या युद्धानें पृथ्वीवर स्वर्गसुखाच्या दरवाज्यांत डोकावण्याची तुला संधि आली आहे. प्रत्यक्ष प्रतापमूर्ति उदयाला येत आहे. कीर्ति प्रेमानें वेडी होऊन तुला माळ घालण्याला तयार झाली आहे. तुझ्या तोंडांत अवचित् पडणारें हें युद्धरूप अमृत विष म्हणून थुंकून टाकूं नकोस. सध्यांचा युद्धप्रसंग म्हणजे सर्व जगाकडून तुझी वाहवा होण्याचा सुप्रसंग आहे. पतिविरहित स्त्री ज्याप्रमाणें सर्वांच्या उपहासास पात्र होते त्याप्रमाणें स्वधर्मत्याग करणाराची अवस्था होते. क्षत्रियाला महत्पुण्याशिवाय युद्धाचा प्रसंग येत नसतो. भयानें व्याकुळ होऊन तूं जर हें युद्ध करणार नाहींस, तर अनंत पापें तुला शोधीत येऊन रणांगणांत पडलेल्या प्रेतांचे लचके तोडणाऱ्या गिधाडांप्रमाणें तीं तुझी स्थिति करतील. लाभहानि, जयापजय, सुखदुःख—हीं सर्व समान मानून, महत्कार्याकरितां खबरदारीनें युद्ध कर. विजयी झालास, तर देशोदेशींचे थोर योद्धे—इतिहास—तुझे भाट बनतील! पराजित झालास तर अत्यानंदाचें स्वर्गसौख्य मिळेल ! "

" महाराज, मी युद्धाला मुळींच भीत नाहीं. प्रसंग अत्यंत बिकट अस-

त्यांमुळें आपल्या बुद्धिवादानें तो खतल करावा अशी खरी इच्छा होती आणि म्हणूनच चरणदर्शनाची इच्छा धरून बसलों होतों. **समर्थांनीं** ती पूर्ण केली."

"**शिवबा,** तुम्ही राज्यकारभार करतां! त्यांत कोणे समयीं कसा प्रसंग येईल याचा नेम नाहीं; आणि तुमचा नेम तर हा असा आहे. तेव्हां तो चालणार कसा? प्रसंग येईल तशी मसलत करून काम करीत जावें!"

"महाराज, दौलतीचा तो विषय काय? **समर्थांच्या** आज्ञेवांचून पाऊल टाकणार नाहीं."

"**शिवबा,** धन्य आहेस तूं! या काळचा तूं केवळ जनकराजाच आहेस! परमार्थदृष्टीनें जर बघितलें, तर आम्ही सतत तुमच्यापाशींच आहोंत, असेंच तुम्हांला आढळेल. ही गोष्ट लौकिक दृष्टीनें मात्र कळण्यासारखी नाहीं. एवढ्या-करितां कार्य प्राप्त होईल तेव्हां श्रीकुलस्वामिनीला विनंति करून आज्ञा होईल तसें करीत जा!"

"देवी तर प्रत्यक्ष नाहीं, तेव्हां विनंति कोठें करावी? आणि आज्ञा होणार कशी?"

"राजा, पुन्हां हा लौकिक दृष्टीचाच प्रकार आला. तूं मूर्तिमंत शिव आहेस! तुला जास्त सांगणें नको. या बाबतींत इतकेंच करीत जा कीं, शुचिर्भूत होऊन तूं तुझ्या अष्टवर्गांतला एक लिहिणारा व एक प्रश्न करणारा असे त्रिवर्ग तुम्ही एकत्र व एकांतीं बसून कार्याच्या उद्देशाचे प्रश्न, प्रश्न करणारा-कडून करवून तुमच्या अंगांत संचरणारी **जगदंबा भवानी माता** जें तुमच्या तोंडून वदवील तें लिहिणारानें लिहून घ्यावें आणि नंतर तीच आमची आज्ञा अशी खात्री बाळगून वर्तन करावें. सांप्रतच्या संकटाचा शेवट **श्री** खात्रीनें चांगला करील; कारण तुमचा कीर्तिदुंदुभि प्रलयकालपर्यंत दुमदुमत राहील अशीं सध्यांच्यापेक्षांही मोठीं अशीं अनेक अचाटकर्में तुमच्या हातून अद्यापि व्हायचीं असून मराठ्यांच्या स्वराज्यसिंहासनाची स्थापना तुमच्या हातून करविण्याची **श्रींची** इच्छाही पुरी व्हायची आहे. मातोश्रींच्या पायांवर मस्तक ठेवून श्रीजगदंबेचें अर्चन करा आणि **जिवा म्हाल्याला अफजु-ल्याच्या** भेटीच्या प्रसंगीं सन्निध ठेवा. त्याची धूर्तता कोणच्या प्रसंगीं उप-योगीं पडेल त्याचा नेम नाहीं. **तुक्या भिवाजीला** रडतोंडीच्या घाटांत पांचशें

मावळ्यांसह छपवून ठेवून, **श्रीच्या** आज्ञेप्रमाणें कार्य शेवटास नेऊन विजयी व्हा ! तुमचें **श्री** कल्याण करील ! तिचेच तुम्ही अंशभूत आहांत, तेव्हां,–"

शेवटचे **समर्थांचे** शब्द अर्धवट ऐकूं आल्यावर पुढें एकदम सर्वत्र शांतरस उदित झाला व **समर्थ** दिसेनासे झाले. **शिवाजी** वगैरे मंडळींची दृष्टी आणि कान **समर्थांची** मूर्ति आणि त्यांचें भाषण अवलोकन करण्यांत व ऐकण्यांत एकाग्रतेनें तल्लीत झालीं असल्यामुळें **समर्थ** केव्हां निघून गेले हें तेथल्यांपैकीं कोणालाच समजलें नाहीं. कांहीं वेळानें सर्व मंडळी स्वप्नांतून जागृदवस्थेंत आल्याप्रमाणें होऊन सलक्ष्य अवलोकन करूं लागली, तो काय ? **समर्थ** कोठेंच दिसेनात. तेव्हां **शिवाजी** बोलूं लागला.

" काय, **समर्थ** अदृश्य झाले ? केवढा हा या ताईताचा दिव्य प्रभाव ! अहाहा ! काय ही शुभकारक वेळ ! **समर्थांच्या** भाषणाच्या विद्युच्छक्तीनें माझें मन किती सुविचारवश करून टाकलें आहे हें ! ह्या **अफजलल्याला** या प्रतापगडावर 'जशासतसें' या न्यायानें गारद केला कीं, **विजापुरच्या** तख्ताची मेघडंबरीच ढांसळल्यासारखें होणार आहे. मग आम्हां **मराठ्यांच्या** विजयी खड्गाला **विजापुरच्या** बादशाहीचें रोपटें जगतें कीं मरतें अशा स्थितींत ठेवायला वेळ तो किती लागणार ! दिल्लीपति **शहाजहानला** आमच्या पत्रानें दिलेल्या हुलकावणीनें आमच्या तीर्थरूपांची तर सुटका झालीच. आतां प्रथम या **आर्यमातेला विजापुरच्या** तख्तांतलें बरेंचसें रक्त खताप्रमाणें नजराणा म्हणून अर्पण केल्यावर परमेश्वर जर आयुष्यासह सर्व तऱ्हेची मदत देईल, तर **युधिष्ठिराच्या** पवित्र सिंहासनाला स्पर्श करून आमच्या देशमातेच्या वैभवी वक्षस्थळावरचा पदर दूर करून तिचें वस्त्र हरण करण्यास पुढें सरसावलेले हे परकीय सत्तेचे हात छाटून टाकायला दौड करून गेल्याशिवाय हा **शिवाजी** कधींच राहणार नाहीं. " श्लोक.

**" जया मुक्तिची वासना पूर्ण आहे ।**
**तयाची गुरूचे पदीं वृत्ति राहे ॥**
**लयें लक्षितां तें स्वरूपीं सरावें ।**
**स्वयें ज्योतिपूर्ण प्रकाशें स्वभावें ॥**

**जयजय रघुवीर समर्थ ! "**

अशा तऱ्हेचा बोधपूर्ण मंजुळ श्लोक दोहोऱ्याच्या चालीवर शांत वातावरणांत बराच वेळ आंदोलत होता व शेवटीं पुढील कार्याच्या प्रोत्साहनाची त्यानें आपली छाप **शिवरायावर** बसवून तो शब्द शब्दब्रह्मांत मिसळून गेला.

वरीलप्रमाणें आत्मगत विचार करीत करीत **शिवराज** शिलेखान्यांत गेले व तेथें हत्यारेंपात्यारें कोणचीं घ्यायचीं त्यांची व्यवस्था सांगून **शिवराजांनीं** जामदारखान्याचा रस्ता धरला. तेथें ते गेल्यावर त्यांनीं जामदाराकडून पोषाख काढवला व **जिवा म्हाल्याकडून** तो अंगावर चढवला. शिलेखान्यांतून तेथें आणविलेलीं—शिरस्त्राण, बख्तर वगैरे प्रथम अंगावर चढवून नंतर मस्तकावरील जिरेटोपावर मंदील बांधला. कमरेला जरीबादली पेटी बांधली. अंगांत घातलेल्या बख्तरावर त्यानीं झगा चढविला. अमोल असे जडावाचे स्वर्ग धारण करून करवंदाएवढ्या शुक्रवर्णाच्या मोत्यांच्या कुडक्या कानांत घातल्या. उंची भरजरी चादर अंगावर घेऊन पायांत भरजरी चोळणा चढवला व त्यावर कमरेला काचा कसला. यावेळीं त्यानीं पृथ्वीमोलाचा मोत्यांचा तुरा जो स्वशिरीं धारण केला तो कोठला होता हें वाचकांना स्मरत असेलच. **समर्थांनीं शिवरायाला** गुरूपदेश केला त्यावेळीं **कल्याणस्वामींना** आपल्यामार्फत **श्रींस** विनंति करवून **श्रींच्याकडून** जो मोगऱ्याच्या कळ्यांचा स्वशिरींचा तुरा **श्रींनीं** प्रसाद म्हणून **शिवराजास** अर्पण केला होता तोच तुरा परमेश्वरी कौतुकानें मोत्यांचा बनलेला होता. तोच तुरा या वेळीं विजयप्राप्त्यर्थ **शिवराजानीं** आज स्वशिरीं धारण केला होता. कमरेला त्यानीं आपली **तुळजा** नांवाची फिरंग बांधून डाव्या हातांत वाघनखें धारण केलीं. ती त्यांची भवानी तरवार सजलजलधरांतील विद्युल्लतेप्रमाणें चमकून नेत्र दिपवीत होती. तीव्र अशी विषदिग्ध कट्यार कमरपट्ट्यांत अडकवून डाव्या हाताच्या मुठींत वाघनखें धरलीं होतीं. अशा तऱ्हेचा तो **शहाजीसिंहाचा शिव** नांवाचा छावा मिशा पिळून क्रोधमत्ततेनें **अफजुल्खानास** भेटण्यास जाण्याकरितां तयारी करून निघाला व प्रथम श्रीजगदंबेच्या देवळांत आला. तेथें त्यानें जगदंबेपुढें मोठ्या नम्रपणानें गुडघे टेंकून पुढीलप्रमाणें देवीची प्रार्थना केली.

**" श्री अंबे [ मजला ] कृपा करुनियां निर्दाळिजे अफ़्जला।**
**आला हा कपटी तयासि चपळें दावी प्रभेची लिळा ॥**

**माझा हा अभिमान [ आइ ] तुजला श्रीरेणुके स्वामिणी ।**
**शीवाजी नृप भोंसल्यास वर दे प्रत्यक्ष चिंतामणी ॥ "**

**शिवाजीनें** अशी प्रार्थना केल्यावर जगदंबेच्या पायांवर मस्तक ठेवलें तेव्हां मोठा चमत्कार झाला. जगदंबेनें मस्तकावरील फुलें कौलप्रसाद म्हणून **शिवराजाला** दिलीं आणि तितक्यांतच **शिवरायाच्या** अंगीं संचार करून त्याच्याकडून " जा, त्या कपटी पामराचें मस्तक तोडून आणून मला अर्पण कर. मी तुझ्यावर संतुष्ट झालें आहें. तुझी पाठीराखी मी आहें " असें वदविलें. तें ऐकून तेथील सर्व लोकांत प्रसन्नता उत्पन्न होऊन शत्रुनिर्दालनार्थ रण-भैरवाचें वारें त्यांच्या अंगांत शिरलें. **शिवराज** पूर्वस्थितीवर येऊन पुन्हां त्यांनीं अंबेच्या पदकमलीं लोटांगण घातलें आणि नंतर मातोश्रींच्या चरण-दर्शनार्थ ते निघाले.

सभामंडपांत यावेळीं पुराणिकबोवानीं श्री सरस्वतीची प्रार्थना—

**या कुंदेन्दुतुषारहारधवला या श्वेतवस्त्रावृता ।**
**या वीणावरदंडमंडितकरा या श्वेतपद्मासना ॥**
**या ब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्गायंति यं सामगाः ।**

वगैरे कवित्वांत म्हणण्यास सुरुवात केली होती. सरस्वतीची प्रार्थना संपवून पुराणिकबोवा भीष्मपर्वाच्या आख्यानाला जों सुरुवात करणार तोंच तेथें **शिवराज** आपल्या भृत्यवर्गासह आले आणि प्रथम देवघरांतील शंभुमहा-देवाच्या पायां पडून त्यांनीं पुराणिकबोवांना नमन केलें आणि नंतर मातोश्री **जिजाबाई**साहेबांच्या चरणकमलांवर मस्तक ठेवून आशीर्वाद मागितला. **जिजाबाई**साहेबांनीं पुढीलप्रमाणें आशीर्वाद दिला.

" शिवबा, जा ! विजयी हो. तो हीनमति **अफ्जल** कपटानें तुला पकडून नेण्यासाठीं आला आहे. त्याचा युक्तीनें शिरच्छेद कर. खरोखर त्याला मृत्यूनेंच प्रत्यक्ष बोलावणें धाडलें म्हणून तो आपल्या बायकांचे शिर-च्छेद करून निराशेच्या त्वेषानें जिवावर उदार होऊन आलेला आहे. तेव्हां अशा त्या शत्रूला बकरा म्हणून दाणीला दे. दुःशासनाचा कंठनाळ फोडून रक्त-प्राशनाची लालसा धरणारा तूं **प्रतिभीमच** या वेळीं मला दिसतो आहेस. तुझी लीला अगाध आहे. माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे. श्रीअंबेच्या बरानें तूं

त्या यवनकरीचें गंडस्थल फोडून त्याला पार धुळीला मिळवून टाक आणि आपला यशोदुंदुभि त्रैलोक्यांत गर्जत ठेव. **कुंतीचे** जसे **भीम, अर्जुन** तसाच तूं माझा पुत्र **भोंसल्यांच्या** कुळांत आर्यवीरशिखामणि आहेस. मोठ्या त्वरेनें व सावधपणानें त्या **अफ्जलाचें** डोकें कापून आपल्या राज्याची वृद्धि कर आणि मला **कुंतीच्या** पंक्तीला बशीव. **भीमानें कीचकाला** ठार मारून जसा कीर्तिध्वज उभारला तसेंच कौतुक तुझ्या हातून होणार आहे. **अफ्जुल्याला** मारून त्याच्या रक्ताचा टिळा तूं आपल्या मस्तकावर लाव."

असा आशीर्वाद ग्रहण करून **शिवाजीनें** आपल्या मातोश्रीला म्हटलें, "आई, अंबेच्या प्रसादानें **अफ्जुल्खानाला** ठार मारून विजयश्री संपादीन तरच तुमच्या पोटीं जन्म झाल्याचें साफल्य मानीन. आई, तुमच्या आशीर्वादानें त्या दुष्ट शत्रूला दंडीन तरच तुमचा पुत्र मी खरा होईन."

"**शिवबा,**" **जिजाबाई** बोलल्या, "जा, आतां त्वरेनें जाऊन त्या **अफ्जल**महिषाला देवी भवानीकरतां बळी दे. त्याला जिवंत सोडशील तर माझीच तुला शपथ आहे. त्या महिषाला रणांत दाणीला देऊन त्याचें डोकें कापून आण. माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे."

**शिवराज** तेथून आपल्या भृत्यवर्गासह मातोश्रींचा आशीर्वाद घेऊन निघाले व पुराणिकबोवानीं पुराणकथनास सुरुवात केली.



# प्रकरण अकरावें.

'जिवा होता म्हणूनच शिवा वांचला.'

श्लोक

" नव्हे चेटकू चाळकू द्रव्यभोंदू ।
नव्हे निंदकू मत्सरू भक्तिमंदू ॥
नव्हे उन्मतू वेसनीं संगबाधू ।
जनीं ज्ञानि जो तोचि साधू अगाधू ॥ "



समर्थांनीं हें जें वरील श्लोकांत वर्णन केलें आहे तें किती खरें यथार्थ आहे ! पुरुष बुद्धियोगाला प्राप्त झाला असतां, त्याला कर्मबंधनाची मुळींच बाधा होत नाहीं. अंगांत कवच घातलें असतां शस्त्रबाधा जशी होत नाहीं तद्वतच हें आहे. पंचाक्षरी जसा भूतबाधेपासून बाधा पावत नाहीं त्याचप्रमाणें कर्मफलाच्या ठिकाणीं आसक्ति न ठेवतां निरभिमानबुद्धीनें कर्म करण्याची सद्बुद्धि ज्याला प्राप्त झाली आहे त्याला जन्ममरणाची उपाधि होत नाहीं. ज्या बुद्धीला पापपुण्याची बाधा होत नाहीं, ती अतिशय सूक्ष्म असून निश्चल आहे आणि सत्व, रज व तम हे तिन्ही गुण जिच्यांत प्रवेश करूं शकत नाहींत अशी जी बुद्धि ती पूर्वपुण्याईनें थोडीशी जरी एखाद्यास प्राप्त झाली तरी ती सर्व संसारभयाचा विध्वंस करते. दिव्याची ज्योत लहान असूनही ज्याप्रमाणें तिचा प्रकाश मोठा पडतो त्याप्रमाणें सद्बुद्धि अल्प जरी असली, तरी तिला लहान समजूं नये. अशी ही सद्बुद्धि प्राणिमात्राला फार दुर्लभ आहे. जे ज्ञानी आहेत तेच मात्र हिची इच्छा करतात. परिसासारखे इतर दगड जसे अनेक नाहींत किंवा लेशमात्र अमृत प्राप्त व्हायला जसा दैवयोगच लागतो त्याप्रमाणें जिचें पर्यवसान ईश्वरप्राप्तींतच होतें अशी जी सद्बुद्धि ती खरोखर दुर्लभ आहे. गंगेचें पर्यवसान जसें समुद्रांत तसें बुद्धीचें भगवंतांत.

अशा बुद्धीशिवाय ज्या बुद्धि त्या दुर्बुद्धि होत. त्यांच्या ठिकाणीं विकार उत्पन्न होतात व त्यांच्याच ठायीं अविचारी लोक नेहमीं रममाण होतात. अशांनाच नेहमीं संसार, नरकवास किंवा स्वर्ग "हीं प्राप्त होतात. परंतु आत्मसुख म्हणून जें कांहीं आहे तें मात्र त्यांच्या कधींच दृष्टीस पडत नाहीं.

असे पुष्कळ लोक आहेत कीं ते स्वतः त्या ज्ञानी म्हणवून वेदाच्या आधारानें भाषण करून कर्मयोगाचें श्रेष्ठत्व स्थापन करतात, पण त्या कर्माच्या फळावर आसक्ति ठेवतात. ते असें प्रतिपादन करण्याचा प्रयत्न करतात कीं, वारंवार मृत्युलोकीं जन्म घेऊन यज्ञादिक कर्में आचरावीं व आल्हादकारक असें स्वर्गसुख भोगावें; कारण स्वर्गसुखावांचून निरंतर सुख देणारें असें दुसरें सुखच नाहीं. जे विषयोपभोगांविषयीं नेहमीं तत्पर राहून, स्वर्ग प्राप्त व्हाव हाच फक्त ज्यांचा अंतिम हेतु असे पुरुष जन्म व कर्म हीं फळें देणाऱ्या व जिच्यांत अनेक कर्में कथन केलीं आहत अशा वेदवाणीच्या आधारानें भोग व ऐश्वर्य यांच्याच फक्त प्राप्तिकरतां आचरण करतात, ते केवळ उपभोगाच्या ठिकाणीं लक्ष देऊन सकामकर्में करितात व अनेक प्रकारचीं अनुष्ठानें विधियुक्त करून तीं शेवटास नेण्यासाठीं फार दक्षतेनें धर्माचरण करतात हें खरें, पण ते एक गोष्ट मात्र वाईट आचरतात. ती कोणची ? तर, मंत्रांमध्यें स्वर्गेच्छा धारण करून यज्ञभोक्त्या परमेश्वराला मात्र साफ विसरतात. असे हे लोक फलप्राप्तीच्या हेतूनें प्राप्त झालेला धर्माचा अमृतकुंभ लाथाडतात. वेदांत सत्व, रज व तम या तीन गुणांचें प्रतिपादन केलेलें आहे, म्हणूनच प्रत्येकानें गुणातीत होण्याचें व्रत पाळलें पाहिजे, ' मी व माझें ' हें द्वंद्व टाकून दिलें पाहिजे आणि नित्य शुद्ध सत्वगुणानें स्थिर झालें पाहिजे. प्रत्येकानें योगक्षेमाची काळजी न करतां आत्मस्वरूपीं चित्त ठेवण्यांतच खरें हित आहे. उपनिषदांची गणना सत्वगुणांत करण्याचें कारण हेंच आहे. ज्यामध्यें कर्म व उपासना इत्यादिकांचें निरूपण केलेलें असतें तें सर्व रज व तम यांनींच भरलेलें असतें व म्हणूनच तें सुखदुःखांचें कारण असतें. या गुणत्रयाची त्रिपुटी टाकून अहंमन्यता दूर झुगारून देऊन जे आत्मसुखाचा विसर पडूं देत नाहींत व सर्वत्र अद्वैतदृष्टीनें अवलोकन करतात तेच धन्य होत.

ज्या ठिकाणीं मन आणि बुद्धि किंवा क्रिया व ज्ञान यांचें ऐक्य असतें त्याच ठिकाणीं चित्ताची समता राहाते व तेंच योगाचें सार असतें; परंतु असा हा ज्ञात्यांनीं उत्तम ठरविलेला कर्मयोग मुद्दाम लाथाडून जे द्वैतांत शिरतात ते महामूढच होत. अशांतलाच प्रकार वैदिक धर्मानुयायांत फरकानें दृष्टीला पडतो आणि त्याचमुळें द्वैताचें साम्राज्य होऊं पाहातें. आर्यवैदिक धर्मापासून जीं अनेक मतें व अनेक पंथ निर्माण झाले आहेत त्यांतलें गुह्य हेंच आहे. खरा अधिकारी जें काय सांगून गेला त्याचें प्रतिबिंब मनावर पूर्णपणें उमटलें असतांही त्या मनांतून स्वार्थसाधुत्वाची असदिच्छा नष्ट झाली नसल्या-कारणानेंच स्वमतानुसार जगद्गुरूच्या उपदेशाचा अर्थ प्रतिपादन करून काळ, वेळ न ओळखतां मी म्हणतों तेंच खरें ह्या हट्टवादाच्या मार्गे लागून आपसांत दुफळी करण्याचें श्रेय घेणारे अनेक धर्मपंथ आमच्या धर्मांत निर्माण होऊन आमचें खरें सौख्य आम्ही दूर लोटतों याचेंच प्रत्यक्ष प्रमाण आमच्यांत उत्पन्न झालेले निरनिराळे संप्रदाय हे होत.

आम्ही एकेश्वरवादी असतां, आमच्यांत बुद्धादि जे चार्वाक वगैरे पंथ निर्माण झाले त्यांचें खंडण करून श्रीजगद्गुरु **शंकराचार्यांनीं** आमच्यांत जें ऐक्य निर्माण केलें व पंचायतनाची पूजा निर्माण केली त्यांतलें खरें ऐक्याचें रहस्य रसातळाला जाऊन आमच्या भिन्न पंथांनीं पुन्हां आमच्यांत द्वैत उत्पन्न केलें. शैव, शाक्त, वैष्णव, गाणपत्य व सौर असे जे आमच्यांत भिन्न पंथ--मूळ अर्थाला सोडून अनर्थकारक--उत्पन्न झाले त्याचेंच उदाहरण पूर्णपणें पण थोडक्यांत ह्या प्रकरणांत—पावसाच्या लहानशा सरीप्रमाणें दाखवून—त्याचें पर्यवसान कसें होतें तें योग्यस्थलीं दाखविण्यांत येईलच. वरील पांच पंथ हे पंचमहाभूतात्मक देवतांच्या पंचायतनाच्या पूजेंतल्या पांच देवतांपासूनच उत्पन्न झाले असून, **श्रीमच्छंकराचार्यांनीं** ज्या पायावर ती पंचायतनाची पूजा प्रस्थापित केली तिचा मात्र विपर्यास कसा झाला व त्याचीं फळें कशीं द्वैत-भावाचीं दृष्टीस पडतात हें सध्यांची स्थिति अवलोकन करणाराला किंवा **शिव**कालीन इतिहास जाणणारांना सांगायला हवें असें नाहीं. **माध्व** म्हणतात आमचेंच म्हणणें खरें! **शैव** म्हणतात शंकराशिवाय काहींच नाहीं. **शाक्त** तर शक्तिशिवाय काय आहे म्हणून प्रतिपादतात. गणानां पति तोच एक खरा

गणपती व म्हणून त्याचीच पूजा करावी असें गाणपत्य म्हणतात व सूर्याशिवाय प्रत्यक्ष कांहींच नाहीं म्हणून सूर्य हेंच खरें दैवत असें सौर म्हणतात; परंतु निर्गुणासंबंधाचा शंकराचार्यांचा बोध कोणीच लक्ष्यांत न घेतां द्वैत समंदाला बगलेशीं मारून आपसांत वितंडवाद घालतात आणि प्रत्यक्ष परमेश्वराचीच परीक्षा घ्यायला निघतात. यानेंच स्वहित बिघडलें. आपापले सांप्रदाय अगदीं निष्कलंक आहेत असें प्रत्येक पंथ मानतो, परंतु आपल्या सांप्रदायांत काय काय दोष असतील त्याची कोणीच चवकशी करीत नाहीं. जो तो आपणाला खरा साधु असें समजतो; पण साधु या शब्दोच्चारापलीकडे त्याला त्या शब्दांतलें रहस्य समजलेलें नसल्यामुळें किंवा तें समजावून घेण्याइतकी त्यांची बुद्धि निष्कलंक नसल्यामुळें त्याचें ढोंग व कोती बुद्धि यांचें प्रदर्शन मात्र होतें. अशांपैकींच एका माध्वसांप्रदायी त्रिवेंकटाचार्यनामक शिष्याची कशी फजीती समर्थांसारख्या खऱ्या थोराच्या स्वच्छ प्रकाशांत जगाच्या दृष्टीस पडली हें पुढील कथाभागावरून स्पष्ट होणार आहे.

सध्यांची वेळ म्हणजे अफ्झुलखानासारख्या प्रचंड शत्रूशीं तोंड देण्याची होती. शिवाजीराजे ती भेट कशी व कोठें घ्यावी याबद्दलची पूर्ण व्यवस्था करून आपल्या सैनिकांची योग्य तयारी करण्यांत गुंतले होते. सैनिक शिवाज्ञेप्रमाणें आचरण करण्यास रडतोंडीच्या घाटांत इकडे तिकडे वावरत होते व अशा त्या प्रसंगीं माध्वगुरुशिष्य त्रिवेंकटाचार्य समर्थांच्या साधुत्वाची परीक्षा बघायला दुष्ट बुद्धीनें परळीस जाण्याकरितां त्याच रडतोंडीच्या घाटांतून प्रवास करीत होता. प्रातःकाळचा समय असल्याकारणानें शालिग्रामार्चन केल्याशिवाय पुढचा मार्ग आक्रमण करणें त्याला इष्ट वाटलें नाहीं म्हणून त्यानें आपली पडशी वगैरे खांद्यावरून उतरून ठेवून तो विचारमग्न झाला होता.

“ आमचे गारु मध्वाचार्य अवरनम्मल्लि इळुत्ता. ते रामदास पुरुक्षा बघावा. त्ये इमी बंधेत्रु. हे रडतोंडीचे घाट संध्यावदन योग्य. निर्झर झारो. ध्ये स्थालींच संध्यावंदन माड बेको. चोरु करावे भक्षण करावे. स्नान करावें. मार्तंड आकाश मध्यान्हके आयतु. भोजन बेको. परळी जाग्रते रामदास परुक्षा करावा. प्रथम चोरु अग्निके इट्टुविडु. स्नान बेको. ”

विचार करीत करीत त्रिवेंकटाचार्यांनीं आपली पडशी एका कपारीच्या

आडोशाला ठेवून तीवर एक धोंडा दडपण ठेवण्याच्या आधीं त्यांनीं स्वतःला हवें असलेलें सर्व सामान तिच्यांतून काढून घेतलें होतें. ते आतां पलीकडच्या झऱ्यावर स्नानाकरितां जाण्यास सिद्ध झाले. स्नानाला जाण्यापूर्वी त्यांनीं रान-शेण्या गोळा करून चकमकीनें विस्तव तयार केला व त्यावर भात शिजण्यासाठीं तांदूळ धुऊन भांडें चढविलें व ते झऱ्यावर स्नानाला गेले. त्यांनीं आपल्या वहिवाटीप्रमाणें स्नान करून सोंवळ्याकरितां म्हणून प्रवासांतला ' अंडपंचा ' ओला करून परिधान केला व अंगावर गोपीचंदनाचे चित्रविचित्र पट्टे ओढून डोक्याला सखलादीची टोपी घातली. हातांत गोमुखी घेऊन जपाची स्मरणी ओढण्यास त्यांनीं आरंभ केला, तोंच त्या बाजूला **तुक्या भिवाजी** कांहीं सशस्त्र मावळ्यांसह आला व तो हाताखालील मावळ्यांस उद्देशून पुढील-प्रमाणें बोलू लागला:—

" कार मर्दान्हो, म्हाराजांची आज्ञा समाजली का न्हाय ? आमच्या मावळं गड्यांच्या संभरा संभरांच्या तीन टोळ्यांच्या बारा तुकड्या करूनशान मागती त्येंच्या साठ केल्याती. अन् त्या सम्द्यांना परतापगडाच्या खडकामंदीं छपून बसाया सांगितलं हाये. आपुन्बी तिक्तंच मावळं गडी हाउत. ह्या रडतोंडीच्या घाटामंदी आपनालाबी तसच करूनशान् हथ राखन कराची हाये. परतापगडाच्या पायथ्याप त्या मुसलमान सरदाराची आन् अपल्या म्हाराजांची भ्याट झाली म्हजी योक जंगी त्वाफ उडनार हये. त्वाफ उडाली म्हजी पायथ्याप छपून बसलेल शूर मर्द मावळं गडी योकदम त्या शत्रूच्या सैन्याप छापा मारनार अन् त्येंच्यां-तून शिल्लक न्हाऊन जे हक्डं दौडत येनार त्येंच्याप आपुन चौबाजूंनीं हल्ला करून त्या सम्द्यांसनी गारद करनार ! "

" अन् ह्ये मर्द मंग म्हाराजापून बक्षिशी मिळवणार ! " सर्व मावळे एकदम एका आवाजांत ओरडून बोलले.

" खुशीनं म्हाराज ती तुमास्नी येनार ! " **तुक्या भिवाजी** आनंदो-त्कर्षानें बोलला.

" अन् मंग आम्ही सम्दं खूस व्हनार ! " सर्व मावळे हृदयसरोवरांतील आनंदवीचींत पोहत पोहत हर्षानें बोलले.

"अन् त्येनं म्हाराजांचा पर्ताप वाढनार!" तुक्या भिवाजी बोलूं लागला, "अर पन् त्ये कोन हैर त्या पल्याडल्या झन्याप!" नीट न्याहाळून पाहून तुक्या बोलला, "काय इचिभन हक्क मायंदळ भुंजीचा वक्त आलाया अन् त्यो पगा सक्लादीची टोपी डोईला घालून सकलादीच्या पिश-वींत हात अडकावून, डोळं ताठ उघडून सवास्त बसलाया. अँ! अर पन् त्येनं आपल्या कपाळाप एक्शअकरावानी उभ्या तीन रेघांचं गंध कुठल्या मुल्काचं लावलयान्? अर त्ये पगा हा हा हा हा हा हा हा! अर, योकूदम् त्यो घाबरलान् काय! त्यो पगा त्येचा त्यो त्या कपारींतला भात कुत्रं खात बसलं हये म्हून त्यो पगा कसा हनहन दौडत येत हाये. चला, आपुन्बी आपल्या कामाप आतां हथून ईरश्रीनं दौडत जाऊं या!"

तुक्या भिवाजीसह मावळे मंडळी मोठ्या आनंदानें व बाक्षिसाच्या ईर्षेनें आपल्या कामाला तेथून निघून गेल्यावर त्रिवेंकटाचार्य मोठ्या उदासीनतेच्या आणि दिलगिरीच्या मुद्रेनें तेथें आला आणि आदळआपट करून दैवाला शिव्या देऊं लागला. कानडी वैष्णव जात्याच मोठे संतापी आणि कठोरहृदयाचे असे दुष्ट असतात. त्यांच्या पंथांतला मुख्य धर्म हाच नेहमीं दृष्टोत्पत्तीस येतो कीं, त्यांनीं जर जगताची चेष्टा, हेवा, निंदा करून आपण महान पवित्र असल्याचें डंभ माजविलें नाहीं तर जणूं काय त्यांचा महाविष्णु त्यांच्या डोक्यांत गदाच मारील. असले हे वीरवैष्णव किती भोळे व सरळ अंतःकर-णाचे धर्मिष्ठ असतात याबद्दल त्यांच्या बारीक गळ्याच्या तीर्थगंडयाच साक्ष देतील! त्यांच्या तीर्थगंड्या इतक्या अकुंचित मातेच्या असतात, कीं त्यांच्या पोटांत सांचलेलें शेवाळ दाभणालाही आंत शिरून स्वच्छ करितां येणें शक्य नस-ल्यामुळें त्यांतील तीर्थाला घाण येऊं नये म्हणून त्यांत सुवासाचीं द्रव्यें घालावीं लागतात, इतके ते स्वच्छ असतात. असो. त्रिवेंकटाचार्यानें शिजत ठेव-लेल्या भाताला कुत्रें शिवल्याचें दुरून पाहतांच तो मोठ्या लगबगीनें आपल्या अंडपंच्याचा कांसोटा सांवरीत तेथें कुत्र्यास दंड करण्याकरितां डाव्या हातांत दगड घेऊन जो आला तों कुत्रें पळूनही गेलें. त्यामुळें त्याचा संताप फारच वाढला. उजवा हात गोमुखींत आहे याचें स्मरण न राहून तो जो त्यानें वर जोरानें संतापानें उचलला तों त्या हातांतील गोमुखींतल्या माळेच्या कंढारण्याचा

ठोसा ठासकन् त्याच्या ओठांवर बसला व त्यांतून रक्त निघूं लागलें. यामुळें तर तो ब्राह्मण फारच संतापला. पण करतो काय ? तेथें दुसरें जर कोणी असतें तर त्याला स्वतःच्या चुकीनें उत्पन्न झालेला संताप त्याच्यावर पाखडतां आला असता व उपाशीच राहावें लागलें असतें; परंतु खैर झाली, कीं, तेथें त्याला दिसेल असें कुत्र्याशिवाय दुसरें कोणी नव्हतें व त्याचमुळें त्या झगझगीत सोंवळ्याच्या वीरवैष्णवाला कुत्र्याच्या विटाळाचा भात स्वस्थपणें खातां येऊन परळीचा रस्ता धरतां आला. त्याचा संताप जरा कमी झाल्यावर तो आपल्या मनाशींच पण जरा संतापाच्या आवाजानें बोलूं लागला.

" चोरु ठेवले स्नान केले. संध्यावंदन कुत्कोंडु. श्वानपुत्र बन्नि चोरु मुट्टिदरु मडिमाड बेकु. धर्मभ्रष्ट आयतु. चोरु बिसाडबिडी. नूतन ठेवणें. तंडुल अक्कि इल्ला. बाजार दूर आगिते. द्रव्य इल्ला ! " चहूंकडे चौकसनजरेनें पाहिल्यावर, **त्रिंबकटाचार्य** आनंदानें स्वगत बोलला, " देव बघितले ' विष्णवे नमः विष्णवे नमः ' माड बेक्कु ! मनुज बघितले प्रायश्चित माड बेक्कु ! मनुज नोडलिल्ला प्रायचित्त होइत्तु ! देव बघितले विष्णुतीर्थके चोरु शुद्ध केले. चोरु भक्षण करावे परळीस जावें परक्षा माडबदुक्ये ! "

येणेंप्रमाणें विचार करीत असतां **त्रिंबकटाचार्य** मोठ्या आनंदानें तो कुत्र्याच्या विटाळानें अपवित्र झालेला भात विष्णुतीर्थानें शुद्ध करून खात बसला असतां, त्याचें चित्त एखाद्या क्रूर श्वापदाप्रमाणें आपलें भक्ष्य यथास्थित ढेंक । देऊन खाण्यामध्यें अगदीं गुंग होऊन गेलें होतें. त्याच्यापासून जवळ सुमारें एका हाकेच्या अंतरावर **तुक्या भिवाजी** आपल्या रणशूर मावळ्यांसह येऊन थडकलेला त्याच्या स्वप्नींही न येण्याचें कारण तो आधाशासारखा भातावर बका बका एकचित्तानें ताव मारीत बसला होता.

" म्हाराजानीं आज्ञा केल्या परमान, " **तुक्या भिवाजी** आपल्या हाताखालच्या रणधीर मावळ्यांना म्हणाला, " येथला तर चोख बंदोबस्त झालाया, पन् ह्ये व्हनार कसं ! सत्रु अपदुल्खान् म्हजी जनु माजल्येला हात्ती, अन् त्यच्या म्होरं आमचं म्हाराज म्हजी योकांदी मुरगी. त्येचं सैन्य म्हजी मायंदळ लांबलचाक दाट रान, अन् आमचं मावळं गडी म्हजी परसांत उगावलेली मायंदळ पालं भाजी. पन तीच जगदंब्येच्या किरपेनं अन् म्हाराजांच्या पुन्या-

ईनं त्या मायंदळ सवास्त पोसल्येल्या रानाला खच्ची करनार! योक लाकुड-तोड्या का योक दगुडफोड्या. हालकं हालकं सम्दं रान त्वाडून निजावतो नि डांगरचा डांगर फोडूनशान जमीनदोस्त करतो! तसंच आम्ही हाउत! आतां आपून सम्दं-" दूरवर पाहात पुन्हां बोलूं लागला, "अरं, पन् त्यो मघाचा बामण, त्येला वाटतंया किं आपल्याला कुनीबी पगितलं न्हाय, अन् म्हून गुमान भात खात बसलाया! का नशीब हाये इचि मन! आमच्याप आला म्हजी मागनं इटाळ व्हईल म्हून हा बोंब माराया का कमी करनार व्हय? कुलं शिवलं त्यो भात खाया या बाम्नाला इटाळ न्हाय, अन् ह्यासाठीं मरनाला तयार झालेल्या आम्हा मर्दांचा या बामनांना इटाळ व्हतो. खूप हाये येचं शास्तंर!"

ठरल्याप्रमाणें प्रतापगडावरील तोफेचा आवाज झाल्यावर तो ऐकून ते सर्व मावळे एकदम दचकले व "मारा, ठोका, तोडा, फाडा, हरहर महादेव!" अशा गर्जना करीत तेथून मोठ्या वीरश्रीनें दौडत गेले व त्यांच्या मागून **त्रिंबकटाचार्य** घाबरगुंडी होऊन कशाबसा तरी आपल्या पडशीसह कासोटा सांवरीत सांवरीत पारळीच्या मार्गाकडे पळून गेला. छपून बसलेल्या मावळ्यांच्या अचानक छाप्यानें गर्भगळित झालेले मुसलमान सैरावैरा धांवत असतां, मावळे वीर त्यांची लांडगेतोड करीत होते; इतक्यांत त्या ठिकाणीं सर्वांग रक्तानें माखलें असून हातातल्या वाघनखांतून यवनकरीच्या रुधिराचे ठिपके आर्यमातेला हलके हलके अभिषेक करीत आहेत अशी एक क्रोधोद्धत्त मूर्ति व तिच्या मागोमाग दुसरी एक सेवातत्पर व्यक्ति बऱ्याच मावळे वीरांसह त्या स्थळीं त्वेषानें आली. व्याघ्रनखधारी मूर्तीचा चेहेरा त्या वेळीं रणमदाच्या भैरवी कळेनें जरी आरक्त झाला होता तरी त्या आरक्ततेंत संतुष्टतेची पूर्ण झांक विलसत असून संतोषानंदही बऱ्याच आतुरतेनें डोकावत होता. अशी ती मूर्ति त्या ठिकाणीं **दुर्योधनाला** गदाप्रहार करून त्याचा ऊरुभंग करणाऱ्या विजयी **भीमसेना**प्रमाणें रौद्ररसाला आपली छाया बनविणारी अशी येत असतां, तिच्या मागोमाग जी व्यक्ति मोठ्या प्रफुल्लवदनानें आणि आढ्यतेच्या दिमाखानें येत होती ती भूषणकवीनें त्या प्रसंगावर रचलेलें पुढील कवित्त म्हणत येत होती.

कवित्त.

सिंध धरि जानै बिन जावली जंगल भटी हठी गज एदिल
पठाइ करि भटक्यो ।
भूषण भनत देखि भमरि भगानो सब हिंमति हिये मैं
धरि काहुवै न हटक्यो ॥
साहिके सिवाजी गाजी सरजा समथ्य महा मदगल
अफजलै पंजाब लपठक्यो ।
ताविगर है करि निकाम निजधाम कह आकुत महाउत
लै आकुस लै सटक्यो ॥ १४ ॥

प्रतापगडाच्या खालीं तळ देऊन बसलेल्या निरुत्साही यवनसेनेवर **तुक्या भिवाजी** वगैरेंनीं गडावरील तोफेचा आवाज ऐकून एकदम अचानक छापा घातला आणि त्यांची लांडगेतोड केली. **शिवराजांच्या** मस्तकावर **अफजुलखानानें** पडतां पडतां जो तरवारीचा वार केला त्याच्या जखमेंतून रक्ताचे थेंब गळताहेत व उजव्या हातांत त्या यवनमहिषाचें मस्तक आहे असे ते **शिवराज** पुन्हां **जिवा म्हाल्यादि** आपल्या भृत्यवर्गासह गडावर जगदंबेच्या देवळांत आले. **जिवाचें** कवित्त म्हणणें झाल्यावर **शिवाजीनें** तें शत्रूचें मस्तक जगदंबेला अर्पण करून पुढीलप्रमाणें तिची प्रार्थना केली.

" श्रीअंबे कुलदैवते विनवितों जोडूनि हस्तद्वया ।
शिवाजी सरजावरी निशिदिनीं आमोघ कीजे दया ॥
अफूजल्ला जननी तुझे ( च ) वरदें निर्नाम केला रणीं ।
दासाचा अभिमान पूर्ण धरणें तूं श्रेष्ठ चिंतामणी ॥ १ ॥
विजयातें वरिलें कृपा करुनियां श्रीअंबिके संकटीं ।
म्हैसा अफूजल दंडुनी निजकरें आलों तुझे नीकटीं ॥
शस्त्राची दिपिका धरोनि समरीं लोलो करूं कौतुकें ।
केला गोंधळ साजिराच जननी हें येश आलें निकें ॥ २ ॥
श्रीअंबे वरदे नृसिंह समरीं मी दास होऊनियां ।
अफूजलू दंडुनियां अरीच निकरें संपादिलें या जया ॥

**शीवाजी नरनायकासि जननी संरक्षणें संकटीं।**
**दासाचा आभिमान पूर्ण धरणें आहे तुझे नीकटीं ॥ ३ ॥**

**शिवराजानें** प्रसन्नचित्तानें देवीची प्रार्थना केली. **शिवराजांची मूर्ति** या वेळीं **दुःशासनाचा** कंठनाळ फोडणाऱ्या **भीमसेना**प्रमाणें सर्वांग रक्तानें भरलेली असून डाव्या हातांतील वाघनखांतून रक्ताचे थेंब ठिबकत व त्यांच्या मागोमाग **जिवा म्हाल्यादि** लोक हात जोडून उभे आहेत अशा भयंकर देखाव्यांत **जगदंबेच्या** मंडपांत उभी होती.

" वीरा, **जिवा म्हाल्या,** " रणमदानें, रणोत्साहानें आणि रणविजयानें संतप्त झालेली व्याघ्रनखधारी मूर्ति बोलली, " ह्या लोकीं तूं धन्य आहेस ! "

" महाराज, त्या **अफझुल्याची** केवडी शक्ति होती ? "

" कांहीं विचारूं नकोस ! परस्परांना भेटण्याकरतां जेव्हां आम्ही एकमेकांनीं हात पसरले, तेव्हां त्यानें कपटानें मला आपल्या काखेंत दाबला—

" त्यावेळीं कोंबडीविक्याच्या बगलेंत लटकणारे आपण दिसत होतां— "

" त्यानें मला बगलेंत दाबलें त्या वेळीं माझ्या डोळयांपुढें आंधेरी आली, पण तत्काळ तुझ्या समयसूचकतेच्या प्रकाशाचाच मला फार उपयोग झाला. "

" त्यावेळीं मीं जर सूचना केली नसती तर ह्या वेळीं आपण इथें असे आनंदानें बोलत उभेच राहिलों नसतों—"

" तुझें म्हणणें खरें आहे. तुझ्या सूचनेचा आवाज ऐकल्याबरोबर, हीं वाघनखें आपोआपच त्याच्या कोथळयांत विद्युद्गतीनें घुसलीं—"

" पण तितक्यांत त्यानें आपल्या मस्तकावर तरवारीचा एक जंगी वार केला—"

" पण शेवटीं कोथळा फुटून तोच ठार झाला—"

" आणि आपण विजयी झालां ! "

" ह्या आजच्या तुझ्या कामगिरीबद्दल तुला बक्षीस द्यावें तेवढें थोडें आहे. आजच्या ह्या तुझ्या कृत्याबद्दल मीं तुझे जितके आभार मानायला पाहिजेत त्यांच्या दुपटीची चौपट करून जरी ते मानले तरी ते पुरेसे होणार नाहींत ! "

" महाराज, या गोष्टींत आपण माझे अगणित आभार मानून मला आपण

जरी बक्षिसांच्या प्रचंड पर्वताखालीं दडपून टाकण्याचें मनांत आणलें, तरी ' जिवा होता म्हणून शिवा वांचला ' हे माझे शब्द त्या बक्षिसांच्या पर्वताचें शिखरच होऊन राहतील आणि इतिहासांत मोठया सुवर्णाक्षरांनीं लिहिले जातील यांत संशय नाहीं ! "

जिवा म्हाल्याचे हे अरेरावीचे शब्द श्रवणीं पडतांच ती भूमंडळावरील विजयी इंद्रमूर्ति आश्चर्यचकित झाली व गोंधळांत पडल्याप्रमाणें तिच्या प्रसन्न मुखश्रीवर मोठया चिंतेची छाया पसरली. इतक्यांत मोठे जोरदार असे पुढील शब्द त्या दोघांच्या कानांत आकाशवाणीप्रमाणें घुसले:—

" बहुतचि करितां हट्ट । तेथें येऊनि पडेल तट ॥
कोणा एकाचा शेवट । जाहला पाहिजे ॥

काय ? अठरापगड जातींत माजलेल्या स्वार्थसाधु द्वैताला लाथ मारून अद्वैताचें मराठी साम्राज्य आणि महाराष्ट्रधर्म यांची संस्थापना करणाऱ्या माझ्या गोब्राह्मणप्रतिपालक शिवबाला त्याचा नोकर हजाम-मशालजी-ऐन वेळीं भाषणांत कुंठित करून आडवितो काय ! बस्स्, ह्यावेळीं घातकी तटाचा विध्वंस अतांच्या अतांच झाला पाहिजे ! शिवबा, बघतोस काय ? ह्या हरामखोराला तोफेच्या तोंडीं बांधून अस्मानांत उडवा ! "

" बस्स, हेच शब्द खरे ! "

" हा निव्वळ अन्याय होतो आहे ! " जिवा बोलला.

वरील आकाशवाणीप्रमाणें जे शब्द झाले ते मोठे अधिकारयुक्त वाणीचे असून त्या काळीं इतक्या जबरदस्त अधिकारानें तोफेच्या तोंडीं देण्याची सजा फर्मावणारा शिवराजांपेक्षांही अधिक योग्यतेचा पुरुष समर्थांशिवाय कोण असणार ! ते शब्द समर्थांचेच होते. त्या शब्दांना ओळखून शिवाजीनें उत्तर दिलें व त्यावर जिवा म्हाल्यानें जेव्हां प्रत्युत्तर दिलें तेव्हां समर्थ त्या स्थळीं एकदम अवतीर्ण झाले. कर्णवधाच्यावेळीं भगवंतांचे मुखकमल जसें क्रोधसंतप्त दिसत असून, त्यानीं ज्याप्रमाणें अर्जुनाला उपदेश केला व कर्णाची निर्भर्त्सना केली तोच प्रसंग यावेळीं स्पष्टपणें दृग्गोचर होत होता. शिवराज समर्थांच्या पदकमलीं लीन होऊन प्रसन्नवदनानें एका बाजूला

उभे राहिले व **जिवा म्हाल्या** त्यांच्या चरणकमलीं विलीन होण्यास पुढें सरसावला मात्र, तोंच **समर्थ** एकदम ओरडून बोलले:-

"ऐरे बदमाष—एकदम मागें हो! आपल्या अकलेचे तारे कोणापुढें चमकावतोस? हरामखोरा, खाल्लया घराचे वासे मोजतोस? बढाईखोरा, मागले दिवस विसरून तालेवारीच्या गोष्टी आणि बढाईचीं उत्तरें कोणापुढें करतोस! थूः तुझ्या सेवाधर्मावर! अरे पागल, अशा तऱ्हेनें धन्याला आडवतोस? रौरवनरकांत जाशील! निमकहरामा, बेअकलीपणाच्या गर्वाशीं मैत्री करून महत्वाकांक्षेचा शिरपेच कोणापुढें चमकावतोस? **शिवाजी**राजासारख्या महान् समर्थ धन्यापुढें सेवकाच्या प्राणाचा प्रकाश सूर्यप्रकाशांतल्या दिवटीप्रमाणें असतो हें तुझ्या लक्षांत नाहीं? मूर्खा, मी होतों म्हणून प्रसंग पार पडला असें म्हणायला आजपर्यंत कोणाच्या अन्नावर वांचलास? सूर्याचें उसनें ऐश्वर्य धारण केलेला चंद्र, कधीं तरी प्रखर प्रकाश पाडतांना दृष्टीस पडला आहे काय? प्रकृति असेल तरच प्रत्ययाचा उपयोग, नाहींतर त्याला विचारतो कोण? आमचा **शिवराज** आहे म्हणूनच तुम्ही नोकर लोक आहांत. तुम्ही पाजी सेवक पोटासाठीं धन्याची सेवा करून ऐनप्रसंगीं सापासारखा महत्वाकांक्षेचा विषारी गरळ धन्यावर फेंकतां; पण समानदर्शी न्यायदेवता त्याचें जहर तुमच्याच देहांत पसरविते. धन्याच्या उमद्या स्वभावाचा फायदा घेणारे असले सेवक वेळींच जर कतल केले नाहींत तर आमावास्येच्या चंद्रसूर्यांच्या एकस्थळीं राहाण्याच्या आनंदाच्या दिवशीं, केतू जसा सूर्याला छळून अखेर पराजित होऊन दृष्टीआड होतो, तद्वतच हे धन्याला छळून अधोगतीला जातात. तिरंदाजानें सोडलेल्या इच्छित बाणाप्रमाणें धन्याची सेवा केल्यास त्यांत वाखाणण्याची ती काय जरूर? सच्चेपणाचा बुरखा घेतलेली लबाडी न्यायापुढें जशी नागवी होते, त्याचप्रमाणें न्यायाच्या पायावर उभारलेल्या महाराष्ट्रराज्याच्या इमारतींत फितवेखोर, आपमतलबी आणि '**जिवा** होता म्हणूनच **शिवा** वांचला' असे उद्गार काढणारे हलकट निमकहराम सेवक वेळींच छाटले नाहींत, तर राष्ट्राला फितवेंखोरीचा, दगलबाजीचा आणि लांचलुचपतीचा जबरदस्त रोग जडतो! **शिवबा**, बघतोस काय? या नीचाला देहान्तप्रायश्चित्त दे!"

" माझ्यासारख्या नीचाला, " जिवा म्हाल्या पश्चात्तापयुक्त स्वरानें हात जोडून बोलला, "देहान्तप्रायश्चित्ताची शिक्षा अगदीं योग्य आहे. माझ्या देहान्तानें महाराजांच्या इतर नोकरांना सेवाधर्माचा उत्तम धडा मिळणार आहे, हेंच मी माझें शेवटचें स्वामीकार्य समजतों. म्हणून सांगतों, माझे मित्र मावळे मर्दांनो, हा माझा धडा लक्षांत ठेवा. तुम्ही सेवक म्हणजे निव्वळ गारगोट्या आहांत. तुमच्या अधिकाऱ्यांच्या आज्ञेचा तडाखा तुमच्यावर बसल्याशिवाय वरचढपणानें तुम्ही आपलें गुप्त तेज कधीं प्रगट करूं नका. मी जातीचा न्हावी, महाराजांच्या यःकश्चित् मशालजीची नोकरी करणारा होतों. मीं आपल्या बढाईची दिवटी, महाराजांसारख्या दिनमणीच्या प्रकाशांत पाजळण्याचा प्रयत्न केला आणि त्याचमुळें या देहांतल्या पंचप्राणाची ज्योत आज मी आपल्या स्वतांच्या हातांनीं तुमच्या देखत विझवून घेत आहें. पण याबद्दल दुःखाऐवजीं मला आनंदच होतो आहे. आपल्या देशाच्या आणि धर्माच्या शत्रूचें पारिपत्य करण्याचा महाराजांचा धडा तुम्ही आज गिरवीत आहांत. त्याचप्रमाणें सेवाधर्माच्या धड्यांत चूक न होऊं देण्याकरितां माझ्या चारित्र्याची तसबीर सदोदित आपल्या डोळ्यांपुढें ठेवावी अशी माझी तुम्हां सर्वांना शेवटची विनंति आहे. माझ्या देशबांधवांना व स्वधर्मीयांना सेवाधर्माचा धडा देण्याकरतां मी आपला देह गमावीत आहें याबद्दल मला जी प्रौढी वाटते आहे त्याबद्दल स्वामी मला क्षमा करोत. मी तोफेच्या तोंडीं जाण्याला सिद्ध आहें. "

" तुक्या भिवाजी, चला याला इथून घेऊन ! " शिवाजीनें हुकूम केला, " हुकुमाप्रमाणें याला तोफेच्या तोंडीं बांधून अस्मानांत उडवा. तोफेला बत्ती देण्याच्या आधीं याला जर थोडेसें बोलायचें असेल, तर आमची परवानगी आहे. "

" हा स्वामीसेवादक्ष नोकर जिवा म्हाल्या मशालजी उभयतां स्वामींना दंडवत घालतो आहे याला आशीर्वाद असावा. "

" वीरा, " शिवराज म्हणाले, " पुढच्या जन्मींही ह्या शिक्षेची आठवण ठेव. "

" जा " समर्थ बोलले, " आपल्या धन्याच्या शब्दांचें चिंतन करीत जा. त्यांतच तुला मोक्ष मिळेल. "

जिवा म्हाल्याला शिवाज्ञेप्रमाणें तुक्या निवाजी तोफेच्या तोंडीं देण्याकरितां तेथून घेऊन गेला तेव्हां त्याच्या मागोमाग इतर सर्व मावळे तेथून निघून गेले, तेव्हां समर्थ शिवराजाला उपदेश करूं लागले.

" शिवबा, तुमचा एक अत्युत्तम सेवक आज दुनियेंतून नाहींसा होत आहे याबद्दल वाईट वाटणें साहजिक आहे; पण उपाय काय ? यजमानाच्या पश्चात् यजमानाच्या घोड्यावर आसन ठेवणारा किंवा देखत मिशी पिळणारा नोकर हें रस्त्यांतलें प्रेतावरचें पडलेलें अशुद्ध व अस्वच्छ असें नागवेलीचें पानच होय ! रक्तवृद्धीचे वगैरे सर्वोत्तम गुण जरी त्याच्या अंगीं असतात, तरी प्रेताच्या संगतीनें वेळपरत्वें ते गुण दूषित झालेले आहेत असें समजून इतर कोणीही तें सेवन करूं नये म्हणून त्याला ज्याप्रमाणें जागच्या जागीं टांचेनें चिरडून टाकावें लागतें, त्याचप्रमाणें या अशा नोकरांना माफी केली असतां वेळीं फितुरीच्या अगर अप्पलपोटेपणाच्या रोगाला प्रोत्साहन दिल्याचा दोष पदरीं येऊन ते रोग असाध्य होतात आणि शेवटीं सर्वस्वाचा नाश होतो.

" समर्थांच्या दासाचा दास सुद्धां म्हणवून घेण्याची माझी योग्यता नाहीं. आज जें कांहीं घडलें तें सर्व समर्थांच्याच कृपेनें घडलें आहे. "

" शिवबा, तूं धन्य आहेस ! आमच्या कृपेनें काय होणार ? तूं जन्म-जन्मांतरीं श्रीची सेवा बहुत केली आहेस. तूं खरा पुण्यार्थी आहेस. मागील जन्मीं तूं भागीरथीच्या सत्तावीस कावडी रामेश्वराला नेऊन अभिषेक केला आहेस. "

" समर्थांच्या म्हणण्याचा अर्थ समर्थांनाच कळणार ! वानरांच्या हातून लंका घेववली तशी माझ्या हातून सेवा घेत आहेत ! "

" राजा, आम्हांला तरी कृष्णातीरीं येण्याचें कारण मूळ तुम्हीच आहां. श्रीच्या संकल्पाप्रमाणें तुम्हांला तुळजा भवनीचा वरही आहे. तेव्हां आतां कशाचीही काळजी न धरतां व्यवहार करतां तसाच करावा. ज्या बुरुजापाशीं अब-दुल्याला चीत केला आहे तेथेंच त्याचें थडगें मोठ्या सन्मानानें तयार करवून

त्या बुरुजाला **अफ़ुजुल्** बुरुज असें नांव द्यावें. कारण आजची घडलेली गोष्ट ही इतिहासांत फार मोठ्या अक्षरांत 'जशास तसें' या सदरांत लिहिली जाणार असून प्रतापगडावरील तुमच्या प्रतापानें प्रतापगडाचें स्थलमाहात्म्यही चिरस्मरणीय असें झालें आहे."

"आज्ञेप्रमाणें करतों."

"ह्या **अबदुल्यानें** वाटेंत जेजूरीचा **खंडोबा**, पंढरपूरचा **विठोबा**, तुळजापुरची **भवानी** वगैरे जीं देवस्थानें भ्रष्ट केलीं आहेत त्यांची पुन्हां स्थापना करवा. त्या रोषावरून मुसलमानांच्या मशीदी मात्र उध्वस्त करण्याचें दुष्कृत्य करूं नका. कारण, ज्याचा धर्म त्याला स्वतःच्या हृदयाप्रमाणें प्यारा असतो. दुसऱ्याच्या धर्मांत आपण हात घातला असतां आपलाच धर्म समानदर्शी न्यायदेवतेच्या संमतीनें आपल्याला पदभ्रष्ट करतो. आमचा महाराष्ट्रधर्म आणि महाराष्ट्रराज्यसंस्थापक **शिवाजी**राजा परकीयांना देखील किती मान देत होता ह्याबद्दलच्या पुराव्यांत ही गोष्ट अधिष्ठानीं बसणार असून आपल्या राज्यांतल्या मशीदींना तुम्हीं चालू केलेलीं उत्पन्नें तुमच्या वैभववृक्षाला वाढण्याला राजमार्ग दाखविण्याकरितां, परमेश्वरस्वरूप अल्लाची बंदगी बजावीत बसलीं आहेत. असो, आतां तुम्हांला पुढची तयारी केली पाहिजे. **विजापुरीं** राहिलेला फक्त शिद्दीजोहार शिपाई तुमच्यावर चाल करून येण्याला थांबणार नाहीं. त्याचा फडशा मोठ्या युक्तीनें केल्यावर तुम्हांला **कर्नाटक** आणि **विजापूर** यांवर स्वाऱ्या करायच्या आहेत. **मिरजेच्या** मुसमान सुभेदाराप्रमाणें रस्त्यावरचे एकंदर अकरा सुभेदार **रामभक्त** करून सोडले आहेत. त्यांची तुम्हांला ससैन्य मदत होणार असून, **श्रीतुकाराम** महाराजांनीं तयार केलेले धर्माचे अभिमानी असे पंढरपूरचे हजारों शूर वारकरी शिपायी, तुम्हांला एकजुटीनें उपयोगी पडणार आहेत. आमचे कुबड्यावाले किरमिजी **रामदास** शत्रुच्या, राज्यांत धर्मजागृति आणि फितुरी करीत हिंडत असून, कोंकणांतल्याप्रमाणेंच त्यांनीं दक्षिणेंत भिक्षेवर जमविलेल्या धान्यांचीं कोठारें तुमच्या सैन्याला मदत करण्याची वाट पाहात आहेत. ह्या सर्व गोष्टींचें तुमच्या शेलक्या मराठी सैन्याला उत्तम साह्य होणार आहे. म्हणून स्वस्थ न बसतां पुढची व्यवस्था करा. कारण, इकडचें राजकारण उरकून तुम्हांला **दिल्लीपतीचाही**

समाचार घ्यावा लागणार आहे. तो सध्यां तुमच्या कर्तबगारीवर डोळ्यांत तेल घालून टपून बसला आहे. परमेश्वरावर भरंवसा ठेवा. त्याचा महिमा अगाध आहे. त्यानें अनंतकालाच्या अनंत उदरांत अनंत गोष्टींची अनंत तऱ्हेनें गुंतागुंत करून ठेवलेली आहे. त्याच्या महिमा कोणी वर्णावा ?

श्लोक.

जया चक्षुनें लक्षितां लक्षवेना ।
भवा भक्षितां रक्षितां रक्षवेना ॥
भयाभीत तो अक्षयीं मोक्षदाता ।
दयादक्ष तो साक्षिनें पक्ष घेता ॥ १ ॥

जयजय रघुवीर समर्थ !



# प्रकरण बारावें.

## पंढरीची अयोध्या.



जो कोणी प्राणी जें कांहीं निर्माण करतो त्या सृज्यवस्तूच्या उत्पत्तीकालीं निर्माणकर्ता प्राणी हा साक्षात् श्रीहरीचीच मूर्ति असतो. एखाद्या स्थावर अथवा जंगम प्राण्याचा जो वध करते तोही श्रीविष्णूचेंच संहार करणारें रौद्र स्वरूप होय. प्रत्येक वस्तु सिद्ध करण्याचें जें साधन त्याला कारण असें म्हणतात आणि जें वस्तु सिद्ध करण्याविषयीं आपलें मत असतें त्यास साध्य असें म्हणतात. ज्याला मोक्षाची इच्छा असेल त्या योग्याला आपलें अभीष्ट सिद्ध करण्याला प्राणायामादि योगांगें हें साधन व ज्या ठिकाणीं लीन झालें असतां संसारचक्रांत पुन्हां परत यावें लागत नाहीं तें परब्रह्म हेंच साध्य होय. साधनाच्या आश्रयानें होणारें व योगी लोकांच्या मुक्तीस कारणीभूत जें आत्मानात्मविवेकरूपी जीवज्ञान तोच ज्ञानस्वरूपी परब्रह्माचा पहिला भेद होय. क्लेशांतून मुक्त होण्यासाठीं योगाभ्यास करणाऱ्या योग्यांचें साध्य जे ब्रह्म व तद्विषयक जें ज्ञान तोच ज्ञानस्वरूपी परब्रह्माचा दुसरा अंश होय. ज्ञानाच्या विभागास कारणीभूत जो साध्यपणा आणि साधनपणा त्यांचा त्याग केल्यानें होणारें जें अखंड एकरूपी ज्ञान तोच त्या परब्रह्माचा तिसरा विभाग. या तिन्ही ज्ञानांतील जो विशेष, अर्थात् जीवपणा, केवळ ब्रह्मपणा व ऐक्य या ज्ञानांत जें कमीअधिक प्रमाणाचें ज्ञान होतें त्याचा त्याग केल्याच्या योगानें जो आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो, तद्रूपी क्रियाशून्य, अनिर्वचनीय, विभागरहित, दृष्टांतशून्य, स्वप्रकाश, सत्तारूपी, इतरांहून भिन्नता दर्शविणाऱ्या धर्मांनीं रहित, रागद्वेषादिविरहित, द्वैतरूपी भय नसणारें, अतर्क्य आणि आश्रयशून्य असें जें ज्ञान आहे तेंच ज्ञानमय असें **श्रीविष्णूचें** चवथें व मुख्य स्वरूप होय. अज्ञानाचा विरोध करून जे योगी त्या चवथ्या स्वरूपांतच लीन होतात त्यांना संसाररूपी शेताच्या

पेरणींत बीजपणा प्राप्त होत नाहीं. ह्याप्रमाणें निर्मल, नित्य, व्यापक, अविनाशी आणि सर्व प्रकारच्या भेदांनीं रहित असें हें विष्णुसंज्ञक परब्रह्माचें मूळ स्वरूप आहे. पापपुण्यादि क्लेशांचा नाश होऊन अत्यंत पवित्र झालेले योगीलोक ज्या ठिकाणीं गेल्यानंतर तेथून पुन्हां परत संसारांत येत नाहींत तें हेंच विष्णुरूप परब्रह्म होय. ह्या ब्रह्माचीं दोन रूपें आहेत. एक मूर्त व दुसरें अमूर्त. या द्वयीला क्षराक्षर असें म्हणतात. हीं दोन्हीं स्वरूपें सर्व प्राण्याच्याठायीं असतात. परब्रह्म हें अक्षर व सर्व जगत् हें क्षर होय. समीपपणामुळें व दूरपणामुळें अग्नीच्या प्रकाशांत जसा विपुलविपुलता व स्वल्पता हा भेद झालेला असतो त्याचप्रमाणें परमात्म्याच्या शक्तीमध्यें देवमनुष्यादि उत्कृष्ट आणि निकृष्ट भेद झालेले आहेत. परमात्म्यापासून पृथक् दृश्य स्वरूपानें प्रकट स्थितींत असणें व सूक्ष्म रूपानें त्याचे ठायीं विलीन होणें हेच जगताचे ठायीं असणारे जन्म आणि नाश हे दोन प्रकार होत.

याप्रमाणें सर्वप्रकारच्या शक्तींनीं युक्त असा जो भगवान परमात्मा श्रीविष्णु तोच योगीलोक योगाच्या आरंभीं ज्याचें ध्यान करतात व ज्याचे ठिकाणीं चित्त उत्कृष्टप्रकारें एकाग्र झालें असतां योगाभ्यास करणाऱ्या लोकांचा साकार स्वरूपाचा आश्रय करून असणारा संप्रज्ञान नांवाचा अत्यंत श्रेष्ठ प्रकारचा समाधि दृढ होतो तें परब्रह्माचें अत्यंत उत्कृष्ठ व मूर्त स्वरूप होय. तीच शक्ति सर्वश्रेष्ठ होय. मूर्तिमंत परब्रह्म तें तेंच. कार्य आणि कारण ह्या दोहोंचेंही स्वरूप धारण करणारा श्रीविष्णू हा आपलीं भूषणें व वस्त्रें यांचें स्वरूप ग्रहण करणारे पुरुष व प्रकृति या सर्वांसही धारण करतो. अशा अज्ञेय व सर्वशक्तिसंपन्न श्रीविष्णूला नमस्कार असो. तो जर सर्वव्यापी आहे तर अयोध्या काय, द्वारका काय किंवा पंढरी काय, सर्व एकच. ध्यानें मात्र निराळीं.

धर्माधर्मसत्वादि गुण, आणि रागद्वेषादि मल यां व्यतिरिक्त जो जगताचा आत्मा त्याला भगवान् श्रीविष्णु हा कौस्तुभरत्नाच्या रूपानें धारण करतो. प्रकृति ही श्रीवत्साचें स्वरूप धारण करून श्रीविष्णूचे ठायीं राहिली आहे व त्या माधवाचे हातीं बुद्धि ही गदेच्या रूपानें शोभते आहे. तो परमेश्वर शंखाच्या रूपानें असणाऱ्या भूतादिसंज्ञक तामस आणि शार्ङ्गनामक धनुष्याच्या रूपानें असणारा इंद्रियादि संज्ञक राजस या दोन्ही प्रकारच्या अहंकारास धारण

करतो. सामर्थ्यस्वरूपी आणि आपल्या वेगातिशयानें वायूसही मागें टाकणारें जें मन त्यास श्रीविष्णु हा आपल्या हातीं चक्ररूपानें धारण करतो. मौक्तिक, माणिक, इंद्रनील, पाच आणि हिरा अशा पांच रत्नांची श्रीविष्णूची वैजयंती माला आहे. ती पंचमहाभूतांना कारणभूत असणाऱ्या समुद्राची आणि पंच-महाभूतांची माला होय! श्रीविष्णूच्या हातीं असलेला बाण हा ज्ञानात्मक आणि कर्मात्मक इंद्रियांचें स्वरूप दाखवतो. श्रीविष्णूनें जे अत्युत्तम खड्ग धारण केलें आहे तें अविद्यारूपी म्यानामध्यें असणारें विद्यारूपी ज्ञानच होय. ह्याप्रमाणें बुद्धि, अहंकार, भूतें, मन आणि सर्व इंद्रियें, तसेंच विद्या आणि अविद्या हीं सर्व त्या विष्णूचाच आश्रय करून राहिलीं आहेत. तो स्वतः रूप-रहित असतांही प्राण्यांच्या कल्याणासाठीं मायिक स्वरूप धारण करून, हा श्रीहरी अस्त्रांच्या व भूषणांच्या आकाराचीं स्वरूपें धारण करणाऱ्या त्या सर्वां-सही धारण करतो. ह्या जगतीतलावर अथवा इतरत्रही कोठें जे म्हणून मूर्तिमंत अथवा निराकार पदार्थसमूह आहेत ते सर्व श्रीहरीचें शरीर होत. मी श्रीहरी आहें व हें सर्व जग श्रीविष्णु आहे. कार्य व कारणें यांचा समूह हाही त्या परमात्म्याहून भिन्न नाहीं, अशी ज्यांची बुद्धि झाली असते त्यांना पुनः-पुनः हे संसारजन्य शीतोष्णसुखदुःखरूपी रोग होत नाहींत. अशानांच सिद्ध साधू म्हणतात.

या वर्णन केलेल्या कोटींत बसण्यासारखे सतराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास जरी बरेच साधु या आर्यावर्तांत होते, तरी त्यांतल्यात्यांत **श्रीसमर्थ रामदास** आणि **श्रीतुकाराम महाराज** हे सर्वांच्या आदराला पात्र झालेले अग्रणी होते. दोघेही महा विरक्त आणि वैष्णव होते. दोघांचें दैवत जरी एक श्रीहरी हेंच होतें, तरी तें दैवत दोघांनीं दोन रूपांत म्हणजे **समर्थांनीं श्रीराम**रूपांत आणि **तुकारामबावांनीं विठ्ठल**रूपांत भजन करण्याचा पंथ–दो पंथ एक काज–या न्यायानें परिपाठांत जोरानें आणिला होता व त्याच श्रीहरिनाममहिम्याच्या जोरावर त्या दोघा साधूंनीं स्वधर्मजागृतीची चळवळ फारच जोरांत आणिली होती. या दोघा संतांनीं दोन प्रकारचे धार्मिक वीर रणमस्तीच्या आखाड्यांत शांततेच्या बुरख्यांत लढण्यास तयार केले होते. या वीरसंबंधानें आतां जें कांहीं थोडेंसें वर्णन या प्रकरणांत वाचायला सांपडणार

आहे, तो त्या दोघा साधूंच्या **स्वधर्म** आणि **स्वराज्य** यांच्या **उत्कर्षाचा** उत्कर्षच होय.

करवीर प्रांतांत सामनगड या नांवाचा एक किल्ला **शिवाजी** महाराज बांधीत होते. ते दिवस पावसाळ्याचे होते. आषाढ महिना म्हणजे भर पावसाळा, आणि अशा वेळीं किल्ला बांधण्याचें काम जारीनें चाललें होतें. अशा या पावसाळ्याच्या ऐन भरांत किल्ला बांधण्याचें काम जोरांत असण्याचें कारण, **विजापुरकरांना कर्नाटक** प्रांतांत पायबंद लावणें हें होतें. अशा प्रसंगीं **श्रीसमर्थ** आणि **शिवराज** हे त्या किल्ल्याची पाहाणी करण्याकरितां किल्ल्यावर गेले होते. **समर्थ** एका बाजूनें पाहाणी करीत हिंडत होते व **शिवाजी** महाराज दुसऱ्या बाजूच्या तटाची पाहणी करीत हिंडत होते. अशा प्रसंगीं तेथील हजारों कामदारांकडे छत्रपति **शिवराजांचें** लक्ष्य जाऊन ते मनांत आपल्याला ' हजारों माणसांचा मी पोशिंदा आहें ' अशा भावनेनें स्वतःला धन्य मानीत होते. हा प्रकार **समर्थांनीं** अंतर्ज्ञानानें ओळखला.

" **शिवबा**, " **समर्थ शिवाजीच्या** जवळ येऊन त्याला म्हणाले, " तूं किल्ल्याचा कारखाना कसा चालविलास तो पहावा अशी इच्छा झाली, म्हणून सज्जनगडावरून येथें आलों. एकंदर कारखाना पाहून परम आनंद झाला. "

" महाराज, " **शिवाजी** हात जोडून बोलूं लागला, " आज माझें मोठें भाग्य व या स्थळाचें दैव उदयाला आलें म्हणूनच कृपा करून येणें केलें ! "

" **शिवबा**, या स्थलीं **श्रीमारुती** आहेत आणि त्यांच्याच योगानें या स्थलाचें दैव उदित झालें आहे; परंतु तुम्ही लक्षावधि मनुष्यांचें पोषण करून कारखाना करवितां, तस्मात् तुम्हीही श्रीमंत आहां. "

" महाराज, हें सर्व आपल्या आशीर्वादाचें फळ आहे ! "

" बरें आहे ! "

याप्रमाणें बोलत बोलत कारखाना पहात चालले असतां, ते दोघे किल्ल्यावरून **श्रीमारुती** मंदिराकडे जाण्याचा जो रस्ता होता त्या रस्त्याचें काम चाललें होतें तेथें आले. त्या ठिकाणीं रस्त्याच्या मध्यभागीं एक मोठा दगड उभा होता. तो तसाच कायम ठेवून त्याच्या असमंताद्भागीं जागा नीट करून

रस्त्याचें काम चाललें आहे हें पाहून श्रीसमर्थ राजश्री शिवाजीमहाराज यांच्याशीं बोलूं लागले.

" शिवबा, हा दगड मध्यें तसाच ठेवून कारखाना चालविला आहेस, त्यामुळें डोंगर किती खोदला तें कळतें खरें. पण यांतलें दुसरें एक परमेश्वरी इंगित काय आहे व तुला येथला हाच दगड कायम ठेवण्याची वासना कां झाली तें तुला ठाऊक आहे काय ? "

" नाहीं ! " शिवाजी भांबावल्यासारखा होऊन मोठ्या लीनतेनें बोलला, " सर्व रस्ता तयार झाल्यावर तबलदारांना रोजमुरा काय द्यावयाचा तो या दगडाच्या मोजणीवरून देउन टाकल्यावर फोडून टाकायाचा मानस होता. पण आतां समर्थ काय बोलले त्यांतलें गुह्य काय आहे तें समर्थांशिवाय इतरांना काय समजणार ? मी असमर्थ आहें ! "

" बाबारे, हातासारखें जें काम होतें तें मागून मनाजोगें होत नाहीं. म्हणून तबलदार बोलावून अतांच ह्या दगडाचें माप घेऊन हा फोडून टाकवावा."

अशा प्रकारची आज्ञा होतांच शिवाजी महाराजानीं तत्क्षणीं तबलदाराला बोलावून आणवून तो दगड फोडायला लावलें. सुमारें अर्धा दगड फुटत आला त्यासमयीं समर्थ बोलले, " धोंड्याच्या मध्यभागीं घाव न घालतां सभोंवार सर्व फोढावा. " त्याप्रमाणें फोडून, मध्यभाग नारळाहून कांहीं मोठा असा वर्तुळाकार राहिला.

" तबलदार, " समर्थांनीं आज्ञा केली, " हा जो नारळासारखा वर्तुळाकार भाग आहे तो असा फोड कीं, याचे मोठ्या युक्तीनें दोन सारखे भाग होतील. "

तबलदारानें समर्थांज्ञा शिरसावंद्य मानून मोठ्या युक्तीनें त्या धोंड्याचे दोन सारखे भाग फोडून तयार केले. तों तेथें काय चमत्कार दृष्टीस पडला कीं, त्या धोंड्यांत उखळाप्रमाणें सुमारें तांब्याभर पाणी मावेल एवढा खळगा असून, त्यांत पाणी व त्या पाण्यांत एक बेडकी दृष्टीस पडली. हा चमत्कार तेथील सर्व मंडळीनीं पाहिला. सर्व आश्चर्यचकित झाले.

" शिवबा, " समर्थ खोंचून बोलले, " तूं परम योग्य, तुझी योग्यता फार मोठी. तुझी कृति फारच आश्चर्यकारक. या दगडांत खळगा करून, त्यांत

पाणी घालून बेडकीचें पोषण केलेंस. हें इतरांच्या हांतून व्हायचें आहे कीं काय ? "

**शिवाजीनें** हात जोडले व तो विनम्र होऊन म्हणाला, " महाराज, अशी गोष्ट माझ्याकडून कशी होईल ? "

" **शिवबा**, तुझ्याशिवाय कर्ता कोण आहे ? "

" असलें हें ईश्वरी कृत्य माझ्या हांतून कधींच घडणार नाहीं, असें असतां **समर्थ** असें बोलतात. तस्मात् माझ्या हांतून कांहीं तरी अपराध झाला असावा आणि त्याच्या पारिपत्याखातर हीं अक्षरें **समर्थ**मुखांतून निघालीं असलीं पाहिजेत. माझ्या हांतून झालेल्या अपराधाची क्षमा करणार **समर्थ** आहेत ! "

" बाप्पा **शिवबा**, तुजवांचून ह्या जिवाचें रक्षण व पोषण करणारा दुसरा कोण आहे ? "

**समर्थांचें** हें वाक्य ऐकतांच **शिवाजीनें समर्थ**चरणीं मस्तक ठेवून हात जोडले व सद्गदित कंठानें बाजूला उभें राहून म्हटलें, " माझ्यानें आतां कांहींच बोलवत नाहीं ! "

अशा तऱ्हेची कंठ सद्गदित झालेली **शिवाजीची** स्थिति अवलोकन करून **समर्थांस** करुणा आली व ते बोलले, " बाप्पा **शिवबा**, लक्षावधि मनुष्यांचें पालन तुम्ही करतां आणि या बेडकीचें पालन तुम्ही करीत नाहीं काय ? "

हें भाषण श्रवण करून **शिवाजीनें** मस्तक वांकवून बद्धांजलीनें विनंति केली, " मी अपराधी खरा. पारिपत्याला योग्य आहें. परंतु स्वामी समर्थ, दीनवत्सल, क्षमाशील आहेत, याकरितां माझ्या अपराधाची क्षमा करावी. "

" बाप्पा **शिवबा**, " **शिवाजीचें** भाषण ऐकून **समर्थ** बोलले, " तुम्ही सरकारचे आवडते सेवक. याकरितां इतरांना तुमच्या हांतून सरकार शेर देववितात हें वास्तविक असून तुमचे मनांत जो संकल्प आला तो योग्य नाहीं. याकरितां त्याची निवृत्ति व्हावी म्हणून, ताबडतोब तुमच्याकडे आलों. तुम्ही क्षमा मागतां ती तुम्हाला दिलीच पाहिजे. आतां दुसरें एक काम तुमच्याशीं आहे. तेवढें तुम्हांला सांगून आम्हांला दुसऱ्या एका महत्वाच्या कामासाठीं पंढरपुराला जायचें आहे. "

" महाराज, दोनप्रहरचा समय आहे. आकाश अगदीं भरून आलें आहे. लवकरच पाऊस कोसळणार असें दिसतें. तरी नैवेद्य करून जाणें होईल तर बरें."

" उत्तम आहे ! " **समर्थ** बोलले.

हे शब्द उच्चारून सर्व मंडळीसह **समर्थ मारुती**पाशीं आले. नंतर **समर्थांची** स्वारी नित्यकर्म स्नानसंध्यादि करण्यास गेली. तें झाल्यावर **समर्थांनीं** श्रीहनुमंताची पूजा केल्यावर **शिवाजी** वगैरे मंडळीसह नैवेद्य ग्रहण केलें व उपरांत **शिवाजीच्या** विनंतीवरून **समर्थ** किल्ल्यावरील माऱ्याच्या जागा पाहाण्यास गेले. **समर्थांनीं** किल्ल्याचें बारकाईनें निरीक्षण केल्यावर कमी-अधिक गोष्टींबद्दल त्यांनीं **शिवाजीस** सांगितलें. **समर्थ शिवाजीला** म्हणाले, " **शिवबा**, तुम्हीं पूर्वीं किल्ले वगैरे इमारती करविल्या आहेत, सांप्रत करवीत आहांत व पुढेंही करवालच; परंतु अशा कारखान्यास सामान कसें वापरावें व तें कसें असावें आणि कारखाना कसा चालवावा याबद्दल आम्हांला तुम्हांस दोन शब्द सांगायचे आहेत. बरें वाटल्यास त्याप्रमाणें करावें."

स्वामींनीं इतकें भाषण करून **शिवराजाला** इमारती-प्रकरणाचे दोन स्फुट समास सांगितले. ते समास सांगत असतां, आकाशांतले पावसाळ्याचे नैसर्गिक चमत्कार दृग्गोचर होऊं लागले.

एकदम वावटळ सुरू होऊन आकाशांत कृष्णवर्ण मेघांची गर्दी होऊं लागली. मत्त हत्ती जशा घोर अरण्यांत एकमेकांशीं टकरा घेतात त्याप्रमाणें काळेकुट्ट ढग एकमेकांवर धाऊन जाऊन आकाशांत धडका मारूं लागले. त्यांच्या धडकांच्या संघर्षपणानें उत्पन्न होणारे लखलखाट एकसारखे त्यांच्या शरिरावर क्षणोक्षणीं नाचत होते. मेघांच्या गडगडाटांशीं स्पर्धा करणारीं उल्हाट यंत्रें यावेळीं त्या गडाच्या तटावर तो मेघांचा गडगडाट ऐकत स्वस्थ बसलीं होतीं. इतक्यांत झंझावात सुरू होऊन मुसळधारेचा पाऊस पडण्यास सुरुवात झाली. डोंगरावरून जलधारांचे ओघ उताणखाटपणानें मोठ्यानें धो धो आवाज करीत भूप्रदेशाकडे उड्या घेऊं लागले. तो महिना आषाढाचा म्हणजे ऐन पावसाळ्याचा. मग पावसाच्या जोराला काय विचारावें ? पशुपक्षी तर तो पर्जन्याचा विलक्षण जोर पाहून जागच्याजागीं स्तंभित होऊन राहिले होते.

सर्वत्र जोरानें होणाऱ्या जलवृष्टींत आसमंताद्भागाचें सर्व रान जरी विलीन झालेलें दिसत होतें, तरी त्या स्वातंत्र्यांत वाढलेल्या जंगलाला पर्जन्याभिषेकाचें सिंचन मिळत होतें म्हणून त्या अरण्यांतील वृक्षांची पल्लवी वारंवार आनंदातिशयानें माना डोलवीत होती. वृक्ष जंगली खरे, परंतु त्यांच्या फुलांचा सुवास मोठा मधुर व चित्ताकर्षक होता. तो वास कृत्रिम उपवनांतल्या तरुलतांच्या फुलांचा हां हां म्हणतां गर्व हरण करणारा होता. परकीय सत्तेंतल्या व्यवस्थितपणानें—शरीराचे सांपळे बनण्यापेक्षां स्वातंत्र्यांतल्या अडमुठेपणाच्या स्वैर वर्तनांतला कणखरपणा बरा, हें तत्त्व त्या जंगली रानांत दाटून भरलेलें असावें असें त्या वेळचा तेथील तो देखावा बघणाऱ्या पशुपक्ष्यांसारख्या प्राण्यांना सुद्धां जर कौतुकास्पद वाटत होतें, तर स्वातंत्र्य ह्या शब्दाचा खरा अर्थ समजणाऱ्या मानवी प्राण्याला त्या देखाव्याचें स्वरूप पाहून आणि पारतंत्र्यांत विलीन होऊन वरकांती झकपक दिसणाऱ्या वस्तुस्थितीचें चित्र पाहून तो जगन्मोहन असा फरक वर्णन करतांना काय बरें वाटेल! असो. ती वेळ सायंकाळची होती. सुमारें पांच घटका पाऊस पडला होता. अशा त्या भरपावसांत समर्थ एकदम उठून उभे राहिले व **शिवाजीला** म्हणाले, “ **शिवबा,** उठ उठ! तुझा खरा भाग्योदय आज उजाडला आहे. चल माझ्या मागोमाग.” इतकें बोलून समर्थ भरधांव पळत सुटले व **शिवराज** त्यांच्या मागोमाग धांवत निघाले. दोघेही मोठ्या वेगानें धांवत धांवत जे निघाले ते किल्ला ओलांडून किल्ल्याच्या बाहेर पडले व डोंगर उतरण्याचा त्यांनीं झपाटा सुरू केला. दऱ्याखोरीं वगैरे पायरस्त्यानीं तशा त्या पावसाच्या मुसळधारेंत ओलांडतां ओलांडतां अखेरीस ती जोडी, डोंगराच्या पायथ्यापुढून द्रुतगतीनें धांवत जाणाऱ्या बाणगंगा नांवाच्या नदीच्या तीराला येऊन उभी राहिली. **समर्थांनीं शिवाजीला** पैलतीराकडे सलक्ष बघण्यास सांगितलें. तों काय, पैलतीरावरचा देखावा पाहून **शिवाजी** अगदीं मूढचित्त झालेला **समर्थांच्या** अवलोकनांत आला. तेव्हां **समर्थ** त्याला म्हणाले, “ **शिवाजी,** असा घाबरल्यासारखा कां दिसतोस? तुला समोरच्या नदीतीरावर काय दिसतें आहे?”

“महाराज, मी मूढ झालों आहें! आपल्या कृपाप्रभावानें काय काय चमत्कार दृष्टीस पडतील त्याचें कोणी वर्णन करावें! ही समोर दिसणारी

आनंदमग्नमूर्ति श्रीसाधुवर्य **तुकाराम** महाराजांची यावेळीं एथें कशी आली ? स्वानंदांत मग्न होऊन विठ्ठलनामसंकीर्तनांत दंग झालेली ही साधुमूर्ति अशा भरपावसांत इथें कां आली असावी हें **समर्थां**शिवाय कोण जाणूं शकेल ? "

" **शिवबा**, तुझ्याशीं कांहीं विशेष काम आहे म्हणून तुला मघाशीं जें सांगितलें त्यांतलें हेंच रहस्य आहे. आतां पुढें काय चमत्कार होतो तो पहा ! "

**समर्थ** इतकें **शिवाजीला** जो सांगताहेत तोंच समोरच्या तीरावर असलेल्या **तुकाराम**महाराजांनीं मोठयानें बोंब मारली व ती ऐकून **समर्थांनींही** मोठयानें बोंब ठोकली. **तुकाराम** महाराज बोंब मारून झपाट्यासरसे जंगलांत अदृश्य झाले व **शिवाजी** मूढचित्त होऊन तटस्थ उभा राहिला. त्या नदीकांठांवर घडलेल्या गोष्टीचा अन्वय त्याला लावितां येईना. तो गोंधळल्यासारखा झालेला पाहून **समर्थ** त्याला म्हणाले:—

" **शिवबा**, तूं असा गाढतमांत मग्न झाल्यासारखा कां दिसतो आहेस ? वरून जोराचें पाणी पडतें आहे त्यानें तर तूं कुडकुडत नाहींसना ? **श्रीतुकाराम** महाराज आले, त्यांनीं काय करायचें तें केलें आणि चालते झाले. तुझ्या कल्याणासाठीं त्यांनीं दक्षिणप्रांतांत चांगली धार्मिक बोंब मारून स्वातंत्र्याचे उपभोक्ते असे स्वदेशाची स्वकष्टानें सेवा करणारे हजारो सैनिक तुझ्या मदतीकरतां तयार केले आहेत. त्यांच्याच कर्तृत्वाचा तुला आतां **विजापुरच्या** स्वारीवर फायदा होणार आहे. थोर लोकांचीं कृत्यें फार चमत्कारिक असतात. **तुकाराम**बावांनीं जी कृति आतां केली ती त्यांच्या नेहमींच्या वागणुकीला योग्य अशीच केली. तुमच्यावर जो आतां **विजापुरचा** सरदार चाल करून येणार आहे त्याचा पराभव करायला **तुकाराम** महाराजांचे **पंढरपुरचे** वारकरी तुम्हांला फारच उपयोगी पडतील. त्यांचीं अंतःकरणें विठ्ठलनामसंकीर्तनानें पुनीत होऊन त्यांनीं देशसेवेच्या तीर्थानें एकादशीचें पारणें केलेलें आहे. ते खरे विष्णुदास असून, भगवंताच्या उपदेशाप्रमाणें वागायला त्यांनीं आपलीं शिरकमळें तळहातांवर पांडुरंगाचा प्रसाद म्हणून धारण केलीं आहेत. आम्हीं सर्व वारकरी एकजीव आहोंत असें दाखविण्यासाठीं त्यांनीं कपाळावर वैकुंठीचा गोपीचंदनाचा शिक्का मारून घेऊन आपल्या जाज्वल्य देशभक्तीच्या कडक व प्रखर अशा निष्कलंक अग्नीच्या रंगाची पताक खांद्यावर धारण केली आहे.

वैजयंती माळेचे आम्ही अनुयायी आहोंत असें दाखविण्यासाठीं त्यांनीं गळयांत तुळशीच्या माळा धारण करून घेऊन कंठांना पवित्र केले आहेत. स्वयंसैनिकांप्रमाणें त्यांनीं शिधा, लोटा, तवा, अंथरूण, रश्शी वगैरे अवश्य तें सामान बरोबर घेतलेलें आहे. ते भजनांतले अभंग उत्तम तऱ्हेच्या कवायतींत व वाद्यांच्या तालसुरावर म्हणत विठ्ठलनामघोष करीत जेव्हां थव्याथव्यानीं नाचतबागडत यात्रेच्या मिषानें स्वधर्मजागृति करीत करीत जातात तेव्हां खऱ्या देशभक्ताचा अंतरात्मा त्यांची ती कृति पाहून व ओळखून थंडगार होऊन जातो. असे हे **तुकाराम**बावानीं तयार केलेले सैनिक तुमच्या या सध्यांच्या अडचणीच्या वेळीं तुम्हांला फार उपयोगी पडतील तर त्यांना घेऊन पुढें **विजापुरा**वर घसरा, पण आडून बसूं नका असें सांगण्याकरितांच मुद्दाम मचाशीं **तुकाराम**बावा येऊन गेले. आम्हांला त्यांचा मनोमय संदेश समजला म्हणूनच आम्ही तुम्हांला अशा घाईनें गडावरून भरपावसांत येथें घेऊन आलों. तुमच्यावर **दिल्लीपतीचीही** चाल होणार आहे. त्याप्रसंगींही या धर्मवीरांचा तुम्हांला चांगला उपयोग होईल. त्या वीरांच्यापाशीं ज्या ज्या हत्यारांची कमतरता असेल तेवढी युद्धोपयोगी हत्यारें तुम्ही त्यांनां पुरवा, म्हणजे आयतें तुमचें मोठें लष्कर तयार होईल. "

" ही कृपा **समर्थांचीच** आहे. श्री**तुकाराम**महाराजांचें दर्शन घडलें, पण भाषण घडलें नाहीं. माझ्या हांतून त्यांचा परामर्ष घडला नाहीं याबद्दल खेद होतो. "

" **शिवराज**, तुम्हांला खेद होण्याचें कांहींच कारण नाहीं. तुमच्याकरितां त्यांनीं **पंढरपुरचे** जे वारकरी तयार करून सर्व **महाराष्ट्रा**ला जागृत करण्यासाठीं त्यांच्या हातांत टाळ व मृदंग दिलीं आहेत त्यांचा उपयोग करून घ्या, म्हणजे त्यांतच तुम्हीं त्यांचा परमर्ष घेतल्यासारखें होणार आहे. असो. तुम्ही आतां किल्यावर जा. आम्हांला दुसरीकडे कामाला गेलें पाहिजे. यंदां आषाढीच्या यात्रेचें आम्हांला भूवैकुंठाहून प्रत्यक्ष **श्रीहरीचें** पाचारण निघालें आहे. भेटीला गेलें पाहिजे. तुम्हांला आतां प्रथम **विजापुरच्या** सरदारांशीं गनीमी काव्यानें युद्ध करावें लागून नंतर **दिल्लीश्वराच्या** मातबर सैन्याशीं सामनें युद्ध करायचें आहे. प्रथम हत्यारांची व्यवस्था करा. "

" आज्ञा शिरसावंद्य आहे. माझ्या ताब्यांत श्रीकृपेनें सध्यां हत्यारांचा पुरवठा भरपूर आहे. मनुष्यबळाचीच कायती मोठी उणीव होती. **समर्थ**कृपेनें ती भरून निघाली. आतां पुढें येणारीं संकटेंही **समर्थ**कृपाच नाहींशीं करील हा भरंवसा आहे. "

" तुमच्यावर श्रीकृपा अखंड आहे. तुमचें कल्याण असो. आम्ही आतां येतों."

**समर्थ** चालूं लागले. त्यांच्या नेहमींच्या चालण्याच्या झपाट्याच्या गतीवर **शिवाजीचे** डोळे दुर्बिणीसारखे लांबवरचें दृश्य दाखविण्याचें काम करीत होते. **समर्थ** हां हां म्हणतां दिसेनासे झाले. **शिवाजी** आपल्या मनाशीं विचार करीत करीत गड चढूं लागला. **शिवाजीनें** गडावर जाऊन **समर्थाज्ञे**प्रमाणें तयारी करण्याचें ठरविलें. तो स्वगत बोलला—

" मी केवढा पुण्यात्मा ! ज्यांनें नख कधीं कोणाच्या दृष्टीला पडायचें नाहीं अशीं साधुवृंदे ज्याअर्थी प्रत्यक्ष भेटी देऊन मीं हातीं घेतलेल्या कामांत मला मदत करीत आहेत त्याअर्थी मला माझ्या मनीषा पार पाडण्यास ईश्वरी मदतच पूर्णपणें हातभार लावते आहे असें स्पष्ट म्हणायला काय हरकत आहे ? **अफ्जुल्खानाचा** सूड उगवण्याकरतां, त्याचा पुत्र **फाजल** आणि **शिद्दीजोहार** हे दोन मोहोरे चाल करून येत असून **दिल्लीहूनही** **जसवंतसिंग** आणि **दिलेरखान** ही जोडी चाल करून येण्याच्या बेतांत आहे. त्यांचा फडशा पाडण्यासाठीं अनेक अतर्क्य अशा युक्तींची योजना प्रथम तयार केली पाहिजे. नंतरचा पुढचा जो मनुष्यबळाचा विचार तो तर साधुवृंदांनीं ठाम करून ठेवला आहेच. असो. **समर्थ**शिष्यांनीं भिक्षेवर अनेक कोठारें आमच्या रस्त्यावर भरून ठेविलीं असून, आमच्या सैनिकांनां दाणागोण्याची मुळींच अडचण पडणार नाहीं. "

**शिवाजी** गडावर पोंचला व पुढील कार्य पार पाडण्याच्या उद्योगाला लागला. **समर्थ** वाट चालत असतां, त्यांनां रस्त्यांत पंढरीचे अनेक वारकरी दृष्टीस पडले. ते वारकरी आषाढीच्या–पंढरीच्या–वारीला चालले होते. त्यांनीं पताका, निशाणें उभारलीं होतीं. वाद्यघोषांत त्यांनीं श्री**विठ्ठल**नामसंकीर्तनाचा शब्दघोष चालविला होता. **समर्थांना** रस्त्यांत पाहून त्यांनीं साष्टांग दंडवतें घातलीं व ते हात जोडून पुढें उभे राहिले.

" अशा थाटानें कोठें जातां ? " म्हणून स्वामींनीं त्यांनां विचारलें.

श्रीपंढरीला जातों ! " असें त्यांनीं उत्तर दिलें.

" तेथें काय आहे व देव कोणचा आहे ? " असें त्यावर स्वामींनीं विचारलें.

आषाढी एकादशीस यात्रेला जात असून, तेथें श्रीविठ्ठलाची मूर्ति आहे. **ज्ञानेश्वर**महाराजांनीं तेथला महिमा अपार वाढविला असून तें स्थान म्हणजे प्रत्यक्ष भूवैकुंठच आहे. तेथें जन्ममृत्यूचें कांहींच चालत नाहीं. चारीं प्रहर सुदर्शन फिरत असल्यामुळें तेथें पातकाचा ठावही नाहीं. स्वामींनीं एकवार तें स्थळ अवश्य पाहावें. तेथें साधुसंत बहुत जमतात. त्यांच्या आयत्याच गांठी पडतील. " वारकऱ्यांनीं विनंति केली.

" एका **रामा**वांचून इतर दैवतांचें आम्हांला कारण नाहीं. तुम्हीं सुखानें जावें. "

श्लोक.

**मना रे जनीं मौन मुद्रा धरावी ।**
**कथा आदरें राघवाची करावी ॥**
**नसे राम तें धाम सोडोनि द्यावें ।**
**सुखालागिं आरण्य सेवीत जावें ॥**

जयजय रघुवीर समर्थ ! " **समर्थ** वेगानें निघून गेले.

यात्रेकरू वारकऱ्यांचा नाइलाज झाला व त्यांनीं आपला रस्ता आनंदानें आक्रमण्यास सुरुवात केली. **समर्थ** कृष्णातीरच्या रस्त्याचे रोखानें चालले.

इकडे **पंढरीनाथ** मनांत विचार करूं लागले कीं, सर्व संतमहंत या **पंढरी**-क्षेत्रीं येतांत, परंतु **रामदास** मात्र येत नाहींत. तरी त्यांस आपण स्वतः जाऊन घेऊन यावें.' **पंढरीनाथांनीं** असा विचार करून ब्राह्मणवेश धारण केला व स्वामींना रस्त्यांत गांठलें.

" आपण कोठें चाललां आहांत ? " **पंढरीनाथांनीं** ब्राह्मणवेषांत नमस्कार करून विचारलें, " आपण कोण आहांत ? राहतां कोठें ? आपलें नांव काय ? "

" आम्ही गंगातीरीं असतों. सांप्रत कृष्णातीरीं वास्तव्य करून असतों. या देहाला **रामदास** असें म्हणतात ! आपण कोण ? राहतां कोठें ? चाललांत कोणीकडे ? "

" आम्ही पंढरपुराला राहातों ! " **पंढरीनाथ**रूप ब्राह्मण संतोषानें बोलले, " देशावरास या प्रांतीं आलों. अकस्मात आपली गांठ पडली. आपण थोर साक्षात् **रामभक्त** आहां आणि **राम** व **पंढरीनाथ** हे दोन नाहींत. यास्तव आपण **पं**ढरीस चलावें. "

" सर्व **रामच** आहे. **राम**व्यातीरिक्त काय आहे ? हें पहा--

**नभीं वावरे जो अणूरेणु कांहीं ।**
**रिता ठाव या राघवावीण नाहीं ॥**
**तया पाहतां पाहतां तेंचि झालें ।**
**तिथें लक्ष्य आलक्ष्य सर्व बुडालें ॥**

ज्या ठिकाणीं श्री**रामचंद्राचें** माहात्म्य नाहीं अशा ठिकाणीं आम्हांला जाण्याचें कारण नाहीं. "

" **राम** सर्वव्यापक आहे. " **पंढरीनाथ**रूपी ब्राह्मण हंसून बोलला, " तुम्ही **राम**ोपासक असतां **राम** सर्वव्यापक आहे हें तुम्हांला माहीत नसावें हें आश्चर्य आहे ! "

" तुम्ही म्हणतां तें सत्य आहे. परंतु **राम**मूर्तीशिवाय इतर देवतांना भजावयाचें नाहीं असा आमचा निश्चय आहे. "

" असा जर निश्चय आहे, तर सर्व तिर्थयात्रेस कां गेलां होतां ? काशी-विश्वेश्वरादि ज्योतिर्लिंगांचीं दर्शनें कां घेतलींत ? **पं**ढरीस न जाण्याचा हट्ट सोडून द्यावा. **पं**ढरीक्षेत्रीं मुख्यत्वेंकरून **मारुतीं**चेंच महात्म्य असून तेथील दैवतही **मारुतीच** आहे. **पं**ढरपूर हें क्षेत्र दक्षिणेंतीला **अ**योध्या आहे. म्हणून आमच्याबरोबर तेथें अवश्य चलावें ! "

" रघुपतीची इच्छा ! तेथें **मारुती** आहेत म्हणतां ? ठीक आहे. आम्हीं पूर्वीं पृथ्वीप्रदक्षिणेस गेलों त्यावेळीं दर्शन झालें नाहीं. यासमयीं जाऊन श्री**मारुतींचें** दर्शन घेऊन येऊं. चलावें ! "

इतकें बोलून **समर्थ** रस्ता चालूं लागले व त्यांच्या समागमें **पं**ढरपुरीचे नाथही ब्राम्हणवेषानें निघाले. **समर्थ** रस्ता चालत असतां पर्जन्य-काळामुळें रस्ता चिखलट, खांचखळ्ग्यांचा होऊन कंटकमय झाला होता त्यामुळें **समर्थां**च्या पायांत वारंवार कांटे मोडत होते ते **पंढरीनाथ**

स्वहस्तें काढून त्यांना **पंढरीस** घेऊन गेले व महाद्वारीं **मारुतीचे** देवालयांत नेऊन त्यांना श्री**मारुतीचें दर्शन** करण्यास सांगून आपण मागच्यामागें अदृश्य झाले.

स्वामीनीं **मारुतीचें** दर्शन घेतलें. त्यांना मोठा संतोष झाला. वारकरी, साधुसंत, महंत वगैरे मंडळी कीर्तन करीत नामघोषपूर्वक नगरप्रदक्षिणा करीत असलेले अवलोकन करून **समर्थां**नींही प्रदक्षिणा केली व ते चंद्रभागेच्या कांठीं वाळवंटांत येऊन उभे राहिले! तेथील कीर्तनसमारंभ पाहून **समर्थांना** मोठा संतोष झाला. त्यांनीं तेथें उभे राहून श्रीप्रताप **मारुतीचें** ध्यान करतांच श्री**मारुतीनीं** प्रगट होऊन त्यांस प्रत्यक्ष दर्शन दिलें तेव्हां साष्टांग नमस्कार घालून **समर्थांनीं** विनंति केली.

" या क्षेत्रीं या देवतापाशीं राहाण्याचें कारण काय ? "

" **श्रीरघुपतीचे** अनंत अवतार आहेत. **राम** व **कृष्ण** या अवतरांत भेद नाहीं. पूर्वीं **रामा**वतारसमाप्तीसमयीं **श्रीरघुपती**पादारविंदीं मीं विनंति केली कीं, पुन्हां या सगुणरूपाचें दर्शन मला कसें घडेल ? त्यावरून **श्रीरघुपतींची** आज्ञा झाली कीं, मद्भक्तोपासकांच्या संरक्षणार्थ तुम्हांला ठेवून आम्ही निजधामास जातों. सर्व उपासक आमचे ठिकाणीं तुम्हांला मानतील. पुनर्दर्शनाची इच्छा आहे. तर **कृष्णावतारीं** याच रूपेंकरून दर्शन देऊं अशी आज्ञा करून **श्रीरघुपती** निजधामाप्रत गेले. त्याप्रमाणें **कृष्णावतारीं** कारणपरत्वें गोकुळांत बालक्रीडेचे समयीं वनांत दर्शन दिलें आणि **द्वारकेंत** असतां, **बलराम, यादव, सत्यभामा** व **गरुड** यांच्या निमित्तें **नारद**-स्वामी यांच्या हस्तें सूचना करून **द्वारकेस** नेऊन दर्शन दिलें. यावरून **राम, कृष्ण** हे उभयतां भिन्न नाहींत हें पक्कें लक्षांत ठेवा. **कृष्णा**वताराचे अंतीं **दिंडीर**वनामध्यें कारणपरत्वें स्वारी आली होती. त्यावेळीं लोहदंडतीर्थीं मीही स्नानास गेलों होतों. त्यासमयीं दर्शन घेतलें, तेव्हां तेथेंच राहाण्याची आज्ञा झाली. **श्रीं**नीं ब्रह्मांडसृष्टी केली, त्यासमयीं हेंही क्षेत्र लोककल्याणार्थ निर्माण **करून,** आदिदैवत परमात्म्यांनीं मुख्य स्वरूपेंकरून या स्थानीं त्रिमूर्तीचा भेद न दाखवितां अद्वैतरूपानें वास केला. यामुळेंच ह्या क्षेत्राला **अद्वैतक्षेत्र** असें म्हणतात. मीं याचकरितां येथें वास्तव्य केलें आहे. **श्रीं**च्या देवालयांत

जाऊन तुम्ही निःसंशयपणें दर्शन घ्यावें. सर्व साधुमंडळी या स्थानीं येतात, परंतु तुम्ही येत नाहीं म्हणून खाशांनीं स्वतः येऊन तुम्हांला अनेक प्रकारें बोध केला, आणि ते तुम्हांला बरोबर घेऊन निघाले. वाटेनें तुम्हांला जे श्रम झाले त्यांचा परिहार करून कांटे लागले ते स्वहस्तें काढून टाकले, या रीतीनें सांभाळ करून तुम्हांस येथवर आणिलें. तुमचे ठायीं श्रीचा असा लोभ असतां, तुम्हांकडून मात्र अनादर होतो."

"श्रीनीं जसें **रामरूपें**करून आपणांस दर्शन दिलें त्याप्रमाणेंच आपण मलाही करवावें!" **समर्थ** परम सद्गदित होऊन बोलले.

**समर्थां**ची विनंति ऐकून **श्रीहनुमान**जीनीं त्यांचा हात धरला व त्यांस राउळांत नेलें.

"उपासकाचें समाधान उपास्यदर्शनावांचून होत नाहीं. यास्तव, या उपासकाला श्रीदाशरथीरूपें दर्शन द्यावें!"

**श्रीहनुमान**जीनीं अशी प्रार्थना करतांच **श्रीपंढरी अयोध्या**रूप व **भीमा शरयू**रूप दिसूं लागली! या वेळीं तेथें मोठा चमत्कार झाला. **श्रीरघुवीर** आणि **समर्थ** यांचें परस्पर दर्शन व भाषण होतें आहे, तों **पं**ढरीचे यात्रेकरू साधुसंत, महंतादि सर्व जितके तेथें जमले होते त्या सर्वांना **पं**ढरपुर **अयोध्या**नगरी दिसूं लागलें. तेव्हां सर्व आश्चर्य करून क्षेत्र पालटण्याचें कारण काय म्हणून शोध करूं लागले. 'राउळांत **रामदास**स्वामींस **श्रीमारुतीनें** ईशदर्शनाकरितां नेलें; यास्तव क्षेत्र पालटून विठ्ठलमूर्तीनीं **रामरूप** धारण केलें व स्वामींना दर्शन दिलें. अशी हकीकत समजतांच सर्व साधु मंडळी राउळीं आली. त्यांत मुख्य मुख्य **निंबराज**बाबा पैठणकर, **तुकाराम**बाबा **देहू**कर, **माणकोजी बोधले धा**मणकर, **जयरामस्वामी वड**गांवकर, **आत्या व रंगनाथ**स्वामी **निग**डीकर आणि **सेख महंमद श्रीगोंदेकर** इत्यादि मंडळी होती. त्यांपैकीं **तुकाराम**बावा पुढें होऊन सर्वांस उद्देशून म्हणाले—

अभंग.

**हुमुंजी रंगाचा उंच मोतीदाणा। रामदासी बाणा त्या रंगाचा॥**
**कृष्णातटाकीं जाहलें दर्शन। तुका म्हणे वंदिन चरण त्याचे॥**

**तुकाराम**बाबा **समर्थां**च्या पाया पडल्याबरोबर सर्व मंडळीची पाया पडण्याची झिंमड उडाली. **समर्थ** आपल्याच तंद्रींत मग्न होते. त्यांनीं तेथें एक सवाई म्हटली.

**“ नाम विठ्ठल सुंदर । ब्रह्मा बिष्णु आणि हर ॥**
**गुणातीत निर्विकार । शुकादिकीं गाइला ॥ १ ॥**
**चंद्रभागा रम्य तीर । तेथें उभा कटीं कर ॥**
**दिंड्या पताका अपार । यात्रा घोष जाहला ॥ २ ॥**
**तेथें येता रामदास । दृढ श्रीरामीं विश्वास ॥**
**रूप पालटोनी त्यास । रामरूपीं भेटला ॥ ३ ॥**
**पुन्हां विठ्ठलस्वरूप । राम विठ्ठल एकरूप ॥**
**पूर्व पुण्य हें विशेष । लक्ष पायीं ठेविला ॥ ४ ॥**

ही सवाई म्हणणें संपतांच **तुकाराम**बावादि साधुजन म्हणाले “ पूर्वीं **तुळशीदास** वृंदावनीं गेले होते त्यांस तेथें **रामरूप** मात्र दाखविलें असें लौकिकांत एकूं येतें; पण हल्लीं आपणांस, तर क्षेत्रसुद्धां दर्शन दिलें. ” याप्रमाणें अनेकांनीं अनेक प्रकारें **समर्थां**चें बहुत प्रकारें स्तवन करून, **पंढरी**-क्षेत्राचें माहात्म्य चाललें पाहिजे यास्तव हें क्षेत्र व श्रीचें रूप पूर्ववत् दिसावें असें करण्याबद्दल **समर्थां**ची सर्वांनीं फार फार स्तुति केली. त्यावरून **समर्थांनीं पांडुरंगा**ची प्रार्थना केली कीं, ‘ आपण पूर्ववत् व्हावें. ’ **समर्थां**ची विज्ञप्ति ऐकून श्रीमूर्ति व क्षेत्र हीं पूर्ववत् झालीं. त्यासमयीं स्वामींनीं पुढीलप्रमाणें अभंग म्हटला.

अभंग.

**येथें उभा कां श्रीरामा । मनमोहन मेघश्यामा ॥ १ ॥**
**काय केलें धनुष्यबाण । कर कटांवरी ठेवून ॥ २ ॥**
**काय केली सीताबाई । येथें राही रखुमायी ॥ ३ ॥**
**काय केलें वानरदळ । येथें वसविले गोपाळ ॥ ४ ॥**
**काय केली अयोध्यापुरी । येथें वसविली पंढरी ॥ ५ ॥**
**काय केली शरयू गंगा ॥ येथें आणिली चंद्रभागा ॥ ६ ॥**
**रामदासीं जैसा भाव । तैसा झाला पंढरीराव ॥ ७ ॥**

याप्रमाणें **समर्थांनीं श्रीची** प्रार्थना करितांच पूर्ववत्प्रमाणें **श्री विठ्ठल**-मूर्ति व क्षेत्र झालें. नंतर **समर्थ** सर्व साधु मंडळीसह देवालयाच्या बाहेर आले. नंतर सर्वत्रांनीं **समर्थांस नामदेवाच्या** जागेशेजारीं **जयरामस्वामी** रहात होते तेथें राहविलें. त्या ठिकाणीं **अंतोबा कुळकर्णी मेथवाडकर** हे **समर्थांना** शरण आले. त्यांना **समर्थांनीं** अनुग्रहप्रसाद दिला. पुढें पौर्णिमेपर्यंत उत्सव होऊन गोपाळकाला झाल्यानंतर **श्रीची** आज्ञा घेण्याकरितां **समर्थ** देवळांत गेले व पुढीलप्रमाणें त्यांनीं **श्रीची** स्तुति केली तेव्हां ' प्रतिवर्षी येत जावें ' अशी **श्रीची** आज्ञा झाली.

" प्रभो, आम्हां सर्वांचा तूं निर्विकार असा आदिपुरुष आहेस. " **समर्थ** प्रार्थना करूं लागले, " तुला पुराण पुरुष ही संज्ञा योग्य आहे. हे परमात्मन्, महत्तत्त्वासह आम्ही सर्व ज्याकरितां उत्पन्न झालों आहों तें तुझें कोणतें काम आम्हीं करावें तें ओळखूनच व्यवहार चालविला आहे. भगवंता, तूं जर सृष्टी निर्माण करायला सांगशील, तर ती माझ्याशिवाय इतर लोक निर्माण करीत आहेतच. मला त्याचें पूर्णज्ञान आणि सामर्थ्य नाहीं. कारण, मी जर इतरेजनांप्रमाणें सृष्टि उत्पन्न करूं लागलों तर परकीय सत्तेखालीं असलेल्या गुलामांत भर पडणार आहे. म्हणून प्रथम स्वराज्य दे. देवा, मी तुझ्या चरणारविंदांना नमस्कार करतों. तुझीं चरणकमलें शरणागताचा ताप दूर करण्यास छत्रासारखीं आहेत. योगी त्यांचा आश्रय करून सर्व प्रकारचीं दुःखें सहज झुगारून देतात. फक्त स्वजनसुखासाठीं तुझ्या चरणांच्या छायेचा मीं आश्रय केला आहे. सर्व नद्यांत श्रेष्ठ अशा पवित्र गंगेचें उत्पत्तिस्थान तुझे चरणच आहेत. देवाधिदेवा, ऋषि एकांतांत बसून वेदविचारांत निमग्न होतात आणि वेदमार्गानेंच ज्या तुझ्या चरणांचा शोध लावितात त्या तुझ्या चरणांपुढें मी लीन आहें. देवा, आस्तिक्यबुद्धीनें व तुझ्या कथाश्रवणापासून उत्पन्न झालेल्या भक्तीनें निर्मळ झालेल्या हृदयांत तुझ्या चरणांची स्थापना केली असतां ज्ञानानें आणि वैराग्यबलानें लोकांच्या अंतःकरणांत तुझ्याविषयीं यथार्थ ज्ञान उत्पन्न होतें त्या तुझ्या चरणांस मी शरण आहें. प्रभो, तू आमचा आश्रयदाता आहेस. तुझ्या चरणकमलांचें स्मरण केलें असतां भक्तांना अभय मिळतें, अशा तुझ्या चरणांचा

महिमा आहे, यास्तव तुला मी नमस्कार करतों. भगवन्, तूं जरी या शरिरांत राहतोस, तरी तुझीं चरणकमळें लोकांना अत्यंत दुर्लभ अशीं होतात. कारण, देह, घरदार, वस्त्रान्न यांच्या ठिकाणीं ' हीं माझीं ' अशी बुद्धि त्यांच्या मनांत दृढ झालेली असते. देवा, तुझ्या अशा ह्या दुर्लभ पदांची आम्ही सेवा करतों. देवाधिदेवा, जे तुझ्या लीला गातात, तुझीं चरणारविंदें मनांत ठेवून भक्तीनें त्यांचें चिंतन करतात आणि त्या योगानें आपल्याला मोठी शोभा आली असें मानतात तेच तुझे सद्भक्त होत. देवा, जे लोक तुझें कथारूप अमृत पितात त्यांची तुझ्याविषयीं भक्ति वाढत जाते; भक्तीनें त्यांचीं अंतःकरणें निर्मळ होतात; त्या योगानें त्यांना विषयाविषयीं विरक्ति उत्पन्न होते आणि मग ज्ञान उत्पन्न होतें. अशा क्रमानें शेवटीं त्यांना वैकुंठपदाचा लाभ होतो. कित्येक लोक समाधिबलानें बलिष्ठ मायेला जिंकतात व वैकुंठप्राप्ति करून घेतात; परंतु त्या मार्गांत फार कष्ट सोसावे लागतात. तसे तुझ्या भक्तीनें जे तुझी प्राप्ति करून घेतात त्यांना दगदग सोसावी लागत नाहीं, इतकाच फरक आहे. देवा, यासाठीं आम्हांस ज्ञानदृष्टि दे. भगवंता, तूं साक्षात् परमेश्वर आहेस. तूं प्रकृतीहून पर आहेस. निष्पाप अंतःकरणाचे जे मोठमोठे परमहंस मुनि आहेत त्यांना देखील जें तुझें स्वरूप कळत नाहीं तें मला पामराला कसें वर्णन करतां येईल! गोविंदा, देवकीनंदना, वासुदेवा, तुला माझा नमस्कार असो. तुझ्या नाभीपासून कमळ उत्पन्न झालें आहे, तुझ्या गळ्यामध्यें कमळांच्या माळा आहेत, तुझे नेत्र कमळांसारखे सुंदर आहेत आणि तुझे चरण कमलांप्रमाणें कोमल आहेत. भगवंता, तुला माझा नमस्कार असो. हृषीकेशा, परकीय अमलानें अनेक वर्षें कोंडून ठेविलेल्या आणि म्हणूनच अतिशय दुःखांत दिवस काढीत असलेल्या ह्या आर्यभूसुंदरीला संकटांतून सोडविण्याकरितां तूंच **शिवराजाला** उत्पन्न केला आहेस व संकटपरंपरेला सोसून तो **शिवराज** या आर्यभूची परकीय सत्तेपासून मुक्तता करण्यासाठीं तळहातावर शिर घेऊन अहोरात्र झगडत आहे. **शिवराजानें** जें परकीय सत्तेशीं भयंकर युद्ध चालविलें आहे त्यांत परकीयांच्या जबरदस्त शक्तीनें महाराष्ट्राचा प्राण जाण्याचीही भीति आहे! पण गोपाळा, या सर्व संकटांतून त्याला निभावून नेणारा तूंच आहेस. हे विश्वात्मन्, लहानपणीं तूं दह्याचें मडकें फोडून त्यांतून लोणी चोरून

घेतलेंस, त्या अपराधाबद्दल तुला बांधून ठेवण्यासाठीं **यशोदेनें** आपल्या हातांत दावें घेतलें त्यावेळीं तुझ्या डोळयांतून आश्रु वाहूं लागले व त्या योगानें तुझ्या डोळयांत घातलेलें काजळ चोहोंकडे पसरलें आणि तुझे डोळे कावरेबावरे झाले. तूं आपलें तोंड खालीं घातलेंस आणि जणूं काय तुला अत्यंत भीति वाटली आहे अशा अभिनयानें तूं त्या वेळीं उभा राहिलास. कृष्णा, पांडुरंगा, प्रत्यक्ष भीति ज्याला भिते त्या तूं भयभीत झाल्याचा आविर्भाव दाखविलास, हें मनुष्यकृतीचें अनुकरण नव्हे तर काय ? असें अनुकरण करण्यांतला तुझा खरा हेतु कोण जाणणार? अनेक अनेक तर्क करतात. भक्तवत्सला, सध्यां सुरू असलेल्या स्वातंत्र्याच्या युद्धामुळें दिल्लीपतीचा आमच्यावर रोष झालेला आहे, यासाठीं तर आम्हांला तुझ्या संरक्षणाची फारच आपेक्षा आहे. परकीय सत्तेमुळें आमची अपकीर्ति होऊन आम्ही बलहीन झालेले आहोंत व त्यामुळेंच स्वराज्याला अपात्र असें राजकर्त्या अधिकाऱ्यांच्या दृष्टीला जे आम्ही दिसतों आहोंत तें अगदीं यथातथ्य आहे. आम्हीं आपलें पौरुष्य न दाखवितां राजापुढें भिक्षा मागणें खरेंच अश्लाघ्य आहे. दांत विचकून भिक्षा मागण्यापेक्षां आपली पात्रता ठरविण्यासाठीं आमच्या **शिवाजीराजाला** ह्या **पंढरीच्या** वारकरी गोपाळांनीं **श्रीतुकाराम**बावांच्या बुद्धिवादानें हातीं शस्त्र धरण्यास जसें उत्तेजित केलें आहे तद्वतच प्रत्येक महाराष्ट्रीयानें आपापल्यापरी तयार होण्यासाठीं, भगवंता, तुमच्या चरणांवरील तुळशीच्या मंजिऱ्या आपापल्या मस्तकीं स्वराज्याच्या लालसेनें तुमचा प्रसाद म्हणून धारण करून रणमस्तीच्या आखाड्यांत उतारण्याकरितां तुमच्याच बलाची अपेक्षा केली पाहिजे. आत्मा जसा इंद्रियाचा मालक, तसा तूं आम्हां वैदिक धर्मीयांचा अभिमानी आहेस आणि म्हणूनच गीतेंत तूं आम्हांला अभिवचन दिलें आहेस, त्यावर आमचा पूर्ण विश्वास आहे. हे **गदाधरा**, ध्वजांकुशादिक अनेक लक्षणांनींयुक्त अशीं जीं तुझी पावलें तीं या आर्यावर्तावर सर्वत्र उमटल्यामुळें पूर्वी हस्तिनापुर जसें शोभिवंत दिसत होतें तशी ही महाराष्ट्रभू सध्यां सुंदर दिसते आहे. आसपासचा हा सुसंपन्न प्रांत, त्यांतल्या परिपक्क झालेल्या वनस्पती, अरण्यें, पर्वत, नद्या, समुद्र ह्यांवर तुझी कृपादृष्टि नसेल, तर आम्ही असेच अपात्रतेच्या शिक्यानें भ्रष्ट झालेले पारतंत्र्यांत कुजत पडणार आहोंत. हे विश्वमूर्ते, हे

**मधुपते**, ज्याप्रमाणें गंगेचा ओघ समुद्राकडे वळतो त्याप्रमाणें आम्हां आर्यांचा ओढा अनन्यभावानें सदोदित तुझ्याकडेच वळलेला आहे. म्हणून आम्हांला आतां कृतार्थ कर. हे पार्थसख्या कृष्णा, ह्या पृथ्वीवरील लोकांना कंटकांप्रमाणें दुःख देणाऱ्या राजांचे वंश तूं जाळून भस्मीभूत करून टाक. सध्यां तूं जो अवतार धारण केला आहेस त्याचा अर्थ तरी, गोविंदा, हाच आहे. **अधोक्षजा**, गाई, ब्राह्मण आणि देव ह्यांचें दुःख हरण करून दुष्टलोकांच्या भारानें त्रास-लेल्या ह्या पृथ्वीला सोडवण्यासाठींच तुझा अवतार झालेला आहे. अशा तुझ्या या योगमायेच्या अवताराचें वर्णन कोण करूं शकेल ! हे **योगेश्वरा**, तुला माझा नमस्कार असो.



# प्रकरण तेरावें.

## वटवृक्षाची तिसरी फांदी.

यं प्राहुः शिवनिर्विशेषमनिशं ब्रह्मेति वेदान्तिनः ।
कर्तारं कुशलाः प्रमाणपटवः सद्युक्तिभिस्तार्किकाः ॥
अन्ये स्वाभिमतं वदंति बहुधः सांख्याः प्रधानं परं ।
तस्मै सद्गुरवेति सन्तु नतयः श्रीरामदासाय मे ॥ १ ॥
लोकानामिह संसृतावभिनिमग्नानामसंचेतसां ।
तेषामुद्धरणाय येन परमां प्रज्ञावधिष्टाय वै ॥
आद्यंतात्परमागतेन विकृतः सारोवतारोह्ययं ।
तस्मैसद्गुरवेति सन्तु नतयः श्रीरामदासाय मे ॥ २ ॥
वैराग्ये कृतवानतीव जगतां तादृक् प्रवृत्यैव यः ।
कांतारांतर संचरैक निरतौ नीता कियद्वासराः ॥
पश्चाल्लोक दया परेण हि पुरात्तापं च संसेविता ।
तस्मै सद्गुरवेति सन्तु नतयः श्रीरामदासाय मे ॥ ३ ॥
नाना देव मह्या मह्या विरचितास्तीर्थाटणान्यादरा ।
दंतः प्रेमभरेण येन बहुधा मूर्तिप्रविष्ठापनाः ॥
ग्रंथाश्चापि जगत्प्रबोधपटवः सत्सारमाशंसिनः ।
तस्मै सद्गुरवेति सन्तु नतयः श्रीरामदासाय मे ॥ ४ ॥
यः संभंगल मंगलं वरमनं सर्वादिभूतं परं ।
यत्सान्निध्यमवाप्य वाक् प्रभृति सद्गाजातमा वर्तते ॥
अंतः प्रांत दुरागमः किमिति हो वाक्यारदूरे स्थितः ।
तस्मै सद्गुरवेति सन्तु नतयः श्रीरामदासाय मे ॥ ५ ॥

इति श्रीवामनपंडितविरचितं रामदासस्तोत्रं संपूर्णम् ॥

वरील स्तोत्रांत ज्यांचें वर्णन विद्वद्वर्य **वामनपंडितां**सारख्या महान पंडितांनीं केलें आहे त्या **श्रीसमर्थ रामदास**स्वामींच्या योग्यतेचें यथातथ्य

वर्णन करायला कोणची लेखणी समर्थ होणार ! राजकारणांतल्या अनेक उला-ढालींचें वर्णन इतिहासकार करूं शकतात, परंतु त्यांची ती वर्णनशक्ति जशी ब्रह्मवर्णनापुढें हात टेंकते तद्वतच राजकारणाचें मूळबीज ज्या **समर्थ रामदासांच्या** बुद्धींत लपून राहिलेलें होतें त्याचें यथार्थ वर्णन करण्याला कोणा-ही लेखकाची लेखणी कुंठित झाली तर त्यांत आश्चर्य तें कसलें ! अशाच तऱ्हे-च्या विभूती इतिहासांत **राष्ट्रगुरु** म्हणून मोठ्या अक्षरांनीं नेहमीं लिहिल्या जातात. शरीराबरोबरच जसें केंसांप्रमाणें अनेक रोग देहांत जन्मलेले असतात तद्वतच राजकारणाबरोबरच त्यांतील अनेक दोष जन्म पावलेले असतात. **शिव**राजांच्या काळीं जे अनेक संतमहंत हिंदुस्तानांत संचार करीत होते त्यां-तलें अग्रेसरत्व **श्रीसमर्थ रामदास** यांच्याकडे येण्याचें कारण तरी हेंच आहे **शिवाजीचा** आणि **रामदासांचा** काळ हा महाराष्ट्राच्या इतिहा-सांत अत्यंत महत्वाचा आहे. राजकारण आणि देशभक्ति यांचा उदय पूर्णपणें त्याकाळीं झाला होता. **श्रीतुकाराम**महाराजांच्या अंगांत जसा दुरूपी वेदान्त होता तसाच जरी **समर्थांच्या** डोक्यांत होता व हे दोघे साधु जरी वेदान्त-निर्णयात पूर्ण वाकबगार होते, तरी त्यांचें राजकारण व देशसेवा ह्या दोन्ही गोष्टी शमींतल्या अग्नीप्रमाणें त्यांच्या हृदयांत अक्षय उद्दीपित राहून त्या अग्नीची कृति जरी स्पष्ट दिसत होती, तरी ते दोघेही नेहमीं शांतचित्तानें ईशभजनांत दंग होऊन विरक्ततेंतच काळक्रमणा करीत असलेले इतिहास साक्ष देत आहे. **समर्थ रामदासांच्या** अंगांत ऐहिक आणि पारमार्थिक गोष्टींचा कसा मिलाफ झालेला होता व त्यापासून महाराष्ट्राचा कसा फायदा झाला हें त्यांच्या चरित्रावरून कोणीही ज्ञाता वर्णूं शकेल.

**श्रीसमर्थ रामदास** व **शिवछत्रपति** यांचे अवतार होऊन गेल्याला आज तीनशें वर्षें पुरीं होत आलीं आहेत. सध्यांच्या विपत्कालीं, पूर्वी होऊन गेलेल्या महान् पुरुषांबद्दल जागृति उत्पन्न झाली असून, सांप्रतकाळीं त्यांच्या-बद्दल अखिल **भरतवर्षांत** सर्वसंमत असा जो पूज्यभाव उत्पन्न झाला आहे त्याचे कारण तरी त्या जोडीची खरी निरपेक्षता हेंच होय. शांति, प्रेमळपणा, भक्ति व वैराग्य या गोष्टींची ओड जेथें असते तेथेंच राष्ट्रगुरुत्व प्राप्त होतें. राज-कारणांतला करारीपणा धार्मिकबंधनांना शिथिल करण्यांत आपलें बुद्धिसामर्थ्य

जे खर्च करतात ते जसे राष्ट्राच्या नाशाला कारण होतात, तसेच अनधिकाराच्या आणि व्यर्थ बडबडीच्या ढोंगानें स्वार्थ साधून खोटा मोठेपणा मिळविण्याची हाव बाळगणारे कर्तृत्वशून्य पोपटपंची पुढारी गैरमुत्सद्दी ठरून राष्ट्राचा अनेक तऱ्हांनीं घात करतात. वसंतऋतूंत गडगडाट करणारे पोकळ ढग जसे पेरणीला निरुपयोगी असतात, तसेच बडबडीचा खटाटोप करणारे व स्वतःला देशाचे पुढारी म्हणविणारे लोक अदूरदर्शी ठरून, राजकारणाची घडी विसकटणारे राजमान्य मूर्ख ठरतात. अशा बडबडणाऱ्या लोकांबद्दल राज्याधिकारी चेवलेले असतात. कृत्रिम हत्यारें तर राहूं द्या, पण नैसर्गिक हत्यारें जीं दंत व नखें त्यांच्याशींही ज्यांनीं फारकत केलेली आहे असे नखदंतभग्न पुढारी ज्या समाजांत अरेरावीच्या गोष्टींनीं प्रमत्त होऊन मनसोक्त बडबडीनें देशाभिमान उत्पन्न केल्याची शेखी मारतात व स्वहित साधण्याकरितां अनेक देशबांधवांच्या पदराला खार लावून स्वकर्मपराङ्मुखतेचा लाजिरवाणा शिक्का स्वदेशबांधवांकडून मारून घेऊन निर्लज्जासारखे शेफारून वादविवादाला तयार होतात, त्यांची मूळची बुद्धि खोटी असून ते देशद्रोही लांडगे, मांजराप्रमाणें जरी डोळे मिटून दूध पिण्यासारखा स्वार्थ साधीत असतात, तरी घरधन्याकडून त्याबद्दल हरघडी कंबरमोडीच्या दंडुक्याची बक्षीशी त्यांना मिळतच असते. अशा तऱ्हेचे पुरुष, हे इतिहासप्रसिद्ध असे राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून देणारे राष्ट्रपुढारी म्हणून कधींही प्रसिद्धीस न येतां तोतयांच्या सदरांत लिहिले जातात.

वर वर्णन केलेल्या प्रकृतीचे जर **समर्थ रामदासस्वामी** असते तर ते **शिवछत्रपतींनीं** पादवंदनास योग्य असे न ठरतां पंडित **वामनस्वामींच्याही** स्तोत्रास पात्र झाले नसते. **वामनपंडीत** हे कोण होते हें महाराष्ट्राच्या इतिहासवाचकांस जरी माहित असलें, तरी ते कवि या नात्यानें फक्त अवगत आहेत; म्हणून त्यांचा या स्थलीं योग्य तो त्रोटक इतिहास दिला असतां अस्थानीं होणार नाहीं.

**श्रीसमर्थ रामदासस्वामी** यांची कर्तबगारी म्हणजे प्रत्यक्ष भगवंताचेंच अवतारकृत्य. **वामनस्वामी** हे मूळचे **वारणातीरांवरील कऱ्हाडचे** राहणारे असून ज्योतिषी होते. ते मोठे कडक मध्वसंप्रदायी होते. त्यांनीं **काशीक्षेत्रीं** जाऊन विद्याभ्यास केला. तेथील विद्वान ब्राह्मणांत ते शास्त्रवेत्ते म्हणून प्रसिद्ध

झाले तेव्हां त्यांनीं आपल्या गुरूशीं वाद केला व त्यानां जिंकलें. गुरूही 'पुत्रादेके पराजयम्' 'शिष्यादेके पराजयम्' असें म्हणून संतोष पावले. तेव्हां तेथील ब्राह्मणांस व गुरूला त्यांनीं स्वदेशीं जाण्याविषयीं आज्ञा मागितली. गुरूनीं त्यांचा बहुत सन्मान करून स्वदेशीं जाण्यास त्यांस परवानगी दिली. वामनपंडित आपल्या गिरीबाई नामक पत्नीसह तेथून जे निघाले ते, वाटेंत जीं जीं क्षेत्रें किंवा इतिहासप्रसिद्ध स्थळें लागलीं तेथें तेथें जाऊन वाद करून जयपत्रें मिळवीत मिळवीत इंद्रायणीचे तीरीं आले तेथें एक मोठा चमत्कार त्यांच्या दृष्टीस पडला. इंद्रायणीच्या घाटावर एक भला मोठा अश्वत्थ वृक्ष होता. त्याच्या दोन खांद्यांवर दोन ब्रह्मराक्षस असून तिसऱ्या खांदीवर तिसरा एक ब्रह्मराक्षस जाऊन बसण्याचा प्रयत्न करीत होता व त्याबद्दल त्या तिघां ब्रह्मराक्षसांमध्यें चाललेलें संभाषण वामनपंडितांना ऐकूं येत होतें. तिसऱ्या खांदीवर जाऊन बसू पाहणारा ब्रह्मराक्षस म्हणाला "अहो, हें रिकामें स्थान असून येथें बसण्यास आम्हांला तुम्ही नको म्हणतां याचें कारण काय ?"

"बाबारे, हें स्थान रिकामें नाहीं." दोघे ब्रह्मराक्षस बोलले. "ही जागा वामनपंडितांकरतां नेमलेली आहे."

"वामनपंडीत आमच्या योग्यतेला येईपर्यंत आम्हीं येथें राहूं. ते आल्यानंतर आम्ही त्यांनां हें स्थान देऊन दुसरीकडे जाऊं."

"हें स्थल दुसऱ्याचें असून तें सध्यां आमच्या ताब्यांत आहे, म्हणून तें आम्ही तुम्हांला देऊं शकत नाहीं. मालकाची परवानगी घेऊन आल्यास आमची हरकत नाहीं."

हें ऐकतांच त्या ब्रह्मराक्षसानें ब्राह्मणाचें रूप घेऊन, वामनपंडीत जेथें इंद्रायणीचे तीरावर उतरले होते तेथें तो आला. त्यानें त्यांस नमस्कार केला व एकांतीं कांहीं भाषण करायचें आहे म्हणून विनंति केली. तेव्हां सर्वत्रांना दूर करून 'बोला' म्हणून त्यांस पंडीत बोलले. ब्राह्मणवेषधारी ब्रह्मराक्षस बोलूं लागला.

"आपणांकरतां जें स्थळ नेमलें गेलें आहे तें आपण येईपर्यंत आम्हांला

राहायला द्यावें. आपण याल तेव्हां आपली जागा रिकामी करून देऊन आम्ही दुसरीकडे जाऊं."

"तुम्ही कोण आहांत व आमची जागा म्हणजे काय व ती कोठें आहे?" **पंडितांनीं** आश्चर्ययुक्ततेनें **प्रश्न केला.**

"मी ब्रह्मराक्षस आहें. मीं जें कर्म करून ब्रह्मराक्षस झालों तेंच कर्म सध्यां तुम्ही करीत आहांत. यास्तव तुम्हीही पुढें ब्रह्मराक्षसच होणार आहांत. ह्याच इंद्रायणीच्या तीरावर असलेल्या अश्वत्थवृक्षाच्या एका खांदीवर तुमचें स्थान ईश्वरी संकेतानें ठरलेलें आहे. तेव्हां तें तुमचें नियमित स्थान तुम्ही येथें येऊन राहीपर्यंत मला राहयला मागण्यासाठीं मी तुमच्याकडे आलों आहें."

"हें परिज्ञान तुम्हांला कसें प्राप्त झालें?" पंडितांनीं विचारलें.

"या योनींत त्रिकाल ज्ञान आहे, परंतु योनी मात्र दुष्ट आहे."

"मी जरी ब्रह्मराक्षस झालों, तरी हरकत नाहीं. मी तें स्थळ तुम्हांला बक्षीस देतों. खुशाल तेथें जाऊन राहा. पण माझें एक काम मात्र करा!"

"कोणचें करूं तें सांगा!"

"तुमची योनी त्रिकालज्ञानी जर आहे म्हणतां, तर मी ज्या योगानें ब्रह्मराक्षस होणार नाहीं असा कांहीं मार्ग तुम्हांला दिसत असल्यास सांगा!"

"साक्षात् ईश्वरकृपा जरी तुमच्यावर झाली तरी ही योनी तुम्हांला चुकायची नाहीं; परंतु दैवयोगानें साधुकृपा झाल्यास चुकेल."

"असा साधु कोण आहे?" पंडितानीं पृच्छा केली.

"सांप्रत देहूस **तुकारामबावा** आहेत."

ब्रह्मराक्षसाचें हें उत्तर ऐकून **वामनपंडितानीं** त्याला साष्टांग नमस्कार घातला आणि 'तुम्हीच गुरू' असें म्हणून दहावीस पावलें त्याच्याबरोबर जाऊन त्याला निरोप दिला.

पंडितानीं सकुटुंब **इंद्रायणींत** स्नान केलें व धोतर नेसून उत्तरीय अंगावर घेतलें आणि सौभाग्यवती **गिरीबाईस** बरोबरच्या सर्व संपत्तीसह घरीं जाऊन राहण्यास सांगून स्वतः देहाचें सार्थक करण्यास बदरिकाश्रमीं जाण्याविषयीं विचारलें.

" आपण आपल्या देहाचें सार्थक करायला जाणार आणि मी घरीं जाऊन नरकीं जावें कीं काय? आपली सेवा करावी हा माझा मुख्य धर्म आहे. याकरतां हा देह पडो अथवा राहो. आपल्याला टाकून जायचें नाहीं हा माझा निश्चय आहे." **गिरीबाईनें** स्पष्टपणें सांगितलें.

" तुमचा जर असा निश्चय आहे तर आमच्याबरोबर चलावें!"

**पंडितांची** आज्ञा झाल्याबरोबर **गिरिबाईनीं** इंद्रायणींत स्नान केलें व त्या हात जोडून पंडितांच्या पुढें उभ्या राहिल्या. **पंडितांनीं** बरोबरची सर्व संपत्ति वांटून टाकण्यास सांगितल्याप्रमाणें तेथें असलेल्या आळंदीच्या ब्राह्मणांस संपत्ति देऊन टाकून **गिरिबाई** आपल्या पतीसह **तुकाराम**महाराजाकडे जाण्यास निघाल्या. तें जोडपें तेथून निघून **आळंदीस** गेलें. कारण **तुकाराम**महाराज त्यावेळीं **आळंदीस** कीर्तनाकरितां गेले होते. तेथें गेल्यावर साष्टांग नमस्कार घालून **वामनपंडीत** हात जोडून उभे राहिले.

" तुम्ही ब्राह्मण असतां आम्हांसारख्या अनधिकाऱ्यास नमस्कार करतां, हा धर्म कोण?" असें **तुकाराम**महाराजांनीं पंडितांस विचारलें.

पंडीत बोलले, " आपण साधु व आम्ही मुमुक्षु ब्राह्मण, यास्तव कृपा करावी, या बुद्धीनें आलों; म्हणून याप्रसंगीं वर्णाश्रमधर्माचें कारणच उरलें नाहीं." यानंतर **वामन**पंडितांनीं **श्रीतुकाराम**महाराजांस स्ववृत्त सविस्तर निवेदन केलें.

**वामन**पंडितांचें वृत्त ऐकून **तुकाराम**महाराज बोलले, " धन्य आहे तुमची! माघारा फिरलांत हेंच उत्तम केलेंत. मी शूद्रवर्ण आहें. आपण ब्राह्मणवर्ण आहांत. वर्णाश्रमधर्माचें रक्षण करावें अशी शास्त्राज्ञा आहे. कृष्णातीरीं **श्रीसमर्थ रामदास**स्वामी हे ब्राह्मण असून साक्षात् मारुतीचे अवतार आहेत. त्यांना तुम्हीं शरण जावें. ते सद्गुरु **चाफळ**खोऱ्यांत असतात तेथें तुम्हीं जावें!"

**तुकाराम**बावांनीं असें सांगितल्यावरून पंडीत निरोप घेऊन सहकुटुंब तेथून निघाले. स्वामींची गांठ पडतांच उभयतां स्त्रीपुरुषांनीं साष्टांग नमस्कार घालून **समर्थांची** प्रार्थना केली.

**समर्थ** प्रसन्न होऊन म्हणाले, " बापा, तुम्हीं केलेंत तें योग्यच झालें. आतां काय म्हणतां?"

पंडितांनीं आपलें सविस्तर वृत्त निवेदन केलें. तें ऐकून संतुष्ट झालेले समर्थ बोलले, " तुम्हीं आतां ईश्वराला शरण जावें. "

" स्वामी, मला ईश्वरकृपेचें कारण नाहीं ! " पंडीत बोलूं लागले, " आपण साधु असून दीनदयाळ आहांत. मी दीन ब्राह्मण असून मुमुक्षु आहें. यास्तव कृपा करावी. "

" पंडीत, तुमचें सार्थक करण्याजोगें आमच्यापाशीं कांहींच सामर्थ्य नाहीं. "

" महाराज, मला तें कांहींच समजत नाहीं. परंतु 'सद्यःसाधुसमागमः' या वाक्याला बाध न येईल असें व्हावें अशी प्रार्थना आहे. "

पंडीत अशा तऱ्हेनें बोलल्यावर **स्वामींनीं** मंद स्मित केलें. ते म्हणाले " तुमचें म्हणणें खरें आहे. आतां मी सांगतों त्या मार्गानें जावें. तुम्हीं उभयतां बदरिकाश्रमीं जाऊन बारा वर्षेपर्यंत तपश्चर्या करावी व विष्णूची उपासना करावी. म्हणजे ईश्वर साक्षात् दर्शन देऊन कृपा करील. "

आज्ञेप्रमाणें पंडितांनीं सहकुटुंब तेथून साष्टांग नमस्कारपूर्वक प्रयाण केलें. त्यांनीं **समर्थांच्या** आज्ञेप्रमाणें बारा वर्षेपर्यंत हरळीच्या मुळ्यांचा रस काढून प्राशन करीत असतां तपश्चर्या केली. परंतु प्रत्यक्ष विष्णुदर्शन झालें नाहीं. तेव्हां भागीरथींत देहत्याग करायचा त्यांनीं निश्चय केला व **गिरिबाईला** तो कळविला. **गिरिबाईनींही** " जी आपली गत तीच माझी " असें उत्तर दिल्याबरोबर तें जोडपें गंगाद्वारीं गेलें. त्यांनीं डोळ्यांना पट्टे बांधले व गंगेंत उडी घेणार, इतक्यांत साक्षात् भगवान् विष्णुमूर्तीनें आडवा हात देऊन " **वामना**, नेत्र उघडून पाहा " असें म्हटल्याबरोबर **पंडितांनीं** " आपण कोण आहांत ? " म्हणून प्रश्न केला.

" तूं ज्याकरितां प्राण देतोस तोच मी आहें ! " असें भगवतांनीं सांगितलें. तें श्रवण करून **वामन**स्वामी हंसत हंसत बोलले—

" तो जर असता तर मी कां मरतों ? तो मरण पावला म्हणून आम्ही मरतों. सोडा हात आणि पडूं द्या आम्हांला गंगोघांत. "

" **वामना**, " **श्रीविष्णु** बोलले, " माझा हात लागला असतां पतन कसें होईल ? माझे आज्ञेशिवाय भागीरथी तुम्हांला कशी बुडवील ! "

इतकें बोलून भगवंतांनीं चतुर्भुज मूर्तीचें साक्षात् दर्शन दिलें व मस्तकीं

वरदहस्त ठेविला आणि " इच्छा असेल तें माग " असें म्हटलें. तेव्हां दोघांनीं साष्टांग नमस्कार करून भगवंतांचे चरण आपल्या नेत्रोदकांनीं क्षालन केले. नंतर यथासामर्थ्यें प्रार्थना करून विनंति केली.

" प्रभूची आज्ञा मागण्याविषयीं झाली; परंतु श्रीचरणसेवेवांचून दुसरी इच्छा नाहीं. "

" कांहीं तरी माग ! " भगवान् बोलले.

" काय मागूं ! " **वामन**पंडित बोलले, " देणेंच असेल तर साधूंना जें सुख प्राप्त होतें तें द्यावें ! "

" ते सुख आमच्यापाशीं नाहीं. कदाचित् वैकुंठलोक मागितला तरी देऊं; परंतु साधूंचें सुख साधूंना शरण गेल्यावांचून प्राप्त होत नाहीं. म्हणून **रामदासाला** शरण जावें. असें केलेंत म्हणजे तुम्हांला उत्तम पद प्राप्त होईल. " महा विष्णु इतकें बोलून अदृश्य झाले.

भगवद्वचनाची खूण गांठ बांधून **वामन**पंडितानीं श्रीमहाविष्णूच्या आज्ञेप्रमाणें **समर्थ**दर्शनार्थ तेथून प्रयाण केलें. तें जोडपें **रामघळींत** येऊन थडकलें. **वामन**पंडितानीं **समर्थांस** साष्टांग नमस्कार घातला तों **स्वामीनींही** त्यांना उलट घातला. हे पाहून **वामन**पंडित म्हणाले, " महाराज, आम्हां दीनावर हा गजब काय ! सरकारची हुंडी आपल्याकडे आली आहे. तिचा स्वीकार करून आम्हां उभतांना आज्ञा व्हावी. "

" सरकारची आज्ञा जशी तुम्हांला झाली आहे तशीच आम्हांलाही झाली आहे. तुम्हीं आतां **श्रीशैलपर्वतीं** जाऊन तेथें कर्दलीवनांत **अवधूत** मूर्ति आहेत त्यांना शरण जाऊन आपली इच्छा पूर्ण करून घ्यावी. "

**पंडितानीं** प्रेमपूर्वक " आज्ञा प्रमाण " असें म्हटलें व तेथें कांहीं दिवस राहून **श्रीशैलपर्वतीं** गेले. तेथें **अवधूत** महाराजांचें दर्शन घेऊन त्यांना सर्व हकीकत निवेदन केली, व ' सरकारच्या आज्ञेप्रमाणें अनुग्रह करून माझें समाधान करावें " अशी विनंति केली. **अवधूतांची** कांहीं दिवस तेथें सेवा करीत राहून, **पंडितानीं** नित्यानित्यविवेकाचा विचार रोज **अवधूतांस** विचारावा व त्यांनीं त्याचा उलगडा त्यांस सांगावा. अशा स्थितींत अकस्मात् **अवधूतांचा** समाधिकाळ प्राप्त झाला. **वामन**पंडित खिन्न झाले.

**वामन**पंडितांची खिन्नावस्था पाहून **अवधूत** बोलले, " बाबारे, देहाच्या मर्यादेप्रमाणें समाधि करणें प्राप्त आहे. अद्यापि तुझ्या मनांत संशय उरला असल्यास **रामदास** यांच्यापाशीं जाऊन निःसंशय व्हावें. " याप्रमाणें आज्ञा करून **अवधूत** समाधिस्त झाले.

**वामन**पंडित आपल्या कुटुंबासह **समर्थां**जवळ जाऊन पोंचण्याच्या आधींच **समर्थांनीं** अर्धकोश सामोरे येऊन **पंडितांस** नमस्कार घातला. तें पाहून दुःखी अंतःकरणानें **पंडीत** बोलले, " महाराज, हें काय ? आम्हां गरीबांवर असा गजब करूं नये ? " इतकें बोलून त्या उभयतां स्त्रीपुरुषांनीं **स्वामींस** दंडप्राय नमस्कार घातले व हात जोडून उभे राहिले.

" **वामना**, शाबास ! " **समर्थ** बोलले, " तुझ्यासारखा प्रयत्नी पुरुष तूंच ! धन्य आहेस तूं ! ईश्वरी कृपा आणि सद्गुरुकृपा ह्या प्राप्त करून घेण्याची योग्यता तुलाच आहे. तूं केलेंस तें इतरांच्यानें व्हावयाचें नाहीं. "

" ही **स्वामींचीच** कृपा आहे. "

" असें आहे तर तूं **गिरिबाईस** नमस्कार कर ! " समर्थ मंदस्मित करून बोलले.

" आज्ञा प्रमाण ! मी केवळ आज्ञाधिकारीच आहें ! "

अशा प्रकारचीं परस्परांत विनोदी भाषणें होऊन **स्वामींपाशीं चाफळास, परळीस** व **रामघळींत** तें जोडपें कांहीं काळपर्यंत मोठ्या सुखासमाधानांत राहिलें. **वमन**पंडितांनीं **दासबोधा**चें पारायण सुरू केलें. सातव्या दिवशीं **दासबोधांतील** सातव्या दशकांतल्या चवथ्या समासांत चौदा ब्रह्में स्थापून तीं उडवलीं. यांपैकीं विचार पाहतां चौदा स्थानीं ब्रह्मसंज्ञेविषयीं दाखला मिळतो. परंतु उडविल्याचा दाखला कोणत्याही ग्रंथीं दिसत नाहीं. हें पाहून ' **स्वामींस** विचारण्याचें तर अंगीं सामर्थ्य नाहीं आणि निःसंदेह तर होत नाहीं ' असा विचार करून **स्वामींस** समक्ष विनंति केली कीं, " महाराज, ग्रंथाचें पारायण मी करतों आणि आपण त्याचा अर्थ स्वमुखें सांगावा ! "

**समर्थांनीं** " बहुत बरें ! " असें म्हणतांच, पारायणास प्रारंभ केला सातव्या दिवशीं तिसऱ्या समासीं पारायण आलें. त्यावेळीं चौदा ब्रह्मांविषयीं **वामनानीं** प्रश्न केला. त्यावेळीं **समर्थांनीं** चौदा ब्रह्में स्थापून तीं उडविलीं.

याप्रमाणें **स्वामींनीं** तीं उडवावीं व **वामन**पंडितांनीं तीं स्थापावीं असें होत असतां **वामन**पंडितांचा निःसंशय होईना. तेव्हां **श्रीसमर्थ श्रीमारुती**-रूपानें भुभुःकार करून शेंपटाचा मोठा तडाखा देऊन "बोल बोल" असें **वामन**पंडितांस बोलूं लागले. **स्वामींचें** तें रुद्ररूप पाहून **वामन**पंडीत भयभीत होत्साते बोलूं लागले.

"**स्वामी**, माझी समस्या पूर्ण झाली—"

"**वामना,**" **स्वामी** पूर्व स्वरूप धारण करून बोलले, "तुझी समस्या पूर्ण झाली किंवा नाहीं?"

"नाहीं!"

"अरे, पूर्वींच समस्या पूर्ण झाली असें म्हणून आतां पुन्हां झाली नाहीं म्हणतोस याचा अर्थ काय?"

"**स्वामी**, आपण आय रुद्ररूप धारण केलें त्याबरोबर बोलायचें सामर्थ्य कोणाचें आहे?"

"तुम्ही **पंडित**. सर्व ग्रंथांचें अवलोकन करीत असून बरोबर उंटाचे उंट पुस्तकें बाळगून जयपत्रें घेत होतां आणि चौदा ब्रह्में स्थापून तीं उडविलीं हें कोणत्याही ग्रंथीं पाहिलें नाहीं असें म्हणतां, याचें आश्चर्य वाटतें. बृहदारण्यकांत चौदा ब्रह्मांची अवस्था काय आहे ती पाहा."

**वामन**पंडितांनीं बृहदारण्यकांत **स्वामींच्या** सांगण्याप्रमाणें पाहिलें तों त्यात **स्वामींच्या** म्हणण्याप्रमाणें असल्याबद्दलची खात्री झाल्यावरून त्यांनीं **स्वामींस** नमस्कार घातला व प्रार्थना केली.

"**स्वामी**, आपण जी आज्ञा केली ती यथार्थ आहे. आतां माझें मन निःसंशय झालें."

"बापा," **स्वामी** बोलूं लागले, "सांप्रतकाळीं कलियुगीं मनुष्य केवळ प्राकृत बुद्धीचे आहेत. त्यांच्या उद्धाराविषयीं तुम्हांला व आम्हांला **श्रींची** आज्ञा झालेली आहे. यास्तव इतःपर या प्राकृत जनांस संस्कृताचा उपयोग नसल्यामुळें संस्कृताच्या आणि वेदवाणीच्या अभिप्रायासहित प्राकृत वाणीनें श्रीहरिगुणानुवाद वर्णून आपली वाचा पवित्र करावी आणि देहाचें सार्थक करून जगदुद्धार करावा."

**समर्थाज्ञे**प्रमाणें **वामन**पंडितांनीं **समर्थांच्या** सन्निध राहून **निगमसारादि** बहुत ग्रंथ मराठी भाषेंत निर्माण केले ते **स्वामींनीं** पाहिले व ऐकले. या प्रकरणाच्या प्रारंभीं जें स्तोत्र आहे तेंच **वामन**पंडितांनीं याप्रसंगीं **समर्थांच्या** देखत म्हटलें व **समर्थांच्या** इच्छेप्रमाणें ते **शिवराजाला** स्वराज्याचा राज्याभिषेक होईपर्यंत **समर्थसेवेंत** राहिले. याच अवधींत जगदुद्धारासाठीं **समर्थाज्ञेवरून वामनपंडितांनीं यथार्थदीपिका** वगैरे बारा लक्ष ग्रंथ लिहिला व **शिवराजांच्या** राज्याभिषेकसमयीं महाराष्ट्राचें ज्योतिष वर्तवून कुटुंबासह स्वगृहाचा रस्ता धरला.

असे जे **वामन**पंडित, ज्यांना **समर्थांनीं** ' यमक्या वामन ' अशी पदवी दिली, ते एके दिवशीं परळीगडावरून इकडे तिकडे डोंगरांत हिंडत असतां स्वगत विचारांत अगदीं तल्लीन होऊन गेले होते. त्यांचे स्वगत विचार पुढील-प्रमाणें चालले होते.

" सर्व भरतखंडांत मनाचें समाधान करणारे सध्यां कायते एक **रामदा**सच आहेत. अशा या थोर पुरुषाला **समर्थ** हें नांव अगदीं योग्य आहे. हेच राष्ट्रगुरु **समर्थ** खरे. विद्येच्या जोरावर सर्व आर्यावर्त पादाक्रान्त करून चहूंकडून जयपत्रें मिळविलीं; परंतु मनाचें समाधान करून ब्रह्माची जोड अखेरीस **श्रीतुकाराम**महाराजांच्या सांगण्याप्रमाणें **श्रीसमर्थां**कडूनच मिळाली आणि आतां हा आत्मा ब्रह्मानंदांत कसा निमग्न झाला आहे. ह्या दोन्ही साधूंची उत्पत्ति जरी दोन मातांपासून स्वतंत्र वर्णांत झाली आहे, तरी ती लौकिक दृष्टीची आहे. पारमार्थिक नजरेनें ते दोघे सहोदरच आहेत. दोघेही स्वधर्मरत स्वदेशभक्त विरक्त खरेच. सैनिकांप्रमाणें शिधालोटा, तवापितळी पडशींत पाठीशीं बांधून ऐक्यकारक पांडुरंगाची भगवी पताक खांद्यावर फडकावीत आणि गळ्यांत तुळशीमाळा व मस्तकावर गोपीचंदनाचा वैकुंठीचा शिक्का मारून **श्रीतुकाराम**महाराजांचे अनुशासित स्वधर्मांचे शूर शिपाई, समाजाला व्यवस्थित स्वरूप देण्याकरतां, वितंडवादी लोकांवर मुखानें अभंगांचे कोरडे उडवीत, तांड्यातांड्यानें जाऊं लागले म्हणजे **तुकोबा**रायांच्या अभंगवाणीचा अभंग जयजयकार ह्या कानांत घुसून अंधपरंपरेच्या रूढींना झुगारून देण्यास हें मन सज्ज होतें आणि **श्रीसमर्थांच्या** शिष्यांचा स्वातंत्र्यद्योतक भगवा

तोंडा वीररसप्रचुर असे खडखडीत स्वदेशाभिमानाचे मनाच्या बोधाचे श्लोक म्हणत यवनांच्या मुलुखांत कुबड्या घेऊन घुमूं लागला म्हणजे राक्षसांच्या विध्वंस करणाऱ्या रामायणांतल्या वानरसेनेची आठवण होऊन स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं—मी जीवन्मुक्त झालों असतांही—माझ्या हाताचीं हीं बोटें उच्छृंखल होतात. असा हा ब्रह्मानंदांत निमग्न होणारा आत्मा जर संसारांत स्वदेशबांधव आणि स्वराज्य यांसाठीं माघार घेऊं पाहातो, तर हरघडीं होत असलेल्या हालांचा प्रतिक्षणिं अनुभव घेत असलेल्या माझ्या देशभगिनी, आपलीं बोटें कडकड मोडून आपल्या भर्त्यांना भागूबाईपणाची शरम उत्पन्न करण्यास कधींतरी माघार घेतील काय?" असले विचार करीत करीत **वामन**स्वामी गडाच्या पायथ्याजवळ येऊन ठेपले. इतक्यांत त्यांना दुरून कोणीतरी दोन माणसें येत आहेत असें दिसलें. तेव्हां ते आपल्या मनाशीं म्हणाले, "ह्या दोन मूर्ती कोणाच्या इकडे येताहेत! विजयजिगीषेनें तप्त होऊन रेड्यांसारखे फुस्कारे टाकणारे हे दोघे कोण बरें असावेत?"

आपसांत तंटा होऊन, आपल्या वादाचा निकाल लावून घेण्यासाठीं दोघे राजज्योतिषी **श्रीसमर्थां**कडे जात असतां **वामन**पंडितांची व त्यांची **सज्जन**गडाच्या पायथ्याशीं अवचित गांठ पडली. तेव्हां त्या दोघां ज्योतिष्यांनीं **वामन**पंडितांना गडावरील इतर पोटभरू लोकांप्रमाणेंच समजून मोठ्या तोऱ्यानें म्हटलें "नमस्कार हो भटजीबोवा!"

"नमस्कार."

त्या तिघांत पुढीलप्रमाणें भाषणचमत्कार सुरू झाला.

"तुम्ही **सज्जन**गडावरच **समर्थां**च्या सेवेंत असतां काय?"

"होय!"

"मग आतां **समर्थ**दर्शन होईल काय?"

"कां बरें? कांहीं जरूरीचें काम आहे वाटतें?"

"तुम्हांला काय? विचारल्या प्रश्नाचें उत्तर द्या अन् चट्कन् मोकळे व्हा!"

"हो, दुसरें काय तर! ज्योतिष्यानें मुहुर्त सांगितला कीं चालूं लागतांना दक्षिणा देऊन मोकळें व्हावें."

"अहो, पण मंगळाच्या घरीं शनि असून, त्याची जर रवीवर दृष्टि असेल

तर त्याचा परिणाम काय होतो तो मीं का आपल्यासारख्या विद्वानांना सांगायला पाहिजे ?"

"तुम्ही ज्योतिष पढलेले आहांत वाटतें ?"

"मुख्य मुख्य अंग पढलों आहें !"

"मग ह्या आर्यभूला खरें निर्भेळ स्वराज्य केव्हां मिळेल तें सांगा पाहूं ?"

"ह्या गोष्टीला प्रथम दुष्टग्रहांच्या शमनार्थ दानें नंतर जप आणि मागून यज्ञ इतक्या क्रिया यथोचित झाल्यावर एका घटकेंत स्वराज्याचें निशाण फडकेल."

"या बाबतींत ग्रह कोणचे वाईट आले असून त्यांनां दानें कोणचीं केलीं पाहिजेत ?"

"प्रथम, उच्चवर्ण जे ब्राह्मण ते दुष्ट ग्रहांचें वर्तन करूं लागल्यामुळें त्यांनीं धरलेल्या हट्टवादीपणाच्या बलिष्ठ रूढीशास्त्राचें रणयज्ञांत प्रथम दान करून नंतर त्यांना समर्थांच्या महाराष्ट्रधर्माची दीक्षा दिली पाहिजे."

"बरें, पुढें आपलें ज्योतिष काय वर्तवतें आहे ?"

"पुढें, नामशेष होऊं पाहाणारा वृथाभिमानी जो क्षत्रियवर्ग सध्यां थोडासा जिवंत राहिला आहे त्या वर्गाचें कुशल त्या ब्राह्मणांकडून चिंतण्याकरितां, मराठे क्षत्रियांच्या मूर्खपणाच्या कृतींचें अंजन त्यांच्याच डोळ्यांत घालून त्यांच्या हातांत द्वैताच्या मेरुमण्याची जी माळ आहे ती काढून घेऊन अद्वैताची दिली पाहिजे—"

"आणि तो जप संपल्यावर यज्ञ केला पाहिजे ! नाहीं का ?"

"अलबत् ! अहंपणाचें यजन आवडणारा यज्ञ अखेरीस झालाच पाहिजे."

"इतकें झालें कीं स्वराज्य !"

"यांत शंका कसली ?"

"ही ज्योतिष वर्तवण्याची पद्धत कोणच्या ग्रंथांत सांगितली आहे ?"

"अद्वैतज्योतिषमीमांसेंत !"

"हा ग्रंथ पठन केल्याला आपल्याला किती दिवस झाले ?"

"तीन महिने !"

"अरे वाः ! अगदीं ताजेंच अध्ययन आहे म्हणायचें ?"

" श्रीसमर्थांच्या आज्ञेवरून श्रीशैलपर्वतीं कर्दली वनांत अवधूत मूर्तीच्या सेवेंत होतों तेथें नित्यानित्यविवेकाचें अध्ययन सुरू होतें —"

" मग त्याचा कंटाळा आला म्हणून हा नवा विषय हातीं घेतलांत वाटतें ? "

" छेः छेः ! अवधूत मूर्ति समाधिस्त झाले म्हणून इकडे आलों–"

" त्यापूर्वी कोठें होतां ? "

" तत्पूर्वीचा माझा इतिहास फार मोठा आहे ! वेळ असल्यास सांगतों. "

" चलाहो, आपण जाऊंया ! इतिहास कसले ऐकतां ? "

" बरें पण तुमचें नांव कायहो ? "

" ह्या देहाला लौकिकांत वामनपंडीत ज्योतिषी असें म्हणतात; परंतु पारमार्थिकदृष्ट्या मी कोणी नाहीं आणि सर्व आहें ! "

" वामनस्वामींनीं आपल्या नांवाचा निर्देश केल्याबरोबर ते दोघे राज-ज्योतिषी मूढचित्त होऊन लज्जित झाले. त्यांना शरण गेल्यावांचून गत्यंतर नाहीं असें पक्कें वाटलें व त्यामुळें त्यांनीं क्षणाचाही विलंब न करतां वामन-पंडितांच्या पदकमलीं लोटांगण घातलें.

" अहो, तुम्ही उभयतां राजज्योतिषी ! " वामनपंडीत बोलले, " माझ्या-सारख्या यःकश्चित्तानें आपणांसारख्या भूदेवांच्या चरणसरोजीं भ्रमरासारखें मिलिंदायमान व्हायचें तें बाजूलाच राहून आपण जर माझ्याच पायां पडूं लागलांत तर सुरूच्या झाडाचें कळसदार सौंदर्य बांकदार कमरेनें नाश पावलें म्हणून बोरीच्या झाडांनीं रडत बसायला नको काय ? "

" पंडीतमहाराज, क्षमा असावी. आम्हीं उभयांनीं आपल्याला न ओळ-खतां आपली चेष्टा केली याबद्दल माफी असावी ! "

" काय ! तुम्ही माझी चेष्टा केलीत ? मला जरी ती समजली नाहीं, तरी ती तुम्हीं केल्याचें तुम्हींच कबूल करीत आहांत. ह्यावरून हा तुमच्यांतला व्यर्थ अभिमान आणि द्वैतभाव स्पष्ट होतोना ? "

" पंडीतमहाराज, पुरें आतां ! मेलेल्याला मारण्यांत काय अर्थ आहे ? समर्थांसारखे चौदा ब्रह्में उडवणारे आपल्यापुढें असतांही ज्यांना कृतांतभक्षक हनुमंताचें रूप धारण केल्याशिवाय आपली खात्री करतां आली नाहीं, त्या सर्व

आर्यावर्तात जयपत्रें मिळवलेल्या आपणांपुढें शब्दवादांत आम्ही कितपत टिकणार ? "

" आम्ही दोघेही श्रीशिवाजीमहाराजांचे आश्रित ज्योतिषी असून, महाराजांचे ज्येष्ठ चिरंजीव युवराज संभाजीराजे यांच्या जन्मग्रहांबद्दल आमच्यांत वाद पडलेला आहे. हल्लीं त्यांचें वय सहा वर्षांचें झालें असून सध्यांच्या त्यांच्या ग्रहांवरून इतउत्तर त्यांच्यापासून त्यांच्या वडिलांच्या जीवास धोका येऊन ते स्वतः व्यसनाधीनतेंत अखेरीस स्वप्राणांसह सर्वस्व गमावतील असें माझें मत आहे. "

" पापी ग्रहांवरून व इतर ग्रहांवरून त्यांच्यापासून त्यांच्या वडिलांना कांहींएक इजा न होतां ते पालथे उपजले आहेत म्हणून शत्रूला पालथा घालतील. लढायांची शर्थ करतील; परंतु दगलबाजीनें शत्रूच्या हातीं लागून त्यांच्यावर मोठा कठीण प्रसंग गुदरेल असें शास्त्रप्रमाणांवरून मी सिद्ध करून दाखवतों. "

" माझ्याही म्हणण्याला शास्त्राधार पूर्ण आहे ! "

" अशा तऱ्हेचा हा तुमचा वाद असेल; पण पुढें काय ? " वामनपंडितांनीं विचारलें.

" ह्याच तंट्याचा निकाल श्रीसमर्थांच्या मध्यस्थीनें आपल्याकडून लावून घेण्याकरतां आम्ही आलों आहोंत ! "

" कोणाच्या ? माझ्याकडून ? " वामनपंडितांनीं विचारलें, " वाः ! योग्य! त्रिकालज्ञानी समर्थांच्याशिवाय या गोष्टीचा निकाल लागणें शक्य नाहीं. फार तर आम्ही गणित करून सांगूं; परंतु टाळा बघायला समर्थांचीच शक्ति पाहिजे. "

" कसेंही करून आमची मुखाशीं गांठ घाला म्हणजे झालें. "

" चला तर ! "

# प्रकरण चौदावें.

## ' ऐसें कैसेरे सोंवळें । शिवतां होतसें ओवळें ? '

"हे **रामदास**स्वामी वैष्णव-हामी वैष्णव ! हामी तप्त **मुद्रां**-कित-ह्य-अवर इल्ला ! स्वयंपाक माडियेनें पात्र बळसु-कोंड्य ! स्वामी बद्रु ! तुप्प बन्नु बळशिद्र ! पात्र **मुट्टिदरु** ! भोजन भ्रष्ट आयतु ! पात्र दुसरा मुट्टिदरु-भोजन माडुदिल्ला !" अशा तऱ्हेची मोठ्यानें बडबड करीत-**त्रिवेंकटाचार्य** परळी गडावरील श्रीच्या मंडपांत पळत चालला असतां, त्याच्या मागोमाग **समर्थ** मोठ्यानें रडत पळत होते व त्यांच्या पाठीमागून **कल्याण** वगैरे शिष्य वर्गही धांवत होता. तें सर्व लटांबर श्रीच्या सभामंडपांत येऊन थड-कलें. **समर्थ** मोठा घसा काढून जोराजोरानें रडूं लागले.

" **समर्थ**ांनीं इतकें श्रमी कां व्हावें ? " **कल्याणा**नें उदास अंतःकर-णानें विचारलें.

" अहो, " **समर्थ** बोलूं लागले, " ह्या ब्राह्मणानें आपल्या हातानें श्रम-करून स्वयंपाक केला, पात्र वाढून घेतलें आणि तूप वाढतांना त्या पात्राला आमचा स्पर्श होऊन तें विटाळलें ! " **समर्थ** मोठ्यानें रडण्याचा हुंदका देऊन म्हणाले, " त्यामुळें या ब्राह्मणाचें भोजन अंतरलें ! केवढा हा माझा अपवित्र देह ! अशा या अपवित्र देहांत माझा आत्मा कोणच्या सुखाला लालचावून आनंदानें विहार करतो आहे त्याचा उलगडा होत नाहीं म्हणून रडूं येतें ! "

" महाराज, आपण श्रमी होऊं नये. ब्राह्मणाला पुन्हां साहित्य देतों. ते पुन्हां चरु उतरून भोजन करतील ! " **कल्याणा**नें विनंति केली.

" बापहो, ब्राह्मणाला स्वयंपाक करून भोजन करण्याला चार घटका लाग-तील, एवढ्याकरतां मला दुःख होत नाहीं व मी त्याबद्दल श्रमीही होत नाहीं;

परंतु **श्रीरघुपतीनें** हा देह इतका अपवित्र कां उत्पन्न केला म्हणून दुःख होऊन रडें कोसळलें. "

" आज हे काय उद्गार निघताहेत ? " **कल्याण** कष्टी होऊन बोलला.

" **कल्याणा,** सर्व प्राण्यांचे देह अपवित्रापासूनच उत्पन्न होतात; परंतु हा देह आज कुत्र्याच्या देहापेक्षांही अशुद्ध ठरला आहे. म्हणून मोठमोठ्यानें रडूं येतें. बरें, तें आमच्या स्पर्शानें विटाळलेलें अन्न विष्णुतीर्थानें सुद्धां शुद्ध होऊं शकत नाहीं. तेव्हां आतां हा असा अपवित्र ठरलेला देह या जगांत तरी राहण्याला कसा योग्य होईल ? "

" महाराजांनीं आज हें काय मांडलें आहे ? याचा उलगडा होत नाहीं ! "

" **कल्याणा,** याचा अर्थ त्या आचार्यांना विचार ! ते ब्राह्मण म्हणजे प्रत्यक्ष भूदेव. त्यानीं रडतोंडीच्या घाटांत कुत्रें शिवलेला भात विष्णुतीर्थानें शुद्ध करून खाल्ला होता कीं नाहीं हें त्यांनाच विचार, म्हणजे माझ्या बोलण्याचा अर्थ तुला समजेल. "

रडतोंडीच्या घाटांतल्या कुत्रें शिवलेल्या भाताची गोष्ट **समर्थ** बोलल्याबरोबर **त्रिवेंकटाचार्य** ओशाळा झाला. त्यानें तोंडांत मारून घेऊन **समर्थांच्या** पायांवर डोकें ठेवलें व पश्चात्तापपूर्वक अंतःकरणानें तो बोलूं लागला.

" अपराध झाले. वदन कृष्ण करते. मुखांत मारते. पादूक मारणें. कपाळमोक्ष करणें. शिक्षा करणें. पापी रक्षा करावा. माफी मागते. **समर्थ**नाम योग्य झालें. **उडुपि** गार्‍ह **मध्वाचार्य** परुक्षा भयाला धाडले—परुक्षा झाले. नानु पापी. क्षमस्व बेकु. टुबत माळा कष्ट आयतु. मानु होगुल्येने—आतां हामी येत्ये ! "

" केवढा चमत्कार आहे पाहा ! " **समर्थ** म्हणाले, " सर्व बाजूंनीं वठत चाललेल्या ह्या आमच्या आर्यवृक्षाच्या फळांची सांप्रतची स्थिति किती चमत्कारिक झाली आहे ! शत्रूचा निःपात करून स्वदेश आणि स्वधर्म यांच्या रक्षणाकरतां ज्यांनीं आपलीं शिरें तळहातांवर घेतलीं आहेत आणि ज्या शेतकर्‍यांवर आम्ही आपला उदरनिर्वाह करतों, त्या आमच्या मूळांच्या गड्यांसह ऐश्वर्यवृद्धींत सुखानें ठेवणारा आमचा खरा वैदिक धर्म बाजूला राहून ' शास्त्रात् रूढिर्बलीयसी ' ह्या तत्त्वावर खोट्या मार्गांचेंच स्तोम सध्यां सर्वत्र

माजलेलें दिसतें आहे. मुद्दाम कडू कारलें खाऊन जिभेची रुची बदलण्या-सारखेंच हें कृत्य नव्हे काय? सोंवळ्याओंवळ्याच्या बंडाळीसंबंधानें तर विचारूंच नका. अहो, जेथें आपलें असें म्हणण्याला कांहींच राहिलें नव्हतें—ईश्वर सर्वव्यापी आहे असें तोंडानें बडबडत असतां, गळ्यांतल्या उबींत अगर संपुष्टांत देवाला कोंडून ठेवण्याच्या योगानें जे स्वबांधवांसह शत्रूकडून सर्वस्वी कैद झाले—त्या सर्व गोष्टी झाडून टाकून, खऱ्या धर्माचें स्वराज्य स्थापन करण्यास शिवाजी-मार्तंडाचा उदय झाला असून-वृद्ध मार्तंडाच्या योगानें सांवलीप्रमाणें दूर पळालेलें तुमचें वैभव आज तुमच्या जवळ जवळ येऊं पाहात असतां, अद्याप तुम्ही स्पर्शास्पर्शासारख्या कःपदार्थ गोष्टींच्या उच्चारानें द्वैतभाव आणि अहंमन्यता यांच्याशीं फारकत न करतां देश-हिताचा गळा दाबून त्याचा प्राण घेण्याच्या खटपटी करतां, याला काय म्हणावें? देह हा मूळचा अमंगळ आणि विटाळाचा उकिरडा असतां, त्याला शुद्ध करण्याकरितां बाह्योपचाराकरतां सक्षौर प्रायश्चित्तें देतां आणि शूद्रादि-कांचा स्पर्श झाला असता त्याला विटाळ मानून पातकनिरसनार्थ स्नानें करतां! परंतु अंतरंगीं काय चालल असतें त्याचा यत्किंचित तरी विचार करता काय? ह्यानेंच आमच्यांतला ऐक्यभाव नष्ट झाला आहे. ब्राह्मणांना अपमतलबी-पणाचा डाग ह्यानेंच लागला आहे. पण खरें पाहिलें असतां सध्यां ज्यांना ब्राह्मण म्हणतां येईल असे-कुलाचा विचार बाजूला ठेवून-ब्रह्मकर्मानें चालणारे ब्राह्मण तरी किती निघतील? वेदघोष करणारे सध्यांचे शेंकडा नव्याण्णव ब्राह्मण म्हणजे, निव्वळ प्रतिध्वनिवाहक यंत्रेंच झालेलीं असून त्यांना मूळच्या ऋषींचे तोतये वंशज म्हणायला कांहींच हरकत नाहीं. पुराणिकबोवा तर काय? पुराणांतलीं वांगीं पुराणांत—अशा तऱ्हेचे बनलेले आहेत. परमेश्व-राच्या पुढें सभामंडपांत पुराणांतल्या अनेक नीतिमत्तेच्या गोष्टी सांगून स्वतःचें वर्तन पाहिलें तर-अरेरे-कोण तो त्यांचा स्वार्थाकरितां दांभिकपणा! मुंडनादी बाह्योपचारांनीं शुद्ध केलेला देह पुन्हां अपवित्र होणारच. आणि पुन्हां त्याच परंपरेच्या उपचारांनीं तो शुद्ध करीत बसण्यापेक्षां अंतःकरणाच्या शुद्धतेकडे जर लक्ष दिलें तर तेथेंच द्वैताचा खून होऊन स्वराज्याचा मूळ पाया जें स्वजनांचें ऐक्य तो पाया भक्कम होऊन त्यावर उभारलेलें स्वराज्य

सर्व जगाचे डोळे दिपवण्यासारखें वैभवशाली होणार नाहीं काय ? अनेक प्रकृतींचे जसे अनेक स्वभाव असतात, परंतु मूळ प्रकृति एकच असते तद्वतच, आमच्यांत जरी भिन्न पंथ, भिन्न जाति आणि भिन्न रीतिरिवाज आज वावरत आहेत, तरी आम्ही मूळचे जे एकच आहोंत तें मूळ—निदान स्वराज्याच्या संस्थापनेकरितां तरी—आपापसांतले तंटे स्वराज्यसंस्थापना होईपर्यंत बाजूला ठेवून आम्हीं न सोडणें हेंच सध्यांच्या काळीं इष्ट असून आमच्या ऐक्यानेंच आम्ही स्वातंत्र्याचा अमृतानुभव घेण्यास पात्र होणार आहोंत. कोणचाही देश परकीय अमलाखालून निघून स्वराज्य चालविण्यास पात्र होण्यास त्याच्यांतली आपापसांतली दुही नष्ट झाली पाहिजे. ऐक्यानें शत्रूचा प्रतिकार करणें म्हणजेच अंगीं असलेल्या पात्रतेचें प्रदर्शन करणें होय. न्यायाचें पारडें नेहमीं जबरदस्ताच्या बाजूचेंच असतें. त्यामुळें नष्ट झालेल्या वस्तूचा मालक जरी आपलें गेलेलें मिळवण्याचा प्रयत्न करूं लागला, तरी तो त्याची वस्तु गिळंकृत करून बसलेल्याच्या थट्टेला-कुचेष्टेला—पात्र होतो व त्याच्यापाशीं दंडुकेशाही नसल्यामुळें न्यायदेवता त्याच्याकडे पाठ फिरवते. पांडवांनीं आपलें सर्वस्व द्यूतांत गमाविलें म्हणून ते स्वराज्याच्या उपभोगाला अपात्र आहेत असा दुर्योधनानें जरी त्यांच्यावर शिक्का मारला होता, तरी त्यांनीं जेव्हां दंडुकेशाही पत्करली तेव्हांच ते स्वतःच्या कर्तबगारीनें स्वराज्य चालविण्यास दुर्योधनाच्या मतानें पात्र ठरले. त्यांनीं स्वराज्याची भिक्षा दुर्योधनापाशीं प्रत्यक्ष भगवंताच्या मार्फत मागितली होती; परंतु तिचा काय उपयोग झाला ? भिक्षेनें कधींही स्वराज्य मिळत नसतें. हर उपाय करून हातांत शस्त्र धरून समरांगणांत टाकल्याशिवाय कधींच कोणी स्वराज्याला पात्र होणें शक्य नाहीं. भिक्षांदेहीच्या झोळ्यांचा उपयोग जसा स्वजनहिताकरतांच करणें न्याय्य आहे तद्वतच अंगची पात्रता सिद्ध करणें हें धाडसानें हातीं समशेर धरून 'गौघास खाते डेरा बताव' असें केल्याशिवाय कधींही होणें शक्य नाहीं. आमच्या **शिवराजानें** भिक्षा न मागतां स्वजनसाह्यानेंच हें कर्म सध्यां चालविलें आहे. त्याकडे लक्ष द्या आणि भिक्षा मागून स्वराज्यप्राप्ति कधींच होणार नाहीं हें पक्कें लक्षांत ठेवा. आम्हीं **शिवबाला** सांगितलेला **महाराष्ट्रधर्म** लक्षांत आणा आणि ऐक्यानें परकीय सत्तेवर तुटून पडा म्हणजे तुमचें गेलेलें वैभव—तुमच्यापासून परकीयांनीं अनेक

लटपटींनीं छिनावून नेलेली तुमची भाग्यश्री–तुमच्या गळ्यांत खात्रीनें माळ घालील. स्वार्थाचे पिढीजात वारस बनलेले आमचे देशबंधु या बोधाकडे लक्ष देतील तर त्यांत त्यांच्याच नव्हे, तर त्यांच्या वंशजांचाही उत्तम तऱ्हेचा फायदा होणार आहे. बाह्यात्कारी स्पर्शास्पर्शासारखेंच सोंवळें व ओंवळें हें सर्व झूट आहे. अंतरंग साफ असेल तर वाटेल त्या क्रिया वाटेल त्याला हव्या त्या स्थितींत पार पाडतां येतील. हे आमचे **त्रिवेंकटाचार्यच** पाहांना ! माझा स्पर्श झाला म्हणून वाढलेल्या पात्रावरून उठले व विटाळ झाला म्हणून ओरडत सुटले; परंतु हे स्वतः काय करीत आहेत तें यांचें यांनाच कळत नसून यांनी सोंवळ्याओंवळ्याचा मात्र पोकळ बंडावा माजवला आहे. खरें पाहिलें असतां ही बंडाळी किती मूर्खपणाची आहे ती पाहाः—

**अस्थींचा विटाळ होतां स्नान केलें ॥**
**चुडे दांतावले कासयासी ॥ १ ॥**
**आचमन करावें शूद्राच्या विटाळें ॥**
**हाटाचें चौढाळें कोण जाणें ॥ २ ॥**
**नदीचे प्रवाहीं आंत पाहों नये ॥**
**स्नानसंध्या होय अग्रोदकीं ॥ ३ ॥**
**ओले चर्मी दूध होत आहे हिंग ॥**
**स्वयंपाकीं सांग सेविताति ॥ ४ ॥**

तेव्हां बापहो,—

**ऐसें कैसेंरे सोंवळें ॥ शिवतां होतसें ओंवळें ॥**
**स्नानसंध्या टिळे माळा ॥ पोटीं क्रोधाचा उमाळा ॥**
**नित्य दंडीताती देहो ॥ परी फिटेना संदेहो ॥**
**नित्य नेम खटाटोप ॥ मनीं विषयाचा जप ॥**
**बाहे केली झळफळ ॥ देहबुद्धीचा विटाळ ॥**
**रामदासीं दृढभाव ॥ तेणेंवीण सर्व माव ॥ "**

**समर्थांच्या** उपदेशांतल्या अभंगाचा शेवटचा चरण संपतो आहे तोंच **समर्थांच्या** वरील मताला दुजोरा देण्यासाठीं **कल्याणस्वामींनीं** पुढील पद्य म्हटलें.

> धरा श्रीधरा त्या हरा अंतरातें ॥
> तरा दुस्तरा त्या परा सागरातें ॥
> सरा वीसरा त्या भरा दुर्भरातें ॥
> करा नीकुरा त्या खरा मत्सरातें ॥

जयजय रघुवीर समर्थ ! "



# प्रकरण पंधरावें.

## तीस फकीर.



**शहाजीच्या** अनुकूलतेनेंच **शिवाजीनें** बंडावा माजविला असेल असें **विजापुरच्या** बादशहास वाटून त्यानें **शहाजीला** धरून कैदेंत ठेवलें; आणि '**शिवाजी** लवकर आपल्या अपराधाची क्षमा मागायला न येईल तर तुझा जीव घेईन' असें बादशहानें **शहाजीस** भय घातलें. ही बातमी **शिवाजीला** कळतांच त्यानें **दिल्लीचा** बादशहा **अकबर** याची सरदारी करण्याचें कबूल करून त्याजकडून विजापूरकरांस दहशत घालून आपल्या बापाची सुटका करवली. नंतर त्यानें पुष्कळ फौज ठेवून आपल्या मुलखाचा बंदोबस्त चालविला. इ. स. १६५६ यावर्षी त्यानें **शामराजपंत** या नांवाच्या एका ब्राह्मणाला **पेशवा** असें पद देऊन त्याला आपला मुख्य कारभारी केलें आणि सारी **कोंकणपट्टी** हस्तगत करून घेण्याच्या उद्देशानें **शामराजपंता**-बरोबर कांहीं सैन्य देऊन त्याला जंजीऱ्याच्या शिद्दीवर पाठविलें; परंतु तेथें त्याचा पराभव झाला म्हणून त्याच्याकडून **शिवाजीनें** पेशवाईचा अधिकार काढून **मोरोपंत पिंगळे** याला तो अधिकार दिला व **विजापुराहून** चालून येणाऱ्या **शिद्दी जोहारावर** पाठविलें. याप्रमाणें **शिवाजीचा** दंगा पुन्हां चालू झाला. तेव्हां विजापुरच्या दरबारांत त्याचें पारिपत्य करण्याचा निश्चय होऊन त्या कामावर **अफजुलखान** फौजेसह इ. स. १६५९ सालीं चालून आला. त्याचें पारिपत्य **शिवाजीनें** केल्यावर, पुन्हां **शिवाजीवर** चालून आलेल्या विजापूरकरांच्या **रुस्तुमजमान** नांवाच्या सरदाराचा **शिवाजीनें** पुरा मोड केला आणि विजापुरापर्यंत मुलुखाची खंडणी घेतली. नंतर त्यानें एकदम **कोंकणांत** शिरून दाभोळ शहर लुटलें. विजापूरकरांकडून **शिद्दी** जोहार नांवाचा सरदार **शिवाजीवर** चाल करून आला. त्यावेळीं **शिवाजी** पन्हाळगडावर होता. **शिद्दीनें** ही संधी पाहून गडाला वेढा दिला; त्या

किल्ल्यांत शिवाजी सुमारें चार महिने अडकून राहिला होता, त्यामुळें त्याच्या मुलखांत फारच अव्यवस्था माजून राहिली होती. म्हणून, शिवाजीशीं त्यानें तह करण्याचा घाट घातला, त्यामुळें वेढा घालणारे लोक थोडे गैरसावधपणानें वागूं लागले. हें पाहतांच शिवाजी शेलके मावळे लोक बरोबर घेऊन एका काळोख्या रात्रीं गडावरून निसटून गेला. शिवाजी पन्हाळगडावरून जो निघाला तो त्यानें घोडखिंडीचें रक्षण करण्याकरितां थोडे मावळे बाजी देशपांड्याच्या हाताखालीं ठेवून खेळणा किल्याचा आश्रय केला. याच-वेळीं कर्नाटकांत बंडें उत्पन्न झालीं होतीं, त्यामुळें तीं मोडण्याचें विजापूरच्या बादशाहास अगत्य पडल्यामुळें शिवाजीचें पारिपत्य करण्याचें काम कांहींसें ढिलें पडलें.

विजापूरकरांची फौज कर्नाटकांत गुंतली आहे असें पाहून शिवाजीनें पुन्हां त्यांचे कित्येक किल्ले घेतले व सांवतांचा वाडी प्रांत जिंकून घेतला. अशा तऱ्हेचा शिवाजीचा अलौकिक पराक्रम पाहून विजापूरकरानीं अगदा मेटाकुटीनें त्याच्याशीं बासष्ठ सालीं तह केला. या वेळीं कल्याणपासून गोंव्या-पर्यंतची सारी कोंकणपट्टी आणि भीमेपासून वारणेपर्यंतचा सुमारें १६० मैल लांबीचा घाटमाथा इतका मुलूख शिवाजीच्या ताब्यांत होता. त्याच्या मुलखाची रुंदी सुप्यापासून जंजीऱ्यापर्यंत सुमारें १०० मैल होती. शिवाजीजवळ यावेळीं पन्नास हजार स्वार आणि सात हजार पायदळ इतकें सैन्य होतें.

याप्रमाणें शिवाजीला विजापूरकरांपासून भीति नाहींशी होऊन तो कांहींसा मोकळा झाल्यामुळें ६२ या वर्षी तो दिल्लीच्या बादशाहाच्या मुलखांत स्वाऱ्या करूं लागला. प्रथमतः त्यानें आपल्या रिसाल्यावरच्या नेताजी पालकर नांवाच्या फौजबक्ष सरदाराकडून औरंगाबादेपर्यंत मोंगलांचा मुलख लुटून फस्त केला व पुष्कळ द्रव्य जमा केलें. हें वर्तमान दिल्लीपति औरंगजेबाला समजतांच त्यानें शाइस्तेखान नांवाचा आपला सरदार शिवाजीचें पारिपत्य करण्यास धाडला.

या सरदाराची शिवाजीनें कशी हबेलंडी उडवली तें कथानक मोठें बहा-रीचें आहे। शिवाजीनें जीं जीं कर्में केलीं त्यांपैकीं एकही बहारीचें आणि

अचाटपणाचें नव्हतें असा कोणचा इतिहास साक्ष देईल बरें ! स्वराज्यस्थापनेसाठीं **शिवाजीनें** ज्या ज्या गोष्टी केल्या त्या सर्व मोठ्या आश्चर्यकारक, अद्भुत आणि विस्मयपूर्ण होत्या असेंच सर्व इतिहासकार एक वाक्यतेनें कबूल करीत आहेत.

**शाइस्तेखान** दिल्लीहून जो मोठ्या तोऱ्यानें जंगी सैन्य घेऊन मोठाल्या मजला मारीत दक्षिणेंत आला तो त्यानें आपला दक्षिणेंतला अखेरचा–हो, अखेरचाच म्हणायला काय हरकत आहे–मुक्काम **शिवाजीच्या** पुण्यांतील खास वाड्यांतच केला. **शाइस्तेखान** ज्यावेळीं पुण्यास येऊन **शिवाजीच्या** वाड्यांत तळ देऊन बसला त्यावेळीं **शिवाजी सिंहगडावर** होता. **शिवाजीला शाइस्तेखानाच्या** आगमनाची जेव्हां वार्ता समजली तेव्हां त्यानें शत्रूची हबेलंडी उडविण्याची मोठी बहारीची क्लृप्ति योजिली. ते दिवस हिंदूंचीं लग्नें होण्याचे होते. **शिवाजीनें** बारीक तऱ्हेची टेहळणी करण्यासाठीं आणि गांवांत लग्नें कोणाकडे आहेत त्याची माहिती मिळविण्यासाठीं आपले गुप्त हेर धाडले व सर्व तऱ्हेची अत्यावश्यक अशी बातमी मिळवून तो **शाइस्तेखानाचा** समाचार घेण्यास सज्ज झाला.

सध्यां ज्याप्रमाणें गांवांतील कोणच्याही मिरवणुकीला पोलिसचा परवाना लागतो तसाच त्यावेळींही परवाना लागत असे. आमची गोष्ट ज्यावेळीं घडली त्यावेळीं **पुणें** गांव पूर्णपणें **शाइस्तेखानाच्या** कब्जांत गेलेला असल्यामुळें सर्वत्र फारच कडक अशी नाकेबंदी झालेली होती. अशा नाकेबंदींतून प्रवेश करून **शिवाजीला** आपलें बिकट कार्य साधायचें होतें. सध्यांचें **पुणें** आणि शिवकालीन **पुणें** यांत महदंतर होतें. **शिवकालीन पुणें** केवढें होतें हें सध्यां दाखवावयाचें झालें तर **कसबा** पेठेकडे बोट करतां येईल. **कसब्या**-शिवाय सध्यां जें **पुणें** शहर दृष्टीस पडतें तें ओसाड रान आणि शेतकी जमिनी यांनीं व्याप्त होतें. **शनिवारवाड्याच्या दिल्लीदरवाज्याच्या** शेजारीं जो **मस्तानी** दरवाजा आहे व त्यांच्याचपुढें वडाच्या झाडाखालीं जें मस्तानीचें थडगें आहे तें सर्व त्यावेळीं तेथें कांहींएक नसून ती सर्व जागा मुसलमानांचें कबस्तान होती. त्यावेळीं शेखसल्याच्या दर्ग्यांत एक मोठा पवित्र मुसलमानी धर्माचा फकीर राहत असे व त्याच्या आसपासचें सर्व मसणवट

त्याच्या हुकमतींत होतें. शेखसल्ला हें पूर्वी लक्ष्मीनारायणाचें देवालय होतें. तें दिल्लीपतीनें फोडून तेथें मुसलमानी दर्गा स्थापन केला होता. अशा दर्ग्यांत एकंदर तीस मुसलमानी फकीर येऊन एके दिवशीं उतरले. त्या सर्वांनीं तेथील पूर्वीच्या लक्ष्मीनारायणापुढें परंतु सध्यांच्या अवलियाच्या तक्यापुढे मुसलमानी धर्माप्रमाणें प्रार्थना केली व ते फकीर दोन प्रहरीं गांवांत भिक्षा मागायला निघाले. ते जे भिक्षा मागायला निघाले ते **शाइस्तेखान** ज्या **शिवाजीच्या** राहत्या वाड्यांत उतरला होता, त्याच बाजूनें दोहरे म्हणत गांवांत शिरले.

**कसब्याच्या** गणपतीलाच लागून जी फणीवाल्यांची तालीम आहे तिच्या शेजारीं जो वाडा आहे त्याला सध्यां जरी शितोळे देशमुखांचा वाडा म्हणतात, तरी **शिवकालीं** तो वाडा **शिवाजीचा** होता. **शिवाजी** आपल्या परम थोर गुरु **दादोजी कोंडदेवासह** त्याच वाड्यांत राहत असे. जो वाडा **शिवाजी**सारख्या परममंगल अशा आर्यधर्मसंरक्षकाचें वसतिस्थान होता तोच वाडा आर्यधर्मविनाशक अशा **शाइस्तेखानाच्या** पदरजांनीं कांहीं काल भ्रष्ट व्हावा हें कालचक्राचेंच अद्भुत कर्म म्हणण्यापेक्षां आर्यधर्माची कसोटी दाखविण्याचेंच शुभ कृत्य होय असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**कसब्याच्या** गणपतीजवळून दक्षिणेकडे जो रस्ता जातो त्याच रस्त्याच्या पुढील दोन चार गल्ल्या ओलांडल्यानंतर एका बारक्या गल्लींतील **शिवापूरकर देशपांडे** या नांवाच्या देशस्थ ब्राह्मणाच्या घरीं लग्नसंमारंभ चालला असून आज रात्रीं वरातीची मिरवणूक निघायची होती. त्या वरातीकरितां **देशपांड्यांनीं** एकंदर साठ माणसांच्या मिरवणुकीचा परवाना काढलेला होता. ते दिवस वद्य पक्षांतले होते.

वर सांगितलेले भिक्षा मागायला गावांत गेलेले फकीर **देशपांड्यांच्या** घराकडे भिक्षा मागत मागत आले. इतर घरांपुढें जशी त्यांनीं दोहरे म्हणून भिक्षा मागितली तशीच **देशपांड्यांच्या** घरापुढें उभे राहून मागितली. **देशपांडे** बाहेर आले व त्यांनीं त्या फकिरांच्या मोहरप्याशीं बोलण्यास सुरुवात केली.

" आपण सर्व दर्ग्यांत उतरलां आहांतना ? "

" होय. "

" फार दिवसांचा माझा नवस फेडायचा आहे. आपण सर्वजण आज रात्रीं आमचेकडे खुद्ब्याला याल काय ? "

" दर्ग्यांत ही गोष्ट जाहीर झाली पाहिजे. "

" तें काम माझें. "

" मग आमची कबूली आहे ! "

" तर मग आपण सर्व घरांत येऊन ओटीवरच्या बसकरावर बसावें. मी आपली हकीकत दर्ग्यांत कळवितों. "

" आपल्यासारखे भिन्न धर्माचे ब्राह्मण आम्हांला नवसाकरितां जेवूं घालतां हें ऐकून तक्यांतील सांईमहाराजांना मोठा आनंद होईल ! "

" यांत काय संशय ! आम्ही सर्व धर्म आमच्याप्रमाणेंच मानतों हें वर्तमान मुसलमानांना गुदगुल्या केल्याखेरीज कसें राहील ! या सर्वजण आंत माझ्या मागोमाग. "

**देशपांड्यांच्या** मागोमाग ते तीस फकीर घरांत गेले व ओटीवर पसरलेल्या जाजमावर जाऊन बसले. **देशपांड्यांनीं** आपल्या मुलाला दर्ग्यांत धाडून **सांईमहाराजांना** रात्रीच्या खुद्ब्याचें आमंत्रण केलें व तीस फकीरांची हकीकत कळविली. **सांईमहाराजांना** त्या रात्रीं **शाइस्तेखाना**कडे मेजवानीला जावयाचें असल्यामुळें त्यांनीं आमंत्रणाबद्दल आनंद व्यक्त करून आपल्या न येण्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली. रात्रीं खुद्बा झाल्यावर फकिरांना सकाळीं दर्ग्यांत धाडून देण्याबद्दल **सांईनीं देशपांड्यांच्या** मुलास सांगून त्याला पिराचा प्रसाद म्हणून अबीर व रेवड्या दिल्या आणि निरोप दिला. **देशपांड्यांचा** मुलगा परत आला त्यावेळीं तिन्हीसांजा झालेल्या होत्या. **देशपांड्यांच्या** घरांत त्यावेळच्या पद्धतीची लग्नघरची रोषणाई होण्यास सुरुवात झालेली असून सर्व घरभर माणसांची गलबल सुरू होती. फकीर ओसरीवर आपसांत गप्पा मारीत बसले होते. **देशपांड्यांनीं** आपल्या मुलाकडून दर्ग्यांतील हकीकत ऐकून घेऊन त्याला घरांतील कांहीं काम सांगितलें व आपण कांहीं कामाकरतां घरांत निघून गेले.

सुनमुख वगैरे विधी आटपल्यावर वरात निघाली. फिल्खोज, चिराग, सीखचिराग्, मशाली, हिलाल वगैरे सर्व तयार होऊन माहीदार सज्ज झाले. वरा-

तीची पालखी देशपांड्यांच्या घरून वाजत गाजत निघाली. पालखीपुढें सरायंदांचें गाणें व कलावंतिणींचा नाच चंद्रज्योतींच्या प्रकाशांत वाजत गाजत चालला होता पालखीच्या मागें बायका आणि त्यांच्या मागें पुरुष मंडळी मिरवत निघाली होती. आताशबाजी, हिलाल, मशाली वगैरेंचा उजेड जसा पूर्णपणें त्या वरातीच्या मिरवणुकीच्या बिनीकडे होता तसा मागें पुरुषमंडळीकडे नव्हता. पुरुषमंडळीच्या बाजूला दहापांच मशाली आपला अंधुक प्रकाश पाडीत होत्या सूर्यास्तप्रसंगीं पूर्वदिशा किंवा सूर्योदयाच्या वेळीं पश्चिमदिशा जशी आपल्या असमंताद्भागांतल्या वस्तु अंधुकप्रकाशांत लीन झालेल्या जन-दृष्टीला दाखवितात तद्वतच त्या प्रकाशांत पुरुषमंडळी दिसत होती. त्या वेळचे कसब्यांतील रस्ते सध्यांच्या रस्त्यांपेक्षांही अरुंद होते. म्हणजे त्या गल्ल्याच होत्या. वरातीसारखी मिरवणूक छोट्या छोट्या गल्ल्या ओलांडीत चालली असतां नवरदेवाच्या घराजवळ ती मिरवणूक आली व सुनेचें नांव वगैरे ठेवण्याचा विधि उरकल्यावर पानसुपारी, अत्तरगुलाब होऊन मुलीकडची मंडळी परत निघाली. त्यावेळीं मशाली वगैरे फार अल्प उजेडाच्या साह्यानें वऱ्हाडी मंडळी परत जात होती. देशपांड्यांच्या घरून जितकी पुरुषमंडळी वरातीबरोबर निघाली होती तितकी मंडळी देशपांड्यांच्या घरीं परत न येतां तीस पुरुष कमी आले. हे तीस पुरुष परत येतांना कोठें गेले कोणाला ठाऊक! देशपांड्यांनीं घराचीं दारें लावलीं व श्रमपरिहारक अशा अमृततुल्य झोंपेंत ते व त्यांची घरची मंडळी निमग्न झाली.

ज्या **शिवाजीच्या** पुण्यांतील वाड्यांत **शाइस्तेखान** उतरला होता त्या वाड्याच्या दक्षिण दिशेच्या गल्लींत जें केदारेश्वराचें देवालय आहे त्या देवा-लयाच्या आसपास कांहीं मंडळी, मध्यान्हरात्र उलटून गेल्यावर बऱ्याच सावधगिरीनें वावरत होती. वाड्याच्या भिंतीजवळ एक भला मोठा जवान उभा असून त्याच्या खांद्यावर दुसरा तसाच मर्द उभा होता. त्या दोघांच्या त्या सजीव चालत्या बोलत्या शिडीवरून एकामागून एक असे अठ्ठावीस जवा-नमर्द भिंतीवर चढले व शेवटीं शिडी झालेल्या दोघांनाही मोठ्या खुबीनें भिंती-वर घेण्यांत आलें. खांद्यावर जो मनुष्य उभा होता त्याच्या नालपोंच्यांना खालच्या अदमीनें घट्ट पकडलें होतें आणि खांद्यावरच्या मनुष्याचे दोन्ही

हात भिंतीवरच्या दोन माणसांनीं पकडले होते. भिंतीवरच्या माणसांनीं त्या दोघांना अशा तऱ्हेनें लोंबकळत वर ओढून घेतलें व ती सर्व मंडळी हूं कां चूं न करतां वाड्याच्या भिंतीवरून मोठ्या शिताफीनें आंत उतरली. तीं सर्व माणसें सशस्त्र होतीं. मुदपाकखान्याकडे ते मर्द एकामागून एक गेले व त्यांनीं मोठ्या सावधपणानें तेथील भिंत पाडण्यास सुरुवात केली. भिंतीला त्यांनीं बरेंच मोठें भगदाड पाडलें व ते एकामागून एक असे आंत शिरूं लागले. आंतील चौकाच्या तोंडीं हातांत तोडे शिलगावलेले अफीमबाज आरब चाऊस डुकल्या घेत पाहारा करीत असलेले त्या लोकांनीं पाहिले. पाहारेकऱ्यांचा त्रास होऊं नये म्हणून त्या लोकांनीं त्या चौवा पाहारेकऱ्यांच्या तोंडांत एकदम बोळे कोंबून त्यांना धडावेगळे केले व त्यांनीं आपला पुढचा रस्ता धरला. यावेळीं **शाइस्तेखानाला शिवाजीला** कैद केल्याचीं सुखस्वप्नें पडत होतीं. इतक्यांत काय झालें असेल तें असो; परंतु त्या वाड्यांत सुखनिद्रेत घोरत पडलेल्या स्त्रीपुरुषांपैकीं कांहींना कोणी तरी अपरात्रीं वाड्यांत शिरल्याची चाहूल लागली हें मात्र खरें. भ्यालेल्या बायकांची प्रथम ओरड झाली. ती ओरड ऐकून **शाइस्तेखान** खडबडून जागा झाला. यावेळीं त्या वाड्यांतील प्रत्येक दार त्या तीस हत्यारबंद लोकांनीं आपल्या ताब्यांत घेतलें असल्यामुळें **शाइस्तेखानाला** पळून जाण्याला कोठेंच वाव सांपडेना. तो जिकडे पळे तिकडे त्याला हत्यारबंद माणून दिसूं लागला. म्हणून तो वाड्याच्या मुख्य पश्चिमाभिमुखी दरवाजावरील चौघड्याच्या जागेंत पळून गेला. त्यानें आंतून कडी लावून घेतली व खिडकींतून रस्त्यावर कसें उतरावें याबद्दल विचार करूं लागला. इतक्यांत शेजारच्या दालनांत ' हर हर महादेव ' अशी गर्जना झाली. नगारखान्याच्या सर्व बाजूंना हत्यारबंद लोकांचा वेढा पडला. पहारेकरी घाबरल्यामुळें त्यांच्या बोबड्या वळल्या. त्यांच्यापैकीं बरेंच जखमी झाले व कांहीं ठारही झाले. राहिलेल्या लोकांनीं त्या हत्यारबंद लोकांवर चाल केली. सर्व वाडाभर आरोळ्यांचा सपाटा सुरु होऊन कतल सुरू झाली. खिडक्या व दारें फोडण्याच्या आवाजानें, छापा घालणाऱ्यांच्या जयघोषानें, जखमी झाले त्यांच्या विवळण्यानें आणि भ्यालेल्यांच्या किंकाळ्यांनीं तो वाडा दणाणून गेला. इतक्यांत एक वीर ज्या ठिकाणीं हातघाई चालली होती अशा ठिकाणीं

हातांत नंगी समशेर घेऊन जोरानें धावून आला. त्याला पाहतांच बाकीच्या एकोणतिसांनीं 'हर हर महादेव' असा जयध्वनि मोठ्या उत्साहानें करून मुसलमानांवर एकदम हल्ला केला. मुसलमान वीरांची दाणादाण झाली.

**रघुनाथ यादव चित्रगुप्त** या नांवाच्या एका कवीनें त्याप्रसंगीचें शार्दूलविक्रीडित वृत्तांतील सहा श्लोकांत मोठे गमतीचें वर्णन केलें आहे तें ऐसेंप्रमाणें :—

शास्तेखान नबाब मूर्ख अगळा चालोन आला कसा।
शीवाजी नृपती समर्थ अवनीं अद्भूत ज्याचा ठसा॥
केलें हीनहि पामरास चपळें तोडोनि बोटें झणी।
धाकें कापतसे कुटील उदरीं जिंकील आतां रणीं॥ १॥

पाच्छाके दरबंदगीस अब मै जाता नही ये घडी।
शास्ताको इरशा लगीच दिलभो जानो हमेशा बडी॥
जानी दौलतकी नहोचि मजकू आशा कभू प्यारसे।
शीवा है बरजोर रोष न कियो जानोच ईमानसे॥ २॥

शास्तातें मरणाहुनीच अगळें केलें नृपानें कसें।
दंडोनी निकरें अरीस चपळें कौतूक झालें असें॥
मारामार करूनियां निजबळें शाहजीसुनु पातला।
कीर्तीचे ध्वज लाविलेच अवनीं आखण्ड वीराजला॥ ३॥

स्त्रीयांमाजी कुटील मूर्ख कपटी शास्ता दडाला भयें।
आतां मारिल भूपतीच मजला निष्ठूरता निर्दयें॥
पाच्छानें मज धाडिलें करूं कस शाहजीसुनू हा बळी।
कीर्तीचे ध्वज लाविले निशिदिवा या भोसल्यांचे कुळीं॥४॥

सेना भीत समस्त त्राण हृदयीं आपूर्व झालें कसें।
शीवाजी नृपती समर्थ अवनी अन्यत्र कोणी नसे॥
पाच्छाके दरबंदगीस न चले दीदार ये की घडी।
जादा देखनमो करामत असे जाना दिलेमों बडी॥ ५॥

बाच्छाचे अमिरादि [सर्व] वाजिरां मारील हा भूपती।
दिल्ली घेउनियां प्रतापतबकें संरक्षिताहे क्षिती ॥
ईराणादिक हें तुराण अवघे घेईल राजा बळें।
हस्तीं शस्त्र धरूनि [सर्व] चपळें खाणील शत्रूमुळें ॥ ६ ॥

**शिवाजीनें** असा एक लाथेचा तडाका मारला कीं, त्यासरसें नगारखान्याचें दार भुईवर सपशेल धाडकन चौकटीसह पडलें. **शाइस्तेखान** तितक्या त्या प्रसंगांतून सज्जावरून जो पळाला तो गोशांत शिरला. **शिवाजीनें** त्याचा पाठलाग केला. इतक्यांत मध्येंच एक मुसलमान वीर आडवा येऊन तो **शिवाजीला** म्हणाला "अरे बेहिम्मत पाहाडका चुवा! कहां भागता है. देखो अभी यह हमारे समसेरका चस्का."

खदिरांगाराप्रमाणें लालभडक झालेल्या क्रोधमत्त **शिवाजी**च्या कर्णरंध्रांत ते शब्द पुरते शिरलेही नाहींत तोंच ते शब्द उच्चारणारा जवान **शिवाजी**च्या तरवारीनें धडावेगळा करून त्याचा रस्ता साफ करून दिला. **शिवाजी** पुढें धांवला तों **शाइस्तेखान** दोराच्या शिडीवरून खिडकींतून खालीं उलटा उतरत असलेला **शिवाजीनें** पाहिला. भवानी त्या खिडकींत चमकली. परंतु अल्लाच्या घरीं **शाइस्तेखानाच्या** आयुष्याची दोरी तोडण्यास यमराज नाखुष असल्यामुळेंच फक्त तो ठार न होतां—कोल्ह्याच्या जीवावरचें जसें शेपटावरच गेलें–तसें तो आपल्या उजव्या हाताच्या पंजालाच फक्त मुकला व **शिवाजी**च्या तडाख्यांतून मुक्त झाला. या प्रसंगीं त्याचा पुत्र **अबदुल फत्तेखां** वगैरे बरेच लोक ठार झाले. **शिवाजीनें** ज्या राज्यलक्ष्मीच्या प्राप्त्यर्थ त्या वाड्यांत कांहीं वर्षांपूर्वी जगदंबेचा साधा गोंधळ कुळाचार म्हणून पाहिला होता, त्याच त्याच्या खासगत वाड्यांत त्या रात्रीं त्यानें त्याच साध्या गोंधळाची नरमेधानें पूर्णाहुति दिल्यामुळें देवी शांत झाली आहे असें त्याला वाटलें. तीं त्याची इमारतच त्या रात्रीं यवनकरींच्या रुधिरांत रंगविलेली रक्तवर्ण पातळ प्रत्यक्ष राज्यलक्ष्मीच्या रूपानें परिधान केलेली त्याला दिसली.

अशा तऱ्हेची फत्ते झाल्यावर **शिवाजीनें** आपल्या मावळेवीरांसह तेथून जें तडक प्रयाण केलें तें कापाकापी करीत सिंहगडाच्या रस्त्यानें तो निघून

गेला. इतक्यांत एक तोफेचा आवाज ऐकूं येतांच कात्रजच्या घाटांत मोठी गम्मत दिसूं लागली. एकदम जिकडे तिकडे उजेडच उजेड दिसूं लागला व तो उजेड मोठ्या वेगानें रानोमाळ धावूं लागला. हें गौडबंगाल काय होतें !

**पुणें** कसब्यांतल्या **देशपांड्यांच्या** घरीं मुसलमानी वेषांत प्रथम शिरून नंतर हिंदी वेषांत जसें **शिवाजीसह** तीस वीरांचें वरातीच्या मिरवणुकींत झालें व पुढें त्याचें पर्यवसान **शाइस्तेखानाच्या** पलायनांत झालें. तसेंच हें गौडबंगाल आहे.

पुण्यांत कत्तल करून **शिवाजी** निसटून **सिंहगडावर** गेला व कात्रजच्या घाटांत शिंगांना जळत्या मशाली बांधलेले शेंकडों बैल तोफेचा आवाज ऐकून सैरावैरा धांवूं लागले. त्या बैलांना मध्यान्ह रात्रीच्या सुमारास पिठांतून अफू चारली असल्यामुळें या वेळीं ते नशापूर्ण बनलेले होते. मध्यान्ह रात्र उलटलेली असल्यामुळें वाऱ्याच्या झुळकी भराभर वाहूं लागल्या होत्या. त्या जंगलच्या वाऱ्याच्या झुळकी कानांत शिरतांच ते बैल रानोमाळ पळत सुटले. चारी दिशांनीं **शिवाजीचा** पाठलाग करण्यास धांवलेल्या मुसलमानी सैनिकांस तो उधळलेल्या बैलांच्या शिंगांवरील मशालींचा उजेड दिसतांच ते सैनिक, त्याच रस्त्यानें **शिवाजी** पळत आहे असें समजून मोठ्या जोरानें दौडत गेले; परंतु व्यर्थ ! **शिवाजीच्या** ऐवजीं त्यांना पळत असलेले बैल दिसले. त्यांनीं **शिवाजीचें** कपट ओळखलें. **कात्रज** पूर्वेकडे व सिंहगड पश्चिमेकडे. **शिवाजी** ज्या दिशेला निघून गेला त्याच्या उलट दिशेला **शाइस्तेखानाची** मंडळी गेली. हा पूर्व आणि पश्चिम दिशांचा संयोग होणें जितकें अशक्य तितकेंच **शिवाजी** आतां आपल्या हातीं सांपडणें दुरापास्त असें समजून **शाइस्तेखानानें** आपला निभाव लागत नाहीं असें पाहून ससैन्य दिल्लीचा रस्ता सुधारला.

लहानशा चकमकींत जरी अपयश आलें तरी खरा वीर मोठ्या रणकंदनांत तें अपयश धुऊन टाकतो. परंतु **शाइस्तेखान** हा दिल्लीपतीचा मिजासी शालक सरदार असल्यामुळें त्यानें जें नामोष्कीनें पलायन केलें त्याची त्याला शरम न वाटतां त्यानें तो आपला कलंक धुऊन काढण्याकरितां '**मिरजा राजे शिवाजीला** फितुर झाल्यामुळें आपली अशी हकीकत झाली ' असें

त्यानें बादशहास लिहून **मिरजाराजा**संबंधानें बादशहाचें मन कलुषित केलें आणि मुसलमानी तख्ताच्या शक्तीवर मोठी एक कुऱ्हाड उत्पन्न केली. हिंदु हिंदूला मिळणें शक्य आहे ही गोष्ट प्रमाणभूत धरून **औरंगजेबानें** **मिरजा**राजासंबंधानें जी शंका प्रदर्शित केली त्याचेंच फळ त्यानें **मिरजा-राजा जसवंतसिंग** याला त्याच्या कृतीपासून च्युत करण्यासाठीं जो **दिलेरखान** नांवाचा सरदार दक्षिणेंत ससैन्य धाडला तें होय.

एकंदरींत काय, कीं, **दिल्ली**पतीचा अधिकारी वर्ग स्वतःची फजीती लपविण्यासाठीं ज्या ज्या क्लृप्त्या उत्तरोत्तर करीत गेला त्या त्या सर्व त्याच्या नुकसानीच्याच होत जाऊन पुढें निरुपायानें **दिल्ली**पतीला **मराठ्यां**चा लोकनायक जो **शिवाजी** त्याला '**दख्खनचाराजा**' असें कबूल करावें लागून **शिवाजी**-च्या राज्यारोहणाचे वेळीं त्याला **दिल्लीहून** मोठ्या समारंभानें बहुमोल नजराणाही पाठवावा लागला हें इतिहासप्रसिद्धच आहे. फाजील लाडकेपणा आणि फाजील विश्वास नोकरावर टाकला म्हणजे धन्याच्या जिवावर बेतायचीच. हीच गोष्ट जर **औरंगजेबा**सारख्या धूर्त **दिल्ली**पतीनें लक्षांत आणली असती तर **शिवाजी**सारख्या त्या वेळच्या त्याच्या क्षुद्र शत्रूला केव्हांच नेस्तनाबूद करतां आलें असतें. पण **शिवाजी** काय धूर्त कमी होता! ' गांठ पडली ठका ठका, त्याचें वर्म जाणें तुका ' हीच स्थिति **औरंगजेब** आणि **शिवाजी** यांच्या दरम्यान घडून येऊन **शिवाजी** चुव्वा राजा बन्गया और **औरंगजेब** दिवाना हो चुका! याचें मुख्य कारण काय तर, अधिकाऱ्यांवरचा फाजिल विश्वास!



# प्रकरण सोळावें.

## ' अशा लक्षणीं जाणिजे योगिराणा । '



'आई, आमच्यासारख्या मुलांना जन्म देऊन, देशमातेची एकनिष्ठपणानें सेवा करण्याच्या युक्त्या सांगणाऱ्या अनेक आया जर ही भरतभूमि उत्पन्न करील, तर महाराष्ट्रभाषेच्या शब्दवृक्षाचें ' परकीय सत्ता ' हें जें बांडगुळासारखें शब्दफल आहे तें ताबडतोब गळून पडेल. '

" बाबा **शिवबा**, **समर्थांच्या महाराष्ट्र**धर्माच्या व्याख्येप्रमाणें सर्वत्र व्यवस्था होत चालली आहे. ब्राह्मणादिवर्णव्यवस्थेंत मुख्य वर्णाचें अंजन पडत चालल्यामुळेंच **समर्थांची** जी मुख्य--साम्राज्याची कल्पना--तिला आधार देण्यासच सध्यां या सर्व आर्यभूमातेवर वीररसाचे स्वातंत्र्यपान देणारे झरे ही वीरभूमाता आपल्या उदरांतून मोठया वेगानें बाहेर सोडीत आहे. त्यांचे कालवे बांधून स्वदेशबांधवांना स्वातंत्र्याच्या मंदिरांत सुखानें ठेवण्याचें जें काम सध्यां तूं करीत आहेस तेंच खऱ्या लोकनायकाचें कर्तव्यकर्म असून त्याचमुळें तुझी इच्छा पूर्ण होणार आहे. "

" आई, माझे वडील बंधु **संभाजी**राजे आणि तीर्थरूप जर आज हयात असते, तर त्यांना हें माझें कृत्य पाहून किती तरी समाधान वाटलें असतें. पण उपाय काय ? त्यांच्याकडून मला जी स्वराज्यसंस्थापनेच्या कामीं मदत झाली असती, तीच मदत माझे सावत्र बंधु **व्यंकोजी**राजे यांच्याकडून मला मिळेल अशी आशा होती; परंतु तीही निष्फळ झाली. कारण, ज्यांच्या अंगीं वडिलोपार्जित संभाळण्याची ताकत नाहीं ते नवें कसें मिळवणार व त्यांच्या हातून माझ्या कार्यांत मला हातभार तो काय लागणार ! "

" खरेंच—**शिवबा**, चंदावराकडची काय हकीकत आहे ? "

" आई, मी केवढा भाग्यवान् म्हणून सांगूं ? माझ्या सारख्याला श्रीसमर्थ आणि श्रीतुकाराममहाराज यांची जर मदत झाली नसती तर, मला फाजल, शिद्दी जोहार, रणमस्तखान वगैरेंचा पराभव कधींच करता आला नसता. आषाढीचे पंढरपूरचे तुकारामबावांचे हजारों वारकरी समर्थकृपेनें मला सैनिक म्हणून मिळाले व समर्थशिष्यांनीं दाण्याचीं कोठारें जमवून ठेवलीं होतीं तीं ऐनप्रसंगीं माझ्या ताब्यांत आलीं म्हणूनच मला कर्नाटक हस्तगत करून घेतां आलें. समर्थशिष्यांनीं कोंकणप्रांतीं जशी स्वधर्मजागृतीची आणि धान्याची मला मदत केली तशीच विजापुरावर स्वारी नेण्याच्या कामींही होणार आहे. कर्नाटकच्या मोहिमेंत मला व्यंकोजी राजांची मदत होईल म्हणून फार आशा होती व त्याप्रमाणें मीं- तुमच्या उपदेशाप्रमाणें-त्यांच्याकडे निरोपही पाठविला होता; परंतु व्यर्थ ! पुन्हां एका वकीलाबरोबर धमकीचाही निरोप धाडला—"

" तो काय ? "

" चंदावर प्रांतीची जहागीर वडिलोपार्जित असल्यामुळें योग्य न्यायाला अनुसरून आम्हांला त्यांतली अर्धी वांटणी द्यावी. "

" मग त्यानीं पुढें काय केलें ? "

" ' पुणें प्रांतीची जहागीर जशी तुम्हीं संभाळली आहे तशीच आम्हींही चंदावर प्रांतीची संभाळली असल्यामुळें हीच सरळ न्यायाची वांटणी झालेली आहे. ' असें त्यानीं उत्तर धाडलें. "

" त्यावर तूं काय उत्तर दिलेंस ? "

" आम्हीं मुद्दल जतन करून, मुद्दलाची शंभरपट शिलकेंत टाकली आहे. तसें तुम्हीं काय केलें आहेत तें दाखवून योग्य वांटणीला तयार व्हा. नाहीं तर ताबडतोब अर्ध्या वांटणीची फारकत लिहून धाडा. "

" हा तुझा निरोप ऐकून व्यंकोजीराजे संतापले असतील. "

" ते संतापून लढाईलाच उभे राहिले. "

" शाबास ! शिसोदे कुळाची एवढी तरी धमक त्यानीं दाखवली ! "

" पुढें एकाच झडपींत तो शरण आल्यावर त्याचें राज्य जिंकून घेऊन तें त्याला परत बक्षीस म्हणून दिलें आणि रघुनाथ हणमंते यांना तेथील वकील

नेमून कर्नाटकाची त्यांना व्यवस्था सांगून विजापुराकडे मोर्चा वळविला. विजापुरच्या तख्ताला माकळी भाल्याचा तडाखा दाखवून, चौथ आणि सरदेशमुखीच्या सनदा व खंडणी घेऊन परत आलों. इथें परत येतों तों हें दुसरें दिल्लीकडचें प्रचंड विघ्न पुढें 'दत्त' म्हणून येऊन थडकलें आहे."

"हो, खरेंच, बाळ, तुम्ही आणि **जसवंतसिंगाची** पुन्हां भेटीची वेळ केव्हां ठरली आहे?"

"आज मध्यान्ह रात्रीं. आमच्या या भेटीचा वास सुद्धां **दिलेरखानाला** येतां उपयोगी नाहीं असें ठरलें आहे. **अवरंगजेबानें** मला सरदारकीचीं वस्त्रें व योग्य नजराणाही धाडला आहे. दिल्लीपतीची इच्छा माझ्या मदतीनें विजापुरची बादशाही बरबाद करण्याची आहे; परंतु मला त्या बाबतींत तीर्थरूपांना मीं दिलेलें वचन पाळायचें असून सध्यां दिल्लीपतीचा रोषही करून घ्यायचा नाहीं."

"या बाबतींत तूं काय करायचें ठरविलें आहेस?"

"**जसवंतसिंगापाशीं** खरी गोष्ट सांगून, **दिलेरखानाला** संशय येऊं नये म्हणून त्या दोघां सेनापतींबरोबर मी आपल्या सैन्यासह विजापुरावर चाल करून जायचें आणि तेथील बादशाहीचा कांहीं मुलुख ताब्यांत घेऊन नंतर बादशाहीला पालथी न पाडण्याची आणभाक **दिलेरखानापुढें** व्यक्त करायची. नंतर **अवरंगजेबाच्या** भेटीला जाण्यासाठीं एथून आग्र्याकडे जाण्याकरतां निघायचें. यामध्यें मी माझे दोन मुद्दे साधणार आहें. दिल्लीपतीची मेहेरनजर राखून तीर्थरूपांना दिलेलें वचन राखायचें आणि आपला वरचष्मा दिल्लीपती व विजापुरकर यांजवर बसवायचा. '**अवरंगजेबाला** भेटून दक्षिणेंतल्या सुभेदारीची सनद घेऊन परत यावें, नंतर दख्खनचे स्वतःच मालक होऊन बसावें' असा सल्ला मला देऊन दिल्लीस चलण्याबद्दल **जसवंतसिंग** मला आग्रह करीत आहेत. ते स्वतांच्या रजपूतबीजाला स्मरून माझ्या जिवाची हमी घेण्यास तयार झाले आहेत. शिवाय, **समर्थांनीं** आधींच **रामदास** करून सोडलेला शिखांचा गुरु **अर्जुनसिंहही** त्या प्रांतीं ऐन प्रसंगीं मदत करण्यास माघार घेणार नाहीं असें त्याचें वचन आहे."

"**शिवबा,** प्रत्येक गोष्टींत धीर धरून आपला आपण विचार करावा आणि

सर्वस्वीं दुसऱ्यावर भरंवसा ठेवूं नये. देहाला किती जरी दुःखें झालीं, तरी न डगमगतां निर्भयपणें कामें केलीं असतां अंतीं सुखच प्राप्त होतें. शत्रु आणि मित्र यांची अनेक तऱ्हेनें परीक्षा बघण्यास एकांतीं मसलत करून मनाचा धिमेपणा राखावा. एकवार फसलें म्हणून प्रयत्न न करतां सुखांत निमग्न होऊं नये. अनेक गोष्टींचे अनेक विचार करावे. मुख्य प्रसंग चुकूं नये आणि आपण धुरीण असल्यामुळें धीर सोडूं नये. आरंभिलेल्या कार्यांतलीं विघ्नें बाजूला सारण्यास जो कंटाळतो आणि बुद्धि चालवण्यास जो त्रासतो तो कुच-कामाचा ठरतो. अंगचापल्यानें जो स्वतःची खबरदारी प्रगट करतो त्याचें सामर्थ्य वाढून, अनेक संकटें त्याचे गुलाम बनतात. मोठमोठे कार्यकर्ते दूर ठेवावे हें खरें, परंतु प्रसंगीं त्यांना हातीं धरून त्यांच्यांतलें कपट शोधावें. जे मोठे विचारी तेच धक्के चपेटे खाऊन आजपर्यंत ईश्वराचे अवतार म्हणून थोर कीर्तीचे होऊन गेले आहेत. आपल्या मनाला रोधून परांतर शोधावें आणि कदाचित् बदलेल म्हणून हरघडी सावध राहावें. पाहिलेलें राजकारण पुनः पाहावें, शोधलेलें पुन्हां शोधावें आणि केलेलें पुन्हां करावें. सर्व बंद व्यव-स्थितपणें बांधले गेले आहेत कीं नाहीं तें नेहमीं डोळ्यांत तेल घालून पाहात असावें. कोणी कांहीं सांगो, स्वस्थांतःकरणानें तें सर्व ऐकून त्याबद्दल शांतपणानें विचार करावा आणि नंतर साधकबाधक गोष्टींचा योग्य विचार करून काय करणें तें करावें, म्हणजे कानांकडे हलकेपणाचा दोष येत नाहीं. आपल्यावर कितीही कठिण प्रसंग आला, तरी डगमगूं नये व शांतमनानें त्या प्रसंगांतून युक्त्यांनीं पार होऊन जावें. जीव तृणवत् माणून स्वदेशबांधवांनाही तोच धडा द्यावा आणि स्वधर्म आणि स्वराज्य यांच्या स्थापनेकरितां एकजुटीनें परकीय सत्तेवर तुटून पडावें आणि धोशा उडवून द्यावा. जन्माला आल्याचें ह्या काळांत हेंच सार्थक आहे.— "

द्वारापाशीं दोघे मधुकरी येऊन त्यांपैकीं एकानें पुढील श्लोक म्हटलाः—

**" कदा ओळखीमाजि दूजें असेना ।**
**मनीं-मानसीं द्वैत कांहीं दिसेना ॥**
**बहूतां दिसीं आपली भेट झाली ।**
**विदेहीपणें सर्व काया निवाली ॥**

जयजय रघुवीर समर्थ ! ".

" हा शब्द **श्रीसमर्थांचा** आहे. ऐन दोन प्रहरीं **समर्थांची** स्वारी कां बरें आली असावी ! " **शिवाजी** विचार करूं लागला.

" माहुलीच्या रस्त्यानें **करंजास** भिक्षा मागून **समर्थांची** **स्वारी** **कल्याणस्वामींसह** भिक्षेला इकडेच आली आहे. " एका द्वाररक्षक चप-राशानें पुढें येऊन मुजरा करून सांगितलें.

" ह्या सातान्यास आज **समर्थ** माझ्या घरीं भिक्षेला आले हें केवढें माझें सुदैव ! जा रे, **बाळाजी आवजींना** मी बोलावतों आहें म्हणून सांग."

**शिवाजीनें** चपराशाला वरीलप्रमाणें सांगितल्यावर चपराशी तेथून निघून गेला व **शिवाजी** आपल्या आईशीं **समर्थांच्या** येण्याबद्दल व त्यांना भिक्षा काय घालावी याबद्दल वादविवाद करूं लागला. मायलेंकरांचें संभाषण सुरू असतां **बाळाजी आवजी चिटणीस शिवराजांच्या** हुकुमाप्रमाणें तेथें आले व मुजरा करून हात जोडून उभे राहिले; तेव्हां **शिवाजी** त्यांना म्हणाला, " परवां मीं जी मोहोरबंद थैली तुमच्यापाशीं दिली आहे ती घेऊन या ! " **बाळाजी** कांहींएक न बोलतां मुजरा करून तेथून निघून गेले व पुन्हां **जिजाबाईसाहेबांशीं** **शिवराज** बोलूं लागले. त्यांचें चालू विषया-संबंधानें थोडेसें भाषण होतें आहे तों **बाळाजी** मोहोरबंद थैली घेऊन तेथें आले व त्यांनीं ती थैली मुजरा करून पुढें ठेविली व हात जोडून बाजूला उभे राहिले. पुन्हां **शिवाजी** व **जिजाबाई** यांचें भाषण सुरू झालें.

" आई, " **शिवराज** बोलले, " स्वदेशबांधवांच्या सुखासाठीं आणि स्वधर्मप्रस्थापनेकरितां अहोरात्र परिश्रम करून परकीय अमलाखालीं हैराण झालेला बराच मुलुख काबीज केला आणि स्वदेशबांधवांना ऐक्यांत स्वातंत्र्या-मृताचें पान करण्यास खुला केला ह्या सर्वाला **समर्थ** सद्‌गुरूंचीच कृपा मुख्यत्वें कारण झालेली आहे. तेव्हां असें हें जें राज्य ज्या **समर्थांच्या** कृपाप्रसादानें मला प्राप्त झालें आहे त्या माझ्या भक्तवत्सल, परम दयाळू आणि न्यायी गुरु-राजांना आज भिक्षा घालायचा योग आला आहे. तेव्हां— "

"**शिवबा**, ज्यांच्या कृपेनें आज ही आपल्याला स्वराज्याची सावली प्राप्त झाली आहे त्यानांच ती स्वराज्याची भिक्षा अर्पण केल्यास त्यांत वावगें तें काय होणार आहे ? "

एणेंप्रमाणें भाषण चाललें असतां पुन्हां दुसरा एक श्लोक तेथें ऐकूं आला; परंतु तो श्लोक ज्या आवाजांत म्हटला गेला होता तो आवाज आणि ह्या श्लोकाच्या आधीं जो श्लोक ऐकूं आला होता तो म्हणण्याचा आवाज यांत अगदींच भिन्नता होती. पहिला श्लोक **समर्थांनीं** म्हटला होता हें **शिवरा-जांनीं** ओळखलें होतें; परंतु ह्या श्लोकाच्या आवाजावरून दुसरें कोणी तरी **समर्थां**च्याबरोबर आलें असावें असा तेथील मंडळीचा जो समज झाला होता तो अगदीं खरा होता. कारण, **समर्थां**च्याबरोबर **कल्याणस्वामी** भिक्षा मागत मागत तेथें आले होते व त्यानींच तो श्लोक म्हटला होता. तो श्लोक ऐणेंप्रमाणें होताः—

**लपावें अती आदरें रामरूपीं।**
**भयातीत निश्चित ये स्वस्वरूपीं॥**
**कदा तो जनीं पाहतांही दिसेना।**
**सदा ऐक्य तें भिन्नभावें वसेना॥**

श्लोक म्हणणें संपतें न संपतें तोंच **श्रीसमर्थ रामदासस्वामी** आणि **कल्याण** पुढें येऊन **कल्याणानें** झोळी पसरली आणि **समर्थांनीं** पुढील वाक्य बोलून भिक्षा मागितली.

" ॐ भवान् भिक्षां ददातु ! " **समर्थांचें** मधुकरी मागण्याचें त्यावेळचें हें वाक्य होतें.

**समर्थांनीं** मधुकरी मागण्याकरितां जें वाक्य उच्चारलें तें संपतें न संपतें तोंच, **जिजाबाईसाहेब** आणि **शिवराज** उठून उभीं राहिलीं आणि **शिवराजानीं—बाळाजी आवजीनीं** थोड्यावेळेपूर्वी येथें आणलेली मोहो-रबंद थैली **कल्याणस्वामीनीं** पसरलेल्या झोळींत टाकली. सर्व मंडळी **सम-र्थांच्या** चरणकमलीं विलीन होऊन **समर्थांना** योग्य आसनावर बसण्याची **शिवराजांनीं** विनंति केली. विनंतीला मान देऊन **समर्थ** आसनस्थ झा-ल्यावर त्यांची **शिवरायांनीं** पायपूजा केली. नंतर **समर्थांनीं** स्मित करून **कल्याणाला** म्हटलें—

" झोळींतली थैली उघडून त्यांतील मजकूर वाच ! "

"आजपर्यंत ज्यांच्या कृपाछत्राखालीं जें कांहीं मिळविलें तें सर्व त्यांच्याच पदकमलीं भिक्षा म्हणून **शिवाजीनें** अर्पण केलें आहे. **समर्थांनीं** त्याचा प्रेमानें स्वीकार करावा." **कल्याणानें** थैली सोडून वरीलप्रमाणें त्यांतील मजकूर वाचला.

"**शिवबा,**" वरील मजकूर ऐकून **समर्थ** बोलले, "तुम्ही आज आम्हांला मोठ्या घोंटाळ्यांत पाडलें आहे. तुम्हांला साम्राज्याचा अभिषेक करवून स्वच्छ कीर्तिदर्शक छत्रचामरांखालीं तुमच्या नांवाचें नाणें चालू करण्याचा जो आमचा संकल्प तो ह्यामुळें तुम्ही बिघडवूं पाहतां. मूर्धाभिषिक्त होऊन न्यायाचें स्वराज्य स्वदेशबांधवांच्या प्रेमानें करण्याचें सोडून तुम्हीं आपलें राज्य आज आम्हांला अर्पण केलेंत आणि आतां तुम्ही काय करणार?"

"परमार्थ!"

"बसा. मासाहेब, **शिवबा,** बसा. जरा शांत व्हा आणि आमचें बोलणें नीट ऐका. ब्रह्मनिष्ठ **वसिष्ठऋषींनां श्रीरामचंद्रांनीं** गुरुदक्षिणेदाखल वडिलार्जित राज्याचें दान केलें त्यावेळीं त्यांनीं नीति आणि राजधर्म सांगितला तो ऐका. 'ब्राह्मणांनीं तपश्चर्या करावी, राजानें यथान्याय राज्य करून त्यांचें पालन करावें आणि त्यांच्या तपश्चर्येचें फळ अर्थात पुण्यसंग्रहीं टाकावें. पाप आणि पुण्य यांचा संग्रह सारखा झाल्यास मनुष्ययोनी प्राप्त होते. ब्राह्मणवर्ण प्राप्त झाल्यास तो जन्म इहसौख्याविषयीं नाहीं. म्हणून तुम्हीं आम्हांला भिक्षा घातलेलें आपल्या श्रमाचें राज्य परत घ्यावें——"

"आज्ञा उल्लंघन करण्याची शक्ति नाहीं; पण दिलेलें दान परत घेतलें असतां नीच योनी प्राप्त होते असें शास्त्रवचन आहे, त्याचें कसें काय?" **शिवाजीनें** विचारिलें

"**शिवबा,** पूर्वपुण्याईनें तुम्हांला राज्यपद प्राप्त झालें आहे आणि आमचा जन्म ब्रह्मकुळांत तुमच्याच करतां झालेला आहे. आज तुम्हीं आम्हांला अर्पण केलेलें सर्वस्व आमचेंच झालें हें खरें आहे. परंतु आम्ही भिक्षा मागण्याच्याच लायकीचे असल्यामुळें आम्हांला भिक्षेपुढें त्याचें महत्व वाटत नाहीं, याकरितां आम्ही तें तुम्हांला परत करतों. तें आम्हीं तुम्हांला बक्षीस दिलें आहे असें समजा!"

" बक्षीस घेणें तें आपल्यासारख्या **समर्थांकडूनच** घ्यावें म्हणजे पूर्वपुण्याई उदेली होते हें जरी खरें आहे, तरी मीं जें कमवून आपल्याला भिक्षा म्हणून दिलें तें मी परत बक्षीस म्हणून न घेतां आपली ठेव म्हणून परत घ्यावें अशी इच्छा मी दर्शविल्यास त्यांत **स्वामींना** वाईट वाटणार नाहीं अशी मीं माझी समजूत करून घेतली तर त्यांत माझी चूक होईल असें मला वाटत नाहीं."

" राजा, भिक्षापात्राची संभाळणूक करण्याला आम्ही जसे पात्र आहों तसे तुम्ही राज्याची संभाळणूक करायला लायक आहांत. दान करणें तें नेहमीं दूरदर्शित्वानें सत्पात्रीं करावें. शंभरविस्वें दारिद्र्याला गजान्त लक्ष्मीसारख्या जनावराचें दान दिलें असतां तें अपात्रीं होतें. आमच्या भिक्षेचा महिमा कसा आहे तो ऐका——

**नित्य नूतन हिंडावें । उदंड देशाटण करावें ॥**
**तरीच भिक्षा मागतां बरवें । श्लाघ्यपणें ॥**
**भिक्षा म्हणजे कामधेनु । सदा फल नव्हे सामान्यु ॥**
**भिक्षेस जो करी अमान्यु । तो करंटा योगी ॥**
**गोरक्ष वाणिज्य कृषी । यांहून प्रतिष्ठा भिक्षेसी ॥**
**कांहीं भिक्षा आहे म्हणावें । अल्प संतोष असावें ॥**
**बहुत आणितां घ्यावें । मुष्टी एक ॥**

**समर्थांचा** प्रतिनिधि या नात्यानें राज्यव्यवहार करायला मी तयार आहें; परंतु ह्या खटाटोपांतून सुटून आतां कांहीं तरी परमार्थ करावा अशी इच्छा आहे, ती पूर्ण व्हावी ! "

" इच्छा चांगली आहे ! अशाच नेहमीं चांगल्या इच्छा करीत असाव्या हें तुमच्यासारख्या राज्याभिषेक करून घेऊं पाहणाऱ्या क्षत्रियाला अगदीं योग्य आहे; परंतु असल्या ह्या कल्पना जरी ऐनतारुण्यांत उद्भवल्या तरी त्या वार्धक्याकरितां जतन करून ठेवाव्या लागतात. भगवंतांनीं अर्जुनाला हेंच सांगितलें आहे. युद्धपराङ्मुख झालेल्या अर्जुनाची समजूत भगवंतानीं कशी काढली हें तुम्हांला माहित असतां भलतीच इच्छा सध्यां प्रदर्शित करतां, याला काय

म्हणावें ! स्वजन्म ओळखला असतां आपल्या प्रारब्धाच्या खजिन्यांतील वृद्धावस्थेकरितां ब्रह्मदेवानें ठेवलेली ठेव तुम्ही आतां या ऐनतारुण्याच्या उपयोगाकरितां काढूं लागलांत, तर तें तुमच्याकडून होणें शक्य आहे काय ? तुम्हीं कोण आहांत ? श्रीच्या इच्छेचे दासानुदास आहांत. तेव्हां श्रीच्या इच्छेविरुद्ध तुम्हांला जातां येणें शक्यच नाहीं. भगवंतानीं जी गोष्ट पूर्वीच करून ठेवलेली आहे ती तुम्ही निमित्तमात्र होऊन दृश्य स्वरूपांत जगापुढें आणण्याला कारण होणार आहांत इतकेंच ! बाकी तुम्ही कोणीच नसून तुमचें कर्तेपण किंवा अकर्तेपण निराळयाच ठिकाणीं केंद्रीभूत होऊन बसलेलें आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, तुमच्यासारख्यांच्या पदरीं परामार्थाचें गांठाडें मुद्दाम जबरदस्तीनें बांधण्यास आमच्यासारख्या ब्राह्मणांचा जन्म झाला असतां परमार्थाचा तुम्ही ध्यास घेऊन बसतां याला काय म्हणावें ! तुम्ही कोण आणि तुमची इच्छा कोण ? मातोश्रींनीं काय करावें ? जें कर्म विधिलिखाप्रमाणें तुमच्या हांतून व्हायचें ठरलें तें घडून यायचें राहील कसें ? तुमचा जन्म या जगांत व्हायचें कारण नीट लक्षांत आणा, बुद्धिभ्रंश सोडून द्या आणि प्रपंच साधून परमार्थ करा ! तुम्ही विश्वकुटुंबी आहांत! तुमच्या संसाराचा पसारा फार मोठा आहे. सर्वसंगपरित्याग करून परमार्थाकरतां रानांवनांत, गिरिकंदरांत कांहीं जायला नको. तो संसारांत राहूनच होतो. मात्र पोटांत विवेक पाहिजे.

**प्रपंच सोडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल ॥**
**प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी ॥**
**प्रपंच सांडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला॥**
**मग तया करंट्याला । परमार्थ कैचा ॥**
**प्रपंचीं जो सावधान । तो परमार्थ करील जाण ॥**
**प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ॥**

संसारांत जन्म झाल्याचें सार्थक म्हणजे नित्यानित्यविवेक ! त्यानेंच इहलोक आणि परलोक साधतात.

**नाना वेष नाना आश्रम । सर्वांचें मूळ गृहस्थाश्रम ॥**
**जेथें पावती विश्रम । त्रैलोक्यवासी ॥**

एवढयाचकरतां गृहस्थाश्रमाला सर्वोत्तम आश्रम म्हणतात. त्यामध्यें स्वधर्म आणि भूतदया यांचा उत्तम अंगिकार करून आळस, निद्रा आणि अनृत यांचा त्याग करावा. व्यवहारांत यथाशक्ति धर्मशास्त्र पाळावें म्हणजे तोच परमार्थ ! ”

“ मीं गृहस्थाश्रमांत राहून समर्थांचें राज्य परमार्थ करीत चालवावें अशी आज्ञा झाली; परंतु परमार्थ साधून संसार कसा करावा याविषयीं आज्ञा व्हावी. ”

“ शिवबा, दैवयोगानें राजपद भोगण्यासच तुमचा जन्म झालेला आहे. तेव्हां नीतीनें प्रजापालन करून सर्व जातींस एकजुटीच्या आणि स्वदेश-स्वातंत्र्याच्या कार्याकरितां एकच मानून वर्णांच्या धर्माप्रमाणें त्यांना चालवाव्या. देवस्थानें आणि गुरु यांच्याठायीं प्रीति ठेवून, नाना प्रकारच्या लिपी लिहूं शिकाव्या. कर्ममार्गाचा कर्मयोग लक्षांत ठेवून सत्समागम करावा. नाना मतांचें तत्त्वज्ञान बाळगून कोणाशींही अति विनोद करूं नये. जातीभेद न मानतां योग्यतेप्रमाणें नौकरांचा मरातब पाहून त्यांना बढत्या द्याव्या. सैन्यावरचा सेनापति एकपत्निव्रताचा शूर, धार्मिक आणि धाडसी असावा. तो आपल्या प्रत्यत्नाच्या योग्यतेचाच असला पाहिजे. अजरामरवत् धान्यकोश आणि द्रव्यभांडाराचा संग्रह करीत असावा. नव्यानव्या हत्यारांचे शोध युद्धोपयोगार्थ लावण्यासाठीं बक्षिसें द्यावीं. देशी भाषेला आणि कविकारागीर यांना आश्रय देऊन वणिजांना व्यापार वाढवण्याला सवलती द्याव्या. परमार्थाविषयीं देह क्षणभंगुर समजून मनोजयवृत्तीनें सर्व विषयांचा त्याग करावा. याच गोष्टी प्रपंचात राहून केल्यास त्यांतच देहाचें सार्थक करणारा परमार्थ अनायासें घडतो.”

“ आजपर्यंत समर्थांच्या कृपाछत्राखालीं कांहीं स्वमतानें आणि कांहीं कारभाऱ्यांच्या मतानें राज्यकारभार केला; परंतु आतां हें राज्य आपलें असून तें ठेव म्हणून माझ्या स्वाधीन झाल्यामुळें मला त्याचें संरक्षण करणें प्राप्त आहे. म्हणून हा गाडा आतां पूर्व त् हाकण्यास आपली आज्ञा जरी मला भाग पाडते आहे, तरी हें राज्य समर्थांचें आहे असें जगानें म्हणण्यांतच मला अधिक कौतुक वाटेल. तेव्हां तशी कांहीं योजना झाल्यास बरें ! ”

" **शिवबा**, तुम्ही जसे आमच्या इच्छेआड येत नाहीं तसें आम्हांलाही तुमच्या इच्छेच्या बाहेर जाणें नाहीं. तुमची इच्छा आहे, तर ज्या आमच्या भिक्षेच्या झोळींतून तुम्ही तुमचें आम्हांला दान केलेलें राज्य तुमच्यापाशीं आम्ही आमची ठेव म्हणून वहिवाटीला देत आहोंत, तें ज्या भिक्षेच्या झोळींतून तुमच्याकडे परत येत आहे त्याच झोळीच्या अग्निशिखेप्रमाणें झळकणाऱ्या ब्रह्मचर्यव्रताचा आणि महाराष्ट्रधर्म व साम्राज्य यांच्या एकीकरण्याचा भगवा झेंडा तुमच्या पवित्र पीत राष्ट्रध्वजाच्या जागीं आजपासून फडकत, म्हणजे तुमची इच्छा पूर्ण होणार आहे."

**समर्थांनीं** इतकें बोलून ती झोळी **शिवाजीला** दिली. **शिवाजीनें** आदरपूर्वक ती ग्रहण करून मस्तकीं धारण केली व नंतर मातोश्रींच्या पायां पडून ती झोळी त्यानें **आबाजी सोनदेवांच्या** ताब्यांत दिली व **समर्थांच्या** अनुज्ञेप्रमाणें करण्यास सांगितलें

" आज्ञा शिसावंद्य आहे!" **शिवाजी** म्हणाला, " परंतु आतां पुढें राज्यकारभार कसा काय करायचा त्याची आज्ञा व्हावी. कारण, आजपर्यंत अनेक प्रसंगांना तुडवून न्यायी रक्तपाताच्या मार्गांत स्वदेशबांधवांच्या भावी सौख्यासाठीं बराच दूरवर जाऊन आपल्या इच्छेप्रमाणें परकीय अमलाच्या चक्रींत सांपडून सर्वस्वी परावलंबी आणि हताश व नाउमेद झालेल्या आर्यभूच्या सिंहासनाच्या अगदीं जवळ आलों असतां, तेथें आपल्या सामर्थ्याच्या जोरानें भेडावणारा एक प्रचंड राक्षस येऊन उभा राहिला आहे. तो मला भेडावतो आहे. त्याची जरी मला भीति वाटते तरी धैर्याचा कंबरपट्टा शाबूत आहे. भवानी मातेच्या प्रहारानें **विजापूरचें** तख्त घायाळ केलें खरें, परंतु **उदेपुरचा राणा जसवंतसिंग** आणि प्रसिद्ध लढवय्या **दिलेरखान्** हे दोघे **अवरंगजेबाकडून** लक्षावधि सैन्य घेऊन चाल करून आले आहेत. त्यांच्या मनांत माझ्याविषयीं संशय येऊं नये म्हणून **जसवंतसिंगाच्या** मसलतीप्रमाणें पंढरीचे वारकरी कर्नाटकांतून परत आल्यावर त्यांना बरोबर घेऊन **जसवंतसिंग** आणि **दिलेरखान** यांच्या सैन्यांसह **विजापुरावर** गेलों; परंतु पूर्वी तीर्थरूपांना दिलेल्या वचनाची स्मृति होऊन विजापुरचें तख्त अक्षयींचें बरबाद करण्याचें सोडून दिलें आणि खरी गोष्ट **जसवंतसिंगापुढें** उघड करून

तह केला. या दोघां दिल्लीवाल्या सरदारांशीं गनीमी काव्याचें युद्ध करणें अशक्य आहे. आज रात्रीं माझी आणि जसवंतसिंगांची त्यांच्याच गोटांत गुप्तपणे मुलाखत होण्याचें ठरलें आहे. "

" त्यांचें म्हणणें तुम्हीं दिल्लीस जाऊन अवरंगजेबाच्या सल्यानें विजापुरची बादशाही नामशेष करून दक्षिणेच्या सुभेदारीचीं वस्त्रें आणि सनदा घेऊन परत यावें, असेंच आहेना ! "

" होय, असेंच त्यांचें म्हणणें आहे ! "

" त्यांच्या म्हणण्याला आज रात्रींच्या भेटींत अनुमोदन द्या. आणि आपल्याजागीं मातोश्रींची स्थापना करून अष्टप्रधानांच्या ताब्यांत राज्यकारभार द्या आणि दिल्लीच्या महायात्रेला जाण्याकरितां युवराज संभाजीराजे यांना बरोबर घ्या. हजार पंधराशें शेलका मावळाही बरोबर असूं द्या. युवराज संभाजीराजे वयानें लहान आहेत ही त्यांतल्या त्यांत आनंदाची गोष्ट आहे. त्यांना बरोबर नेण्यांत तुमचें एक मोठें राजकारण साधणार आहे. शिवाजी आपल्यावर जर विश्वास ठेवणारा नसता तर त्यानें आपल्या मुलाला कधींच बरोबर आणलें नसतें ' असे उद्गार एकदां औरंगजेबाच्या तोंडून निघाले म्हणजे तुमची कामगिरी फत्ते झालीच म्हणून समजा. तसें न घडतां कांहीं विपरीत प्रकार जर घडला, तर शीखगुरु अर्जुनसिंह तुम्हांला योग्य ती मदत करील. आमचे दोघे शिष्य आमचा संदेश घेऊन त्याच्याकडे अमृतसरला जाण्याकरतां निघून सुद्धां गेले. जसवंतसिंग फितुर होणारा रजपुत नसून त्याचें आणि तुमचें कुळ एकच आहे, म्हणून त्याच्यावर भरंवसा ठेवण्यास हरकत नाहीं. औरंगजेबाची मात्र गोष्ट तशी नाहीं. तो वचनाचा सच्चा नाहीं. त्याच्या मनांत विजापुरकरांसह मराठ्यांना अचुक गिळायचें आहे. याकरतां त्यानें ही युक्ती योजली आहे. तो तुमच्याशीं खात्रीनें दगलबाजी करील आणि तोच योग जसवंतसिंगाच्या संतापाला कारणीभूत होऊन तुम्ही दक्षिणेंत सुखरूप येण्यास त्याच्या पंजांतून सुटाल. "

" मासाहेबांनीं असेंच मत दिलें आहे ! "

" शिवबा, ह्या खऱ्याच वीरमाता आहेत. मासाहेब, आपले पुत्र शिवबा म्हणजे प्रत्यक्ष शिवस्वरूप श्रीच आहेत. श्रीरामचंद्रानीं वडिलो -

जित राज्य गुरुदक्षिणा म्हणून **वसिष्ठऋषींना** अर्पण केलें, परंतु यांनीं स्वपराक्रमानें मिळवलेलें आम्हांला दिलें. हें उदाहरण आजपर्यंतच्या जगाच्या इतिहासांतलें पहिलेंच असल्यामुळें मोठाल्या सोनेरी अक्षरांत लिहून ठेवण्यासारखें आहे. ह्या आमच्या **शिवराजाला** उपमा देण्याला दुसरी वस्तूच नसल्यामुळें यांच्यासारखे हेच असेंच म्हणण्याव्यतिरिक्त दुसरी तोडच नाहीं. यांची जर अशी स्थिति, तर यांच्यासारख्या अनुपमेय आणि अलौकिक पुत्राला जन्म देणाऱ्या ज्या आपण, त्या आपल्या उपमेला तरी दुसरी वस्तु कोणची व कोठें सांपडणार ? **शिवराज** हे पुरे निश्चयी आणि खरे **रामभक्त** आहेत. यांच्या सान्निध्यानें आणि भाषणानें दुष्ट संदेहांचें निर्बीज होऊन पुण्य प्राप्त झाल्याशिवाय कधींच राहायचें नाहीं. "

" **समर्थांच्या** म्हणण्याला बाध कसा येईल ? " **कल्याणस्वामी** बोलले, आमचे **शिवराज** म्हणजे--

**नसे गर्व अंगीं सदा वीतरागी ।**
**क्षमा शांति भोगी दयादक्ष योगी ॥**
**नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा ।**
**अशा लक्षणीं जाणिजे योगिराणा ॥**

जयजय रघुवीर समर्थ ! "



# प्रकरण सतरावें.

## ' जगीं सर्वसूखी असा कोण आहे ? '



आरोग्य हें जसें शरिराचें मुख्य जीवन तसेंच ज्ञान हें मनाचें आहे. प्रीति आणि ममता हीं ह्या आत्म्याचीं जीविसाधनें असून पवित्रता हें त्याचें जीवन आहे. शारीरिक सुखापेक्षां आत्मिक सुख वरिष्ठ असून नाशवंत शरिरापेक्षां अमर आत्मा जसा श्रेष्ठ आहे, तद्वतच ज्ञान आणि आरोग्य यांपेक्षां पावित्र्य श्रेष्ठ आहे. त्याच्यापासूनच जगांत जयप्राप्ति होते; परंतु ह्या गोष्टी समजत असून उमजत नाहींत त्याला उपाय नाहीं ! मस्तकावर यमराजाच्या सैनिकांच्या विमलध्वजेचें फडकणें सुरू होईपर्यंत ज्ञानार्जन केलें, परंतु गिरिशिखरावर कोसळलेल्या मेघजलाप्रमाणें तें ज्ञानार्जन पादतळीं येऊन पुन्हां ज्ञाननिकेतन जें मस्तक तें खडकाळ जमिनीप्रमाणेंच कोरडें ठंठणीत राहिलें तर त्याचा उपयोग काय ? माळरानांत उत्तम धान्य पेरल्याप्रमाणेंच त्या ज्ञानाची अवस्था होते. अशा तऱ्हेचीं अनेक उदाहरणें दृष्टीस पडतात. एखादा माणूस मोठा विद्वान आहे, बहुश्रुत आहे. स्वधर्माचरणी आहे, परंतु स्वतःच्या विद्वत्तेचा, बहुश्रुतपणाचा व स्वधर्माचरणाचा अर्थ त्याला कळत असूनही त्यानें त्याप्रमाणें वर्तन न ठेवतां, अहंकारानें म्हणा किंवा मदोद्धतेनें म्हणा, सर्व जग कःपदार्थ असून 'आपणच काय ते एकटे शहाणे' असें स्वतःला स्वतःच म्हणवून घेऊन ज्ञानार्जनाचा दुरुपयोग जर तो करूं लागला तर त्याला कधींना कधीं तरी ' शेरास सव्वा शेर भेटतोच ! ' या न्यायानें थपडा बसल्याशिवाय राहात नाहींत. वास्तविक पाहिलें असतां विनय हा ज्ञानालंकार आहे ! मानस सरोवरावरील हंसाची योग्यता सर्व जग कबूल करतें; परंतु ती कोठपर्यंत ? त्यानें आपली हंसपणाची मर्यादा सोडली नाहीं तोंपर्यंत ! हंस जर काकबळी खाण्याकरितां धडपड करूं लागला किंवा चात-

कानें जर प्रफुल्ल कमलांत बसण्याचें सोडून पुरीषोत्सर्गज जी भुताची छत्री किंवा श्वानमूत्रज त्याचा आश्रय केला तर नरकस्थ क्षुद्र कीटकांपेक्षां त्याला अधिक मान कोण देईल? प्राणीमात्रांच्या हृदयांत खरा ज्ञानरभ्युदय झाला आहे हें समजण्याची खरी खूण म्हणजे त्यांच्या ठायीं अज्ञानतिमिरध्वंस होऊन ते सर्व जगत् म्हणजे आपण व आपण म्हणजेच सर्व जगत्, अशा भावनेनें सर्व जगाशीं वहिवाटूं लागण्याचा जगाला प्रत्यय येणें हें होय! अशी भावना ज्या मस्तिष्करूप ज्ञानकोशांत कोठेंच दृग्गोचर होत नाहीं तो ज्ञानकोश फोल होय! अशा त्या ज्ञानकोशाला सर्वांगसुंदर बनवायला कोणी तरी पुरा ज्ञाता भेटावा लागतो. प्रसिद्ध **वामनपंडितांना श्रीसमर्थां**सारखे जेव्हां परात्परगुरु भेटले तेव्हांच त्यांची समजूत पटून ते सर्वादराला पात्र झाले व ब्रह्मराक्षस या पदवीपासून अलिप्त राहिले. अशांतलीच एक चमत्कारिक गोष्ट सतराव्या शतकांत **श्रीशिवछत्रपतीमहाराजां**च्या काळीं घडून आली.

**सदाशिवशास्त्री देव** या नांवाचे एक ब्राह्मण येवलें मुक्कामींचे राहणारे **श्रीवाराणशी**क्षेत्रीं विद्यार्जनाकरितां गेले असतां तेथें त्यांनीं उत्तम तऱ्हेची विद्या संपादन केली. नंतर ते स्वदेशीं येण्यासाठीं निघाले. त्यांनीं जी अमोल विद्वत्ता वाराणशी क्षेत्रीं संपादन केली त्याचें चीज व्हावें म्हणून त्यांनीं मार्गांतील अनेक मोठमोठ्या राजधान्यांतून प्रवेश करून तेथील राजाश्रित पंडितांशीं वाद केले व जयपत्रें संपादन केलीं. पुरुष विजयी झाला तरी त्यानें आपलें विजयाभरण जो अमूल्य विनयरूप शिरपेंच त्याचा दुरुपयोग करूं नये हें तत्त्व **सदाशिवशास्त्री** विजयानंदांत गर्क होऊन मदोन्मत्त झाल्यामुळें विसरले व खऱ्या ज्ञानवंताच्या पायरीवरून च्युत झाले. त्यांनीं आपणच एकटे काय ते महान् पंडित आहोंत अशी स्वमनाशीं गांठ बांधून आपण कधींही पराजित होणार नाहीं ह्या भावनेनें–अर्थात् अज्ञानाच्या पोकळ गर्वाशीं दृढमैत्री केल्यानें–दिवसा मशाल पेटवली व जानव्याला सुरी बांधून नर्मदेच्या दक्षिण प्रदेशीं **श्रीशिवछत्रपतीं**च्या महाराष्ट्र–समर्थ–राजगुरु–**श्रीसमर्थ रामदास**स्वामींशीं वाद करून त्यांना जिंकून अजिंक्यपत्र घेण्याची लालसा मनीं धरली. ते **रायगडास** आले. त्यावेळीं **श्रीशिवछत्रपति औरंगजेबाला** भेटायला दिल्लीस गेले होते; परंतु प्रसिद्ध **काशीकर गागा-**

**भट्टजी** तेथें **समर्थाज्ञेवरून** येऊन राहिलेले होते. त्यांची व त्यांची गांठ पडून **समर्थांच्याकडे** परळीस **सज्जनगडावर** जाण्याचें ठरून श्रीमन्मातोश्री **जिजाबाईसाहिबांच्या** परवानगीनें ते लवाजम्यासह पालख्यांत बसून तेथून निघाले. बरोबर **बाळाजी आवजी** वगैरे मातबर मंडळी होती. ती सर्व मंडळी **परळीस** येऊन पोंचल्यावर **समर्थशिष्यीण आक्काबाई** यांनीं त्यांचा आदरसत्कार केला ; कारण त्या वेळीं **समर्थ** तेथें नसून, **बहिरोबाचे** डोंगरांत होते. **आक्काबाईनीं समर्थांचा** पत्ता सांगितल्यावर ती मंडळी तेथून **श्रीचें** दर्शन घेऊन जी निघाली ती रस्ता चालतां चालतां खांचाखडयांतून दहापांच खोरीं ओलांडीत चालली असतां वाटेंत त्यांस **कल्याणस्वामी** भेटले. **कल्याणस्वामींनीं** त्या सर्व मंडळीला दुरून पाहतांच—

**" जनीं हीत पंडीत सांगूनि गेले ।**
**अहंतागुणें ब्रह्मराक्षस झाले ॥**
**तयांहूनि व्युत्पन्न तो कोण आहे ।**
**मना सर्व जाणीव सोडूनि राहे ॥**

जयजय रघुवीर समर्थ ! "

असा श्लोक त्या सर्व मंडळीला स्पष्टपणें सार्थ ऐकूं येईल इतक्या मोठ्यानें म्हटला. श्लोकाच्या शेवटच्या ओळीचा शेवटचा शब्द संपतो आहे तोंच **सदाशिवशास्त्र्यांची** पालखी **कल्याणस्वामींच्या** जवळ येऊन ठेपली. **कल्याणस्वामींना** पहातांच **सदाशिवशास्त्र्यांचें** व त्यांचें भाषण सुरू झालें.

" काय हो, तुम्ही कोठें असतां ? "

" त्रिभुवनांत ! "

" वः ! तुम्ही मोठे तत्वज्ञ दिसतां ! "

" ही सर्व **समर्थांची** कृपा आहे ! "

" त्यांची गांठ कोठें पडेल ? "

" त्यांची व आपली गांठ पडावी आणि आपल्या मर्जीप्रमाणें **श्रीकृपें**·

करून जें कांहीं घडणें तें सर्व यथासांग घडून यावें म्हणूनच मी आपल्याला सामोरा होऊन त्यांच्याकडे घेऊन जायला आलों आहें.

" चला तर मग ! व्हा पुढें ! "

**" मना सांगपा रावणा काय झालें ।**
**अकस्मात तें राज्य सारें बुडालें ॥**
**म्हणोनी कुढी वासना सांडि वेगीं ।**
**वळें काळ हा लागला पाठिलागीं ॥**

जयजय रघुवीर समर्थ ! "

याप्रमाणें त्या दोघांचें संभाषण होऊन **कल्याणस्वामी** वरीलप्रमाणें श्लोक म्हणत पुढें झाले व ती सर्व मंडळी त्यांच्या मागून जाऊं लागली. यावेळीं **समर्थांची** स्वारी **बहिरोबाचे** डोंगरांत उत्तरेकडील रस्त्यावर एका मोठ्या दगडावर एकटीच डाव्या काखेंत कुबडी धरून पूर्ण सूर्यस्वरांत स्वगत विचार करीत बसली होती.

" पृथ्वीवरचे प्राणी किंवा आकाशांतले ढग यांच्यामध्यें एकसारखी दुसरी आकृति जशी कधींच दिसत नाहीं त्याचप्रमाणें प्राणिमात्रांच्या आणि राजकारस्थानांत हरघडीं उठणाऱ्या वावटळींच्या आणि प्रसंगांच्या चित्रांची स्थिति आहे. अकालीं अवचित जमलेले ढग किंवा पांच सात तान्ह्या अर्भकांच्या सभेंत एकदम उत्पन्न झालेली रडारड यांचा शेवट जसा त्वरित एकच होतो त्याचप्रमाणें मत्सरानें उठविलेलें काहुर आणि अदूरदर्शित्वानें केलेलें राजकारण यांची स्थिति आहे. जें राजकारण दुसऱ्यावर अवलंबून राहतें तें फसतें. बारभाईचें राजकारण नेहमीं आरंभाला गोड, पण अखेरीला विषवत् ठरतें. म्हणून कडू औषध जसें आनंदपर्यवसायी होतें तद्वतच राजकारणाचें घडतें. राजाचा राजदंड जोंपर्यंत प्रधानमंडळावर मात करीत असतो तोंपर्यंत राजकारण बिघडण्याची भीतिच नसते. स्वार्थाकरितां प्रजेला अनेक तऱ्हांनीं पिळून चैनीच्या रोगानें त्रस्त झालेलें राज्य अत्यल्पावधींत नष्टप्राय होतें. प्रजेला दांत कोरून पोटें भरण्याची पाळी ज्या राज्यांत येतें तें राज्य प्रजेच्या शापवाणीनें—तळतळाटानें—नष्ट होण्यास फारसा कालावधि लागत नाहीं; कारण, राज्यसंरक्षणाला जें मुख्य मनुष्यबळ लागतें तें जुलमाच्या अतिरेकानें प्रजेचीं मनें सर्वतोपरी असंतुष्ट झालेलीं

असतात म्हणून नष्ट झालेलें असतें. नुसत्या द्रव्यबलानें राज्यरक्षण कांहीं काळ होऊं शकतें; परंतु तें भाडोत्री तट्टाप्रमाणें क्षणैक असंतुष्ट प्रजेला चकवण्याच्या खोट्या प्रयत्नाप्रमाणें अधिकारमदांधत्वाच्या जोरावरील मूर्खपणाच्या निरर्थक अबदागिरीप्रमाणें भपक्याचें असतें. शेळीच्या शेंपटाप्रमाणें त्याचा कांहींच उपयोग होत नाहीं. बरें, ही गोष्ट खरे मुत्सद्दी अथवा प्रजाधुरीण जर सांगूं लागले तर आपण करीत असलेला अथवा हांकीत असलेला एकमुखी कारभार आपल्या हातांतून जाईल या भीतीच्या पिशाच्यानें राज्याधिकाऱ्यांचीं मनें भारून गेलेलीं असल्यामुळें ते अधिकारीराजाला कळसूत्री भावल्याप्रमाणें नुसते ' सह्याजी ' बनवून आपल्या अदूरदर्शी मूर्खपणाच्या मुत्सद्देगिरीनें अखेर अपयशाचें खापर राजाच्या मस्तकावर फोडतात व त्याला आपला मुगुट अखेरीस ईशचरणीं अर्पण करण्यास भाग पाडतात. ईशकृपा ही निराळीच आहे. ती कृपा केव्हां व कशी कोणावर होईल याचें ज्ञान मानवी शक्तीच्या जरी बाहेरचें आहे, तरी अनेक वर्षांच्या अनुभवानें त्याचें आगाऊ परिज्ञान होण्यासाठीं महान् विद्वान प्रतिपरमेश्वरच अशा आमच्या परमपूज्य ऋषिवर्यांनीं ठोकळ प्रमाणानें जे ठोकळताळे आकाशस्थ ग्रहांवरून ठरवून ठेवले आहेत त्यांना विश्वजित अशा **रावणानें** लत्ताप्रहरांनीं तुडवून मी करीन तेंच खरें झालें पाहिजे अशा दर्पानें जें वर्तन केलें व ऋषिप्रणीत शास्त्राला तुच्छ मानून **श्रीरामचंद्राकडून** बक्षीस मिळविलें तसेंच बक्षीस अखेरीस हे अदूरदर्शी मुत्सद्दी प्रजेकडून मिळवून आपलीं आरक्त मुखकमलें कज्जलवत् करून घेतात. वास्तविक खरें पाहिलें असतां आमच्या ऋषींनीं जें शास्त्र करून ठेवलें आहे त्याचा उत्तम अभ्यास केलेल्या जोतिष्यांकडून-पोटभरू ज्योतिष्यांकडून नव्हे-जर आमचे लोक वागतील तर आगाऊ समजणाऱ्या गोष्टींवरून कोणच्याही कामांत पुढें पाऊल कसें टाकावें तें अचुक समजणार आहे.

ज्योतिषशास्त्राप्रमाणें जन्मकुंडलीच्या ग्रहांवरून तीनचार कारक-योग उत्पन्न होत असले, तर ज्योतिषी ज्याप्रमाणें हलक्या ग्रहांना तुच्छ मानून छत्रपतित्वाचा योग स्थापित करतात, त्याचप्रमाणें महाराष्ट्राच्या कुंडलींत सध्यां तनुस्थानीं **शिवाजीसारखा** बलिष्ट ग्रह, इतर स्वगृहीच्या चार ग्रहां-

च्या योग्य साह्यानें बसल्यामुळेंच स्वराज्याच्या सिंहासनावरील छत्रपतित्वाचा योग उत्पन्न होऊन तो स्थापित होण्याच्या घटका आतां अगदीं भरत आल्या आहेत. आतां ह्या कुबडीच्या स्वरोदयाची इतिकर्तव्यता संपून, क्षणभर काळालाही गप्प बसायला लावणाऱ्या ह्या विश्वभक्षक अग्निरूपी पवित्र भगव्या छाट्यांचीही जरूरी संपली असल्यामुळें–शिष्यशाखेची योग्य व्यवस्था करून स्वधामाप्रत जाण्याच्या योग्य मार्गाचें पाऊल आतां जरा जोरानें उचलायला लागलें पाहिजे! अरे, पण हा मंजुळ व बोधप्रद असा आमच्या मनाच्या बोधाचा श्लोक मध्येंच एकदम कां बरें ऐकूं येऊं लागला आहे?" **समर्थ** जरासा विचार करून पुन्हां स्वतःशींच म्हणाले, "हं, आलें ध्यानांत! पात्र उत्तम घडलें गेलें आहे, परंतु जरा कच्चें आहे. थोड्याश्या आंचीनें पक्कें होणारें आहे!" पुन्हां दुसरा श्लोक स्वामींना ऐकूं येऊं लागला. तो श्लोक म्हणत म्हणतच **कल्याणस्वामी समर्थां**च्यापाशीं आले.

"जनीं सांगतां ऐकतां जन्म गेला।
परी वादवेवाद तैसाचि ठेला॥
उठे संशयो वाद हा दंभधारी।
तुटे वादसंवाद तो हीतकारी॥

जयजय रघुवीर समर्थ."

**समर्थां**च्या पायां पडून **कल्याण**स्वामी म्हणाले–"**सदाशिव**शास्त्री **देव समर्थांच्या** भेटीला आले आहेत."

सर्व लवाजमा आला व पालख्यांतून मंडळी उतरली. सर्वांच्या पुढें शास्त्रीबोवांची पालखी असून त्यांच्या मागें **गागाभट्ट, बाळाजी आवजी** वगैरेंच्या पालख्या होत्या. **सदाशिव**शास्त्री पालखींतून उतरून **समर्थ** बसले होते त्या दगडासमीप गेले. तेव्हां **समर्थ** त्यांना म्हणाले "यावें शास्त्रीमहाराज!"

"तुमची आणि आमची बरोबरी झाल्यास आम्ही तुम्हांला नमस्कार करूं. नाहींतर आशीर्वाद म्हणूं!" शास्त्रीबोवा घमेंडीच्या सुरेनें बोलले व त्या दोघांत पुढीलप्रमाणें संभाषण सुरू झालें:—

" शास्त्रीबोवा, आपण साक्षात् भूदेव. आपण आशीर्वाद म्हणणेंच योग्य आहे. "

" परीक्षा झाल्याशिवाय नमस्कार किंवा आशीर्वाद कां म्हणूं ? "

" परीक्षा ती काय ? "

" आमची वादभिक्षा आहे ती द्यावी. तुम्हांला आम्हीं जिंकल्यास जयपत्र घेऊं. आम्हांला तुम्हीं जिंकल्यास तुम्हांला शरणपत्र देऊन ही दिवसां लावलेली मशाल स्वहस्तें विझवूं आणि यज्ञोपवीताला बांधलेल्या ह्या सुरीनें जीभ उतरून ठेवूं "

" शास्त्रीबोवा, वादभिक्षा म्हणणें आणि निग्रहपर बोलणें आम्हांला कशाला पाहिजे ! आम्ही केवळ रामाचे दास–अरण्यवासी–ब्रह्मपिसे ! आम्हांवर कृपा करावी. आपल्या बरोबरीच्यांशीं आग्रहपुरस्पर बोलावें. आमच्याशीं तसें बोलणें योग्य नाहीं. "

" तुम्ही राजगुरु. सर्वांपेक्षां विद्वान. **वामन**पंडितासारख्या अद्वितीय विद्वानानीं–माझ्या सहचर गुरुबंधूंनीं–तुमचें शिष्यत्व पत्करून मराठी भाषेंत कविता करण्याची तुमची आज्ञा मानिली. तुम्ही राजमंडळांतले अध्वर्यु. यास्तव जयपत्र घेणें तें तुमच्याच जवळून घेऊं आणि भापण करणें तें तुमच्याशींच करूं."

" इतका आग्रह धरणें चांगलें नाहीं. आम्ही जंगली, अविद्वान असें स्वमुखानें कबूल करीत असतां आपणांसारख्या भूदेवांनीं आमच्यापाशीं वादभिक्षा मागणें योग्य नाहीं ! "

" तुम्ही **समर्थ** या नांवानें ज्याअर्थी सर्वत्र गाजतां आहांत त्याअर्थी तुमचा समर्थपणा काय आहे तो आम्हांला बघायचा आहे. "

" ही पृथ्वी नाना रत्नांनीं विपुल भरलेली आहे. श्रीच्या भांडारांत कसलीच न्यूनता नाहीं; परंतु तुम्हीं आमच्या छंदांत पडूं नये हेंच बरें ! "

" असल्या पोकळ साधूपणाच्या गोष्टी एकायला आम्ही येथें आलों नाहीं. वाद करावा किंवा जयपत्र द्यावें. "

" **कल्याणा**, शास्त्रीबोवा काय म्हणतात ? "

" महाराज, पात्र बहुत शुद्ध आहे. त्यांत त्यानीं आपण होऊन गांठ घातली आहे. यास्तव कृपा करावी. " **कल्याण**स्वामी बोलले.

**रामदास** स्वगत म्हणाले " अहंपणाचा शोध लावण्याकरतांच ही दिवसां मशाल लावलेली दिसलीच. एवढ्या जाड्या विद्वानाला केवढा हा अविद्येचा डाग! " **कल्याण**स्वामी " **समर्थ** बोलले " तो मोळक्या कोण चालला आहे त्याला बोलावून आणा ! "

**समर्थांनीं कल्याणाला** सांगितल्याप्रमाणें तो मोळक्याला बोलावून आणायला गेल्यावर **सदाशिव**शास्त्री आपल्याच मनाशीं म्हणाले—

" काय हें चमत्कारिक भाषण ! स्वामीचें बोलणें पाहिलें तर नम्रपणाच दिसतें, पण आम्हीं आलों असतां उठून आम्हांला नमस्कार करीत नाहीं. इतका तर हा उद्धट आहे ! "

**कल्याणानें** मोळक्याला तेथें आणल्यावर **स्वामींनीं** त्याच्याकडे कृपा-दृष्टीनें पाहिलें तेव्हां त्यानें " जोहार, मायबाप ! मी महार आहें. मला काय आज्ञा आहे ? " अशी विनंति केली.

" तूं काय काम करतोस ? **समर्थांनीं** विचारलें.

" **स**ज्जनगडावर मठांत लांकडाची मोळी देऊन पोटाला भाकरी मिळवतों."

" **कल्याणा**, ह्या कुबडीनें जमीनीवर एक आडवी रेषा ओढून त्या मोळ-क्याला आंत बोलाव ! "

" येरे ही रेषा ओलांडून आंत ! " **कल्याणानें** जमीनीवर एक रेषा ओढून मोळक्याला आंत येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो आंत आल्यावर त्याला **समर्थांनीं** विचारलें—

" तूं कोण आहेस ? "

" मी शूद्र आहें ! " मोळक्यानें सांगितलें.

" **कल्याण**, दुसरी रेघ ओढून त्याला आंत बोलाव ! "

" येरे हिच्या आंत ! दुसरी रेघ ओढून **कल्याणानें** मोळक्याला आंत बोलाविलें व तो आला.

" आतां तूं कोण आहेस ? " **समर्थांनीं** विचारिलें.

" महाराज, मी वैश्य आहें ? " मोळक्या बोलला.

" तिसरी रेखा ओढून त्याला आंत घे ! "

" ये हिच्या आंत ! " **कल्याण** बोलला.

" आतां तूं कोण आहेस ? " मोळक्या रेषेच्या आंत आल्यावर **समर्थांनीं** त्याला पुसलें.

" मी क्षत्रिय आहें ! " मोळक्यानें उत्तर दिलें.

" आणखी एक रेघ ओढून त्याला आंत घे ! "

" येरे इच्या आंत ! " **कल्याणानें** आणखी एक रेघ ओढून त्याला घेतलें.

" मी ब्राह्मण आहें ! " रेषेच्या आंत येऊन मोळक्या बोलला.

" कांहीं पढलेला आहेस का ? " **समर्थांनीं** विचारलें.

" ब्राह्मणधर्माला अनुसरून सर्व कांहीं पढलों आहें. कोणाशीं वाद करून परीक्षा देऊं ? " मोळक्यानें विनंति केली.

" ह्या पंडितांशीं वाद कर ! "

पंडित व मोळक्या यांच्यांत शास्त्रवाद सुरू झाला.

" काय हो, " मोळक्या म्हणाला, " हें जग परमेश्वरानें स्वतःच्या स्तुतिवादाकरितांच निर्माण केलें आहे ना ? "

" यांत काय संशय ? "

" असल्या अज्ञानाच्या गर्वराशीकडे आपण कोणच्या शक्तीनें परमेश्वराचा संबंध जोडणार ? "

" नैसर्गिक शक्तिच आमच्याकडून असें वदविते कीं, परमेश्वराच्या कांहीं एका विशिष्ट चैनीकरितां ह्या जगाची उत्पत्ति झाली आहे. "

" अहो, चैन ही अध्रुवाकरितां असून शाश्वताला तिची जरूरी नाहीं असें वेदान्ती म्हणतात. तेव्हां असल्या ह्या खेळाच्या वस्तूची परमेश्वराला काय जरूर ? "

" जरूर म्हटली तर मानवी प्राण्याचें प्रेम हीच होय ! "

" जी वस्तु उत्पन्नच झालेली नाहीं तिच्याबद्दल आधीं प्रेम कसें उत्पन्न होणार ? शिवाय ज्या स्थलीं शाश्वत असें दुःख आणि अतर्क्य अशा हाल-अपेष्टांचें साम्राज्य अबाधित चालू आहे अशा ठिकाणच्या विचित्र रमणीयतेचा अनुभव घेण्याकरतांच कोट्यवधि मानवी प्राणी उत्पन्न करण्यांत येतात ह्या म्हणण्याला प्रीति हें नांव द्यायला कोण तयार होईल ? "

" आतां सदाशिवशास्त्रयांनीं पूर्वपक्ष करावा. " समर्थ बोलले. सदा-शिवशास्त्री बोलूं लागले.

" हें जग निर्माण होण्याचें कारण काय ? "

" संसार म्हणून जें एक वेदान्त्यांचें मुख्य आणि बिन्मोल तत्व आहे तें अबाधित राहण्यासाठींच या जगाची रोजची नवी उत्पत्ति थांबत नाहीं, आणि तीच तात्विक आवश्यकता ह्या जगाच्या उत्पत्तीचें कारण आहे. "

" हें जग कोणच्या मार्गानें चाललें आहे ? "

" भौतिक आणि आधिभौतिक या दोन मार्गांनीं ! "

" ह्या दोहोंत श्रेष्ठ मार्ग कोणचा ? "

" आधिभौतिक ! "

" तो कसा ? "

" त्यांत दोन्ही मार्गांचा अनुभव घेतां येतो म्हणून ! "

" जो मार्ग—हेवा, द्वेष, मत्सर वगैरेनीं तुडुंब भरलेला असून, ज्यांत रक्तपातासारखीं अघोर कर्मं घडतात, त्यांत भौतिकतत्व कसें सांपडणार ? "

" भौतिक मार्गाची वाट सुलभ करणाऱ्या वस्तु आधिभौतिकाशिवाय मिळणें दुरापास्त आहेत. आणि त्या नसतील तर भौतिकांत मन शिरण्याला देहाचें स्थीरत्व आवश्य आहे ! "

" आजपर्यंत भौतिक मार्ग कसा चालला ? "

" अनेक संसारी लोकांच्या साह्यानें ! "

" तो कसा ? "

" सुखानें संसार करण्यास स्वराज्य हवें. स्वराज्यच जर भौतिकांत निमग्न होईल, तर कोणी कोणाला पुसणार नाहीं आणि त्यायोगें परकीय लोकांचें फावून स्वराज्याबरोबर दोन्ही मार्गांतून हद्दपार व्हावें लागेल. पुढें गुलामगिरीचें परकीय जोंखड मानेवर बसून तेल व तूप नष्ट झालेलें धुपा-टणें हातीं येईल. "

" सर्वच जर संसारी झाले तर विरक्त कोणीं व्हावें ? "

" श्रीसमर्थ रामदासस्वामींप्रमाणें कोट्यवधींत एकाद्यानें ! "

" ह्याचें कारण काय ? "

" राष्ट्ररक्षणाला जसे लाखों सैनिक लागतात, त्याचप्रमाणें लाखों संसाऱ्यांना संसारांत राहून परमार्थाची वाट सुगम करून दाखविणारी एकच विभूति पुरे होते म्हणून ! "

" प्राण्याची प्रकृति काय आहे ? "

" सुखोपभोगी ! "

" खरें सुख कोठें आहे ? "

" ब्रह्मानंदांत ! "

" मग तें संसारांत मिळेल काय ? "

" अल्बत्—मिळालेंच पाहिजे ! "

" तें कसें ? "

" स्त्रीरूप शक्तिसेवनांत ! "

" परंतु तें शाश्वत नाहीं ! "

" सर्वच जर स्वप्न तर राहिलें काय ? कर्ता व करविता जो कोणी तो मात्र खरा. "

" तो कसा आहे ? "

" तो सर्वांत असून सर्व जरी त्यांत आहे, तरी तो सर्वांहून भिन्न आहे ! "

" त्याचें स्वरूप काय ? "

" विश्व ! "

" पृथ्वी कोठें आहे ? "

" विश्वांत ! "

" विश्व कोठें आहे ? "

" आकाशांत ! "

" आकाश कोठें आहे ? "

" आभासांत ! "

**सदाशिव**शास्त्री कुंठित झाले. त्यानीं **समर्थां**च्या पुढें अनन्यभावानें लोटांगण घातलें व सद्गदित अंतःकरणानें ते बोलूं लागले.

" जन्मजन्मांतरींच्या पुण्याईनें ब्राह्मण झालों. वाराणशीक्षेत्रीं चोवीस वर्षें अध्ययन केलें. गर्वानें दिवसां मशाल पेटवून जानव्याला सुरी बांधली. अनेक

जयपत्रें मिळविलीं. राजा **शिवाजीची** सभा जिंकण्याच्या उद्देशानें आलें. **समर्थांशीं** गर्वोक्ति केल्या **ज्ञानेश्वरानीं** रेड्याकडून वेद म्हणवला, **समर्थांनीं** अंत्यजाकडून माझा गर्वपरिहार केला. आतां ही मशाल प्रदीप्त कशाला हवी?" मशाल विझवून पुन्हां शास्त्रीबोवा बोलूं लागले, "प्रतिज्ञेप्रमाणें यज्ञोपवीताला बांधून आणलेल्या ह्या सुरीनें आतां जीभ कापून टाकावी हेंच खरें."

शास्त्रीबोवांनीं यज्ञोपवीताची सुरी सोडून घेऊन आपली जीभ कापण्यास सुरुवात केली, तों **समर्थाज्ञेप्रमाणें कल्याणानें** त्यांचा हात धरला.

"**पंडीत**महाराज," **समर्थ** म्हणाले, "दुराग्रहाचें कारण काय? कुणीं कुणाचें जयपत्र घ्यावें? जीभ कुणीं कुणाची कापावी? दिवसां मशाल कुणीं कुणाची विझवावी? तुम्ही समर्थ असून श्रीरघुपतीच्या भांडारांत अनेक विभूती आहेत. यास्तव दुराग्रहाची गोष्ट कधींही करूं नये." नंतर मोळक्याला **समर्थ** म्हणाले, "अरे, तुं जशा रेषा ओलांडून पुढें आलास तसाच माघारा जा!"

"आज्ञेप्रमाणें करतों; पण माझी एक विनंति ऐकावी!"

"बोल!"

"पूर्वीं मी **चित्रसेन** नांवाचा गंधर्व होतों. एके वेळीं मद्यप्राशनानें मंदांध होऊन स्त्रियांसह क्रीडा करीत असतां **नारदमुनींची** माझ्या हांतून अवहेलना झाली. त्यामुळें त्यानीं मला 'अरे मदांधा, तुला मृत्युलोकीं पशुयोनींत दोन आणि अंत्यजांत एक असे तीन जन्म होतील,' असा शाप दिला. त्याबरोबर मी शुद्धीवर आलों आणि त्यांनां शरण गेलों. तेव्हां त्यांनीं कृपार्द्र होऊन 'तुला शाप देण्याचें कारण नाहीं; परंतु ऐश्वर्यमदामुळें तुला साधूचा महिमा माहित नाहीं, पुढें कलियुगांत साधूंचे अवतार होणार आहेत त्यांचें महात्म्य काय असतें तें तुला कळण्याकरितां प्रथम शाप देऊन त्या साधूंच्या कृपेनें तुझा उद्धार होईल असा उश्शाप देतों.' असें ते म्हणाले. तेव्हां मीं विनंति केली कीं, कोणच्या साधूंच्या योगानें उद्धार होईल आणि माझे जन्म कसकसे होतील ते सांगण्याची कृपा व्हावी. तेव्हां ते म्हणाले 'तूं प्रथम **जयपाळ** राजाच्या घरीं घोडा होशिल. तेथें श्रीसांबावतार **मुकुंदराज** येऊन तुझा उद्धार करतील. नंतर प्रतिष्ठान क्षेत्रीं ब्राह्मणाच्या घरीं तूं रेडा होऊन राहशील. श्री**विष्णु**अव-

तार ज्ञानेश्वर तेथें येऊन तुझ्याकडून वेद वदवून तुझा उद्धार करतील आणि नंतर तूं चाफळास अंत्यज होऊन श्रीमारुतीअवतार समर्थ रामदास तुझा उद्धार करतील व तूं नंतर स्वस्थळीं येशील.' श्रीनारदस्वामींच्या वचनाप्रमाणें स्वामींनीं अनुग्रह करून मुक्त केलें आहे. आतां हा देह इथेंच टाकून स्वर्गाहून येत असलेल्या त्या विमानांत बसून स्वस्थानीं जाण्याची आज्ञा व्हावी!"

"नारदस्वामींची इच्छा पूर्ण झालीच पाहिजे!" समर्थ बोलले.

"आतां एक शेवटची विनंति आहे!" मोळक्या बोलला.

"बोल."

"पूर्वीच्या दोन पशुदेहांचा उद्धार झाला तेथें साधूंनीं दोहोंचे चमत्कार करून ठेवले आहेत. त्याचप्रमाणें ह्या देहापासून स्वामींनीं मुक्त केलें. तेव्हां ह्या देहाचाही चमत्कार जगाला कळून माझें अल्प चरित्र प्रसिद्ध व्हावें म्हणून रथोत्सवसमयीं रथावर श्रींची स्वारी दीपमाळेपर्यंत येते, त्याकाळीं माझा जो कोणी वंशज असेल त्याला मानाचा नारळ देऊन नंतर श्रींची स्वारी माघारी फिरावी असा वर द्यावा."

"ठीक आहे. तुझी इच्छा पूर्ण होईल!" समर्थांनीं वर दिला.

अद्यापि ती वहिवाट सुरू आहे. ह्यावरून त्या गोष्टींत कांहीं तरी तथ्य आहे असें राध्यांच्या सुधारणेच्या काळीं सुद्धां कोणालाही कबूल करावें लागेल.

समर्थांचा वर ऐकतांच त्या अंत्यज मोळक्यानें मानवी देहाचा त्याग करून दिव्य देह धारण केला आणि घंटानादांत व विद्युल्लतेसारख्या दिव्यप्रकाशांत अंतराळांतून आलेल्या विमानांत बसून तो वर चालता झाला. हा कल्पनातीत चमत्कार पाहून तेथील सर्व मंडळी आश्चर्यचकित झाली व आपापल्या मनांत समर्थांच्या अलौकिक शक्तीचें कौतुक करूं लागली. सदाशिवशास्त्री तर अगदीं मेल्यापेक्षां मेले होऊन मोठ्या विनम्र वदनानें आणि सगद्गदित आवाजानें बोलूं लागले.

"मी पतित आहें. मला आज स्वर्गीचा चमत्कार दाखवून स्वामींनीं पावन केलें.

**यस्मिन् कस्मिश्च वर्णे तु ज्ञानं देहं प्रतिष्ठितम् ।**
**तस्य दासस्य दासोहं भवेज्जन्मनि जन्मनि ॥**

असें भगवद्वाक्य आहे. तेथें माझ्यासारख्या यःकश्चित् कःपदार्थ पामराचा काय पाड ! **स्वामींनीं** मला अनुग्रह देऊन माझा उद्धार करावा."

"तुम्ही जन्मजन्मांतरींचे **श्रींचेच** दास आहांत. आतां तुमची या जगांतली इतिकर्तव्यता संपली आहे. म्हणून तुम्ही इतउत्तर **सदाशिव** हें नांव सोडून देऊन **वासुदेव**पंडीत हें नांव धारण करा आणि मौजे कण्हेरी, प्रांत **शिरोळें** येथें मठ करून राहून आमच्या इतर शिष्यांप्रमाणें **श्रींचा** संप्रदाय वाढवावा."

**समर्थांची** अशी आज्ञा होतांच **सदाशिव**शास्त्र्यांचे आतां **समर्थ**कृपेनें बनलेले **वासुदेव**पंडीत पालखींत न बसतां **समर्थांना** प्रणाम करून त्यांनीं निदर्शित केलेल्या ग्रामाचा तडक रस्ता धरला. तेव्हां **कल्याण**स्वामींनीं पुढीलप्रमाणें एक श्लोक म्हटला:—

**म्हणे दास सायास त्याचे करावे।**
**जगीं जाणता पाय त्याचे धरावे ॥**
**गुरू अंजनेवीण तें आकळेना ।**
**जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ॥**

जयजय रघुवीर समर्थ !"

**वासुदेव**पंडितांनीं आपला मार्ग धरल्यावर त्यांच्याबरोबर **रायगडा**वरून आलेल्या इतरमंडळीनें **समर्थांची** पूजा करून पुन्हां माघारा **रायगडाकडे** जाण्याचा रस्ता धरला आणि **समर्थ** व **कल्याण** यांचें संभाषण सुरू झालें.

"**कल्याणा, शिवबा दिल्लींत औरंगजेबाच्या** कैदेंत सांपडला आहे. त्याला मदत करण्यासाठीं **शीखगुरु अर्जुनसिंह** याच्याकडे पूर्वींच दोघां शिष्यांची रवानगी केली आहे आणि आतां आम्हांलाही **दिल्लीस शिवबाच्या** मदतीला जाणें प्राप्त आहे. म्हणून आतां इथल्या शिष्यशाखेची व्यवस्था लावली पाहिजे. पण प्रथम एक काम उरकायचें आहे. आम्ही बसलों आहोंत ह्या धोंड्याचें नांव **बहिर**धोंडा असें ठेवतों. कारण **बहिरु** महाराचा हा मृत देह याच्याखालीं पुरायचा आहे. असो. **वेणूला मिरजेस, उद्धवाला इंदुरास, भिका-**

**जीला** राजा **व्यंकोजी**पाशीं वगैरे बऱ्याच शिष्यवर्गाला निरनिराळया ठिकाणीं मठ स्थापून देऊन त्यांची व्यवस्था केली आहे. आतां राहिलांत तुम्हीच. तेव्हां तुमचीही आतां व्यवस्था केली पाहिजे. **अक्काची** व्यवस्था परळीच्या मठांत केली आहे.''

"आज स्वामींनीं हें काय मनांत आणलें आहे? मला दूर करणें योग्य नाहीं."

"आजपर्यंत आमच्याजवळ राहून हेंच का ज्ञान तुम्हांला प्राप्त झालें?"

"तसें नव्हे; परंतु सेवेंत अंतर पडूं नये ही इच्छा आहे!"

"**कल्याणा**, प्रत्येक प्राण्याची उत्पत्ति कांहींतरी एका विशिष्ट कारणामुळें होत असते. तें काम त्याच्या हांतून पार पडलें म्हणजे त्याची ह्या जन्मांतली इतिकर्तव्यता संपते आणि नंतर तो आपला पसारा व्यवस्थित करून, स्वकर्माप्रमाणें पुढच्या मार्गाला लागतो. त्यचप्रमाणें आमचीही स्थिति आहे. या जगाला सांगण्याकरतां परमेश्वरानें आम्हांला जो निरोप सांगितला होता आणि जें कर्म करण्याची आज्ञा केली होती त्या दोहोंतून आम्ही पार पडलों असून त्याचें चित्र येत्या १५९६ च्या ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीला जगाला मोठ्या उज्वल स्वरूपांत दिसणार आहे. तें दृष्टीस पडलें म्हणजे आम्ही आमच्या स्वधामाचा मार्ग जोरानें चालू लागणार. नंतर जगापासून अलिप्त राहून दुसऱ्याच एका विशिष्ट गोष्टीची आम्हांला व्यवस्था करायची आहे."

"महाराज, मायेचा तडाखा अजब असल्यामुळें तिच्यापासून दूर होतां येत नाहीं आणि म्हणूनच विरहाचे कष्ट होतात."

"**कल्याण**स्वामी, माया मिथ्या म्हणजे अबद्ध ब्रह्म तीच माया आणि माया तेंच ब्रह्म."

"या दोहोंत पृथक्त्व नाहीं असें जर मानलें तर वेदान्तादि शास्त्रांना बाध येतो. **वसिष्ठ, वामदेव, व्यासादि**कांच्या कृत्याला बाध येतो आणि **मन्वा**दिकांच्या शब्दांना असत्यता येते हें कसें काय?"

"तसें नव्हे. वेदान्तादि शास्त्रें खरीं असून, ते थोर लोक त्याग शब्द बोलून पूर्णपदाला पावले हें ही खरें. इतकेंही असून ब्रह्म तीच माया आणि माया तेंच ब्रह्म हेंही खरेंच आहे!"

"तें कसें?"

" ब्रह्म म्हणून जसा कांहीं एखादा पदार्थ दाखवितां येणें शक्य नाहीं, तसेंच मायेचेंही असून, तीही ब्रह्माप्रमाणेंच सर्वव्यापी आहे. अग्नींत दाहकत्व आणि प्रकाशकत्व हे जरी दोन गुण आहेत, तरी दाहकत्वाला आणि अग्नीला पृथकत्व नाहीं. अग्नीचा धर्म प्रकाशकत्वाचा असून उपाधीच्या योगानें जरी त्याच्या अंगीं दाहकत्व आहे तरी पृथकत्व नाहीं. दाहकत्व आणि पृथकत्व हे गुण पृथक पाहणें असेल, तर प्रफुल्लित अग्नींत मोहोऱ्याच्या खड्याला कच्चें सूत गुंडाळून तो अग्नींत टाकला असतां, सुताला अग्नीचा स्पर्श होत नाहीं. कारण, मोहोऱ्याच्या योगानें दाहकत्वाचें पृथकत्व झालें. "

" मी मूढ आहें. मला हें काय कळणार ? "

" याचा अर्थ असा कीं, लौकिक मायेनें व्याप्त असून तुमचें आणि आमचें पृथकत्व आजपासून लौकिकदृष्ट्या होणार आहे. याचें स्पष्टीकरण व्यवहारदृष्ट्या पाहिलें असतां झाडाखालीं झाड वाढत नाहीं हें आहे. "

" ह्यावरून **समर्थांना** माझा कंटाळा आला आहे असें दिसतें. महाराज, माझा अव्हेर करून मला दूर करूं नये एवढीच विनंति आहे. "

" आत्मा आत्म्याच्या ठायीं लीन होतो, म्हणूनच पापाचरणी लोकांना पुण्याचरणी लोकांच्या संगतीचा फायदा होतो. प्रत्यक्ष प्रमाण युवराज **संभाजीचेंच** घ्या. ते आपल्या बापापेक्षां जरी शूर निपजणार आहेत, तरी पुढें कुसंगतीनें दगा पावणार आहेत अशी त्यांची जन्मकुंडली स्पष्ट सांगते आहे. ही गोष्ट **शिवराजाला** आगाऊ समजली असल्यामुळें, **शिवबा** कोठेंही जावोत, ते त्यांस आपल्यापासून कधींच दूर करीत नाहींत. वास्तविक पाहिलें असतां युवराजांचें वय या वेळीं अवघें नऊ वर्षांचें आहे. अशा अल्पवयांत सुद्धां **शिवरायांनीं** त्यांना जें **दिल्लीस** बरोबर नेलें आहे त्यांतलें हेंच वर्म जरी खरें आहे, तरी **औरंगजेबाच्या** मनांत स्वतःविषयीं पूर्ण विश्वास उत्पन्न व्हावा व त्या पुरुषव्याघ्राच्या बच्याला मुसलमानी दंगल लहानपणापासूनच दृष्टीस पडून मूळ प्रकृतींत भर पडावी हे दोन मुद्दे **शिवराजाला** साधायचे आहेत. तुमची गोष्ट तशांतली नाहीं. तुम्ही पुरे कसोटीला उतरलेले आहांत. "

" आणि म्हणूनच स्वामीचरणांची सदोदित सेवा करीत संनिध राहाण्यापलीकडे दुसरा कांहीं हेतु नाहीं. "

" **श्रीरघुपतींच्या** इच्छेआड कोणीं व्हावें ? तुमच्या हातून त्यांची सेवा उत्तम प्रकारें पार पडल्यामुळें, इतउत्तर तुमच्या हातूंन उपासना वाढवून जगदुद्धार करवावा अशी **श्री**चींच प्रत्यक्ष इच्छा आहे आणि तिला तुम्हीं मान देणें आवश्य आहे. यास्तव **श्रीं**ची इच्छा पार पाडण्याकरितां तुम्हांला आमच्यापासून आतां दूर झालेंच पाहिजे. "

" दूर म्हणजे कोठें ? "

" **शिवराजांनीं** शिष्यवर्गाकरितां ज्या सनदा करून दिल्या आहेत, त्यांपैकीं डोमगांवची सनद तुमच्याकरतां वाट पाहाते आहे. तिचा तुम्हीं स्वीकार करून, त्या गांवीं मठस्थापना करावी; कारण, तें स्थान तुमच्यासाठीं तुम्हींच पूर्वी नेमून ठेवलेलें आहे, म्हणून आमच्या झोळींत आजपर्यंत वास्तव्य करून राहिलेली ही तुमच्या नांवाची सनद तुम्ही घ्या. अनमान करूं नका ! "

" आज्ञेप्रमाणें करणें प्राप्त आहे; पण 'पूर्वींच जागा तयार करून ठेवली आहे ' या म्हणण्याचा अर्थ कळत नाहीं. "

" ह्याचा अर्थ असा आहे कीं, पूर्वीं आपण कांहीं मंडळीसह **सीना** नदीच्या तीरावरून पर्यटण करीत असतां, डोमगांवाजवळच्या एका जाळीला आमच्या मेखळेचा पदर आडकला होता. तो पदर तुम्हीं स्वहस्तें सोडविलांत. तेव्हां त्याचा भाव असा कीं, त्या जागीं आम्हीं असावें ही त्या भूमीची इच्छा खरी, परंतु परमेश्वरी संकेताप्रमाणें, तुम्हीं आम्हांला आमच्या मेखळेचा पदर सोडवून तेथून दूर केलेंत. म्हणून तीच जागा तुम्हीं आपल्याकरितां निवडून ठेविली आहे आणि परमेश्वरानें नेमली आहे. तेव्हां परमेश्वराचे अशा रीतीनें व्यक्त होणारे गुप्त हेतु पार पडलेच पाहिजेत. तेथें उपाय नाहीं. म्हणून आतां अज्ञानांत न शिरतां परळीस गेल्यावर निघण्याची तयारी करा. शिष्यवर्गांत जीं लहान लहान मुलें आहेत तीं बरोबर घ्या. प्रस्थानाला मुहूर्त बघण्याचें कारण राहिलेलें नाहीं. कारण, ज्या दिवशीं आमची मेखळा तुम्हीं सोडवलीत त्याच दिवशींच्या सुमुहूर्तावर तुम्हीं प्रस्थान ठेवलेलें आहे. "

"**समर्थांच्या** संकल्पाबाहेर कोण जाणार! परंतु देहान्तापर्यंत सेवा घडावी ही इच्छा आहे."

"बापा, तूं आहेस तावत्कालपर्यंत तुझ्याच हातून सेवा घडेल. काळजी करूं नको. एक गोष्ट लक्ष्यांत ठेव कीं,

मालकंस—दादरा

**मना मानसीं दुःख आणूं नकोरे।**
**मना सर्वथा शोकचिंता नकोरे॥**
**विवेकें देहे बुद्धि सोडून द्यावी।**
**विदेहीपणें मुक्ति भोगीत जावी॥"**

**कल्याण**स्वामींनीं **समर्थांच्या** पदकमलीं मस्तक ठेविलें आणि मोठ्या करुणपूर्ण वाणीनें पुढील पद्य म्हटलें.

पिलु—दादरा.

**जनीं सर्व सूखी असा कोण आहे।**
**विचारी मना तूंचि शोधोनि पाहे॥**
**मना त्वांचि रे पूर्व संचीत केलें।**
**तयासारिखें भोगणें प्राप्त झालें॥**

जयजय रघुवीर समर्थ!

**कल्याणानें** परळीचा रस्त धरला व **समर्थ** जंगलांत अदृश्य झाले.



# प्रकरण अठरावें.

## दख्खनचा राजा.

विजापूरकरांचें शिद्दीजोहारच्या आधिपत्याखालचें सैन्य कर्नाटकांत गुंतलें आहे असें पाहून शिवाजीनें पुन्हां त्यांचे कित्येक किल्ले व सांवतांचा वाडी प्रांत जिंकून घेतले. असा त्याचा अलौकिक पराक्रम पाहून, हताश होऊन आणि आतां आपली धडगत लागणार नाहीं अशी खात्री होऊन विजापूरकरांनीं इ. स. १६६२ मध्यें त्याच्याशीं तह केला.

शिवाजीला विजापूरकरांपासून भीति नाहींशी होऊन तो कांहींसा मोकळा झाल्यामुळें विजापूरकरांशीं तह झाल्याबरोबर दिल्लीच्या बादशहाच्या मुलखांत स्वाऱ्या करूं लागला. प्रथमतः त्यानें औरंगाबादेपर्यंत मोंगलांचा मुलख लुटून पुष्कळ द्रव्य जमा केलें. ही गोष्ट दिल्लीपतीला समजतांच त्यानें शाइस्तेखानाला मोठें लष्कर देऊन त्याच्यावर धाडलें. खानाची हवेलंडी कशी चमत्कारिक युक्तीनें शिवाजीनें उडवली हें मागें वाचलेलें वाचकांस स्मरतच असेल. त्यानंतर तो सुरत शहर लुटून शिवाजी माघारा रायगडाला आला. याच वेळीं विजापूरकरांशीं शिवाजीचें यजमान व चाकर अथवा राजा व सरदार हें नातें तुटून शिवाजीनें स्वतःला राजा हा किताब उघडपणें घेतला व आपल्या नांवाचें नाणें पाडिलें. पुढें इ. स. १६६५ या वर्षी शिवाजीनें जलमार्गानें जाऊन किनाऱ्यावरील बारशिलोर नांवाचें मोठें प्रसिद्ध श्रीमंत नगर लुटिलें आणि तेथून अपार द्रव्य आणिलें. याच सुमारास त्याच्या लढाऊ गलबतांवरच्या लोकांनीं मक्केच्या यात्रेस जाणाऱ्या कित्येक मुसलमानांचे यात्रेकरू लुटले. दिल्लीपति औरंगजेब बादशहाला त्यामुळें फारच राग आला व त्यानें शिवाजीचें पारिपत्य करण्याकरितां दिलेरखान व जयसिंग या दोघां मुसलमान व हिंदु सेनापतींची नेमणूक करून त्यांच्या सैनापत्याखालीं प्रचंड सेनासागर दिला.

त्यांनीं एकाएकीं **शिवाजीच्या** मुलखांत शिरून मोठा अनर्थ मांडला. त्यामुळें **शिवाजीला** आपली तयारी करण्यासही अवसर सांपडला नाहीं. **मराठी** राज्याची स्थापना होत आहे तोंच त्याच्यावर ही मोठी धोंड येऊन कोसळली. **परंतु शिवाजी** पुरा छातीचा आणि अजमावलेल्या धारिष्टाचा खरा **रणशूर** आणि अप्रतिम मुत्सद्दी असल्यामुळें जरी आतां **मराठीराज्य** बुडणार असें त्याला वाटूं लागलें होतें तरी कोणच्या प्रसंगीं कसें वागावें या बाबतींतला मुत्सद्दीपणा **शिवाजीच्या** अंगीं शौर्याच्या तोडीचाच असल्यामुळें तो आपण होऊनच त्या दोघां सरदारांच्याकडे भेटायला गेला. 'आपण कांहीं जहागीर घेऊन बादशाहाची चाकरी करण्यास राजी आहों,' असें त्यानें त्या दोघां सरदारांपाशीं कबूल केलें. त्याचें म्हणणें **जयसिंगानें** बादशाहास कळविलें. ते म्हणणें **दिल्ली**पतीनें मान्य केलें. **विजापूरकरांवर पंढरीच्या** वारकऱ्यांना बरोबर घेऊन स्वारी करण्याच्या कामीं **औरंगजेबाच्या** म्हणण्याप्रमाणें **शिवाजीनें जयसिंगाला** मदत केली.

**औरंगजेबाच्या** इच्छेप्रमाणें जयसिंगाबरोबर **विजापुराव**र स्वारी करण्यास निघण्याच्या पूर्वी, **शिवाजीनें औरंगजेबा**स एक विनंतिपत्र पाठवून **विजापूर**करांच्या कांहीं मुलुखाची चौथाई आणि सरदेशमुखी असे दोन हक्क मागितले. **औरंगजेबाच्या** मनांत **विजापूरची** बादशाही रसातळाला नेऊन नामशेष करण्याचें होतें. सबब त्या कामांत **शिवाजीचा** फार उपयोग होईल असें मनांत आणून त्यानें **शिवाजीचें** मागणें कबूल केलें. तेव्हां तो कांहीं फौज घेऊन **जयसिंगा**बरोबर **विजापुरा**वर चाल करून गेला. त्यावेळीं त्यानें असा कांहीं विलक्षण पराक्रम केला कीं, तो ऐकून बादशाहा **औरंगजेब** त्याच्यावर फारच खूप झाला. त्यानें त्याबद्दल बहुमानाचीं वस्त्रें पाठवून दिल्लीस आपणांस भेटण्यास येण्यास त्यास बोलावणें पाठविलें.

बादशहाचें बोलावणें कबूल करून, **शिवाजी** आपला पुत्र **संभाजी** ह्यासहवर्तमान बादशहास भेटण्यास **दिल्लीस** गेला. **दिल्लीस** जातांना पंधराशें **मावळे** सशस्त्र घोडेस्वार त्यानें आपल्याबरोबर घेतले होते. **दिल्लीस** जाण्यास निघतांना **शिवाजीनें** आपल्या राज्याचा बंदोबस्त **समर्थाज्ञे**प्रमाणें **अष्टप्रधानांच्या** ताब्यांत देऊन त्यांचें नायकत्व मातोश्री **जिजाबाईसाहेब** यांचे हातीं दिलें

होतें. तानाजी मालुसरे आणि नेताजी पालकर या दोघां दोस्त त्यानें आपले खास शरीरसंरक्षक म्हणून बरोबर घेतले होते. शिवाजी ससैन्य दिल्लीस चालला होता तरी रस्त्यांत त्याच्या सैन्यानें कोणत्याही तऱ्हेचे अत्याचार केले नाहींत. यावरून शिवाजीच्या आज्ञेची त्याच्या सेनेवर केवढी जरब आणि शिस्त होती हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. शिवराज आपल्या दाक्षिणी लांब पल्ल्यांच्या भालेवाल्या पंधराशें मावळ्यांच्या रिसाल्यासह दिल्लीस जाऊन पोंचल्यावर मिरझाराजांच्या रामसिंग नांवाच्या मुलानें आगाऊ ठरल्याप्रमाणें त्याचें उत्तम स्वागत केलें व औरंगजेब बादशहाला त्याच्या आगमनाची वार्ता समक्ष जाऊन सांगितली. शिवाजीला दरबारांत कधीं बोलवायचा तो दिवस नक्की ठरला व त्याप्रमाणें दिवाण-ई-आम नांवाच्या दरबार भरण्याच्या मोठ्या प्रशस्त जागेंत भर दरबारांत त्याची गांठ घेण्याचें ठरलें. दिवाण-ई-खासमध्यें भेट न घेतां दिवाण-ई-आममध्यें भेट घेण्याचें ठरविण्याचें कारण, आपल्या बादशाही वैभवानें शिवाजीचे डोळे दिपवून सोडून त्यानें बादशाही अमलाला भिऊन दबून राहावें, हें जसें एक कारण होतें, तद्वतच दुसरेंही एक चमत्कारिक व अतर्क्य असें कारण होतें. शिवाजीला औरंगजेब जरी 'पहाडका चुव्वा' असें म्हणत असे, तरी तो वाघासारख्या वीस वीस हातांच्या लांब पल्ल्याच्या हव्या त्या जागीं कुद्या मारतो असें दिल्लीपतीनें ऐकलेलें असून, त्यामुळें तो आपल्यापासून दरबारांत निदान दोनचार कुद्यांच्या अंतरावर तरी असावा म्हणजे आपल्या जिवाला धोका येण्याचा संभव नाहीं अशी औरंगजेबाची समजूत होती. ही जी दिल्लीपतीला भीति वाटत होती तिचा प्रतिकार करण्यास लायख असें शिवाजीची मोठ्या ऐश्वर्यांत भेट घेण्यास योग्य स्थल दिवाण-ई-आम हेंच होतें. त्या ठिकाणीं शहाजहान बादशहाचें मयूर सिंहासन आपल्या बादशाही ऐश्वर्यानें शोभत होतें. त्या स्वर्गीय दरबाराचें काय वर्णन करावें! तेथील खांबावरील रत्नमौक्तिकजडित भरगच्ची रेशमी अलौकिक पडद्यांच्या लोंबत्या रेशमी गोंडेदार काढण्यांचेंच जर वर्णन करूं लागलों, तर त्या काढण्या आणि प्रत्यक्ष दिल्लीपतीची कन्या लावण्यवती जिबुन्निसा हिच्या चालतांना झुकत असलेल्या दोन्ही हातांशीं स्पर्धा करण्याकरितां पुढें सरसावलेल्या आहेत असाच

भाष होत होता. सभागृहाच्या वरील वरंडयांत, दख्खनचा प्रतापी वीर कसा काय आहे तो बघण्यासाठीं बादशहाची आवडती कन्या जिबुन्निसा आपल्या अंतर्गृहांतील परिवारासह जडावाच्या झालरीच्या आंतील रेशमी जाळीदार पडद्यांत मोठ्या मिजाशीनें बसली होती. इतक्यांत भालदाराची ललकारी ऐकूं आली. दरबारांत जमलेले सर्व सरदार खाड्खन् उठून उभे राहिले. त्यांचे उजवे हात त्यावेळीं बादशहाला नमून मुजरा करण्यासाठीं अगदीं आतुर झाले होते असें त्यांच्या चलनवलनावरून दिसत होतें.

" पाक् परवरदिगार, शुक्रे मौलाके कमालप्यार्, और् नेहायत् हज्जार बार, हुजूर्के समसेर्से दुष्मन् हुये बेजार् बद्जाद् बने बेमार. चष्मरोषन् खुषींमें चमन्में चिडिया मष्गूल जहांपन्हां बादशाहा देहलीके शहान्शहा औरंगजीब बाद्शाह् तशरीफ् लाते है. गरीबनवाज् बाद्शाह्की दौलत उमर बढती है. रियासत्को खुदा पर्वरीष करता है. दुनिया दुरोझेका मालिक् नाहिंजारको गारद् करदेता है. तन्दुरुस्तीकी चमन् चष्मरोषन् चली है. सबोंके आदाब्पर् निगा रखीये मेहेर्बान्. "

भादलादाराची याप्रमाणें ललकारी झाली व मोठ्या मिजाशीनें परंतु अत्यंत सावधपणानें दिल्लीपतीची स्वारी आपल्या लवाजम्यानिशीं दरबारांत प्रवेश करून सरदारांची ताजीम घेतघेत मोठ्या दिमाखानें दाढीमिशांवर हात फिरवीत फिरवीत मयूरासनाच्या पायऱ्या चढून जाऊन स्वस्थानीं विराजमान झाली. त्याची लावण्यवति लाडकी कन्या जिबुन्निसा लगेंच आपल्या गोशांतून उठून बरोबरच्या शरीररक्षक सशस्त्र तातार स्त्रियांसह आपल्या बापाजवळ येऊन बसली. औरंगजेबाचा दरबार इतर शौकी बादशहांप्रमाणें विलासमग्न झालेला नसल्यामुळें आणि त्यांतल्या त्यांत आजचा दरबार हा विजापूरकरांची खोड मोडून विजयी वैभवांत बादशहाचा सरदार म्हणून दख्खन्चा प्रतापी वीर जो शिवाजी त्याची भेट घेण्यासाठीं मुद्दाम भरविलेला असल्यामुळें त्या दरबारांत दरबारच्या सुरुवातीच्या समयीं होणाऱ्या इतर बादशहांच्या दरबारांतील थाटमाटाच्या नाचरंगांची किंवा सरदार वगैरेंच्या नेच्यांच्या हुक्क्यांच्या लांबलांब वळवळणाऱ्या नळयांच्या गुंडाळ्यांची गैरहजेरी होती यांत नवल तें काय ! नेहमींच्या दरबारच्या ठराविक कामांपैकीं पेषकारीचें काम संपतें आहे नाहीं तोंच आज

द्वारानें रामसिंग, शिवराज, संभाजी यांचीं नांवें आपल्या ऊर्दू जबानींत वहिवाटीप्रमाणें ललकारलीं व त्यांना दरबारांत प्रवेश करण्याची बादशाहानें संमति दिली. रामसिंग पुढें झाला व त्यानें नेहमींच्या दरबारच्या वहिवाटीप्रमाणें सभागृहाच्या मध्यभागीं जाऊन मोठ्या आदबीनें लवून त्रिवार बादशाहापुढें कुर्निसात् केली. त्याच्या मागोमाग शिवरायांनीं येऊन एकशेंएकवीस अकबरी मोहरा भरलेला एक रत्नजडित सोन्याचा चषक बादशाहापुढें पहिलीच भेट म्हणून नजराणा ठेवून शंभू महादेव, शहाजी आणि जिजाबाई यांस मनांतून परंतु बाह्यात्कारें बादशाहास त्रिवार मुजरा केला. संभाजीचें वय ह्या वेळीं अवघें सात आठ वर्षांचें असतां त्यानें आपल्या बापाप्रमाणेंच वर्तन केलेलें पाहून सर्व सभागृह आश्चर्यानें थक्क झालें व सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांत राहणारा शिवाजी व त्याचा पुत्र संभाजी हे दोघे रानटी लुटारू जातीचे पुरुष असावेत असा जो तेथील लोकांचा समज झाला होता तो त्यांच्या त्या संस्कृत वागणुकीला पाहून साफ नष्ट झाला. शिवाजीच्या वर्तनावरून बादशाहाची भीति बरीच दूर झाली. त्याचा तो गौर राजवर्ण, चमकणाऱ्या नक्षत्रांच्या तेजालाही लाजविणारे पाणीदार डोळे, चालण्याची ती वीराला साजणारी ढब, अंगावरील मुसलमानी बड्या सुभेदारालाही खालीं मान घालायला लावणारा मर्दानी पोषाख व प्रसन्न मुखश्री हीं पाहून बादशहाची प्यारी लडकी शेहजादी जिबुन्निसा हिला त्या दोघां पितापुत्रांना जवळून बघण्याची उत्कट लालसा झाल्यामुळें तिनें आपल्या बापाला म्हणजे दिल्लीपती औरंगजेबाला त्या जोडीला सिंहासनाच्याजवळ बोलावण्याची विनंति केली व ती तावडतोब अमलांत आणण्यांत आली. औरंगजेबाच्या हरकाऱ्यानें ललकारी दिल्याबरोबर शिवाजी आपल्या पुत्रासह सिंहासनाच्याजवळ जाऊन उभा राहिला. जिबुन्निसानें त्या दोन छब्या—ते दख्खनचे राजपुरुष—यांना मोठ्या दक्षतेनें अवलोकन केलें. डोळ्यांची तृप्ति करून घेतल्यावर ती बादशाहाला म्हणाली, "जहांपन्हां, तखसीर मुआफ करना. सिवाजीको आप्के मर्जीके लेहेरमुजब् दख्खनका राजा बनाव, अगर्चे बंगालका सुभेदार बनाव! यह बादशाह्की मर्जी है। लेकिन् हमारा हुजूर्के पास एक अर्ज है, बाहू सुनना चाहिये. यह् सिवाजीके फर्जंद संभाजीको मै आप्ने गोदमें कुइदीन रखनेका इरादा

करतीहूं ! उस्को राजाके मेमनसरीखा मै आठचार दीन आपेसाथ मेहेलमें ऐष-आराममें रखदेउंगी, और बडे उफलुके इतमामसे **शिवाजीके** तर्फ पुचादेंगी. मेरा अर्मान अर्ज-खाविंद बडे मेहेरबानीसे मंजूर करेंगे ऐसा मै हक्क रखतीहूं."

" अर्ज मंजूर करनेको कुच्छ् हर्जा नहीं है ! लेकिन् यह **शिवाजी** आप्रा सरदार और उस्का फर्जंद **संभाजी** यह् दोनोंका इतमाम् और इत्बार् पहले दौलतसे उस्के दर्जे मुजब होना चाहिये. फेर तुमारे मर्जीमुआफक् सब् बन्जाएगा ! **शिवाजी**, तुम हमारा **दख्खन्**का सरदार है ! "

" हुजूर ! "

" **दख्खन**मे बडे बडे रियासतदार के जैसे **विजापूरवाले**, **गोवलकोंडावाले**, **एहेम्मदनगरवाले** यह तख्तके साम्ने आकर हात बांधके बंदगी उठाते है ! उस्के सरीखे तुम् तख्तपर बैठनेवाले न होके तुम् खाली दस् बीस हजारी सरीखा हमारा इतर दूसरे सरदारमुजब एक सरदार है ! तुमारे सारिखे यह् तख्तके साम्ने कुर्निसात करनेवाले यह् मोंगल बादशाहाके रियासतमें बहोत सर्दार है ! **रामसिंग**, **शिवाजीको** मैं पांच हजारी सरदार जाहेर करताहूं. उस्के लिये उस्को देनेकेवास्ते सब ऐवज् तयार है ! "

' पांच हजारी सरदार ' हे शब्द कानीं पडतांच **शिवाजीच्या** आंगाची लाही लाही झाली. त्याचे डोळे खदिरांगाराप्रमाणें लाल भडक झाले. **औरंगजेबाच्या** सिंहासनावर उडी मारून त्याच्या नरडीचा घोट घेण्याइतका क्रोध त्याच्या मस्तकांत भरल्यासारखा दिसूं लागला. दरबारांत अशस्त्रावस्थेंत त्याची भेट घेण्याचें पूर्वीच ठरलें असल्यामुळें **औरंगजेब** बादशाहा जरी जरासा भयरहितसा दिसत होता, तरी तो **शिवाजीच्या** हालचालींवर पूर्ण नजर देऊनच सिंहासनावर त्या दिवशीं अधिष्ठित झालेला होता.

**रघुनाथ यादव चित्रगुप्तानें**, **शिवाजी**महाराज दिल्ली येथें बादशहाचे दरबारीं भेटीस गेले, त्यावेळचें सहा श्लोकांत वर्णन केलें आहे. त्यांपैकींच पुढील तीन श्लोक होत.

शार्दूलविक्रीडित.

**शीवाजी नरनाथ भूतळवटीं वीराजला हो क्षिती ।**
**धैर्यौदार्यहि धूर्तताच अगळी धार्मीकताहो निती ॥**

पाच्छाची परवा नसेचि प्रभुतें भीमार्जुनासारिखा ।
देखोनी अवरंगजेब [ परि ] तो आला असे फारिखा ॥ १ ॥
आतां सावध्र फार जाण असणें ऐसें वदे पाच्छहा ।
आहे तारक या घडीस मजला पाहो सखा ईनशा ॥
शीवाजी मज दीसतोचि नयनें प्रत्यक्ष तो केसरी ।
अफ्जलखावत हे गतीच घडती जानोच भाई बुरी ॥ २ ॥
पाच्छाची भृति फाटलीच चपळें देखोनि राजाप्रती ।
बेमानी जरि केलिया इसघडीं होईल शास्तागती ॥
जैसा व्याघ्रहि धांवतोच निकरें देखोनियां श्वापदां ।
तैसा हा रिपु भासतोच मजला अन्यत्र नाहीं कदा ॥ ३ ॥

खरोखरीच वर वर्णन केल्याप्रमाणें **औरंगजेबाची** स्थिति **शिवाजींची** मुखश्री पाहून झाली. आपल्या उजव्या हाताला–आपल्यामागें राज्यावर बसणारा युवराज **संभाजी** आहे हेंही त्यावेळीं तो विसरला. ' पांच हजारी सरदार ' हे कर्णकटु आणि अपमानकारक शब्द कर्णपुटांत शिरतांच **शिवाजींचें** देह-भान गेलें. डावीकडे उभा असलेल्या **रामसिंगा**च्या कमरबंदांतल्या कट्यारीला त्यानें हात घातला. तिचें पातें प्रलयकालीन क्रोधमत्त **शिवरूप शिवाजी**च्या हातीं त्रिशुळाच्या प्रखर फळाप्रमाणें दिग्मंडळांत चमकलें. सर्व सभा सुन्न होऊन क्षणैक शांतरसांत निमग्न झाली. सिंहासन रिकामें दिसूं लागलें व दरबारांत एकच गोंधळ उडाला. **रामसिंगा**च्या कमरबंदांतल्या कट्यारीला **शिवाजीनें** हात घातला त्याच वेळीं **औरंगजेबानें** मागल्याप्रमाणें सिंहासना-वरून पलायन केलें होतें. ' दरबार बरखास्त ' म्हणून सर्पदार, चोपदार, दरु-बंकी आणि सखवास यांच्या ललकाऱ्या एकदम कानीं आल्या. लगबगीनें व घाईघाईनें सर्व सरदार–दरकदार दरबारांतून भीतिग्रस्ततेनें बाहेर पडूं लागले. इतक्यांत एक हरकारा बादशाही हुकुमाचें पत्र घेऊन **रामसिंगापुढें** आला व तें पत्र त्यानें मुजरा करून **रामसिंगाच्या** हातीं दिलें. त्यानें तें वाचलें.

' **शिवाजी** दऱ्याखोऱ्यांत-पहाडांत–राहणारा रानटी माणूस आहे. त्याचा बच्चा फार लहान आहे. कधीं दृष्टीस न पडणारा दरबारचा देखावा पाहून तो घाबरून गेल्यामुळें हिंस्रपशूसारखा एकदम चवताळलेला दिसूं लागला.

त्याला अंजारून गोंजारून पूर्वीच ठरवून ठेवलेल्या घरांत राहण्यास घेऊन जावें. त्याची समजूत करावी आणि त्याच्या मुलाला लडकी शेहजादी **जिबुन्निसा** इजकडे पोंचता करावा. दोनचार वेळां त्यानें दरबार पाहिला म्हणजे तो माणसाळेल. तोंपर्यंत बादशाही हुकुमानें त्याची चोख व्यवस्था ठेवा. पुन्हां हुकूम होईल त्याप्रमाणें त्याला दरबारांत घेऊन या.'

पत्रांतला मजकूर **रामसिंगानें शिवाजीला** समजाविला. **संभाजीला जिबुन्निसा**कडे धाडण्याचें **शिवाजीनें** कांहीं कारण सांगून नाकारिलें व तिघे दिल्लीपतीनें आगाऊच ठरविलेल्या जागीं पालख्यांतून बसून गेले.

**शिवाजीला** दिल्लींतील ज्या घरांत राहण्याची व्यवस्था केली होती तेथें **नेताजी** व **तान्हाजी** हे दोघे त्याचे शरीररक्षक म्हणून आणि **हिरोजी** खिजमतगार या नात्यानें राहिले होते. बाकीची सर्व गृहव्यवस्था बादशाही हुकुमतीनें राजाला साजेशीच होती. सुमारें पंधरा दिवस झाले तरी दरबारांत येण्याचें बोलावणें **शिवाजीला** आलें नाहीं व घराभोंवतीं लष्करी पाहाऱ्याचा गराडा पडला. हें पाहून बादशहाचें कपट **शिवाजीच्या** लक्षांत आलें. एके दिवशीं रोजच्याप्रमाणें **रामसिंग** भेटीस आला असतां त्याचें व त्याचें कांहीं खलबत झालें. दरबारबंदी होऊन आपण बादशहाचे नजरकैदी झालों हें त्या खलबतांत ठरलेलें **शिवाजी**च्या मुद्रेवर स्पष्ट दिसूं लागलें. तेथील बड्या बड्या अमीरउमरावांचीं मनें आकर्षण करण्याच्या बहाण्यानें **शिवाजी** त्यांच्याकडे नानाप्रकारचे नजराणे रोज धाडूं लागला. 'बरेच दिवस झाले. माझे रानांत राहणारे सैनिक बादशाही शहरांत राहण्यास नालायख आहेत; म्हणून त्यांना दिल्लीहून दक्षिणेंत जाण्याची परवानगी हुजूरनीं द्यावी.' असा **शिवाजीनें** बादशाहाकडे अर्ज केला. बादशहाला तो अर्ज ऐकून बरें वाटलें व त्यानें लगेच **शिवाजीच्या** मर्जीप्रमाणें करण्याबद्दल फर्मान् धाडून दिलें. फर्मान् हातीं पडतांच **नेताजी** व **तान्हाजी** यांस ससैन्य दक्षिणेंत निघून जाण्याचा **शिवाजीनें** हुकूम दिला व ते लगेच आपल्या रिसाल्यासह निघून गेले. त्या पितापुत्रांपाशीं **हिरोजी** शरीररक्षक म्हणून राहिला. ही सर्व व्यवस्था **शिवाजीनें** मोठ्या चातुर्यानें केली होती.

वेळ सायंकाळचा होता. यमुनानदीचा प्रवाह मोठ्या धीर गंभीरपणानें व

स्वच्छंदानें कृष्णसर्पाची कांती धरून त्याच्याच गतीनें वाहात होता. तो ओघ शिवराजांच्या या वेळच्या रहाण्याच्या स्थलाच्या बाजूनें वाहात असल्याकारणानें त्याकडे पाहून शिवाजीच्या अंतरंगांत फारच चमत्कारिक विचार उद्भवूं लागले होते. या वेळीं शिवाजी ज्या खिडकींत बसून तो यमुनेचा ओघ सलक्ष अवलोकन करीत होता ती त्या किल्लेवजा वाड्याची खिडकी पश्चिमाभिमुख असून त्यावेळीं पश्चिम दिशेचा देखावा मोठा प्रेक्षणीय दिसत होता. त्यावेळचें सूर्यास्त समयींचें पश्चिमेकडील आकाश इतकें चमत्कारिक दिसत होतें कीं, रक्तवर्ण अळित्याचीच ती एक प्रचंड नदी वाहात असून त्या नदींत एका प्रसृत अशा भव्य सुवर्णाच्या परातींत विश्वरक्षक किंवा विश्वभक्षक असा अतुल प्रदीप्त वैश्वानराचा गोल एखाद्या नौकेप्रमाणें हेलखावे खात खात चालला आहे! हा देखावा पाहून शिवाजीच्या मनांत आलें कीं, "उदय आणि अस्त यांत केवढा तरी फरक! सद्दी संपली कीं, अशी स्थिति होते ना? कर्मसाक्षी आणि जगच्चक्षु असा जो लोकबांधव दिनमणि त्याची जर ही स्थिति तर या भूमंडळावरील मी मी म्हणणाऱ्यांची ती काय कथा? माझ्याशीं कपट करून मला नजरकैदेंत अक्षयीं ठेवूं पाहणाऱ्या या दिल्लीपतीची पुढें कशी काय अवस्था होणार त्याचें भावी चित्र दाखविण्यासाठीं तर आज सूर्यनारायणानें हा देखावा माझ्या डोळ्यांसमोर उभा केलेला नसेलना? ज्या कालिंदीच्या पुलीनावर भगवंतानीं रास खेळून तें पुनीत केलें आणि त्याच यमभगिनीच्या उदरांतील कालीयाचें मर्दन करून त्याला गति दिली व तिला विषमुक्त केलें तें पवित्र पुलिंद आणि ती भाग्यवती सूर्यकन्या यमुना यांच्यापासून मला मोठा धडा घेतला पाहिजे आहे! भगवंतानें भग्नहृदय केलेला तो यमुनेच्या डोहांतला विषपूर्ण प्रमत्त कालिया आणि यमुनेच्या तीरांवर यथेच्छ विहार करून आर्यधर्माला पालथा घालूं पाहणारा हा औरंगजेब..."

सूर्य अस्ताला जाऊन घरांत दिवे लागले, काळोख पडला व शहरांत लखलखाट झाला. गार वारा वाहूं लागून यमुनेच्या कांठावर आणि पात्रांत विहार करणारे शोकी लोक घरोघर परतूं लागले. सर्वत्र नानातऱ्हेच्या पुष्पांचा घमघमाट पसरला. इतक्यांत एक अजस्र जटाधारी मूर्ति मोठ्या वेगानें यमुनेच्या पुलावरून शिवाजीच्या वाड्याकडे येतांना त्या काळोखांतून शिवाजीला

दिसली. कृष्णवर्ण मेघाच्छादित आकशांत जशी विद्युल्लता भरभर चमकतांना दिसते तद्वत ती मूर्ति त्यावेळीं **शिवाजीला** त्याच्याकडे अंधेरांतून येतांना दिसत होती. आतां ती मूर्ति त्या वाड्याच्या तटाच्या पायथ्याशीं आली. 'जयजय रघुवीर समर्थ' असा ध्वनि झाला आणि त्या वाड्याचा तो तट सुमारें तीनचार पुरुष उंच असतांही त्या दिव्य मूर्तीला तो मृत तट ठेंगणा व वाटला असावा असें दिसलें; कारण, ती मूर्ति त्या तटावर एकदम अवतीर्ण झालेली **शिवाजीला** दिसली. तो दैवी चमत्कार होता किंवा घोरपडीच्या साह्याची मानवी युक्ति होती ह्यांपैकीं **शिवाजीची** दृष्टी कांहींच जाणूं शकली नाहीं. ज्या खिडकींत **शिवाजी** बसला होता त्याच प्रशस्त खिडकींतून ती मूर्ति तटावरून आंत शिरली. **शिवाजीची** दृष्टि क्षणैक स्तिमित होऊन त्याच्या डोळ्यांपुढें अंधारी आल्यासारखें झालें; परंतु तो लवकरच शुद्धीवर आला आणि त्या मूर्तीच्या पदकमलीं विनम्र झाला ! 'कल्याणमस्तु' अशा आशीर्वादानें सुस्नात होऊन **शिवाजी** करद्वय जोडून उभा राहिला. ही मूर्ति **समर्थां**ची होती हें वाचकांनीं ओळखलेंच असेल !

" **शिवबा**, आम्हीं पूर्वी म्हटल्याप्रमाणेंच अखेर झालें ! परंतु तेंही चांगलेंच झालें ! जें कांहीं होत असतें तें चांगल्याकरतांच होत असतें ! तुझ्याशीं **औरंगजेबानें** सध्यां जी दगलबाजी केली आहे तिचा परिणाम फार चांगला व्हायचा आहे ! तूं आपल्या शब्दांतून जसा मुक्त झाला आहेस, तसाच **मिर्झाराजा**ही दोषमुक्त झाला असून, **औरंगजेब** मात्र वचनाचा सच्चा नाहीं हें सध्यांच्या तुझ्या नजरकैदेच्या प्रत्यक्षप्रमाणानें जगाच्या नजरेस आलें आहे. परकीय राजसत्तेवरील अंधविश्वास उडण्याला हिंदूंना हें एक मोठेंच उदाहरण होऊन बसलें आहे. याचा तुला फायदा घेतलाच पाहिजे. तुझी सद्यःस्थिति ही **महाराष्ट्राचीच** नव्हे तर अखिल **भरतखंडाची** गुलामगिरींतून मुक्तता करणारी एक अचाट शक्तीच उत्पन्न झाली आहे. ह्याच शक्तीच्या जोरावर अखिल **भरतखंडाचें** साम्राज्य मराठ्यांच्या हातीं येणार आहे. भावी स्थितीचें हें सुखस्वप्न नव्हे तर भावी सूर्योदयापूर्वीचा हा अरुणप्रकाश आहे. कर्तव्य काय तें करून दाखविण्यासाठीं सुमंगल असा हा हरिद्राकुंकुममिश्रित सुवर्णाचा अरुणोदय प्रभातकाळीं स्वस्तिवाचनाचें काम करूं

लागला आहे; तर डगमगूं नकोस ! तूं सध्यां जें मेवामिठाई, फळफळावळ वगैरेंच्या भेटी अमीरउमरावांना धाडण्याचें कर्म सुरू केलें आहेस त्यांतच तुला जयप्राप्ति होणार आहे ! धीर सुटूं नये म्हणूनच फक्त आम्ही येथें तुला भेट देण्यासाठीं आलों आहों ! आपण भविष्यत्‌कालीं जें कांहीं करायचें योजिलें असतें त्याची परिस्फुटता न होऊं देण्याबद्दल जसा तूं अत्यंत खबरदारी घेतो आहेस तसेंच आजपर्यंतचे मुत्सद्दी करीत आले आहेत व खरे मुत्सद्दी असेंच पुढेंही करतील. हीच खरी राजनीति आहे. ' हम् यों करेंगे और त्यों करेंगे ! और पातशाहाको ऐसे कैचीमें पकडेंगे के उसको हमारा राज हम्को बिगरजंग देनाही पडेगा ' अशा लंब्या लंब्या बाता मारून, कांहीं काल खोटा विश्वास उत्पन्न करून स्वदेशबांधवांकडून द्रव्य उकळणारे—जर लोकनायक अथवा महात्मे ठरूं लागतील तर—

**इशारतीचें बोलतां नये ।**
**बोलायाचें लिहूं नये ॥**
**लिहावयाचें सांगूं नये ।**
**जचावीनें ॥**

हीं राजकारस्थानांतील सूत्रें खोटीं ठरून ' क्रियेवीण जी वाचाळता ' तिचाच सर्वत्र जयजयकार होऊन, ' त्या योगानें फुकटच्या बडबडीनें पदराला खार न लागतां', उलट बडबडयांचे खिसे मात्र गरम होत राहतील; परंतु ही गोष्ट अशक्य आहे ! बडबडीनें केलेलें राजकारण अदूरदर्शीपणाचेंच नव्हे तर मूर्खपणाचें ठरून, बडबड न करतां किंवा कागदाला टाक न लावतां मौनव्रताचेंच खरें ठरतें ! असो. तूं प्रत्यक्ष श्रीचाच अंशभूत आहेस. आम्हीं तुला विशेष सांगावें असें नाहीं. परंतु मनुष्ययोनींत येऊन लौकिकदृष्ट्या अमानुष अशीं मानवी कर्मे करून दाखविल्याशिवाय परमेश्वराचें प्रत्यंतर मूढ जनांच्या हृत्पटलावर बिंबत नाहीं आणि मानवी बुद्धीची वाढ होण्यालाही कित्ता मिळत नाहीं म्हणून अद्‌भुत पराक्रमाच्या गोष्टी कराव्याच लागतात आणि अशा तूं करीतही आहेस हें योग्यच आहे ! आम्ही येथें येण्याचें कारण तुझ्या मनाची झालेली चंचलता साफ मोडून टाकून बुद्धि स्थिर आणि खंबीर करण्याचेंच

फक्त नसून, उद्यां सायंकाळीं तुझें ह्या शहरांतून युवराज **शंभू**सह जें प्रयाण व्हायचें आहे त्याचें प्रस्थान घेऊन जाण्यासाठीं आहे. पेटाऱ्यांत बसून तुम्ही बापलेक पळून जाण्याची वेळ आम्हीं उद्यां सायंकाळची ठरविलेली आहे! मनांत जो मतलब योजला आहेस त्याचप्रमाणें घडून येण्याच्या घटका अगदीं भरत आल्या आहेत. ह्या घटकेपासून बरोबर चाळीस घटकांच्या आंत तूं ह्या नजरकैदेंतून मुक्त होऊन **सीख** पंथांतील साधूंच्या मेळ्यांत **गुरुनाथ** या नांवानें दाखल होशील! पुढें तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं व्यवस्थित होईल! तुम्हां दोघांचे पेटारे शहराच्या बाहेर कसे पडतील याबद्दल तुला काळजी नको! तुमचे पेटारे उचलून नेणारे हमाल ऐन वेळेला या वाड्याच्या तोंडाशीं उभे असलेले तुझ्या दृष्टीस पडतील! त्यांची खूण म्हणजे त्यांच्या मस्तकांवर हिरवे पटके असतील. त्यांच्यावर बेलाशक विश्वास टाक! पूर्वीच आमच्या तीर्थयात्रेच्या प्रवासांत **रामभक्त** करून सोडलेल्या **सीखगुरु अर्जुनसिंहानें** ही सर्व तरतूद केलेली आहे! तो तुमच्यावर फार प्रेम करतो. तुम्हांला तो गुरुबंधु समजतो! पेटारेवाले जिकडे पेटारे नेऊन उतरतील तेथें **शीख** साधूंचा मेळा तुला दिसेल. त्या मेळ्यांत मिलाफ होऊन जावा म्हणून हीं पाहा, कफणी वगैरे वस्त्रें आणिलीं आहेत—हीं घे! तुम्हां दोघां बापलेकांकरतां हे कपडे मुद्दाम करवून आणले आहेत. आतां आम्ही जातों! पेटाऱ्यांत बसण्याच्या वेळीं ह्या **श्री**चरणींच्या तुलसी–मंजिऱ्या तुम्हीं दोघांनीं आपल्या मस्तकांवरील साफ्यांत धारण केल्या असतां तुम्हांला दक्षिणेंत जाण्याचा मार्ग सुगम होईल असा आमचा आशीर्वाद आहे! आतां जास्त बोलण्याला सवड नाहीं. पुढील व्यवस्था करण्यास........"

**समर्थ** एकदम आल्यावाटेनें पवनगतीनें पवनाप्रमाणेंच अदृश्य झाले. त्यांच्या चरणकमलीं पुन्हां मस्तक ठेवण्यास अवसर सांपडला नाहीं म्हणून **शिवाजीला** अत्यंत वाईट वाटलें. **शिवाजी** तसाच कष्टी अंतःकरणानें खालच्या मजल्यावर गेला. सर्व व्यवहार रोजच्याप्रमाणें सुयंत्रित सुरू झाला. प्रातःकाळ झाला. बादशाहानें नेमलेले सर्व नोकरचाकर आपापल्या कामांत गर्क आहेत असें पाहून **शिवाजीनें हिरोजीला** एकांतांत नेऊन कायसेसें सांगितलें. **हिरोजी** आपल्या कामाला गेला. **शिवाजी** नित्यनैमित्तिक उरकण्यांत गुंग

झाला. दुपारच्या दोन वाजण्यापर्यंतचा रोजचा कार्यक्रम उरकल्यावर मेवामिठाईचे करंडे भरण्याचें काम सुरू झालें.

अलीकडे सुमारें एक महिना **शिवाजीनें** आजाऱ्याचें सोंग घेतलेलें होतें. बादशाहाच्या हकीमांचीं वगैरे औषधें घेण्याचें **शिवाजीनें** धर्माच्या सबबीवर नाकारल्यामुळें त्या बादशाही राजधानींतच्याच एका शीखधर्मीय **दाससिंह** नांवाच्या देशी वैद्याचें औषध सुरू होतें. तें औषध आणण्यास जाण्याचा व प्रकृतिमान कळविण्याचा फक्त **हिरोजी**च्याच नांवाचा परवल बादशाहाकडून मिळालेला होता आणि म्हणून तेवढ्यासाठींच **हिरोजीला** जवळ ठेवून घेऊन बाकीच्या लोकांना दक्षिणेंत लावून देण्याची परवानगी बादशाहाकडून **रामसिंहा**मार्फत **शिवाजीला** मिळवावी लागली होती. आज **शिवाजीची** प्रकृति रोजच्यापेक्षां फारच अधिक बिघडली होती. मेवामिठाईचे दहावीस पेटारे ठरल्याप्रमाणें अमीरउमरावांकडे धाडण्यास सुरुवात झाली. मस्तकांवर हिरवे पटके बांधलेले हमाल त्यांतील दोन पेटाऱ्यांचे वाहक होते. **शिवाजी** आज फार आजारी असल्यामुळें त्याच्या शयनमंदिरासमीप **हिरोजी** किंवा युवराज **संभाजी** यांच्याशिवाय कोणासही जाण्याचा मज्जाव होता. **हिरोजी** मात्र शयनमंदिराच्या द्वारपालाचें काम करीत होता. मिठाईचे पेटारे योग्य स्थलीं जाऊन पोंचले. रात्र सुमारें सात-आठ घटका झाली. **शिवाजीची** प्रकृति जास्तच नादुरुस्त झाल्यामुळें परवल दाखवून **हिरोजीला** वैद्याकडे जाणें प्राप्त झालें. वैद्याकडे जातांना त्यानं **शिवाजी**च्या शयनागारांतील दिवा अत्यंत मंद करून ठेवला होता व दार लावून घेतलें असून आजारी **शिवाजीला** त्रास होऊं नये म्हणून त्या बाजूला कोणीही न फिरकण्याबद्दल सक्त ताकीत दिली होती.

**हिरोजी** औषध आणण्यास वैद्याकडे गेला तो परत आला किंवा नाहीं कोण जाणें ! रात्रीचे बारा वाजले. पहारा बदलला; परंतु **शिवाजी** फार दुखणाईत असल्यामुळें त्याला त्रास होऊं नये म्हणून त्याच्या शयनागाराकडे न जाण्याची सक्त ताकीत असल्यामुळें पहारेवाल्यांनीं दुरूनच त्या जागेकडे पाहिलें तों तें बंद असल्यामुळें महाराजांना झोंप लागली असावी अशी पाहारेवाल्यांची समजूत झाली. सकाळच्या सूर्योदयापर्यंत जितके दर तीन तासांस

पाहारे बदलायचे तितके सर्व बदलले जाऊन सर्व घरभर रोजच्याप्रमाणें नोकरचाकर आपापल्या कामांत दंग झाले. पांचसहा घटका दिवस आला. **शिवाजी**च्या शयनागाराकडे अजून सामसूमच होती. त्या बाजूला कोणाची जाण्याची ताकत होईना. आणखी दोन घटका गेल्या. आतां मात्र गृहरक्षकांच्यानें शोध घेतल्याशिवाय राहवेना! कारण, न जाणों **शिवाजी**ची तबियत इतकी बीमार असतां बादशाहाकडे वर्दी न पोंचविण्यासारखी जबाबदारी शिरावर घेण्याचें धैर्य त्यांच्यानें होईना. रक्षकांचा मुख्य धाडस करून शयनमंदिराजवळ गेला तों तेथें त्याला फारच चमत्कारिक प्रकार आढळून आला. दार उघडून त्यानें पाहिलें तों काय? सर्वत्र शून्य! त्याची छाती फाटली. कंबरेचा कांटा मोडला. तो भीतीनें मट्कन् खालीं बसला. त्याचें सर्वांग लट्लट् कांपूं लागून घामानें तो ओला चिंब झाला. आतां आपली गर्दन खास जाणार अशी त्याची बालंबाल खात्री झाली. तरी पण मरेपर्यंत जगण्याचा उपचार केलाच पाहिजे म्हणून, त्यानें आपला खास चपराशी शहरांत **दाससिंह** वैद्याकडे **हिरोजीचा** शोध करण्यास रवाना केला. तो गेल्यावर त्यानें सर्व वाड्याभर हातपाय आपटून भेटेल त्या नोकरावर यथेच्छ तोंडसुख घेण्यास आणि लहरीप्रमाणें हातांनींही समाचार घेण्यास सुरुवात केली. इतक्यांत धाडलेला खास चपराशी परत आला. त्याचा चेहेरा पाहून तर त्याचें धावें पुरें दणाणलें. तो रागारागानेंच त्याला म्हणाला "का, असा खेटरें मारल्यासारखा चेहेरा करून कां आला आहेस?"

"महाराज, तखसीर मुआफ करो! **दाससिंह** वैदका भी पता नहीं, और **हिरोजीका** भी पता नहीं! ठेकेदार मकानवाले हजरत कहते के वोह् वैद कब् मकान् छोडकर कहां गया उसका उसको पता नहीं!" चपराशानें उत्तर दिलें.

"खैर! सबकों सूली चढाना बेषख् है! फितूरी हो गया है! पहारेमेसे **सिवाजी** भग गया! जाव! यह् होक्म लेव और वोह् मकानवाले ठेकेदारको पकडेज करो!"

रक्षकाध्यक्षानें वैद्याला कैद करण्यासाठीं लेखी हुकूम देऊन चपराशाला व चार सशस्त्र शिपायांना धाडिलें आणि मोठा जळफळीचा दंगा मचावण्यास

सुरुवात केली. नंतर तो स्वतः बादशाहाकडे खबर देण्यास गेला. बादशाहाला हकीकत सांगतां सांगतां तो भीतीनें गर्भगळित होऊन जमिनीवर मूर्छित होऊन पडला. या वेळीं ऐन मध्यान्हीचा समय झाला होता.

शिवाजीकडून मेवामिठाईचे पेटारे ज्या वेळीं त्याच्या त्यावेळच्या राहत्या घरांतून बाहेर पडले होते त्या वेळीं सायंकाळचा पांचाचा अंमल होता. त्या वेळेपासून आतांपर्यंतचा काळ म्हणजे पक्का एकोणीस तासांचा काळ मध्यें गेला होता. शीख साधूंचा मेळा राजधानीपासून दहा मैलांवर होता. त्या मेळ्यांत सायंकाळीं साताच्या पुढें व आठाच्या आंत हिरवे पटकेवाले दोन मिठाईचे पेटारे घेऊन आले. त्या मेळ्याच्या महंतांनीं ते पेटारे नीट तपासून पाहून उघडले. तों त्यांत त्यांस एका पेटाऱ्यांत ऐन छत्तीससदतीस वर्षांची गौरवर्णाची व मध्यम बांध्याची राजसमूर्ति शीख धर्मीय साधूचा लिबाज असलेली दृष्टीस पडली. दुसऱ्यांत तशाच पेहेरावांतली परंतु मिसूही न फुटलेली अशी एक सुमारें सात आठ वर्षांची राजस चेहेऱ्याची आणि गोंडस बाळसेदार अंगलटीची बालमूर्ति दृष्टीस पडली. महंतानें त्या दोन्ही मूर्ती अवलोकन करून मंदस्मित केलें. सांकेतिक शब्दांनीं त्यांनीं एकमेकांस ओळखिलें. परस्परांचीं दृढालिंगनें झालीं! मस्तकावरील तुलसीच्या मंजिऱ्यांची ओळख पटली. साधूंच्या तांड्याबरोबर असलेले चार धार्मिक घोडे लगेच लढाऊ बनले व पेटाऱ्यांतून आलेले दोघे आणि इतर दोघे असे त्यांवर चौघे स्वार झाले व त्यांनीं तडक मथुरेचा रस्ता धरला. अफीम देऊन घोडे आधींच तयार करून ठेवलेले असल्याकारणानें त्यांना टांचही लावून घेण्याची फुरसद नव्हती. फुर्र आवाज करून ते जे एकदम निघाले ते मथुरेच्या रस्त्याला लागले व सीख धर्मीय साधूंचा तांडा अमृतसराच्या रस्त्याकडे निघून गेला.

प्रेतवत् मूर्च्छित पडलेल्या रक्षकाध्यक्षाला एकदम देहान्तप्रायश्चित्ताची सजा फर्मावण्यांत येऊन सर्व दिशांना स्वार पिटाळण्यांत आले. या वेळीं दुपारच्या एकाचा अंमल झाला होता. म्हणजे साधूंच्या मेळ्यांत पेटारे जाऊन पोंचले त्या वेळेपासून या वेळेपर्यंत मध्यें सुमारें सतरा तासांचा काल गेला होता. घोडे ताज्या दमाचे व अफीम चारलेले अस्सल जातीचे असून, स्वार जर उत्तम कसलेल्या मांड्यांचे असतील तर ते घोडे दर तासास निदान दमछाक करीत

चाळीस मैल जाण्यास कांहींच हरकत नसते. याच मानानें वर सांगितलेले चार घोडे आपल्यावर बसलेल्या कसलेल्या राउतांस घेऊन सतरा तासांत किती लांब निघून गेले असतील याचा अदमास करतां येईल! परंतु एकसारख्या दवडीनें सतरा तास घोडे एकसारखे पळणें अशक्य आहे. वर सांगितलेल्या चौघां घोडेवाल्या साधूंनीं आपला पहिला मुक्काम मथुरेंत केला. तेथें ते एका ब्राह्मणाच्या घरीं जाऊन उतरले. ही त्यांची उतरण्याची सोय आगाऊच ठरवून ठेवलेली होती! फरारी झालेल्या **शिवाजी**चा शोध लावण्यासाठीं चारी दिशांना धाडलेले स्वार सायंकाळीं हिरमुसलीं तोंडें करून परत आले. बादशाहाचा राग अनावर झाला. त्यानें आणखी शेंकडों मैल शोध करण्यास हजारों दूत रवाना केले, तथापि **शिवाजी** आपल्या हातावर तुऱ्या देऊन गेला याबद्दल बादशहाची वालंबाल खात्री झाली. आतां **शिवाजी** आपल्या हातीं लागणें अशक्य आहे असेंही तो समजून चुकला; तरी पण अनेक तऱ्हेचे यत्न करण्याची त्यानें माघार घेतली नाहीं.

चौघा महंतांनीं बाल महंताला त्या ब्राह्मणाच्या घरीं **मथुरेंत** ठेवून दोघांनीं **काशीक्षेत्राचा** रस्ता सुधारला व एकानें दक्षिणेचा रस्ता धरला. दक्षिणेचा रस्ता धरणारा महंत दिल्लींतील **शिवाजीला** औषध देणाऱ्या **दाससिंह** वैद्याच्या तोंडावळ्यासारखा किंवा खिडकींतून आंत घुसून **शिवाजीला** उपदेश करणारा व एकदम आल्या मार्गानें जाऊन अदृश्य होणाऱ्या **समर्थांच्या** अंगलटीसारखा असावा असें दिसत होतें. **मथुरेस** ब्राह्मणाच्या घरीं ठेविलेला बाळ महंत **संभाजी** युवराज तर नसेल ना? असेलही कदाचित्! कोण जाणें? **काशीक्षेत्राकडे** निघून गेलेले दोन महंत कोण बरें असावेत? एक **शिवाजी** आणि दुसरा **हिरोजी** असावेत असें वाटतें! कोणी का असेनात! कोण असतील ते समयानुसार आपोआप उघडकीला येतील.

दक्षिणेकडे येण्यास निघालेला महंत घोडेस्वार **परळीस** येऊन 'जयजय रघुवीर समर्थ' म्हणून ओरडल्याबरोबर **कल्याण** वगैरेंनीं त्याच्या पायांवर मस्तकें ठेवलीं त्यावरून ते **दाससिंह** नांवाचे **शीख** पंथांतील महंत नसून प्रत्यक्ष **समर्थच** होते हें नक्की ठरलें.

* * * * * *

काशीक्षेत्राकडे गेलेल्या महंतांसंबंधानें मात्र अद्यापि गूढ आहे. त्याचाही उलगडा यथावकाश होईलच. दोघे महंत काशीक्षेत्रापासून सुमारें दहा कोसांवर गेल्यावर त्यांनीं आपले घोडे जंगलांत सोडून दिले व ते हिंदूंच्या बैरागीवेषानें वाट चालूं लागून काशीस आले. दोघांनीं तेथें धार्मिक विधी उरकले व पुढें गया-अयोध्या वगैरे क्षेत्रें बघून दक्षिणेचा रस्ता धरला. त्या दोघांपैकीं एका महंतानें मथुरेंत जाऊन बालमहंत ज्या ब्राह्मणाच्या घरीं राहिला होता तें घर गांठलें आणि तो तेथें त्या राजबिंडया बालमहंताच्या सेवेंत व रक्षणांत अहर्निश चूर होऊन राहिला.

* * * * * *

दुसरा महंत जो तडक निघाला तो येतां येतां द्वारकाक्षेत्र पाहून सुरतेस आला. त्याकाळीं सुरत शहर फारच धनाढ्य होतें. तेथील बाजारांत लक्ष्मी प्रत्यक्ष वावरत असल्याचें दिसत होतें. त्या बाजारांतून तो बैरागी चालला असतां डोकीवर पाटी भरून केळीं घेऊन जात असलेल्या एका हेलकरणीच्या पाटीला त्याचा नकळत धक्का लागून ती पाटी जमीनीवर पडली. मुसलमान ही त्या वेळीं राजकर्त्यांची धर्मजाति असल्यामुळें कोणीही मुसलमान हिंदूंना सतावून सोडण्यास येणारी संधी कधींच फुकट दवडीत नसे. ह्या वेळीं तर काय! हेलकरणीसारख्या मुसलमान स्त्रीचा एका हिंदु फकिराकडून अशा तऱ्हेचा अपराध घडलेला! बाजारपेठेंतले सर्व नरवीर मुसलमान एकदम खवळले. मोठी ओरडाओरड सुरू झाली. 'मारो, पीटो सालेकू! हिंदूका फकीर भिच्छा मंगेको आया, और साला औरतोंको धक्के लगाता है!' अशा तऱ्हेचा एकच गोंगाट झाला. शेंकडों लोक काठ्या घेऊन त्या गरीब बिचाऱ्या बैराग्याच्या भोंवतीं हां हां म्हणतां जमा झाले. तो बैरागीही कांहीं कमी नव्हता. त्याच्या हातांतील बडगा त्यानें लाठीसारखा खेळण्यास प्रारंभ केला व तो एकटा हिंदु आणि शेंकडों मुसलमान यांच्यांत संकलित हातघाईचें युद्ध सुरू झालें.

* * * * * *

ह्या वर्षी म्हणजे इ. स. १६६६ सालीं सुरतेस जी इंग्रजांची वखार होती तिचा व्यवस्थापक **सर ह्यू रोझ** नांवाचा एक इंग्रज माणूस होता. त्यानें आपल्या वखारीच्या संरक्षणार्थ म्हणून स्वतःचें कांहीं पायदळ सैन्य ठेवण्याचा

दिल्लीपतीकडून परवाना मिळविलेला होता. त्या परवान्याप्रमाणें त्यानें उत्तर-हिंदुस्तानांतले बरेचसे पुरभय्ये कवाईत शिकवून तयार केलेले होते व ते पुरभय्ये मुसलमानांच्या त्रासापासून त्याच्या वखारीचें रक्षण करीत असत. ही इंग्रजांची वखार सुरतेच्या जरी बाजारपेठेंत होती असें म्हणण्याचा प्रघात आहे, तरी ती वखार बाजारपेठेच्या अगदीं शेवटाकडे असून बाजारपेठेपासून तुटक असलेल्या अशा एका बंगलावजा घरांत होती. वर सांगितलेली हिंदु बैराग्याची व मुसलमानांची मारामारी सुरू होउन जेव्हां मोठा गल्ला झाला तेव्हां ती कसली गडबड आहे म्हणून पाहण्याकरितां तो ह्यूसाहेब आपल्या वखारीच्या [illegible] मजल्यावरच्या खिडकींतून दुर्बीण लावून पाहूं लागला. इतक्यांत त्याचे कवाईत शिकलेल्या लोकांपैकीं चार पुरभय्ये तेथें त्याच्या-पाशीं आले व 'आमच्या हिंदु बैराग्याला मुसलमान लोक मारहाण करीत आहेत, करितां त्याला सोडवण्याला जायला आम्हांला परवानगी द्या' म्हणून परवानगी मागायला आले. त्यांचे धर्माभिमानानें फिरलेले चेहरे पाहून ह्यूनें त्यांस तावडतोब परवानगी दिली. ते चौघे लगेच चित्त्यासारखे तेथून लाठ्या घेउन उड्या घेत जे निघाले ते त्या गर्दीत लाठ्या खेळत घुसले. त्यांनीं त्या बैराग्याला सोडवला व गर्दीची फांकाफूक केली. गर्दी मोडल्यावर तो बैरागी कोठें आहे म्हणून त्यांनीं त्याचा बराच शोध केला; परंतु व्यर्थ. आपणाला संकटांतून मुक्त करण्यास ज्यांनीं मदत केली ते कोण, कुठले व कोणाचे नोकर होते हें त्या चाणाक्ष बैराग्यानें जातां जातां समजून घेण्याचें सोडलें नव्हतें. ती मारामारीची वेळ अगदीं फुटक्या तिन्हीसांजची होती. अंधेरानें आपला अंमल बसविण्यास आरंभ केलेला होता. अशा त्या अर्धवट उजेड व अर्धवट अंधेरांच्या मिलाफांत म्हणजे ऐन गुजरीच्या वेळीं तो बैरागी जो तेथून निसटला तो पार जंगलांत दिसेनासा झाला. तो कोठें गेला त्याचा त्या पुरभय्यांना आणि साहेबाला पत्ताच लागला नाहीं.

* * * * * *

शिवाजीमहाराज दिल्लीहून औरंजेबाच्या हातांवर तुऱ्या देऊन जे निघाले ते तीर्थक्षेत्रें करीत करीत बैराग्याच्या वेषानें राजगडीं आले. तेथें

आल्यावर तोफा उडाल्या व किल्लेनिहाय बातमी पसरली. त्यांनीं प्रथम भवानी मातेपुढें दंडवत घालून तिची प्रार्थना केली.

श्रीअंबे तुझजे कृपा करुनियां राज्यावरी आणिलें।
केला विन्मुख पाच्छहा मुढमती ह्या संकटीं रक्षिलें ॥
तूझा दास पतीत जाण जननी सांभाळिजे सर्वदां।
माझा हा अभिमान पूर्ण धरणें अन्यत्र नाहीं कदा ॥

नंतर मातोश्री जिजाबाईसाहेबांचें पादवंदन करून महाराजांनीं सैनिकांस तयार होण्यास आज्ञा सोडली. दहाहजार स्वारांचें पथक निघालें. तें जातांना मोंगलांचा मुलूख लुटफाट करून उजाड करीत चाललें. जातां जातां त्यांनीं आपला त्या स्वारीचा अखेरचा मुक्काम सुरतेस करून परत फिरण्याचा बेत आधींच योजून ठेविला होता. ती जंगली सेना सुरतेवर एकदम अचानक जाऊन पडली. सर्वत्र लुटफाट सुरू होऊन आगी लावण्याचा तडाखा सुरू झाला. त्या आगीचा लोट दूरवर दिसूं लागला. हालअपेष्टा होणाऱ्या नागरिकांचे करुणविलाप 'हरहर महादेव' शब्दांत विरून गेले. सर्व शहर लुटल्यावर ते मराठे सैनिक इंग्रजांच्या वखारीजवळ येऊन ठेपले. वखारीला धक्का न लावण्याबद्दल आधींच हुकूम सुटलेला होता. एक सुरंग दिलपाक् नांवाच्या घोडीवर एक राजबिंडा पुरुष बसलेला असून त्याच्यामागें शेंकडों घोडेस्वार उभे आहेत असा देखावा ह्यूसाहेबाला त्याच्या बंगल्याच्या कौलारावरून दिसला; इतकेंच नव्हे तर ते सर्व लोक त्याच्याच वखारीकडे येत असलेले त्यानें पाहिले. तो अत्यंत घाबरला. मराठे आणि आपण एका धर्माचे आहोंत. सबब त्यांच्याविरुद्ध आपण हत्यार उचलणार नाहीं असें त्या साहेबाच्या शिक्षित पुरभय्यांनीं सांगितल्यावर तर त्याच्या हातपायांचा गळाठाच झाला. शिवाजीपाशीं शरण येण्यास तो निघाला. इतक्यांत त्याच्या वखारीच्या दरवाजावर थाप बसली. साहेब दांतीं तृण धरून शरणांगताप्रमाणें गुडघे टेकून हात जोडून पुढील गुडघ्यांवर चालत पुढें आला. शिवाजीनें त्याला आश्वासन दिलें. ह्यूनें विचारलें "तुमचा राजा शिवाजी कोठें आहे? मला त्याला भेटायचें आहे!"

यावर **शिवाजीनें** उत्तर दिलें " कांहीं दिवसांपूर्वी, ज्या तुझ्या चौघां पुरभय्या शिपायांनीं एका **गुरुनाथ** नांवाच्या गोसाव्याला याच बाजारपेठेच्या मारामारींतून सोडविलें तोच त्या दिवशींचा संध्याकाळचा **गुरुनाथ** गोसावी आतां तुझ्यापुढें हा **दख्खनचा राजा शिवाजी** उभा आहे. काय बोलायचें असेल तें बोल. "

**ग्रूरोझ**साहेब अगदींच आश्चर्यचकित झाला. त्यानें दक्षिणेंत **मराठ्यांच्या** राज्यांत व्यापाराच्या सवलतीची मागणी केली. **शिवाजीनें** विचार करून कळविण्याचें अभिवचन दिलें आणि त्या चौघां पुरभय्यांस बोलावून आणून प्रत्येकीं पांचपांचशें होन बक्षीस दिले. **सुरतेहून शिवाजी** सैन्यासह अपरंपार लूट घेऊन परतला व राजगडाला आला.

*      *      *      *      *      *

एक बैरागी **परळीस** येऊन रामभजन करीत बसला, दुसरा **सुरत** लुटून **राजगडीं** परत आला, पण बाकीच्या दोघांची हकीकत काय झाली ? ते कोण होते ? त्या दोघांपैकीं, तरुण आठ वर्षांचा बालवैरागी युवराज **संभाजी** होता व चौथा **हिरोजी** होता. ते दोघे आगाऊ ठरल्याप्रमाणें **मथुरेहून** निघून येऊन **सुरतेस शिवाजी** महाराजांना मिळाले व त्यांच्याचबरोबर **राजगडास** येउन सुखरूप पोंचले.

*      *      *      *      *      *

**शिवाजी** आपल्या हांतून निसटला व तो आपल्या मुलुखांत बेफिकीरपणें लूटफाट करूं लागला याबद्दल **औरंगजेबाला** फारच वाईट वाटलें. त्यानें यावर अशी तोड काढली कीं, पुनः त्याला आपली कृपा दर्शवून प्रसंग येईल तेव्हां दगा करावा. या हेतूनेंच त्यानें १६६७ सालीं **शिवाजीला** राजा हा किताब देऊन **वऱ्हाडप्रांतांत** जहागीर दिली. ह्याप्रमाणें **औरंगजेबानें** बाह्यात्कारें **शिवाजीस** आपली कृपा दर्शविली तरी, **शिवाजी** त्याचें कपट ओळखून होता. म्हणून त्यानें आपल्या सावधपणांत अंतर पडूं दिलें नाहीं. तेव्हां हा एकादे वेळीं घात करील असें **औरंगजेबाला** भय पडून त्यानें आपला दक्षिणेंतील सुभेदार सुलतान **माजूम** ह्यास **शिवाजीला** पकड-

ताब्यांत गेलेला आपला मुलुख पुन्हां घेण्याच्या उद्योगाला लागला. १६७० मध्यें त्यानें प्रथम **तान्हाजीला** धाडून **कोंडाणा** किल्ला परत घेतला; पण **तान्हाजी** तेथें मारला गेला म्हणून त्या गडाचें नांव त्यानें **सिंहगड** असें ठेविलें. ह्याच वर्षी त्यानें **पुरंदर** वगैरे पुष्कळ किल्ले परत घेऊन **सुरत** पुन्हां लुटलें आणि परत येतेवेळीं त्याच्या मागें मोंगलांचें जें अफाट सैन्य लागलें होतें त्याची त्यानें सरोस कतल केली. नंतर त्यानें आपला सेनापति **प्रतापराव गुजर** ह्यास फौज देऊन **मोंगलांचा खानदेश** प्रांत लुटावयाला पाठविलें. त्यानें **खानदेशांत** जाऊन बहुत लुटालूट केली. तेथील बहुतेक गांवकऱ्यांकडून 'आम्ही दरसाल **शिवाजीराजे** यांस चौथाई देत जाऊं' असा करार लिहून घेतला. ही हकीकत **औरंगजेबाला** कळतांच त्यानें **मोहबतखान** नांवाच्या आपल्या सरदाराला **शिवाजीवर** पाठविलें. तो १६७२ मध्यें **दक्षिणेंत** आला. सेनापति **प्रतापराव** गुजर याजकडून त्याची **शिवाजीनें** अशी मेंवेरी उडवली कीं, तो जीव घेऊन **औरंगाबादेकडे** पळून गेला.

ह्याप्रमाणें **शिवाजीला** कोणी शत्रु नाहींसा होऊन तो पूर्वी ज्या **औरंगजेबाच्या** परवानगीनें **विजापुरकरांच्या** मुलुखांतून चौथाई वसूल करून स्वतःकरितां तिचा उपयोग करीत असे त्याच **औरंगजेबाच्या** मुलुखावर त्यानें ती हल्लीं स्वतःच्या फर्मानानें बसविली व ह्या वेळेपासून **मराठे** लोक नेहमीं मोंगलांच्या मुलुखीं चौथाई घेऊं लागले. याचें नांव कालचक्र किंवा सद्दी! याखेरीज **गोवळकोंड्याचा** बादशाह आणि **विजापूरचा** बादशाह हेही **शिवाजी**पासून आपणांला उपद्रव पोंचू नये म्हणून दरसाल त्याला गुप्तपणानें अनुक्रमें पांच लक्ष आणि तीन लक्ष मोहोरा देत असत.

**सुरतेसारखें** धनाढ्य नगर पांच सहा वेळ लुटून फस्त केल्यावर **शिवाजीची** दृष्टी १६७३ सालीं **हुबळी** शहरावर गेली. हें शहर **विजापूरकरांच्या** ताब्यांतलें असून संपत्तीनें भरपूर नव्हे तर गडगंज भरलेलें होतें. तें त्यानें लुटलें—त्यांत **इंग्रजांचीही** वखार लुटली गेली—आणि तेथून त्यानें मनस्वी द्रव्य आणलें. ह्याशिवाय याच वर्षी त्यानें **सातारचा** किल्ला **अजिमतारा**, **मांडवगड**, **चंदन वंदन** वगैरे बरेच किल्ले घेतले. ही बातमी **विजापुरास** समजतांच त्याच्या पारि[illegible] लष्कर आलें. त्याचा **प्रतापराव** गुजरानें मारे धुव्वा उडवू

दिला; परंतु तें लष्कर लुटण्याची संधी आली असतांही तें **प्रतापरावानें** लुटलें नाहीं म्हणून **शिवाजीनें** त्याची फारच निर्भर्त्सना केली. तेव्हां तो त्वेषाला चढून एकदम पुन्हां विजापुरकरांच्या सेनासंभारावर जाऊन कोसळला; पण त्याच्या फौजेचा बंदोबस्त त्यावेळीं चांगला नसल्यामुळें तो सरकारकामास आला व त्याच्या सैन्याची फारच दुर्दशा झाली. हें पाहून **हंसाजी मोहिते** नांवाच्या **शिवाजीच्या** एका पांच हजारी स्वारांच्या सरदारानें **विजापूर**करांच्या लष्करावर जोराची झडप मारली आणि **प्रतापरावाचे** लोक वांचविले. **शिवाजीला** ही बातमी समजली तेव्हां त्यानें त्याचा मोठा गौरव करून **हंसाजीचें हंबिरराव मोहिते** असें नांव ठेवलें व **प्रतापरावाची** सेनापतीची जागा त्याला दिली.

यानंतर **शिवाजीचें** लक्ष मराठी भाषेकडे गेलें. राजकारण आणि व्यवहार व इतर बाबी यांत जे तत्कालीन राजकर्त्यांच्या भाषांतील शब्द घरगुती प्रपंचांतील व्यवहारांत मराठी भाषेच्या औरसपणानें वागत होते त्यांना प्रतिशब्द तयार करून मराठी भाषा संस्कृतापासून अगदीं सरळ निघालेली आहे ह्याबद्दलचा अंदेशा राहूं नये म्हणून एका **रघुनाथाध्वरी** पंडिताची त्या कामावर योजना केली व त्याप्रमाणें त्यानेंही आपली कामगिरी उत्तम केली. गोब्राह्मणप्रतिपाल आणि स्वदेशबांधवांचें हित हीं करण्यासाठीं जशी **शिवराजांनीं** अनेक जिवावरचे कठिण प्रसंग सोसून बेमालुम कामगिरी केली व स्वराज्यस्थापनेसारखें बिकट काम पार पाडलें तद्वतच ते आपल्या मातृभाषेला न विसरतां तिचेंही उज्ज्वल स्वरूप दृश्यमान करण्याचा त्यांनीं जो प्रयत्न केला त्याचेंच चित्र **रघुनाथाध्वरी**विरचित **राजव्यवहारकोश** हें होय !

हें प्रकरण संपविण्याच्या पूर्वी येथें थोडा पूर्वीचा इतिहास देण्याचा उद्देश इतकाच आहे कीं, जमीनीवर **शिवाजीनें** जे पराक्रम करून राज्य संपादन केलें तें समुद्राची बाजू आपणांस निर्भयपणाची मानणाऱ्या एक डोळ्या हरिणाच्या गोष्टीप्रमाणें नव्हतें इतकेंच दाखवायचें आहे. जमीनीच्या रक्षणासाठीं **शिवाजीनें** ज्या खटपटी केल्या व शेंकडों नवे किल्ले बांधले [illegible]

समुद्रकिनारा सुरक्षित आहे असें समजून केल्या नाहींत; तर जमीनीप्रमाणें समुद्रही त्यानें आपल्या ताब्यांत ठेवण्याची खबरदारी घेतली होती.

एकदां असा चमत्कार झाला कीं, **श्रीसमर्थ रामदास व शिवाजी-राजे सज्जनगडावर** कांहीं सुखदुःखाच्या राज्यप्रकरणीं गोष्टीं बोलत असतां **समर्थांची** एकाएकीं क्षणैक समाधी लागली व लगेच त्यांचा देह आणि अंगावरच्या छाट्या ओल्याचिंब झाल्या. हें पाहून **शिवराजानीं** विचारलें " अकस्मात् सर्वांग भिजून वस्त्रेंही भिजलीं हें काय ? "

**समर्थांनीं** वस्त्राचा पदर **शिवराजाच्या** हातावर पिळून " या उदकाची परीक्षा करावी " असें म्हटलें.

हातावरील उदकाचें आचमन करून **शिवराज** म्हणाले " हें तर समुद्रोदकाप्रमाणें क्षारोदक लागतें ! हा काय चमत्कार आहे ? "

" हें गौडबंगाल आहे असें नाहीं. **राजापुरास मुंजे** या आडनांवाचे एक सावकार आहेत. त्यांचें माल भरलेलें एक जहाज समुद्रांतून येत असतां जंजीऱ्याच्या शिद्दयाच्या दुष्टपणानें तें फुटून बुडूं लागलें. तेव्हां त्यांनीं आमचें स्मरण केलें. अर्थानिशीं व प्राणानिशीं बुडत असलेल्या त्या सावकाराची प्रार्थना आम्हांला **श्रीरघुपतींनीं** येऊन कानांत सांगितली. तेव्हां अर्थात **श्रींच्या** आज्ञेप्रमाणें वर्तन करणें आम्हांला भाग पडलें. आम्हीं मनोमय साक्षीनें तेथें जाऊन जाहजाच्या तळाखालीं हात दिला आणि तें किनाऱ्यावर आणून सोडलें. ते मुंजे आमच्या भेटीस जहाजांतल्या उत्तम मालाच्या चौथाईसकट आजपासून पंधरा दिवसांनीं येथें येतील. त्यावेळीं **शिवबा** तुम्हींही येथें यावें. "

" आज्ञाप्रमाण ! " **शिवराजांनीं** मस्तक लववून व हात जोडून म्हटलें.

" **शिवबा,** तुम्हीं जमीनीवरचा जसा व्यवहार चालवला आहे तद्वतच समुद्रांतीलही चांच्यांचें बंड मोडून त्या बाजूनें कोणी परकीय सत्ता **परशुराम**-क्षेत्राकडे डोकावणार नाहीं असें करण्याची आतां खटपट करावी. "

**समर्थांची** ही आज्ञा **शिवाजीला राजापुरचे** सावकार मुंजे यांची गोष्ट घडली त्याच सालीं म्हणजे इ. स. १६५९ मध्यें झाली व त्याप्रमाणें **शिवाजीचें** भूप्रदेशाप्रमाणें समुद्राकडेही लगेच लक्ष लागलें. **शिवाजीनें**

आरमार केवढें व कसें निर्माण केलें याबद्दलचा ऐतिहासिक पुरावा जो नुकताच उपलब्ध झाला आहे, त्यासंबंधानें येथें थोडक्यांत पण सविस्तर माहिती देऊन हें प्रकरण संपवूं !

विजापुरकरांशीं युद्ध सुरू असतांनाच **शिवाजीनें राजापुरावर** स्वारी केली. या स्वारींत **इंग्रजांना शिवाजीची** चांगलीच दहशत बसली. या स्वारीच्या वेळीं **राजापुरची इंग्रजांची** वखार जी नामशेष झाली ती झालीच. हें बंदर **विजापुरकरांचें** होतें म्हणून पातशाही मुलुखावर जसा **शिवाजीचा** डोळा होता तसाच **इंग्रज** त्यांना मदत करतात ह्या संशयानें त्यांच्यावरही **शिवाजीचा** डोळा होताच.

**खेळणा किल्ल्यावर विजापुरच्या** सैन्याचा पराभव केल्यावर **शिवाजी** जाणूनबुजून **राजापुरावर** ढाला फिरवून गेला. **पन्हाळ्यांत** जेव्हां **शिवाजी** चार महिने अडकून राहिला होता, तेव्हां **राजापुरचे** वखारवाले **इंग्रज विजापुरच्या** फौजेला दारूगोळा पुरवतात असा त्याला संशय आला होता. म्हणून त्यांचें पारिपत्य करण्याचें त्यानें योजिलें होतें. खुद्द **राजापूर** लुटल्यानंतर त्यानें **इंग्रजांची** वखार लुटली व तेथील गोरे व्यापारी पकडून त्यांना त्यानें **मंडणगड** नांवाच्या डोंगरी **किल्ल्यावर** दोन वर्षें कैदेंत ठेवलें; यामुळें **इंग्रजांना शिवाजीची** फारच दहशत बसली व "जेथें पाहावें तेथें **शिवाजी** आहेच ! कसाही प्रसंग आला तरी त्याला तो तयारच" अशा प्रकारचे उद्गार **इंग्रज** सदोदित काढूं लागले. **इंग्रजांनीं** आपल्याला **शिवाजीपासून** उपसर्ग होऊं नये म्हणून, **जंजीऱ्याच्या शिद्दी याकुबखानाशीं** तह करण्याचा घाट घातला होता; परंतु **सुरतेच्या इंग्रजांच्या** गव्हर्नरानें तो **शिवाजीच्या** भीतीनें हाणून पाडला.

**जंजीऱ्याचा शिद्दी** आणि **मुंबईचे इंग्रज** यांचें बंड नामशेष करण्याच्या उद्देशानें **शिवाजीनें** ८५ लहान व ३ मोठीं जहाजें घेऊन **कारवारावर** स्वारी केली. त्याही ठिकाणीं **इंग्रजांची** वखार होती. तें ठिकाण तटबंदीनें मजबूत केलेलें नसल्यामुळें तह होऊन **शिवाजीला** जी खंडणी मिळाली तींत आपल्या हिश्शाचे म्हणून **इंग्रजांनीं शिवाजीला** रोख ११२ पौंड म्हणजे ५६० रुपये दिले.

**समर्थांप्र**माणें **मराठ्यांच्या** आरमाराची संस्थापना प्रथम करणारे **शिवराजच** होत. **जंजीऱ्याच्या शिद्याची** व इतर **पोर्तुगीज, इंग्रज** यांसारख्या लुंग्यासुंग्यांची रग जिरविण्यासाठींच समुद्राच्या बाजूनें शह बसवावा म्हणून **शिवराजांनीं** अरमार निर्माण केलें. **हबशाला** समुद्रमार्गानें मिळणारी अन्नसामुग्रि या आरमारानें बरीच तंगीत आणली. **शिवाजी**महाराजांचें आरमार तयार झाल्यावर, दर्याकिनाऱ्याचें उत्तम तऱ्हेनें निरक्षण करून **शिवराजांनीं** खंबीर माऱ्याच्या जागा शोधून काढल्या व **जंजीरे** म्हणजे पाण्यांतील **किल्ले** बांधण्यास सुरुवात केली. नंतर हळू हळू **कोंकण**पट्टींतील दर्याकिनाऱ्याचीं बंदरें काबीज करण्याचा प्रारंभ केला. **वाडीच्या सांवतां**वर स्वारी करून त्यांचा दर्याकिनारा **शिवराजांनीं** आपल्या राज्यास जोडला. **राम दळवी** व **तान सांवंत** हे **सांवतांचे** दर्यावर्दी सरदार **शिवाजीला** येऊन मिळाल्यावर त्यांस त्यानें **मराठ्यांच्या** आरमारावरील हशमांचे सुभेदार नेमले. **मालवणास सिंधुदुर्ग** नांवाचा **जंजीरा** बांधवून तेथें **मराठ्यांच्या** आरमाराचें मुख्य ठाणें करण्यांत आलें. **कुलाबा, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग** व **रत्नागिरी** हे **किल्ले** दुरुस्त करण्यांत आले व तेथें जहाजें बांधण्याचें काम जारीनें सुरू झालें. हे सर्व **किल्ले मराठ्यांच्या** आरमाराच्या मुख्य जागा करण्यांत आल्या.

**शिवराजांचें** अशा तऱ्हेचें आरमार सिद्ध झाल्यावर **कोंकणाच्या** समुद्रकिनाऱ्यावर **मराठ्यांची** व परकीयांचीं युद्धें सुरू झालीं. **पोर्तुगीज, इंग्रज** व **सिद्धी** यांस ह्या आरमाराची शक्ति पाहून धडकी भरली. **शिवराजांनीं** दर्यायुद्धांत **कारवार**पर्यंतचा समुद्रकिनारा स्वतां मोहिमेवर जाऊन पादाक्रांत केला.

ह्या **शिवराजांच्या** आरमारांत ह्यावेळीं एका डोलकाठीचीं लहान ८५ व तीन डोलकाठ्यांचीं ३ मोठालीं जहाजें होतीं. पुढें **जंजीऱ्यावर शिवराजांनीं** जेव्हां निकराचा हल्ला केला त्यावेळीं तर त्यांच्या आरमाराची संख्या १६० जहाजांची झाली होती. याच काफिल्यानें **पोर्तुगीज** लोकांशीं जेव्हां **दमण** बेटाजवळ दोन हात केले तेव्हां त्यांचा पराभव करून त्यांचें एक मोठें लढाऊ जहाज काबीज केलें.

सर्व कोंकणपट्टी ताब्यांत आल्यावर, आरमाराच्या सोयीसाठीं **शिवाजीनें** कुलाबा, उंदेरी, अंजनवेळ वगैरे तेरा जंजीरे बांधविले. **मालवणाजवळील पद्मदुर्ग किल्ल्यांत** जहाजें बांधण्याचा मोठा कारखाना निर्माण करण्यांत आला. **विजयदुर्ग** व **कुलाबा** येथें आरमाराकरितां तोफा व दारूगोळा ठेवण्याचीं मुख्य ठिकाणें केलीं. **कोळी** व **भंडारी** लोकांना वश करून घेऊन त्यांना **शिवराजांनीं** आपल्या आरमारावर घेतलें.

एवढा उपद्व्याप करणारा हा **समर्थ**शिष्य **शिवराज** जर स्वतां खलाशी असता, तर त्यानें जमिनीप्रमाणें समुद्रही निःशत्रु करून टाकिला असता असे तत्कालीन मुत्सद्दी म्हणूं लागले होते त्याचा पुरावा इतिहास देत आहे.

गुरुभक्ति, चिकाटीचा उद्योग, स्वराज्य, स्वधर्म आणि स्वदेशबांधव यांच्यासंबंधाचें खरें उत्कट प्रेम आणि गोब्राह्मणप्रतिपाल इतक्या गोष्टींच्या ऐक्यांत ज्या वृक्षाला स्वजनबांधवांचें उल्हसित शक्तीचें जीवन मिळून सद्गुरुरूप उपदेशाच्या युक्तीचें पाठबळ मिळालें तो वृक्ष कटुतर फळें प्रसवणें शक्यच नाहीं. सध्यांच्या **मराठ्यांनीं** शिकायचें आहे तें हेंच.



# प्रकरण एकोणिसावें.

## 'आधीं केलें मग सांगितलें.'



आर्द्रानक्षत्र नुकतेंच लागलें होतें. पावसाची संतत धार सुरू होती. मृगांत झालेल्या पेरण्यानीं आपलीं दूर्वादलश्याम वर्णाचीं मस्तकें भूपृष्ठावर काढून आसमंतात्भागाचा देखावा निरीक्षण करण्याचें काम नुकतेंच सुरू केलें होतें. भू-पृष्ठावर अनेकांच्या मालकीचीं अनेक आकारांचीं अनेक शेतें सर्वत्र विखुरलीं असल्याकारणानें तीं नाना तऱ्हांच्या आकारांच्या कोंदणांत बसवलेल्या मरकतमण्याप्रमाणें हिरवींचार दिसत होतीं. आकाश तर इतकें कृष्णवर्ण होतें कीं, त्यांत काजळाची गोळी केव्हांच लपून जावी. वर्षाऋतूच्या प्रारंभीं राक्षसांप्रमाणें निरनिराळ्या आकृती क्षणार्धांत धारण करणारे मेघ या वेळीं आकाशमंडपांतील रंगभूमीवरून नाहींसे होऊन मेघांच्या गडगडाटानेंही विश्रांति घेतली होती. वृक्षलतांनीं सुप्रसन्न मनानें आपलीं मस्तकें शांतपणें डोलवून जलधरश्रीचा आदरसत्कार चालविला होता. पहाड, डोंगर, पर्वत, गिरिशिखरें, दऱ्याखोरीं, घळीं, खिंडी—जिकडे पहावें तिकडे नेत्रांना रममाण करणारीच अपूर्व शोभा दिसत होती. नुकत्याच ऋतुस्नात झालेल्या तरुणींप्रमाणें नद्या मुरके मारीत चालल्या होत्या. उताणखाट ओढे मात्र आपल्या खळखळाटानें आपल्या ओढघस्तपणाचें प्रदर्शन करीत द्रुतगतीनें धावत होते. गिरिशिखरांवरून भूप्रदेशाकडे वेगानें व सर्पगतीनें धावणारे व दोहों कांठांनीं इंद्रगोप कीटकरूप मण्यांनीं किनार बनलेले जलौघ महाराष्ट्राला स्वातंत्र्य प्राप्त करून देणाऱ्या वीरशिरोमणींचे आदरणीय स्फटिक-पथच आहेत किंवा, महाराष्ट्र राज्यलक्ष्मीला सिंहासनाधीश करण्याकरतां इंद्रानें स्वतः त्या पायघड्याच पसरल्या आहेत असें दिसत होतें. पर्जन्य हें प्रत्यक्ष ब्रह्माचें रेत असून, पृथ्वी त्याचें कलत्र असल्याकारणानें ती आपलें कलत्र हें नांव जसें सार्थ करून आपल्या उदरांतून बाहेर टाकलेल्या उद्भिज्जानें सर्वजनहृदयाब्धि संतोषित करते तद्वतच प्रत्येक स्त्रीनें करावें हेंच उत्तमोउत्तम होय.

हिंस्र पशूंच्या गिरिकंदरांतील गर्जना व त्यांचे प्रतिध्वनि या काळीं जसे नष्टप्रायसे भासत होते तद्वतच पक्ष्यांचा किलकिलाटही श्रवणपथांवरून अस्तगत झालेला होता. पाणथळ जागांमधून चिखलानें बरबटलेले बेडूक इतस्ततः भ्रमण करूं लागून त्यांच्या आवाजानें काळाचा सुभिक्षपणा दशदिशांना जागृत करीत होता. मेघांच्या गडगडाटानें आनंदपूर्ण होऊन थैथै नाचतांना केका करणारे आणि उपकारांतून उतराई होण्याकरितां—पाऊस पाडून थकलेल्या इंद्रराजाला आपल्या चित्रविचित्र आणि कौतुकास्पद पिसाऱ्याच्या पंख्यानें वारा घालणारे मोर जागच्याजागीं स्तब्ध झालेले होते. उत्तम तऱ्हेचा पर्जन्य पाडून आपल्या अशरीरिणीरूप विद्युल्लतेचा ध्वज फडकावीत गगनमंडपांत इतस्ततः भ्रमण करणारा विजयानंदी देवराजा आनंदमग्न झालेला पाहून सारस पक्षी त्याला सामोरे जात असतां श्रेणीबंधित आणि आधाररहित असें तें एक चमत्कारिक तोरणच दिसत होतें. खेडेगांवांतून लोणी जमा करून तें शहरांत विक्रीकरितां घेऊन जाणारे मावळे गडी व त्यांच्या बायका, हातांत वेळूच्या काठ्या आणि डोकींवरल्या इरल्यांवर लोण्याच्या पाट्या घेऊन रानांतून जात असतां, शेंदूर फासून जागोजाग ठेवलेल्या दैवतांना—आपल्याला फायदा व्हावा म्हणून लोण्याचा नैवेद्य दाखवून जातांना मानसिक उद्देशाप्रमाणें त्यांच्या चेहऱ्यावर जो एक प्रकारचा भाव दिसत होता, तो त्यांच्या त्या काळच्या धर्मभोळेपणाची उत्तम साक्ष देत होता. या वेळच्या सृष्टिसौंदर्याचें वर्णन करावें तेवढें थोडेंच! अशा या सुबत्ता दर्शवणाऱ्या काळांत, श्रीमच्छत्रपती ही पदवी ज्या महाराष्ट्रललामभूत वीरशिरोमणीला मिळायची होती तो दिवस अगदीं सन्निध आला असल्याकारणानें ज्या **समर्थ रामदास स्वामींनां राष्ट्रगुरु** म्हणणेंच यथार्थ होईल ते स्वतां महाराष्ट्राला आपला शेवटचा म्हणून निरोप सांगायला स्वतंत्र झालेल्या महाराष्ट्राचें **आनंदभुवन** हें नांव ठेवून, त्याच्या रंगभूमीवर अवतीर्ण झालेले आहेत; तर, बा **महाराष्ट्रा**, त्यांचा तो निरोप ऐक आणि त्याप्रमाणें यथातथ्य वर्तन कर, म्हणजे त्यांतच तुझा व तुझ्या वंशजांचा फायदा आहे.

महाराष्ट्राला उद्देशून **समर्थ** म्हणतातः—

बा **महाराष्ट्रा**, स्वराज्याची स्थापना होऊन तुझ्या मानेवरील परकीय जड

जोखड दूर व्हावें असा **श्रीं**चा संकल्प होता आणि त्याप्रमाणें कारणीभूत असा मानवी प्रयत्नही झाला. आमच्या सहवासाचें **शिवराजानें** जें साधन केलें त्याची दृढता राखून, मूळची गोष्ट न विसरतां, भक्तिपूर्वक **श्रीं**ची आराधना करण्यांत तो नेहमीं दंग असतो हेंच त्याच्या फळाला आलें आहे. जेथें **श्रीं**चें अधिष्ठान नाहीं तेथें स्वराज्यप्राप्ति नाहीं हें पक्कें ध्यानांत ठेव ! देव, ब्राह्मण आणि गोमाता यांच्यासंबंधाची भक्ति सदृढ असली पाहिजे. **शिवराजा**च्या अंगीं हें व्रत असिधाराव्रताप्रमाणें उज्वल आहे. म्लेंच्छमय झालेली पृथ्वि पुनीत करावी म्हणूनच **शिवराजानें श्रीं**च्या आज्ञेवरून कृष्णातीरीं जन्म घेतला आणि आमचेंही कृष्णातीरीं येणें **शिवाजी**मुळेंच झालें आहे. म्लेंच्छांचा पुरा नाश झाला नाहीं असें जें सध्यां दिसतें आहे, तें, बा **महाराष्ट्रा**, खरें नव्हे. जुन्यावृक्षाच्या फांद्या व मुळ्या सुकल्या म्हणजे तो कधींतरी मरायचाच यांत संशय नाहीं. **श्रीं**चा संकल्प अप्रमाण ठरणें शक्य नाहीं. म्लेंच्छांचा जो मोड होणें अवशेष राहिला आहे तो, दीपक जातां जातां मोठा होऊन एकदम जातो तद्वत् होणार आहे. टिटवीच्या प्रयत्नानें समुद्र आटत नाहीं हें खरें ; म्हणून यत्न करायला कचरूं नये. आपण स्वतां काय केलें पाहिजे याचा प्रथम विचार न करतां, दुसऱ्यानें काय करावें तें सांगत सुटणारा म्हणजे प्रत्यक्ष करंटाच होय. बा, **महाराष्ट्रा**, भाग्याला उणें काय आहे ? तूं खरा कार्यकर्ता हो. प्रयत्न कर. प्रयत्न न करशीलतर भाग्य नाहीं, वैभव नाहीं आणि कांहींच नाहीं.

**वन्ही तो चेतवावारे । चेतवितांच चेततो ।**
**विवेक जाणिजे तैसा । वाढवितांच वाढतो ॥ १ ॥**
**संग तो साक्षपीयाचा । धरितां साक्षपु घडे ।**
**साक्षपें साक्षपु वाढे । पुरती मनकामना ॥ २ ॥**
**कष्टतां सौख्य मानावें । कष्टीं फळची पाविजे ।**
**आळसें दुःख वाटे तें । दुःखब्रह्मांड भोगवी ॥ १ ॥**
**केल्यानें होत आहेरे । आधीं केलेंचि पाहिजे ।**
**येत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥**

यत्नाचा महिमा असा आहे. यत्न करणारीं माणसें धीराचीं असलीं पाहिजेत. नाहींपेक्षां संकट आलें नाहीं तोंवर आकाशपाताळ एक करून सोडायचें आणि संकट येतांच गर्भगळित होऊन जायचें हा धीरधरांचा धर्म नव्हे.

खलेलें खेकटी खर्बी । खलखला खर्बरे खरें ।
खबर्दारी खुसीखासी । जेथें तेथें विटेचिना ॥ १ ॥
धीधरा धीधरा तकवा । हडबडूं गडबडूं नका ।
काळ देखोनि वर्तावें । सांडावें भय पोटिचें ॥ २ ॥
धरावा धीर तो मोठा । विचारें पाहतां बरें ।
अधीर माणसें खोटीं । काम कांहीं कळेचिना ॥ ३ ॥
धाकेंची चळचळा कांपे । भेणेंची फळफळा मुते ।
बोबडी पडीली तोंडीं । घाविरे चांचरे पडे ॥ ४ ॥
खादाड आळसी मंदु । सुचना ते कळेचिना ।
प्रसंगीं चळचळा कांपे । तो प्राणी आत्मघातकी ॥ ५ ॥

यत्न करतांना अहंपणा सोडून भवानी मातेला शिरीं धरावी आणि बेलाशक पुढें पाऊल टाकावें. कारण—

वोळतां भवानी माता । महींद्र दास्य इच्छिती ।
बोलणें हें प्रचीतीचें । अन्यथा वाउगें नसे ॥

बा **महाराष्ट्रा**, सूर्याच्या अंगीं प्रखरता ठेवण्यांत परमेश्वराचा जसा अत्युच्च हेतु आहे तसाच प्राणीमात्रांच्या उत्पत्तींतही आहे. तो ज्याचा त्यानें ओळखून सफळ केला कीं, ईश्वरानें तयार केलेल्या पात्राचें या भूरंगभूमीवरचें त्याचें काम संपलें. एखादा गवई बेसूर गाऊं लागला असतां श्रोत्यांचा उद्देश जसा भेसूर होतो तद्वतच प्रत्येक पात्राचें आहे. कारण—

क्रियेवीण नानापरी बोलिजतें ।
परी चित्त दुश्चित्त तें लाजवीतें ॥
मना कल्पना धीट सैराट धावे ।
तया मानवा देव कैसानि पावे ॥

या भगव्या वेषाचा आणि या कुबडीचा अर्थ, जर आम्हांला कळला नसता, तर फक्त संतति उत्पन्न करून वंशवृद्धी करण्याच्या कामांत इतर जनांप्रमाणें 'सावधान' शब्द ऐकूनही परक्याच्या मुलीशीं मैत्री केली असती आणि पारतंत्र्यांत निमग्न झालेल्या लाखो महाराष्ट्रीयांप्रमाणें ह्या देहाकडून नवे गुलाम उत्पन्न झाले असते; परंतु नाहीं—आपल्या जन्माचा अर्थ आपल्याला कळल्यावर असें कोण करणार ? स्वधर्माच्या स्नेहांतली स्वातंत्र्याची वात, ह्या हृदयांत पेटल्यामुळें, वयाच्या बाराव्या वर्षीच संसाराची बिडी खाड्कन् तोडली आणि बारा वर्षेपर्यंत तपश्चर्या करून शुद्ध केलेल्या ह्या जमिनीला बारा वर्षांच्या देशपर्यटणांतील स्वधर्मजागृतीनें भाजून काढली व धार्मिक आणि राजकीय अशा दुफळ्या नांगरांनींही आर्यभू नांगरून शिवाजी-सारख्या लोकनायकाच्या पराक्रमाचें बी त्यांत पेरलें. नंतर चोवीस वर्षेपर्यंत या यावनी किड्यांच्या अंगांतलें रक्त त्या राजकीय बियाण्याला पाजल्यामुळें आतां तें शेत लोंगरलें आहे. हा सर्व प्रभाव या महाराष्ट्रभूचा म्हणा किंवा ह्या दंडकारण्यांत श्रीरामचंद्राला जो त्रास झाला त्याचा सूड म्हणून म्हणा, काय हवें तें म्हणा, दिग्विजयी असा झालेला आहे. म्हणून आम्हीं या भूमीचें नांव आनंदवभुवन असें ठेविलें आहे. ह्या भूमींत—

कल्पान्त मांडिला मोठा म्लेंछ दैत्य बुडावया ।
कैपक्ष घेतला रामें आनंदवनभूवनीं ॥ १ ॥
बुडाले सर्वही पापी, हिंदुस्तान बळावलें ।
कोपला देव देवांचा आनंदवनभूवनीं ॥ २ ॥
पूर्वी जे मारिले होते, तेचि आतां बळावले ।
अभक्तांचा क्षय झाला आनंदवनभूवनीं ॥ ३ ॥
त्रैलोक्य गांजिलें मागें ठाउकें विवेकी जनां ।
कैपक्ष घेतला रामें आनंदवनभूवनीं ॥ ४ ॥
भीमासी धाडिला देवें वैभवें धाव घेतली ।
लांगूळ चालिलें पूढें आनंदवनभूवनीं ॥ ५ ॥

तेथूनि वाढला धर्म रमा धर्म समागमें ।
संतोष मांडिला मोठा आनंदवनभूवनीं ॥ ६ ॥
बुडाला औरंग्या पापी म्लेंछसंहार जाहला ।
मांडिलीं मोडिलीं क्षेत्रें आनंदवनभूवनीं ॥ ७ ॥
बुडाले भेदवादी ते नष्ट चांडाळ पातकी ।
तुडविले बुडविले देवें आनंदवनभूवनीं ॥ ८ ॥
गळाले पळाले मेले, गेले देशधडी पुढें ।
निर्मळ जाहली पृथ्वी, आनंदवनभूवनीं ॥ ९ ॥

**महाराष्ट्रा**, ही पृथ्वी समुद्र आणि भूमि मिळून झालेली आहे. हीं जशीं या पृथ्वीचीं दोन अंगें आहेत, तशींच प्रपंच आणि परमार्थ हीं मानवस्थितीचीं अंगें आहेत. समुद्रानें भूमी वेष्टिली आहे म्हणा किंवा भूमीनें समुद्राला वेढा दिला आहे म्हणा, कांहीं म्हणा, त्यांची ताटातूट जशी कधींच व्हायची नाहीं त्याचप्रमाणें प्रपंचाचें आणि परमार्थाचें आहे. ह्यांत तो गुंडाळलेला आहे आणि त्यांत हा गुंडाळलेला आहे. मनुष्य हा त्या दोहोंच्या मिलाफाचा एक पुतळा बनलेला आहे. त्यांची तुटातूट होणें शक्य नाहीं. लोकसंग्रहाला प्रपंच आवश्यक आहे, तसाच सुखासाठीं परमार्थ आवश्यक आहे. प्रपंच केल्याशिवाय जसे जगाचे व्यवहार चालायचे नाहींत, तसेंच परमार्थाशिवाय माणसाला कधीं सुख व्हायचें नाहीं. कां कीं, तृप्ति आणि शांति यांत जें खरें सुख आहे तें परमार्थांत आहे. प्रपंचांत नाहीं. म्हणून, बा **महाराष्ट्रा**, तुझें आम्हीं ठेवलेलें **आनंदभुवन** हें नांव सार्थ करण्यासाठीं वसुधैव कुटुंबकम् या न्यायानें संसार करून परमार्थ कर, त्यांतच तुझें कल्याण आहे. प्रपंच साधून परमार्थ साधणें यालाच ज्ञाते पुरुष खरा योग म्हणतात. प्रपंच साधून जो परमार्थ साधतो तोच खरा योगी. आमचा महाराष्ट्राचा खरा पुढारी आणि खरा लोकसंग्रही नरव्याघ्र **शिवाजी** राजा असाच आहे. त्याचा कित्ता कोणच्याही आपत्प्रसंगीं बेडा पार करणारा आहे. प्रपंच आणि परमार्थ यांत मुख्य विचार हा आहे कीं, शहाण्या आणि दूरदर्शी माणसानें या दोहोंतही प्रसंगवशात् मग्न असावें, परंतु अंतःकरणानें ह्या दोहोंपासूनही निरंतर अलिप्त

राहावें; बद्ध असें एकानेंही होऊं नये. अतिवृष्टीनें जसा समुद्र वाढत नाहीं तसा अवर्षणानें तो कधीं आटतही नाहीं. त्याचप्रमाणें लाभानें हर्ष होऊं नये आणि हानीनें दुःख वाटूं नये अशी वृत्ति ठेवावी. कर्म हें कर्तव्य आहे. प्राणीमात्र कर्मयोगी आहे. कर्मयोगाचा त्याग देहत्यागाबरोबर होतो. आधीं तो होत नाहीं. देवानें ज्या शक्ति दिल्या आहेत त्या कांहीं तरी कार्यार्थ दिलेल्या आहेत, लोभ्याच्या द्रव्यसंचयाप्रमाणें स्वस्थ ठेवण्याकरितां दिलेल्या नाहींत; म्हणून, कर्म करायचें तें फलाच्या आशेनें करायचें नाहीं असा निश्चय ठेवला पाहिजे. मोठेपणा कर्तव्यांत आहे, त्याच्या फलांत नाहीं. मुंगी दाणा ओढीत असते, त्याचें कौतुक आपण करतों, त्या दाण्याचें करीत नाहीं. त्याच न्यायानें आपल्या अंगांतल्या शक्ति, जन्मसिद्ध कार्य ओळखून त्या कार्याकडे लावणें यांतच आपलें काय तें खरें मोठेपण आहे, फलांत नाहीं. दोन धीवर एकसारखीं दोन जाळीं समुद्रांत टाकतात आणि एकसारखी मेहनत करतात; परंतु त्यांत कधीं कधीं असें होतें कीं, एकाच्या जाळ्यांत पुष्कळ मासे येतात आणि दुसऱ्याच्या मुळींच येत नाहींत, तरी त्या धीवराच्या योग्यतेंत अंतर पडत नाहीं. आपणां माणसांना प्रपंच आणि परमार्थ हीं दोन्हीं साधायचीं आहेत; ह्याकरितां प्रपंच अशा तऱ्हेनें करावा कीं, त्यानें परमार्थ साधण्यास साह्य व्हावें. परमार्थाला इतकें जपावें कीं, त्याच्यायोगानें प्रपंच सुखावह व्हावा. पोटांत आग पडली असली किंवा थंडीनें हाडें कुडकुडत असलीं, तर ध्यानधारणा व्हायची नाहीं. सर्व माणसें दिवसभर ध्यानधारणा करीत बसलीं तर जगाच्या पोटाला मिळायचें नाहीं. म्हणून, बा **महाराष्ट्रा**, इंद्रियदमन करून, विषयाच्या स्वाधीन न होतां आपल्या स्थितीला योग्य—आपल्या परिस्थितीला अवश्यक—अशीं आपलीं सगळीं कर्तव्यें, फलाशा न धरितां, **श्रीकृष्णार्पण** म्हणून शुद्ध भावानें कायावाचामनेंकरून करावीं. हेंच **श्रीकृष्ण** परमात्म्यांनीं गीतेंत **अर्जुनाला** सांगितलें आहे. खरें **गीतारहस्य** हेंच आहे. त्याचें, बा **महाराष्ट्रा** अवलंबन कर ! तेंच जन्माचें सार्थक आहे. त्यांतच मोक्ष आहे.

**देहे त्यागितां कीर्ति मागें उरावी ।**
**मना, सज्जना हेचि क्रीया करावी ॥**

**मना, चंदनाचे परि त्वां झिजावें ।**
**परी सज्जनां अंतरीं नीववावें ॥**

**शिवराजा**च्या अलौकिक पराक्रमानें जें कार्य आरंभीच्या मूठभर मावळे वीरांच्या जिवावर आरंभिलें तें कार्य सर्व **महाराष्ट्रीयांच्या** मदतीनें लोक-संग्रहाच्या बळावर आज पार पडून त्या राजकीय शेतांतल्या कणसांची भरपूर जोमाचीं तोरणें **महाराष्ट्रीयांच्या** दरवाज्यांवर बांधण्याचा सुयोग आज असा त्रेपन्न वर्षांच्या मेहनतीनें आलेला आहे. असें हें राजकीय बियाणें फळाला येणें अक्रुद्ध वृक्षाप्रमाणें मोठें खडतर, परंतु अंतीं फार श्रेयस्कर आहे. तेव्हां इतक्या मेहनतीचें योग्य फळ जो आम्हां **महाराष्ट्रीयांच्या शिवराजाचा राजगडावरचा** राज्याभिषेक त्याचें माधुर्य चाखण्याचा आज आम्हांला कित्येक शतकांनीं प्रसंग आला असल्यामुळें, महाराष्ट्रीयांनो, हा **रामदास** तुम्हांला आमंत्रण करण्याकरितां आला आहे—तर चला **राजगडा**वर जाऊं आणि स्वकृतीनें खरा क्षत्रीय वीर ठरलेल्या **शिवराजा**चा प्रेमळ स्वराज्याभिषेक पाहून आनंदगजर करूं. हाच आनंदगजर करण्याचा योग नुसत्या वाचाळतेनें कधींच येत नसतो. 'लकडीशिवाय मकडी वळत नाहीं' या न्यायानें आपलें सर्वस्व अपहार करून बसलेल्याला थप्पड लगावल्याशिवाय आणि खरा शिरजोरपणा त्याच्या दृष्टीस पडल्याशिवाय आपखुशीनें परत मिळणें शक्य नसतें. माशानें गिळलेलें रत्न त्या माशाला फाडल्याशिवाय जसें परत मिळत नाहीं तद्वतच नष्ट झालेल्या—दुसऱ्याच्या ताब्यात गेलेल्या—राज्यलक्ष्मीचें आहे. बडबडीनें आणि वाचाळतेनें राज्यलक्ष्मी कधींच प्रसन्न होणें शक्य नाहीं. तिच्या सिंहासनाचा मार्ग अत्यंत किळसवाणा आहे. तो रक्तमांसांच्या चिखलानें तुडुंब भरलेला आहे. अशा मार्गाचें आक्रमण केल्याशिवाय राज्यलक्ष्मी कधींच दृष्टीस पडावयाची नाहीं आणि तशा मार्गातून गेल्याशिवाय तिचें दर्शनही घडणार नसल्यामुळें ती वश होणें अशक्य आहे. एवढ्यासाठीं पुन्हां एकवार अखेरचें म्हणून, बा **महाराष्ट्रा**, तुला बजावून सांगतों कीं—

**इशारतीचें बोलतां नये । बोलायाच लिहूं नये ॥**
**लिहावयाचें सांगूं नये । जबाबीनें ॥**

कारण—

फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे ।
दिसंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे ॥
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ।
विचारी मना, तूंचि शोधूनि पाहे ॥

" हें जर खरें आहे आणि तुम्हांला जर स्वातंत्र्याचें सुख हवें आहे तर माझा हा, बा महाराष्ट्रा, शेवटचा निरोप ऐक आणि

आधीं केलें । मग सांगितलें ॥

हें वाक्य महामंत्र म्हणून नीट लक्षांत ठेवून स्वजन्माचा उद्देश ओळख, मीपणा सोड आणि कर्मयोगाला दृढालिंगन देऊन वाचाळता बंद कर. उद्दिष्ट-कार्य करून शांततेच्या आरामांत, ह्या माझ्या स्थितिप्रमाणें ब्रह्मानंदाचें सुख प्राप्त करून घेण्याचें मुख्य बीज मीं ' क्रियेवीण वाचाळता ' न करतां, ' आधीं केलें ' आणि ' मग सांगितलें ' आहे हें लक्षांत ठेव.



# प्रकरणें वीस आणि एकवीसावें.

## ' भला रे भला बोलला तें करावें. '



आज रायगड किल्ल्यावर फारच मोठी धामधूम उडून राहिली होती. सिंहासनाधीश होणारे शिवाजी महाराज प्रातःकाळीं गंगाभट्टजींकडून मौंजीबंधन करून घेऊन मुक्त झाल्यावर ' शुभमंगल सावधान ' म्हणणाऱ्या भिक्षुकांत गेले व तेथें त्यांनीं अग्निसमक्ष आठव्या स्त्रीचें पाणिग्रहण केलें. आर्यधर्मशास्त्राप्रमाणें क्षत्रियाला सिंहासनावर पट्टाभिषेक सशास्त्र होण्यासाठीं अष्टनायिकांची आवश्यकता असते. त्याप्रमाणें शिवराजांनीं हें आज आठवें लग्न केलें होतें. य पूर्वीच त्यांचीं जरी सात भिन्न स्त्रियांशीं लग्नें झालीं होतीं व आज हें आठवें केलें होतें, तरी अष्टनायिकांचें अग्रेसरत्व श्रीमती सईबाईसाहेबांकडेच होतें. लग्नकार्य उरकल्यावर अभिषिक्त होण्याची तयारी झाली. यावेळीं तें स्थळ कशा तऱ्हेचें शृंगारलें होतें व तें त्यामुळें कोणच्या तऱ्हेच्या वैभवांत दिसत होतें याचें लांबलचक वर्णन करीत बसण्यापेक्षां त्याच दरबारांत हजर असलेल्या भूषणकवीनें अवघ्या चार ओळींत जें वर्णन केलें आहे तेंच येथें दिलें असतां, तो गड व त्यावरील राजदरबार ह्यांची वाचकांना बरोबर कल्पना होईल. भूषणकवी त्यावेळचें वर्णन पुढीलप्रमाणें करतात—

सवैया.

**जापर साहितनै शिवराज सुरेसकी ऐसी सभा सुभ साजै**
**यौं कवि भूषण जपत है लखि संपतिको अलकापति लाजै**
**तामधि तीनहूँ लोककि दीपति ऐसो बडो गढराज विराजै**
**वारि पताल सीमाची मही अमरावतिकी छवी ऊपर छाजै**

अशा तऱ्हेच्या वैभवाच्या थाटमाटांत अष्टनायिकांना बरोबर घेऊन ज्यावेळीं उजव्या हातीं युवराज संभाजीराजाला धरून शिवराज आपल्या

मातोश्रींच्या पायां पडण्यासाठीं, **जगदंबाभवानी**मातेचा प्रसाद घेऊन गेले त्यावेळीं **जीजाबाई**साहिबांनीं त्यांना जो आशीर्वाद दिला तो त्यांच्याच चित्रगुप्तांनीं पुढीलप्रमाणें लिहून ठेवला आहे. तो आशीर्वाद येणेंप्रमाणें:—

**बापा तूं शिवबा प्रतापनिधि रे सिंहासनीं रूढणें ।**
**शत्रू जिंकुनि आवघे अतिरथी दुष्टांस निर्दाळणें ॥**
**श्रीअंबा वर दे जयासि वरणें साम्राज्य कीजे सदा ।**
**देवब्राह्मणपूजनीं रत असे अन्यत्र नाहीं कदा ॥ १ ॥**
**शिवबा तूं अवरंगजेब निकरें दंडी प्रतापें रणीं ।**
**दिल्ली घेउनि आसनावरि रुढें तत्काळ ये च क्षणीं ॥**
**श्रीतुळजा कुलदेवते स्मरुनियां सत्कीर्ति संपादिजे ।**
**स्वकरें शस्त्र धरूनियां निजबळें धार्मीकता रक्षिजे ॥ २ ॥**

अष्टनायिका आणि **संभाजी** युवराज यांसह असा मातोश्रींचा आशीर्वाद घेऊन **शिवराज** सिंहासनाच्या दरबारांत आल्यावर, **भूषण** कवी म्हणतात:—

दोहा.

**दशरथके जो राम भो वसुद्योके गोपाल ॥**
**सोई प्रगट्यो साहिके श्रीसिवराज भुवाल ॥**
**उदित होय सिवराजके मुदित भये द्विजदेव ॥**
**कलजुग हट्यो मिट्यो सकल म्लेंच्छनिको अहमेव ॥**

**भूषण**कवीनें अशा तऱ्हेचा दोहा म्हटल्यानंतर **शिवाजी**महाराज सर्व सभासदांना उद्देशून म्हणाले कीं, " सभाजनहो, आजचा हा प्रसंग या पुण्यभूमींत कित्येक शतकांनीं साजरा करण्याचा जो प्रसंग आला आहे तो **श्रीसमर्थ रामदास** गुरुराज यांच्या प्रोत्साहनानें, आपणां सर्वांच्या मदतीनें आणि आमच्या मातोश्रींच्या शिकवणीनें आला असून, सर्व सुमंगल गोष्टींचें श्रेय **जगदंबा भवानीमातेच्या** कृपेवर आहे. आजचा हा प्रसंग पाहून, **आर्यलक्ष्मीला** जसा आनंदोत्कर्षाचा गहिंवर येणें साहजीक आहे, त्याचप्रमाणे आर्यशत्रूंना दुःखातिशयाचा गहिंवर येऊन त्यांनीं नाइलाजानें आपली संमति दर्शविणेंही अगदीं बरोबर आहे. ज्या सिंहासनावर आज आपण आम्हांला

पट्टाभिषेक करण्याचें योजिलें आहे, त्यावर शांततेंत बसण्याचे दिवस जरी अद्यापि आले नाहींत, तरी ज्याप्रमाणें समुद्रांत चौऱ्याशीं बंदरें आणि **नर्मदे**पासून **रामेश्वरा**पर्यंतचा भूभाग यांचें स्वामित्व आज पूर्णपणें **मराठ्यांचें** झालें आहे—त्याचप्रमाणें आपणां सर्वांच्या अविश्रान्त श्रमानें, **उत्तर हिंदुस्तानही** पादाक्रांत करून, सर्वत्र **मराठी** भाषेचें **मराठ्यांचें** साम्राज्य लवकरच प्रस्थापित होणार आहे."

**शिवराजांनीं** अशा तऱ्हेचें भाषण केल्यावर **रघुनाथ यादव चित्रगुप्त** पुढें होऊन आपल्या मंजुळ स्वरांत म्हणाले—

**शीवाजी नृपती समर्थ अवनीं श्रीविष्णुची साम्यता।**
**ऐसें श्रीविधि बोलतो निशिदिनीं आहे सदा योग्यता॥**
**झालें पातक आगळें म्हणुनियां क्षात्रत्व संपादिलें॥**
**दुष्टां संहरिलें च जाण निकरें धर्मास संपादिलें॥ १॥**
**शाहजीचा सुत हा महेंद्र अवनीं राजा शिवाजी सदा।**
**कीर्तीची गरिमा भरोनि उरली अन्यत्र नाहीं कदा॥**
**जैसा कर्णहि धर्म भूपति ( पुरा ) त्या तुल्यता हा असे।**
**सर्वज्ञांबुनिधी निरूपम जगीं सौंदर्यता वीलसे॥**

याप्रमाणें **शिवराजांची** सिंहासनावर बसण्याची योग्यता गायिल्यावर **गंगाभट्ट** पुढें होऊन म्हणाले " राजा, तुझा विजय असो ! आम्हां ब्राह्मणांना **समर्थांनीं वाराणशी**क्षेत्राहून तुझ्या राज्याभिषेकाला मुद्दाम येथें आणिलें आहे. तुझें पूर्वीचें कुल श्रेष्ठ आहे यांत शंकाच नाहीं. ती तुझी पूर्वीची कुलकथा जरी बाजूला ठेवली, तरी तूं आज आपल्या कर्मानें खऱ्या क्षत्रियाच्या पदाला प्राप्त झाला आहेस. **दक्षिणें**तल्या ब्राह्मणांचा तुझ्या क्षत्रियत्वाबद्दलचा झालेला गैरसमज दूर करून त्यांना आज आम्हीं येथें तुला राज्याभिषेक करण्यासाठीं, तुझे पौरजन म्हणून मुद्दाम पाचारण करून आणिले आहेत. तेव्हां आतां आम्ही सांगूं त्याप्रमाणें शपथ घेऊन तुला राज्याभिषेक करून घेतला पाहिजे."

" आज आमच्या जन्मभूमीला, " **शिवाजी** लीनतेनें बोलला, " जें

स्वातंत्र्य प्राप्त झालें आहे तें मी आपणां सर्वांच्या इच्छेप्रमाणें वागलों नसतों, तर कधींच झालें नसतें."

"क्षात्रतेज प्रगट करणारी" **गंगाभट्ट** बोलूं लागले "ही न्यग्रोधाची शाखा, सौख्य देणारी ही उदुंबराची खांदी, सार्वभौमत्व देणारी ही अश्वत्थाची फांदी, सर्व पृथ्वीवरीला सर्व राजांना मांडलीक करून, त्यांजवर निर्बंध असें राज्य करण्याची शक्ति देणारी ही प्लक्ष वृक्षाची शाखा-अशा ह्या चार शाखा-राजा, तूं आपल्या उजव्या हातीं घे."

**शिवाजीनें** चारी शाखा उजव्या हातांत धरल्यावर **गंगाभट्ट** पुन्हां बोलूं लागले, "औदुंबराच्या लांकडाच्या तयार केलेल्या पायऱ्यांवरून चढून जाऊन सिंहासनावर बसण्याच्या आधीं, हा सुवर्णाचा सोमकलश डाव्या हातांत घेऊन, तुला आम्ही सांगूं त्याप्रमाणें आतां शपथ घेतली पाहिजे."

"आपली आज्ञा शिरसावंद्य आहे!" मस्तक लववून **शिवाजी** बोलला.

सुवर्णाचा सोमकलश **शिवाजीच्या** डाव्या हातांत देऊन त्याच्याकडून **गंगाभट्टजींनीं** पुढीलप्रमाणें मंत्रानें शपथ घेववली.

### शपथ.

**अनेन सोमराजेन शपे-पुरोधासि त्वयि निपराधिनं सदा लक्षय यदि विरुद्धं वर्तिष्ये ममाद्यप्रभृतिरापर्यंतं यानि विविधानि सत्कृत्यानि मत्कृतानि भवये स्तानि सर्वाणि निर्फलानि भवांत्विति।**

याप्रमाणें शपथ घेऊन **शिवाजी** अष्टनायिकांसह सिंहासनावर बसल्यावर **संभाजी** युवराज सिंहासनाच्या पायरीवर बसला, तेव्हां **गंगाभट्ट** आपल्या शिष्याला म्हणाले "शिष्या, क्षात्रतेज दर्शवणाऱ्या लहान तांदुळांच्या लोंब्या, सार्वभौमत्व दर्शवणाऱ्या जाड्या तांदुळांच्या लोंब्या, सर्वसौख्य दर्शविणारी प्रियंगु वनस्पति आणि सैनिकांच्या नायकत्वाचें चातुर्य प्रकट करणारे सातूचे तुरे आण!"

हे पदार्थ शिष्यानें आणून दिल्यावर **गंगाभट्टजी शिवाजीला** म्हणाले, "राजा, हें दहीं तुझ्या मस्तकाला जगांत तीव्र करो, हा मध वनस्पतींतलें वीर्य असल्यामुळें तूं वीर्यवान् होवोस, गोमातेचा कस यांत पूर्ण असल्यामुळें हें शुद्ध

नवनीत तुझें वैभव वाढवो आणि सूर्यप्रकाशांत पडलेल्या पावसाचें हें जल तुला अमर करो."

"तथास्तु!" शिवाजी लीनतेनें बोलला.

"राजा," गंगाभट्ट बोलूं लागले, "आतां आम्ही सर्व ब्राह्मण तुला ह्या महाराष्ट्राच्या सिंहासनावर आतां सांगितल्या इतक्या द्रव्यांनीं पट्टाभिषेक करीत आहोंत; तर शांत चित्तानें स्थिर बैस."

वर सांगितलेल्या चार धान्यांच्या लोंब्यांनीं चार वस्तूंच्या मिश्रणाचा राज्याभिषेक पुढील मंत्र म्हणत ब्राह्मणांनीं सुरू केला.

## राज्याभिषेकमंत्र.

हिरण्यवर्णा शुचयः पावका राष्ट्रवर्धन्य आपः पुनन्तु। त्वाञ्जयन्ददतु। संततिं वधर्यन्तु। तासां राजा वरुणो बहुमूल्यानि रत्नानि ददतु। यम आयुर्वर्धयतु। शत्रून्नाशयतु। इंद्रो मरुताङ्गणस्ते कामान् पुष्यतु। मित्रो सर्वदिक्षु यशः प्रथयतु। चतुःसमुद्रेभ्यो गंगादिपावनीनदीभ्यो आनीतानिरद्भिरभिषिक्तं त्वै चित्तस्थैर्यम्मन्त्र शुद्धिमिंद्रियतुष्टि रिंद्रियसंयमनम्। परमं क्षात्रतेजो नाथरक्षणं निरपराधिसद्रक्षणन्नयचक्षुश्चारचक्षु र्निर्मत्सरत्वन्दयाशीलत्वमतिथिपूजनमभ्यसूयाराहित्यं षड्रिपुक्षयो भवतु। परिखीकृत सागरां समुद्रवेलावप्रकृताम्मही शासनक्षाम्यादिगुणाः त्वयि सचंतु। एतद्भिर्गुणैर्युक्तो भवान् राजाधिराजो भवतु। ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः॥

याप्रमाणें ब्राह्मणांनीं अभिषेक केल्यावर शिवराज म्हणाले "हें मस्तक अशा तऱ्हेनें अभिषिक्त करून, ह्या प्रजाजनांचा योग्य मार्गानें प्रतिपाल करण्यास लायक करणाऱ्या पंडितंमन्य महामहोपध्याय गंगाभट्टजी यांस क्षत्रियाच्या अमर्यादित क्षात्रतेजाप्रमाणेंच योग्य दक्षिणा न दिल्यास ह्या यज्ञाची सांगता होणार नाहीं. म्हणून, ज्या ह्या देहाकडून क्षात्रतेज प्रकट होत आहे त्याची सोन्याची एक तुला, सहस्र गायी आणि वेदवचनाप्रमाणें चतुष्कोण भूमि अध्वर्यूंना दान देऊन, बाकीच्या ब्राह्मणवर्गाला अन्नदानासह, दुसरी एक आमची सुवर्णतुला दान करण्याचा आमचा विचार आहे."

"राजा, तुझें म्हणणें यथायोग्य आहे. आतां, तुला तुझ्या हातांतल्या सुवर्णकुंभांतलें सोमपान करायचें आहे. आम्ही मंत्र सांगतों तो म्हणून, प्रथम त्यांतलें देवांना अर्पण कर आणि मग तूं आपल्या अष्टनायिकांसह तें पी.

## सोमपानमंत्र.

**इमं सुवर्णकंसं स्वादिष्टया मदिष्टया सोमधारया पूर्णं गृह्णतु भवान् । अयं त्वयि बलमोजो निधत्ताम् । पृथिव्यां स्वातंत्र्यभाजं करोतु । वीर्यं वर्धयतु पारतंत्र्याद्दूरं रक्षतु ।**

मंत्र म्हणून **शिवाजीनें** सोमपान केल्यावर **गंगाभट्टजी** म्हणाले "युवराज **संभाजी,** तुझ्या वडिलांप्रमाणेंच तुलाही राज्यभिषेकांत सुस्नात होण्याची संधी आज परमेश्वरकृपेनें आणून दिली आहे; तर पुढें याप्रमाणें आपल्या वडिलांच्या हातून, ह्याच सिंहासनावर महाराजाधिराजाचा अभिषेक करून घेऊन, वार्धक्यांत मुनिवृत्तीनें योगसाधन करण्याची संधी **शिवराजाला** आणून दे आणि धन्य हो!"

"तथास्तु." **संभाजी** म्हणाला व **रघुनाथाध्वरी** पंडितांनीं पुढील चूरणिका म्हटली.

## गद्य.

**जयजयकार महाराज! दक्षस्तु दिशापाल शिवनृपाल निर्नीद्रानिदर्शक निरातंग वैरिनिच्छेदक । यद्रथगतीनाकपर्यंत राज्याश्रममुनि दृष्टलक्ष्यभिदुन्मत्त यवनमातंगमदभंगक आफलोदयकर्मवान् । टक्कर टंकारसम यद्धनुटट्टुर तक्षकासम गुप्ततमेंद्रिय अथर्वनिधि महाराष्ट्रसाम्राज्यप्रस्थापक गीर्वाणभाषांतर्गत महाराष्ट्रभाषोन्नतिकारक । गर्वबलोन्मत्त म्लेंछरिपुवर्ग जयें नमविला तो विजयि चिरायु असो ॥**

चूरणिका म्हणणें संपल्यावर **भूषणकवीनें** पुढील कवित्व म्हटलें.

## कवित्.

**इंद्रजिमि जंभपर, वाढव समुद्रपर, रावण कुटुंबपर, रघुकुलराज है ॥ पवनवारिवाहपर, शंभु रतिनाहपर, जिमि सहस्त्र बांहपर, राम द्विजराज है ॥ दावाद्रुम दंडपर, भूखन वितुंडपर,**

चित्ता मृगझुंडपर त्योंही मृगराज है ॥ तेजतम अंसपर, कान्ह-
जिमि कंसपर त्योंही म्लेंछवंसपर, सेर सिवराज है ॥

गद्य.

सांचकर माने देवीदेवता न जाने अरु, ऐसी उर आनेमें, करी बात सबकी ॥ और पादशाहनकें, चहा हती हिंदुनकी, यहां जहां अकबर, सुनत साख जबकी ॥ बब्बरके तिब्बर, हीमायु हद्द बांधी गये, दोनो एक करीना, कुरान बेद मतकी ॥ कासीकी कला जाती, मथुरा मसीद होती, सिवाजी न होता तो सुन्त होत सबकी ॥ बेद राखे विदित, पुरान राखे सारसुत, रामनाम राख्यो, अती रसना सुधरमें ॥ हिंदुनकी चोटी, रोटी राखी है सिपाहिनकी, कांधमें जनेऊ राख्यो माला राखी गरमें ॥ मीड राखे मुगल मरोड राखे पाद्शाह, वैरी पीस राखे वरदान राख्यो करमें ॥ राजनकी हद्द राखी, तेगबाल सिवराज, देव राखे देवल, स्वधर्म राख्यो घरमें ॥

भूषणकवीनें याप्रमाणें शिवराजस्तुति गायिल्यावर शिवराजांनीं सर्व सभासदांना उद्देशून म्हटलें " सरदारादि आमचे पौरजनहो, परकीय सत्तेच्या जुलुमाचा प्रतिकार करून, मराठ्यांच्या महाराष्ट्राचें मराठी साम्राज्य प्रस्थापित करण्याला परिस्थितीनें आम्हांला उद्युक्त केलें आणि त्या बाबतींत आपणां सर्वांनीं ऐक्यानें आम्हांला जी मदत केली त्याचें श्रेय आज हें सिंहासन अशा तऱ्हेनें सर्वांच्यापुढें अवतीर्ण झालें आहे. सध्यांच्या वर्तनाप्रमाणेंच सर्वांनीं ऐक्यवृद्धींत आपला क्रम चालू ठेवल्यास, हें राजसिंहासन ' यावच्चंद्रदिवाकरौ ' आपणां सर्वांचें आभारी राहून, आपणां सर्वांना स्वातंत्र्याचें खरें सुख मिळणार आहे. आमच्यांतले कांहीं लोक सध्यां बलात्कारानें आणि इतर कित्येक अकल्पनिक गोष्टींनीं आज आमच्यांतून मुसलमानी धर्मांत गेले आहेत. त्यांपैकीं आमच्या सासुरवाडचे थोर सरदार निंबाळकर यांना आम्हीं परत स्वजातींत आणून या मराठ्यांच्या सिंहासनाचे एक आधारस्तंभ बनविले, याबद्दल आमच्यासंबंधीं कांहीं दिवस आमच्या प्रजाजनांचा गैरसमज

ला होता व आमच्याविरुद्ध कांहीं सरदारांनीं गुप्त कटही केला होता; प

आम्हीं त्यांच्यापुढें आमच्या देशाची भावी स्थिति जेव्हां सयुक्तिकपणानें मांडली तेव्हां त्यांचा गैरसमज दूर होऊन त्यांचीं मतें सुप्रसन्न झालीं. त्या सुप्रसन्नतेचें बीज म्हणजेच हें **मराठ्यांच्या** साम्राज्याचें सिंहासन आहे. म्हणून आजचा हा आपला आनंदाचा आणि कधीं न उगवणारा असा शुभ दिवस मानून, ह्याच दिवसाच्या आज्ञेच्या प्रायश्चित्तानें, ज्यांची इच्छा असेल त्यांनीं स्वजातींत परत यावें. या आज्ञेप्रमाणें आमचे मुख्य प्रधान पेशवे आमचें आज्ञापत्र वाचून दाखवितीलच आणि या गादीचे अष्टप्रधान, आमच्याप्रमाणेंच, या सिंहासनाशीं एकदिलानें, स्वकर्तव्यमहत्वानें आणि मित्रभावानें, आपापल्या कामगिऱ्या यथातथ्य चालविण्याच्या आपणां सर्वांदेखत शपथा घेतील आणि आमच्याप्रमाणेंच युवराज **संभाजीराजांशीं** योग्य वर्तन ठेवून, जगांत धन्य होतील अशी आमची खात्री आहे. ''

**शिवराजांचें** हें प्रजाजनांना उद्देशून झालेलें भाषण संपल्यावर अष्टप्रधानांचीं शपथप्रमाणांचीं भाषणें सुरू झालीं. प्रथमतः मुख्य प्रधान **पेशवे** यांनीं पुढीलप्रमाणें शपथ घेऊन सर्व प्रजाजनांना **शिवराजांचें** कौलप्रमाण आज्ञापत्र वाचून दाखविलें.

'' आजपर्यंत या गादीची जी एकनिष्ठपणें सेवा केली त्याचेंच हें फल **पंतप्रधान पेशवे** हा बहुमानाचा हुद्दा मला मिळाला असून, सिंहासनाच्या उजवीकडचें पहिलें स्थान मला मिळालें आहे. माझें हें **पंतप्रधानाचें** काम मीं आजपर्यंत जसें चालविलें आहे तसेंच पुढें चालवीन अशी या गादीची प्रथम शपथ घेऊन आतां महाराजांचें आज्ञापत्र सर्वांना वाचून दाखवितों. ''

## आज्ञापत्र.




**स्वस्तिश्री राज्याभिषेक शिवशक १ ज्येष्ठ शुद्ध १३ क्षेत्रीये कुलावतंस श्री.**

**राजा शिवाजीछत्रपती** स्वामी यांनीं समस्त ब्राह्मण वेदपाठी व गृहस्थ व क्षेत्रीय मंडळी तथा प्रभुगृहस्थान व वैश्यज्ञाती व शूद्रादि लोकान तथा जमेदार व वतनदार व रयेत वगैरे सर्व ज्ञाती हिंदु महाराष्ट्रान तथा महालानिहाय व देश व तालुके व प्रांतानिहाय वगैरे येकंद्र आज्ञा केली ऐशीजे—

हिंदुज्ञातींत अनादिपरंपरागत धर्मशास्त्राप्रमाणें धर्म चालत आले असतां, अलीकडे कांहीं दिवसांत येवनी आमल जाहल्यामुळें ज्ञातींतील लोकांस बलात्कारें धरून भ्रष्ट केले व कितेक जागींचीं दैवतें छिन्नभिन्न केलीं. हिंदुज्ञातींत आहाकार जाहला. गायत्राह्मणांसह धर्म उच्छेद होण्याचा समय प्राप्त जाहला. त्यावरून श्रीईश्वरी कृपेनें आमचे हस्तें श्रीसांबजीनें यवन वगैरे दुष्टांस शासन करऊन पराभवातें गेले व राहिले ते शत्रु पादाक्रांत होतील. परंतु लिहिण्याचें कारण कीं या सरकारांत राज्याभिषेकसमयीं क्षेत्रक्षेत्रादि क्षेत्रस्थ ब्राह्मण बहुत ग्रन्थ अनादि जमा करून धर्मस्थापना जाहली. त्यांत काशीक्षेत्रस्थ सिष्ठ ब्राह्मणांत कांहीं तड पडून हलीं ग्रंथ पाहतां भटजींकडून तफावत जाहली आहे-ठरलें त्याजवरून शास्त्री, पंडित व मुत्सदी व कारकून यांस आज्ञा देऊन ज्ञातीविवेक व स्कंदपुराणांतर्गत सह्याद्रिखंड आदिकरून महान ग्रंथीं निर्णय सर्व ज्ञातीविशी जाहले आहेत ते वगैरे सर्व ग्रंथांनुमतें व जसे ज्याचे धर्म अनादि चालत आले त्याप्रमाणें निरवेध चालावे. जो कोणी द्वेषबुद्धीनें द्रव्यलोभास्तव, ब्राह्मणशास्त्रविरहित तंटे करून खलेल करील येविसी सरकारांत अर्ज करावा म्हणजे शास्त्राचे संमतें व रूढीपरंपरा ग्रंथ पाहून सरकारांतून निरंतर निरमत्सरपणें धर्मस्थापना कोणाचा उजूर न धरतां परनिष्ट जेव्हांचे तेव्हांच त्वरित बंदोबस्त होईल. हलीं येवन उत्तर देसीहून येत आहेत, तरी सर्व ज्ञातीनें येकदिल राहून खस्त मेहनत करून सरकारची सेवा करून शत्रु पराभवातें न्यावा. यांत कल्याण तुमचें सरकारचेत ईश्वर करील जाणिजे.

मर्यादेयं
विराजते ॥

याप्रमाणें आज्ञापत्र वाचून मुख्य प्रधान स्वस्थानीं विराजमान झाल्यावर **सेनापतींनीं** पुढीलप्रमाणें शपथप्रमाण केलें.

" तरवारीचें स्थान शक्तीप्रमाणें डावीकडेच असायचें. आमच्या धर्माची पायमल्ली करणाऱ्या परकीय सत्तेला नामशेष करून टाकण्याकरितां, परमेश्वर-कृपेनें, महाराजांनीं ही जी तरवार माझ्या हातीं दिली आहे तिचा उपयोग मी एकपत्निव्रतानें ह्या सिंहासनाच्या डाव्या बाजूच्या पहिल्या जागीं बसून यथायोग्य न्यायानें करीन—ह्याच शपथेनें मी आपल्याला बांधून घेतों. "

नंतर **पंत अमात्य** म्हणाले " पंतप्रधान पेशव्यांच्या शेजारच्या जागेचा अपमान न होतां मी आपलें—राज्याच्या जमाबंदीचें काम—या पवित्र सिंहासनाला स्मरून करीन. "

**सुमंतांनीं** नंतर पुढीलप्रमाणें शपथप्रमाण केलें.

" **सेनापतींच्या** खालच्या पायरीचीं जीं परराष्ट्रीय वकिलांशीं सद्युक्तींचीं भाषणें करणें तीं—सारासार विचारानें—स्वराज्याच्या फायद्याचीं अशींच करण्याची आणि फंदफितुरी व लांचलुचपतींसारखे घोर अपराध न करण्याची मी ह्या सिंहासनाची शपथ घेतों. "

" **पंत अमात्यांच्या** जवळचेंच जें माझें स्थान आहे तें माझ्याकडे कायम ठेवून घेण्यासाठीं, स्वराज्यासंबंधींचें दप्तर आणि बारनिशी ह्यांची योग्य व्यवस्था बजावण्याच्या कामगिरीनें, मी ह्या मराठी साम्राज्याच्या सिंहासनाच्या आज्ञेनें पुरा बांधला गेलों आहें. " **पंतसचीव** यांनीं याप्रमाणें शपथ-प्रमाण केल्यावर **पंडितराव** उठून उभे राहिले व त्यांनीं शपथ घेतली.

" **सुमंतांच्या** शेजारीं बसण्याचा योग मला सुदैवानें प्राप्त झाला असून, धर्मोपदेशविषयक ज्या गोष्टी, त्यांच्या आदरानें मी ह्या राज्यांत ह्या सिंहासनाची इभ्रत राहील असेंच वर्तन करीन. "

" **पंतसचिवांच्या** शेजारींच माझें स्थान असल्यामुळें, " **मंत्री** शपथ घेऊं लागले, "मी त्यांच्याच सल्ल्यानें, स्वराज्यांत केव्हांही अन्नाची तूट पडणार नाहीं असा हुजुरातीचा आणि कोठीचा बंदोबस्त ठेवीन अशी ह्या सिंहासना-ेर प्रतिज्ञापूर्वक शपथ घेतों. "

" कोणचाही तंटा असो, त्याचें बीज हरएक तऱ्हेचा व्यापार हेंच होय! त्याचा निकाल लावून घेण्याकरितां दोन्ही पक्ष आपापल्यापरी राज्यांतल्या न्यायमंदिरांत येतात. त्यांपैकीं कायद्याच्या अन्वयें खरा गुन्हेगार शोधून त्याला योग्य दंड करण्याचें जोखम महाराजांनीं माझ्या शिरावर टाकलें आहे. मी **पंडितरावांच्या** शेजारींच असल्यानें त्यांच्या साह्याच्या खऱ्या शास्त्राधारानें, ह्या सिंहासनाची खरी इभ्रत राहील असेच न्यायनिवाडे राज्यांत करीन. " **न्यायाधिश्यांनीं** अशी शपथ घेतल्यावर **छत्रपति शिवराज** म्हणाले—

" पौरजनहो, निंदक कांहीं म्हणोत, शत्रु दांत खावोत किंवा परोत्कर्षासहिष्णु ह्या सिंहासनाकडे पाहून कष्टी होवोत, त्या सर्वांच्या कृती नजरेआड करून, आम्हीं आपल्या जन्माचा हेतु पूर्णपणें ओळखून—कोणाचीही मदत नसतां, ह्या आमच्या शूर, धाडसी, एकपत्निव्रताच्या दोस्तांच्या साह्यानें आणि **सद्गुरु समर्थ रामदास स्वामी गुरुराजांच्या** उपदेशामृतपानानें व आपणां सर्वांच्या ऐक्याच्या भक्कम अशा तीव्र खड्गानें आज हें **महाराष्ट्राच्या साम्राज्याचें वैभवशाली सिंहासन** प्रस्थापित केलें आहे. ह्याचे झेंडे सर्व पृथ्वीवर नाचवून **मराठी भाषा** सर्वत्र चालू करण्यास आपणां सर्वांनीं एकदिलानें झटलें पाहिजे. "

हें भाषण झाल्यावर पुढील पद्य म्हणत वारांगनांचा नाच सुरू झाला.

**[ वेहाग-दादरा. ]**

**नरेंद्रकीर्तिला ॥ सुरेंद्र भाळला ॥ सुरांगना सुरवासना ॥**
**त्यजूनि पातला ॥ सुरांबरीं पहा ॥ सुपुष्पहार हा ॥**
**करिं धरूनि सुख वरूनि अर्पिण्या तुला ॥ त्वदीय कौतुकीं ॥**
**तो सुरवरेण्य कीं ॥ पहा पहा सुमौन पावला ॥ ध्रु० ॥**

वारांगनांचा नाच व गाणें संपल्यावर **रघुनाथ यादव चित्रगुप्त** पुढें येऊन श्लोकबद्ध वाणीनें **शिवछत्रपतींच्या** वतीनें सर्वांना उद्देशून मंजुळ आवाजानें म्हणाले—

**शीवाजी नृपती प्रतापनिधि हा सिंहासनीं रूढला ।**
**जैसा विक्रम भोज जाण अवनीं अत्यंत वीरांजला ॥**

पृथ्वी जिंकुनि सार्वभौमपद हें संपादितो निश्चयें ।
नाहीं पीडण ही प्रजांस अगर्वी व्हावें तुम्हीं निर्भयें ॥ १ ॥
जाणा धर्महि नैषधापरि असे शाहजीसुनू भूपती ।
कीर्तीची गरिमा भरूनि उरली आमोघता ये क्षिती ॥
घ्यारे कौल प्रजांप्रती वदतसे म्हाराज अत्यादरें
नम्ना रे भय अंतरीं अनुदिनीं दंडीन दुष्टां त्वरें ॥ ॥ २ ॥
शीवाजी नृपती समर्थ भुतळीं मानूं नकारे भया ।
दिल्हा कौल प्रजांस जाण प्रभुनें आमोघ केली दया ॥
पाच्छाचा शक मोडिलाच निकरें चिंता न कीजे मनीं ।
कीजे कीर्द महाभुरी च चपळें दीवा सदा यामिनी ॥ ३ ॥
शीवाजी [ नृपती ] प्रजांस वदतो घ्या कौल माझा म्हणी ।
तुमच्या रे प्रतिपालनास अवनीं म्हाराज मी रे धनी ॥
दिल्लीपासुनि जिंकिलें निजबळें हें राज्य जाणाच रे ।
केला हीनहि पाच्छहा मुढमती श्रीअंबिकेचे वरें ॥ ४ ॥
जोडोनी कर आवघ्या च वदती जाणा प्रजा भूपती ।
श्रीरामें वर दीधला च सदयें पाहें बहूता रिती ॥
तैसें पालन या जगीं च करणें हे प्रार्थना जी पदा ।
कीर्तीची गरिमा भरूनि उरवी अन्यत्र नाहीं कदा ॥ ५ ॥
श्रीरामावत कौल देउनि आम्हां संरक्षणें भूपती ।
धार्मीका गुणसागरा प्रभु जगीं ऐशा प्रजा बोलती ॥
पडतां संकट दर्शनास चपळें द्यावें अम्हां सर्वदा ।
कीजे दाद विलंब तो च न लवीं ही प्रार्थना जी पदा ॥६॥
देणें कौल असा च जाण अमुतें म्हाराजचूडामणी ।
भूपा क्लेश हरूनियां सुख दिजे तूं एक चिंतामणी ॥
इत्यादीक हि सेवकांकारिं अम्हां देऊं नको सर्वथा ।
तूझा कौल नृपा कदापि न किजे भूमंडळीं हो वृथा ॥७॥
असा कौल ( हा ) देउनीयां प्रजांला ।
नृपाअंतरीं तोष अद्भूत झाला ॥

प्रभूची लिला वर्णिली चित्रतेनें ।
अती आदरें हो रघूनाथजीनें ॥ ८ ॥
झाला नाथ अनाथतारक जगीं शाहूजीसुनू भूपती ।
पृथ्वींतील प्रजा समस्त हृदयीं आनंद हा मानिती ॥
आतां हे भयकल्पना च अमुतें नाहीं कदा निश्चयें ।
शीवाजी नरनायका जय असो श्री अंबिकेचे दयें ॥ ९ ॥
सिंहासनारूढ नृपाळ झाला ।
आनंद हाची आवघ्या प्रजांला ॥
ऐसा धणी हरिहरें दिधला प्रतापी ।
केले च येवन बळें सुढ अप्रतापीं ॥ १० ॥

याप्रमाणें कवित्वाचें गाणें संपल्यावर **औरंगजेब, विजापूरकर, बेदरकर, भागानगरवाले, सर्व टोपीवाले** वगैरेंच्या नजराण्यांचा स्वीकार करून, **शिवराज** म्हणाले—

"ज्यांच्या कृपेचें फळ हें सिंहासन आहे ते आमचे **सद्गुरुराज समर्थ** या प्रसंगीं येथें असते तर त्यांच्या वाणीचा बोध घ्यायला सांपडला असता, आणि त्यांना अर्पण केलेल्या ह्या **मराठ्यांच्या** राज्याचा प्रतिनिधि म्हणून पादवंदनाचाही लाभ होऊन हें आजचें कार्य सुशोभित झालें असतें."

**शिवराजांचें** हें भाषण संपतें आहे नाहीं तोंच पुढील श्लोक तेथील सर्व मंडळींच्या कर्णरंध्रांत शिरला:—

जया युक्तिीची वासना पूर्ण आहे ।
तयाची गुरूचे पदीं वृत्ति राहे ॥
लयें लक्षितां तें स्वरूपीं सरावें ।
स्वयें ज्योतिपूर्ण प्रकाशे स्वभावें ॥

जयजय रघुवीर समर्थ !

**वामनपंडितांसह** श्री**समर्थ रामदास** तेथें एकदम अवतीर्ण झाल्याबरोबर सर्व सभाजन एकदम उठून हात जोडून उभे राहिले व **शिवराज** सिंहासनावरून आपल्या परिवारासह उठून **समर्थ**चरणीं विलीन झाले. त्या-वेळीं **वामनपंडितांनीं** पुढील श्लोक म्हटला.

**जनाकारणें देव लीलावतारी ।**
**बहूतांपरीं आइरें वेषधारी ॥**
**तया नेणती ते जनीं पापरूपी ।**
**दुरात्मे महा नष्ट चांडाळ पापी ॥**

श्लोक संपल्यावर आणि **शिवराज** आपल्या परिवारासह उठून हात जोडून उभे राहिल्यावर **समर्थ** म्हणाले—

"अहाहा ! काय हें आम्हां **मराठ्यांचें** वैभव! प्रत्यक्ष इंद्रपुरीच ही ! **शिवराज,** आज तुमच्या जन्माचें खरें सार्थक झालें ! गोब्राह्मणप्रतिपालाचें छत्र आज खरें उभारलें गेलें !-हीं तुमचीं स्वच्छ कीर्तिदर्शक शुभ्र छत्रचामरें, आज परकीय सत्तेच्या डोळ्यांपुढें आपल्या विजयी स्वरूपानें पूर्णपणें फडकूं लागलीं ! ह्यांच्या आश्रयाला जोंपर्यंत तुमचें खरें रक्त कोणच्याही देहांत खेळत राहील, तोंपर्यंत ह्या सिंहासनाला राजकीय सत्तेच्या शक्तीचा स्पर्श होण्याची भीतीच नाहीं. हें आमचें **मराठ्यांचें साम्राज्य** जितक्या उदात्त तत्त्वांवर आज प्रस्थापित झालें आहे तितकें पुढें कधींही होणें शक्य नाहीं ! आमचें वर्चस्व कबूल करून, आम्हांला प्रतिवर्षी खंडणी मिळाली असतां, आमच्या मांडलिकांच्या कोणत्याही राज्यवस्थेंत विनाकारण स्वार्थाकरितां ढवळाढवळ करून त्यांचें स्वातंत्र्य नष्ट करण्यानें त्यांना गुलाम करून सोडण्या-इतकें आमच्या साम्राज्याचें अनुदात्त तत्त्व नाहीं हें प्रत्येकानें लक्षांत ठेवावें !"

"महाराज," **शिवराज** बोलूं लागले, "आपणांसारखे परीक्षक आणि योजक वैद्य मिळून, या भवानीसारखी पोलादी मात्रा जवळ असल्यामुळेंच यमराजाच्या हद्दीवर जाऊन पोंचलेल्या स्वातंत्र्याला ह्या कुबडीच्या स्वरोदयाच्या साह्यानें परत आणून महाराष्ट्रधर्माच्या पथ्यानें सुदृढ करतां आलें. तेव्हां ही सर्व कृपा आपलीच आहे. रजोगुणी **अर्जुनाकडून भगवंतांनीं** जें कर्म करवलें तेंच आपण मजकडून करवलें. त्याचाच हा आजचा दिवस आम्हां **महाराष्ट्रीयांच्या** खऱ्या आनंदाचा सूर्यप्रकाश आहे ! म्हणून हा दिवस ह्या **भरतभूमी**-च्या ह्या सतराव्या शतकाच्या इतिहासांत कांहीं विशिष्ट हेतूनें लिहिला जावा अशा तऱ्हेची **समर्थांची** सेवा आम्हां **महाराष्ट्रीयांच्याकडून** प्रलयकालपर्यंत घडत राहील अशी देणगी द्यावी आणि दासाला धन्य करावा !"

" **शिवाजीराजे**, ह्या उच्च आणि उज्वल सिंहासनावर चढून जाण्यास तुम्हांला रामनामाच्याच पायरीची खरी मदत झाली असल्यामुळें तें रामनाम, आजपासून पत्रव्यवहारांत आणि एकमेकांच्या भेटीच्या वेळीं ' जयहर 'च्य ऐवजीं ' रामराम ' असें तुमच्या राज्यांत सर्वत्र सुरू करण्याचीं आज्ञापत्रें सोडून तुमच्या नांवाचें नाणें चालू करावें, म्हणजे तुमचा आणि सर्व महाराष्ट्रीयांचा इच्छित हेतु पार पडणार आहे. **शिवबा**, तुम्हीं आतां स्वस्थानीं विराजमान होऊन ह्या **महाराष्ट्राचे राजे** कसे शोभतां तें आम्हांला पाहूं द्या ! "

आपल्या परिवारासह **शिवराज** सिंहासनावर जाऊन बसलेले पाहून **समर्थां**-चा कंठ दाटून आला ! सर्व जन्मांत त्यांना काय तो खरा आनंद आजच झाला. ते आनंदातिशयानें दोनच वाक्यें बोलले. " अहाहा ! काय ही शोभा आणि केवढा हा आनंद ! या **महाराष्ट्रलक्ष्मीचें** महबल अतर्क्य खरेंच ! " कंठ दाटून आला. पुढें त्यांच्यानें बोलवेना तेव्हां ते **वामनपंडितांना** म्हणाले, " **वामन**स्वामी, तुमचें ज्योतिष ह्या वैभवासंबंधानें काय म्हणतें ?"

**वामनपंडितांना** असा प्रश्न केल्यावर त्यांनीं **मराठ्यांच्या** वैभवी स्वातंत्र्यांतल्या स्वराज्याचें ज्योतिष मोठ्या मार्मिकपणानें वर्तवलें. ते म्हणाले—

"ह्या मराठ्यांच्या साम्राज्याच्या सिंहासनाचा जन्म मिथुन लग्नांत मार्तंडमंडलोदयामध्यें झाला असून पराक्रमस्थानीं साक्षात् **श्रीमारुती** अवतार **रामदास समर्थ** रविरूपानें बसल्यामुळें, सुखस्थानांतल्या स्वक्षेत्रीच्या बुधरूप **सांब** अवतार **शिवराजांच्या** मदतीनें भूमीचा पूर्ण उद्धार झाला. पंचमस्थानच्या स्वक्षेत्रांतल्या शुक्ररूप शक्तीचें **शिवराजाला** पूर्ण साहाय्य असल्यामुळेंच वृत्रासुराला जिंकण्याला इंद्र जसा असमर्थ झाला तसा प्रत्यक्ष काशीविश्वेश्वराला पळवून लावणाऱ्या **औरंगजेबादि** यवनांना, **शिवराजाला** पादाक्रांत करणें अशक्य होऊन त्याला राजा ही पदवी देणें भाग पडलें. षष्ठमस्थानीं स्वगृहांत विजयी मंगळरूप भगवा झेंडा अवतीर्ण झाल्यामुळें यवनांचा बराच संहार होऊन महाराष्ट्राच्या क्षितिजावर पुढें आणखी होणाऱ्या यवनसंहाराचें दर्शक म्हणून भगवा झेंडा फडकूं लागला. सप्तमस्थानीं साक्षात् **बृहस्पति** उदय पावल्यामुळें परम पूज्य आणि विश्वसनीय अशी ज्येष्ठ आणि श्रेष्ठ भार्या, स्नेही, नोकर किल्ले, अश्व, गज वगैरेनीं ही भूमि अमरपुराला लाजवणारी होऊन

**संभाजी**सारख्या—बापसे बेटा सवाई रणशूर—परंतु एककली **युवराजाला** जन्म देती झाली. **रावणा**सारख्या चवदा चौकड्यांच्या राजाला ज्यानें आपलें शौर्य दाखवून रसातळाला नेऊन पोंचविलें तो शनिग्रह नवमस्थानांत स्वगृहीं असल्यामुळें भवानी खड्गानें आपली उज्वल कीर्ति अमर केली आणि एकादशस्थानांत उच्चीचा चंद्र मित्रगृही असल्यामुळें कुबडीरूप **जिजाबाई**च्या आशीर्वादानें लाभस्थान दुर्योधनाप्रमाणें दशगुणित होऊन, सद्व्यथी झालें. असा हा या महाराष्ट्राचा ग्रहयोग उत्पन्न झाल्यामुळेंच छत्रपतित्वाचा योग स्थापित झाला आहे. आजचा हा **महाराष्ट्रीयांच** स्वातंत्र्यांतला आनंदरवि उदय पावून यवनांच्या राज्यांत उसन्या ऐश्वर्याच्या चंद्रप्रकाशाचाही अस्त होऊं लागला आहे. "

**शिवाजीच्यानें** बोलल्यावांचून राहावेना ! तो म्हणाला, " ही सर्व कृपा **समर्थांची** आहे. मला मिळालेल्या उपदेशाप्रमाणें, स्वजन्मकारण ओळखून आजपर्यंत चालत आलों आणि तसाच पुढें चालेन. प्रत्येक महाराष्ट्रीयानें भगवद्वचनाप्रमाणें स्वजन्माचा उद्देश ओळखून वागण्याचें मनांत आणलें, तर इच्छित हेतु पार पडण्याला कांहींच हरकत पडणार नाहीं. कारण, परमेश्वर या सर्वांचा साह्यकारी असल्यामुळेंच—

**सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा ।**
**उडी घालितो संकटीं स्वामि तैसा ॥**
**हरी भक्तीचा घाव घाली निशाणी ।**
**नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥**

" **शिवाजीराजे,** आपलें पूर्वी ठरल्याप्रमाणें **जिवा म्हाल्याच्या** दोघां मुलांनां बोलावून आणून, त्यांना जमीन बहाल केलीत काय ? " **समर्थांनीं** विचारलें.

" त्यांनां जमीनीचा ताम्रपट करून देऊन सैन्यांस योग्य त्या जागाही **समर्थाज्ञे**प्रमाणें दिल्या आहेत ! "

"**शिवाजीराजे,**" **समर्थ** बोलूं लागले, " वेदांविषयीं पोंकळ बडबडण्यांत रमलेले, दुसरें कांहींच नाहीं असा वाद घेणारे, कामना धरून कर्म करणारे, स्वर्गभोग हेंच सर्वस्व असें मानणारे जे गूढ लोक ते ऐश्वर्योपभोगाकडेच

लक्ष्य ठेवतात आणि ज्या कर्मांचें फल पुनर्जन्म आहे असलीं अनेक कर्मे करण्याच्या गोष्टी फुलवून सांगतात; परंतु त्यामुळें भोग आणि ऐश्वर्य यात गुंग झालेल्यांच्या मनाची एकाग्रता होण्याला दृढ प्रवृत्तीची बुद्धि त्यांना सोडून जाते. सत्व, रज आणि तम या तिहींनां अनुलक्षून वेदाच्या आज्ञा आहेत. परंतु आपण ह्या तिहींच्या पलीकडे राहिलें पाहिजे. सुखदुःखादि परस्पर-विरुद्ध विकारांपासून मुक्त झालें पाहिजे. धैर्य धरून चिंता सोडली पाहिजे, आाण जागृतीनें सर्व व्यवहार केले पाहिजेत. प्राण्याचा अधिकार कर्माच्या ठिकाणीं असून फलाच्या ठायीं नाहीं. सिद्धि आणि असिद्धि या दोहोंत जो समबुद्धि ठेवतो तोच खरा योगी! कर्माला ज्ञानाचा आश्रय जरूर लावला पाहिजे. ज्ञानावांचून केवळ फलाच्या आशेनें कर्म करणारे ते दीन होत. ज्ञानी पापपुण्यापासून मुक्त होतो. म्हणून, कर्माच्या ठिकाणीं कौशल्य म्हणजे ज्ञानाची योजना हाच योग! ज्ञानी कर्माच्या फलाची आसक्ति सोडून जन्म-बंधनापासून मुक्त होतात. वेदांतलीं स्तुत्यर्थ वाक्यें ऐकून विक्षिप्त झालेली बुद्धि निश्चल होऊन, समाधानवृत्तीत जेव्हां स्थिर होते, तेव्हांच योगाची प्राप्ति होते. मनांत उद्भवणारे सर्व विकार सोडून आपल्याच ठिकाणीं जो संतुष्ट असतो तोच खरा स्थितप्रज्ञ असें म्हणावें. मनुष्य विद्वान् असून जपून जरी वागत असला, तरी इंद्रियें भारी उचबळ, तीं त्याचें मन बळेंच ओढून नेतात. त्या सर्व इंद्रियानां आवरून परमेश्वरावर विश्वास ठेवावा आणि समबुद्धीच्या योगानें वागावें म्हणजेच तो स्थिरबुद्धीचा गणला जातो. जो मनुष्य विषयांचें चिंतन करतो त्याची त्यांच्या ठिकाणीं आसक्ति उत्पन्न होते, आसक्तिमुळें इच्छा उत्पन्न होते. इच्छेला प्रतिबंध झाला म्हणजे क्रोध उत्पन्न होतो. क्रोधापासून संमोह होतो. समोहापासून स्मृतीला भ्रंश होतो. भ्रंशानें बुद्धि नष्ट होऊन सर्वस्वाची होळी होते. इंद्रियांना रागद्वेषापासून सोडवून मन आवरून जो विषयांत वागतो त्यालाच चित्ताची प्रसन्नता प्राप्त होते. अशा तऱ्हेचा ज्याला योग नाहीं त्याला बुद्धीही नाहीं. ज्याला बुद्धी म्हणजे भावनाध्यान नाहीं, त्याला शांति नाहीं. ज्याला शांती नाही त्याला सुख कुठलें असणार? म्हणून, सुखाला शांती पाहिजे. शांती मिळवण्याला मीपणा आणि माझेपणा हीं सोडलीं पाहिजेत. ही ब्राह्मी स्थिति अंतकाळीं जरी प्राप्त झाली, तरी हिच्यामुळें अज्ञान सहज मिळून जातां येतें. म्हणून प्रत्येकानें आपला प्रकृतिगुण ओळखून जन्मसाफल्य केले पाहिजे. युवराज संभाजी, तुम्हीही दोन शब्द ऐका.

अनश्वर हा देह जाणा । मिथ्या माया अवलक्षणा ॥
तेथें विचार ज्ञानार्क किरणा । स्पर्शो नये सर्वथा ॥
जाणित कर्माची गहना गती ॥ त्यातें वर्णवी मायेची भ्रांती ।
जशी बद्बुद समूहाची उत्पत्ती । कोठें कांहीं दिसेना ॥
अधर्मे वर्तला जरी नर । त्यास कैंचा सुखोपचार ।
तयें भ्रांतीतें उत्तर । नरक घोर वाहतातीं ॥
करूनी अज्ञानाचा पसार । भ्रांतीमय करितीं अनाचार ।
लक्ष्मी मदाचा सागर । पूर्ण पात्रें भरूनियां ॥
येथें सारासार एक जाणें । सत्य सद्भावें वर्तणें ।
करूनियां जग पाळण । कीर्ति कीजे भूलोकीं ॥
मनोवृत्ति प्रामण्याचा अर्थ । भ्रमाचा चुकवावा अनर्थ ।
अविचार कर्माचा स्वार्थ । कल्पू नये पां ॥

आपल्या वडिलांच्या कर्तबगारीकडे लक्ष्य द्या आणि कुलावतंस व्हा, जगांत जी कीर्ति तुमच्या वडिलांनीं मिळविली आहे तींत भर घाला आणि

भलारे भला बोलती तें करावें ।
बहुता जनांचें मुखें येश घ्यावें ॥
परी शेवटीं सर्व सोडोनि द्यावें ।
मरावें परी कीर्तिरूपें उरावें ॥

जयजय रघुवीर समर्थ

**शिवाजी** आणि **संभाजी** यांनीं 'तथास्तु' म्हटल्यावर **समर्थांची** पूजा करण्यात आली आणि नंतर दरबार बरखास्त झाला.

"सध्यांचा **महाराष्ट्र** ह्या चरित्राचा बोध घेऊन त्याप्रमाण वर्तन करील काय? **शिवराजाच्या** वेळची परिस्थिति **शिवराज** आणि **समर्थ** यांनीं जशी वदलली तशी, बा **महाराष्ट्रा**, तुला सध्यांची स्थिति बदलतां येणार नाहीं काय? काळावर दृष्टी ठेवून वर्तन करण्यांत तुझें हित नाहीं काय? तेव्हांच्या माणसाचाच तूं वंशज आहेस ना? वाघाची संतति वाघच असली पाहिजे. आपली सध्यांची परिस्थिति पालटून टाकण्याचा–फलाशा सोडून नेटाचा–यत्न कर आणि खरा राजनिष्ठ म्हणून जगांत कीर्ति मिळीव..."

हें पुस्तक लिहिण्याचें काम संपवितांना कोठूनशी वरीलप्रमाणें **आकाशवाणी** झालेली लेखकाला ऐकूं आली आणि तो काय चमत्कार आहे म्हणून त्याचें लक्ष्य त्या आकाशवाणीकडे वेधल्यामुळें त्याच्या हातांतली लेखणी तेथेंच गळून पडली.

**समाप्त.**

उत्तम वाङ्मय, गायन किंवा बरवा विलास तरुणीचा ।
रमवी चित्त न ज्याचें, पशु किंवा मुक्त तो मनुज साचा !!!

---

# सरसवाङ्मयरत्नमाला.



एक रुपया प्रवेश फी भरून कायम ग्राहक होणारांसच या मालेचीं सर्व मनोरंजक पुस्तकें निम्म किंमतीस मिळतात. टपाल हंशील निराळें.

( १ ) विहंगवृंद (शिलक नाहीं.) ... ... ... १। रु.
✓( २ ) स्वर्गीय प्रेम ... ... ... ... ... ... १॥ रु.
✓( ३ ) वनज्योत्स्ना-सुभेदार ... ... ... १॥। रु.
( ४ ) जीवनलता ... ... ... ... ... ... १। रु.
( ५ ) गृहलक्ष्मी-शरयू ... ... ... ... ... २ रु.
( ६ ) रणरंग वंड-सौदामिनी ... ... ... १॥। रु.
( ७ ) ताजमहाल-काव्यरत्न ... ... ... २।≈ रु.
( ८ ) पतित-जर्मन उच्चाटण... ... ... ... २। रु.
( ९ ) रत्नकंकण-कृपणकन्या... ... ... ... २॥≈ रु.
(१०) शापित महाराष्ट्र ( प्रती संपल्या) ... ... २॥ रु.
(११) तीन शिलेदार भाग १-२ ... ... ... ३ रु.
(२१) दुर्गादास-प्रेमशृंखला ... ... ... २ रु.
(१३) अल्ला हो अकबर ... ... ... २ रु.
(१४) प्रेमळ सवत ... ... ... ... ... ... २॥ रु.
(१५) गुर्जरवीर अनहील ... ... ... ... २॥ रु.
✓(१६) साठ वर्षांपूर्वी-शीलपरीक्षा ... ... ... २॥ रु.
✓(१७) महात्मा गांधींचा बंदीवास, सैतानी चक्कर ...
जर्मनीचे डाव पेंच ... ... ... किं. २॥≈ रु.
✓(१८) व्रतपालन-रंगमहालरहस्य ... ... ... २॥≈ रु.
(१९) अस्तनींतील निखारा व पेशवाईचा अंतकाल... २॥। रु.
✓(२०) श्रीसमर्थ राष्ट्रगुरु-बालब्रह्मचारिणी ... ... २॥। रु.

रत्नदीप, अंध रमणी, लॉर्ड क्लाइव्ह, चंद्रोदय, मुत्सद्दी जपान, नशीब, दिव्याखालीं अंधेर वगैरे क्रमशः प्रसिद्ध होतील.

सेक्रेटरी-सरसवाङ्मयप्रसारक मंडळी, गिरगांव-मुंबई.

सुवाङ्मयेन गीतेन युवतीनां च लीलया । यस्य न द्रवते चित्तं स वै मुक्तोथवा पशुः ।

सरसवाङ्मयरत्नमालेचें २० वें रत्न.

# बालब्रह्मचारिणी

( एक ऐतिहासिक शोकपर्यवसायी कादंबरी. )

लेखक

रा. रा. भिकाजी गोपाळ भिडे.

रत्नकंकण—कृपणकन्या—सैतानी चक्कर इ. कर्ते.



प्रकाशक.

तात्या नेमिनाथ पांगळ.

प्रोप्रायटर, सरसवाङ्मयप्रसारक मंडळी—गिरगांव—मुंबई.

डॉ. भालचंद्रसमोर, रा. भांडारे यांचा दगडी बंगला, चर्नीरोड.

मुद्रक

रा. रा. केशव रावजी गोंधळेकर, 'जगद्धितेच्छु प्रेस'

शनवार पेठ, ४३२ पुणें.





इ. स. १९१८. एप्रिलचा अंक. } किंमत रु. ०–८–० { वर्ष चवथें. आवृत्ति पहिली.

# बालब्रह्मचारिणी !

## प्रकरण १ लें.



### नवाबी आमदानी.



पावसाची सर नुकतीच थांबली होती, तथापि आकाशांत अद्यापि प्रचंड मेघखंड इतस्ततः हेलकावे खात होते. मधून मधून वाराही उदास स्वरानें घोंघावत होता, परंतु अस्तोन्मुख सूर्यनारायण ढगांच्या गर्दीतून वाट काढून धाराजर्जर वसुधा--देवीचें आपल्या कोमल करांनीं शांतवन करीतच होता. अशा वेळीं कल्याणकुमारी गोष्ठविहार प्रासादातील आपल्या खोलींत एकटीच सचिंत बसली होती. तिचें मुखमंडल ह्यावेळीं मेघाच्छन्न आकाशाप्रमाणेंच चिंतामग्न दिसत होतें. तिच्या विशाल व तेजस्वी नेत्रांतून नुकताच अश्रुवर्षाव होऊन गेला होता. अद्यापि राहून राहून एखादा हुंदका किंवा दीर्घ निश्वास तिच्या तोंडून बाहेर पडतच होता. सूर्याचे आरक्त किरण शेजारच्या गवाक्षांतून तिच्या अंगावर पडत होते. ती शून्य पण चंचल दृष्टीनें मेघाच्छादित आकाशाकडे वरचेवर अवलोकन करीत होती. सारांश, ह्या वेळीं कल्याणकुमारी ही बाह्य विराट सृष्टीची सर्वतोपरि छोटीशी प्रतिकृतीच होती, असें ह्मणण्यास हरकत नाहीं !

इतक्यांत महालाच्या दारांतून मृदु मंजुल नूपुर ध्वनि ऐकूं आला. कल्याणकुमारीनें चटकन् मागें वळून पाहिलें, तों आपली प्रिय भ्रातृपत्नी

ललितागौरी येत असलेली तिच्या दृष्टीस पडली. कल्याणकुमारीनें तत्काळ आपले डोळे पदरानें पुसून स्मितपूर्वक तिचें स्वागत केलें. तथापि तिच्या अंतःकरणाची खिन्नता ललितागौरीच्या ध्यानांत आल्यावांचून राहिली नाहीं.

ललितागौरी कल्याणकुमारीजवळ बसून प्रेमळ स्वरानें ह्मणाली—" वत्स, रात्रंदिवस एकच दुःखविचार मनांत आणून जिवाला कष्ट कां करून घेतां ? तुमच्या पतीच्या शोधाची एकसारखी खटपट चाललीच आहे ! ईश्वरकृपेनें त्यांचा लवकरच शोध लागेल, आणि त्यांच्या सहवासानें तुह्मी पूर्ण सुखी व्हाल व आह्मां सर्वांनांही आनंद होईल. "

कल्याणकुमारी—" वहिनी, पतिसेवावंचित विरहिणी पत्नीच्या अंतःकरणाची अवस्था कशी होते, याचा तुला अनुभव नाहीं ! आणि तसला कटु अनुभव तुला, किंबहुना कोणालाच कधीं न येवो, अशी माझी ईश्वराजवळ प्रार्थना आहे ! "

ललितागौरी अश्रुपूर्ण नेत्रांनीं कल्याणकुमारीकडे पहात कंपित स्वरानें ह्मणाली—" विरहव्यथा किती दुःसह असते, याचा मलाही आतांशा अंशतः अनुभव येऊं लागला आहे. त्यावरून तुमच्या धैर्याची आणि सहनशीलतेची मला मोठी धन्यता वाटते ! "

कल्याणकुमारी तिचे अश्रु आपल्या पदरानें पुसून स्मितपूर्वक ह्मणाली, " वहिनी, दादा कोठें देशांतरास कां गेला आहे ! आपल्याच जहागिरींत वसुलासाठीं गेला आहे, दोन दिवसांनीं परत येईल ! त्यासाठीं इतकें कां तुला दुःख होतें ? तुमचें परस्परांवर इतकें प्रेम आहे हें पाहून मला मोठा आनंद वाटतो; पण रात्रंदिवस दादा जर तुझ्याजवळ घरांत बसून राहिला तर, वसूल कसा होणार आणि बाबांची मुराशिदाबादेहून लवकर मुक्तता तरी कशी होणार ? माझ्या आजपर्यंतच्या चिंतेंत ह्या बाबांच्या काळजीची नवीन भर पडल्यामुळें तर माझें मन फार उद्विग्न होऊन गेलें आहे ! "

ललितागौरी—" खरेंच ! मामंजी एकदां सुखरूप घरीं परत आले ह्मणजे सर्वांचीच काळजी दूर होईल ! चला, वत्स, संध्याकाळ झाली ! तुळशीजवळ दिवा लावून आपण देवाची प्रार्थना करूं ! तोच सर्व संकट दूर करणार ! " दोघीही उठून मुकाट्यानें महालांतून निघून गेल्या.

दोनशें वर्षांपूर्वी बंगाल प्रांतांत गोष्ठविहार नांवाचें एक बरेंच मोठें संस्थान असे. मोंगल बादशहांच्या कारकीर्दींत गोष्ठविहारसारखीं अनेक संस्थानें त्या प्रांतांत होतीं. अद्यापि नडिया जिल्ह्यांत गोष्ठविहार नांवाचें ठिकाण आपल्या पूर्ववैभवाची साक्ष देण्यासाठीं जीर्णविशीर्ण स्थितींत विद्यमान आहे.

गोष्ठविहारचे विधुर संस्थानिक राजा गोपीकृष्ण यांना कल्याणकुमारी ही एकुलती एक कन्या व गोविंदराम हा एकुलता एक पुत्र होता. कल्याणकुमारी स्वरूपानें अत्यंत सुंदर व स्वभावानें फार प्रेमळ असल्यामुळें, तिचे बाबा गोपीकृष्णराय व दादा गोविंदराम यांचें उभयतांचेंही तिजवर अतिशय प्रेम असे. गोविंदरामाची तरुण पत्नी ललितागौरी ही देखील कल्याणकुमारीवर सख्या वहिणीप्रमाणें प्रेम करीत असे.

मोंगल बादशहाकडून, बंगाल, बहार व ओरिसा ह्या प्रांताच्या नबाबगिरीवर मुरशिदकुलीखानाची नेमणूक झाल्यावर, नबाब मुरशिदकुलीखान, आपल्या नांवानें मुरशिदाबाद नांवाचें नवीन शहर वसवून, व तेथें आपली गादी स्थापन करून, नबाबी अमल गाजवूं लागला.

मुरशिदकुलीखानाची नेमणूक होण्यापूर्वी बंगाल, बहार व ओरिसा प्रांतांतील राजे व जमीनदार यांजकडून सरकार देणें वसूल करण्याच्या बाबतींत फारच अव्यवस्था माजून गेली होती. जमीनदार लोकांकडे सरकारची बाकी कित्येक वर्षांपासून थकत आली होती; त्यास जमीनदार लोकांचा आळस हें कारण नसून, देशाची स्थितीच अत्यंत शोचनीय होऊन गेली होती. औरंगजेब बादशहाच्या मृत्यूनंतर दिल्लीच्या सिंहासनाकरितां त्याच्या पुत्रांमध्यें परस्पर कलह व कारस्थानें चाललीं होतीं. त्याच संधीस दक्षिणेंतील मराठे लोकांच्या स्वाऱ्याही वारंवार होऊं लागल्या. ह्या मराठ्यांच्या टोळधाडीनें तर देश उध्वस्त होऊन गेलाच; पण त्यांतच परदेशी फिरंगी लोकांचे धार्मिक अत्याचार आणि अशा अव्यवस्थेच्या काळांत अधिकच माजणाऱ्या स्थानिक चोऱ्या, दरवडे व लुटालुटी, ह्यांच्या योगानें वंग देशांतील प्रजा अगदीं हैराण होऊन गेली होती. त्यामुळें, प्रजाजनांकडून जमीनदारांना वक्तशीर वसूल मिळेना, अर्थात् जमीनदारांच्या हातून सरकार देणेंही फिटेना. ह्याचा परिणाम

असा झाला, कीं, बंगालच्या नवाबाकडून कित्येक वर्षांत बादशहाला एक छदामही पोहोंचला नाहीं !

ह्या ढिलाईच्या काळानंतर एकदम मुरशिदकुलीखानाची अत्यंत क्रूर व राक्षसी कारकीर्द सुरू झाली. वार्षिक खंडणी वसूलीचे त्याचे कडक नियम व अत्याचारी शासन पद्धति यांच्या योगानें राजे व जमीनदार अतिशय त्रासून गेले. आपले प्राण व आपल्या घराण्याची अब्रू कशी बचावते, ही प्रत्येकाला रात्रंदिवस काळजी लागून राहीली होती.

नबाबानें सर्व प्रदेशाचे तेरा विभाग किंवा सुभे करून प्रत्येक सुभ्यावर एकेक सुभेदार नेमिला व त्याचे ताब्यांत बरेंच सशस्त्र सैन्यही ठेविलें. सुभ्यांतील राज्यव्यवस्थेकडे किंवा प्रजासंरक्षणाकडे ह्या सुभेदारांचा यत्किंचित देखील संबंध नसे. त्या कामांत राजे व जमीनदार यांना पूर्ण मुखत्यारी होती; पण सुभ्यांतील एखाद्या जमीनदाराकडून सरकार खंडणी वक्तशीर आली नाहीं तर, तेवढी वसूल करण्याकरितां वाटतील ते अत्याचार करण्याची ह्या सुभेदारांना पूर्ण मुभा असे.

नबाब मुरशिदकुलीखान यानें आपला नातजांवई महमद रेझाखान याच्या हातीं सर्व राज्यकारभार मुखत्यारीनें सोंपविला होता. रेझाखान अमानुष अत्याचारी क्रूर राक्षस होता. सरकारी खंडणी वसूल करण्याकरितां, जमिनदार लोकांवर तो जे भयंकर अत्याचार करीत असे, तसे अत्याचार कोणत्याहि काळीं कोणत्याहि देशांत कोणीहि केल्याचा दाखला सांपडणार नाहीं ! जमीनदारांकडे वसूल थकला म्हणजे तो त्यांना हुकूम पाठवून मुरशिदाबादेस बोलावून आणी, आणि एखाद्या हलकट गुन्हेगारा प्रमाणें कोणाला कोरडे मारवी, कोणाला दिवसभर उन्हांत उभे करी, कोणाला रात्रभर गार पाण्यांत बुडवून ठेवी, तर कोणाला हातांपायांत खोडे घालून पाडी. ह्या शिवाय रेझाखानानें एका आवारांत एक मोठा तलाव तयार करविला होता. त्यांत शहरांतील सर्व नाल्यांचें घाण पाणी व मैला आणून सोडला होता. त्या तलावाची इतकी दुर्गंधी सुटत असे, कीं, आवाराजवळच्या रस्त्यानें देखील कोणाला नाकाला पदर लाविल्या शिवाय जाववत नसे ज्या जमीनदारांकडून इतर उपायानें खंडणी वसूल करणें अशक्य होई, त्यांना ह्या नरककुंडांत उभें करण्यांत येत असे. हिंदु

लोकांचा उपहास करण्याकरितां ह्या प्रत्यक्ष रौरव नरककुंडाला " वैकुंठ" असें नांव देण्यांत आलें होतें. ग्रँड डफ, स्टुअर्ट इत्यादि प्रसिद्ध इंग्रज इतिहासकारांनीं देखील आपल्या ग्रंथांत या वैकुंठाचा उल्लेख केलेला आहे. हल्लीं मुरशिदाबादेस जो किल्ला आहे, त्याच्या दक्षिण दरवाजाजवळच हें वैकुंठ होतें.

गोष्ठविहार संस्थानचा राजा गोपीकृष्णराय याजकडे खंडणीची बाकी राहिल्यामुळें रेझाखानानें त्यांना हुकूम पाठवून मुरशिदाबादेस बोलावून नेलें होतें. गोपीकृष्णरायाला पुढील भय अगोदरच दिसत होतें, म्हणून त्यानें शक्य तितकी खटपट करून जमेल तितका खजिना जमविला होता. तथापि राजाचा स्वभाव दयाळू असल्यामुळें, आपल्या गरीब प्रजेवर जुलूम जबरदस्ती करून त्यांच्याकडून द्रव्य वसूल करणें, त्याच्यानें होईना, त्यामुळें कितीहि प्रयत्न केला तरी, खंडणीच्या बाकीपैकीं निम्मी रक्कम कटाकटी जमली. तेवढीच घेऊन गोपीकृष्णराय मुरशिदाबादेस गेले. बाकीची रक्कम वसूल करून किंवा निदान कर्ज काढून मुरशिदाबादेस पाठवून देण्यास त्यांनीं आपला पुत्र युवराज गोविंदराम यास जातांना ताकीद केली होती, त्याप्रमाणें गोविंदरामही आपल्या संस्थानांत वसुलाकरितां फिरत होता. खंडणीची निम्मी रक्कम हजर केली म्हणजे रेझाखान थोडासा शांत होऊन बाकीची रक्कम भरणा करण्यास मुदत देईल, व त्या मुदतींत आपल्या पुत्राकडून रकम आली म्हणजे आपल्यावर अत्याचार घडण्याचा प्रसंग टळेल, अशी गोपीकृष्णराय यांस फार आशा वाटत होती.

राजा गोपीकृष्णराय मुरशिदाबादेस जातांना याप्रमाणें आपल्या प्रियकन्येला आश्वासन देऊन गेला होता. परंतु महमद रेझाखानच्या अमानुष अत्याचाराचें वर्णन कल्याणकुमारीनें अनेक वेळां कित्येकांच्या तोंडून ऐकिलें होतें. त्यामुळें तिला आपल्या वृद्ध पित्याच्या सुरक्षिततेविषयीं अतीशय काळजी वाटत होती. आपला दादा बाकीची रक्कम घेऊन केव्हां येतो, आणि ती मुरशिदाबादेस केव्हां पोंचती होते, अशी तिला रात्रंदिवस उत्कंठा लागली होती.

कल्याणकुमारीचें वय ह्या वेळीं वीस वर्षांचें होतें. तिचा विवाह

होऊन सात वर्षे झालीं होतीं. परंतु पतिगृहीं जाण्याची तिला एकदांही सुसंधी लाभली नव्हती. तिचे श्वशुर सरदार द्वारकानाथ व पति नीलकंठराय हे मुरशिदाबादेसच रहात असत. सुमारें दोन तीन वर्षांपूर्वी रेझाखानाच्या अत्याचारास वृद्ध सरदार द्वारकानाथ बळी पडले, त्यांची जहागीर खालसा झाली, त्यांचा वाडाही रेझाखानानें काढून घेतला, आणि त्यांची सर्व संपत्ति लुटून नेली. त्या वेळीं तरुण नीलकंठराय आपल्या विधवा मातुश्रीसह मुराशिदाबादेहून नाहींसे झाले; त्यांचा त्यानंतर कोणासही पत्ता लागला नाहीं. गोपीकृष्णरायांनींही आपल्या जांवयाचा शोध गुप्तपणें चालविलाच होता. कारण नबाबांच्या शत्रूचा उघडपणें तपास चालविल्यास आपल्यावरही तसेंच संकट येईल, अशी गोपीकृष्णरायांना धास्ती होती.

पतिविषयक चिंतेनें कल्याणकुमारी अगोदरच ग्रासून गेली होती, त्यांतच आणखी प्रिय पित्याच्या सुरक्षितेची काळजी उत्पन्न झाल्यामुळें तिचें अंतःकरण फारच उदास झालें. त्यामुळें कल्याणकुमारी खिन्न अंतःकरणानें आपल्या महालांत बसून शून्य दृष्टीनें बाह्य सृष्टीकडे अवलोकन करीत होती.

दुसरे दिवशीं कल्याणकुमारीचे बंधु कुमार गोविंदराम गोष्ठाविहारास परत आले. जहागिरीच्या पूर्व भागांतून शक्य तितकी रक्कम त्यांनीं वसूल करून आणिली होती; परंतु तेवढ्या रकमेनें नबाबाच्या बाकीपैकीं निम्या ऐवजाची देखील भरती होण्यासारखी नव्हती. हें पाहून तर कल्याणकुमारी फारच घाबरून गेली. आतां आपल्या पित्याची अत्याचारापासून मुक्तता होण्याची आशा नाहीं, असें तिला वाटूं लागलें. तथापि, हातीं आलेली रक्कम तरी तूर्त मुराशिदाबादेस रवाना करावी, आणि बांकीची जमाविण्याचा आणखी प्रयत्न करावा, म्हणजे रेझाखान थोडा तरी शांत होऊन आणखीं कांहीं दिवस सवलत मिळेल व बाबांचा बचाव होईल, असें कुमार गोविंदरावानीं आपल्या प्रिय भगिनीला आश्वासन दिलें, तेव्हां तिचें मन तात्पुरतें तरी अंमळ शांत झालें.

नंतर आपले वृद्ध उपाध्याय शिरोमणी ठाकूर यांच्या बरोबर कांहीं विश्वासू माणसें बंदोबस्ताकरितां देऊन, रक्कम मुरशिदाबादेस पाठविण्याची

व्यवस्था करून, कुमार गोविंदराम दुसरे दिवशींच आपल्या जहागिरीच्या पश्चिम भागांत वसूलाकरितां निघून गेले.

कल्याणकुमारीच्यानें आतां स्वस्थ रहावेना. रेशाखानाच्या क्रूर अत्याचाराचें स्मरण होऊन तिच्या अंगावर वरचेवर शहारे येऊं लागले. रेशाखानाच्या राक्षसी कृत्यांबद्दल तिला अतिशय संताप आला. आपण पुरुष असतों तर मुर्शिदाबादेस जाऊन बाबांच्या संरक्षणाची कांहीं तरी तजवीज केली असती; दादा वसुलाच्या कामांत गुंतला असल्यामुळें, त्याला तिकडे जातां येणें शक्य नाहीं, आणि आपण अबला असल्यामुळें आपला कांहीं उपयोग नाहीं; ह्यापेक्षां ईश्वरानें आपल्याला जन्मालाच घातलें नसतें तर, फार बरें झाल असतें, असें तिला वाटूं लागलें. कल्याणकुमारी रात्रभर बिछान्यावर तळमळत पडली होती. तिला एक क्षणभर देखील झोंप लागली नाहीं. शेवटीं पहाटेच्या वेळीं तिच्या मनांत एक कल्पना आली, व ती अमलांत आणण्याचा तिनें आपल्या मनांत निश्चय केला. तेव्हां तिच्या मनाला बरेंच समाधान झालें, आणि तिच्या अंगीं विलक्षण धैर्य संचरूं लागलें.

---

## प्रकरण २ रें.



### अकल्पित भेट.



शुक्ल सप्तमीची रात्र! दिवस मावळून दोन तास झाले होते; आल्हादकारक अर्धचंद्र प्रफुल्ल हास्यानें सर्व सृष्टि आनंदित करीत होता; वन्यकुसुमनें निःस्वार्थ बुद्धीनें सुगंधप्रसार करीत होतीं; आणि मंद समीरण तो सुगंध आपल्या अंजलींतून दशदिशांना उधळीत चालला होता. भैरवी नदीची सुनील जलधारा चंद्रज्योत्स्नेनें अर्पण केलेला शुभ्र शालू परिधान करून व वीचितरंगमाला धारण करून प्रेमयुक्त मधुर गायन

करीत आनंदान चालली होती. उभयपार्श्ववर्तिवृक्ष आपले विस्तीर्ण बाहू पसरून आपल्या प्रिय भगिनीचें संरक्षण करण्यास सज्ज होते.

अशा रम्य व शांत वेळीं भैरवी नदीच्या गंभीर जलप्रवाहावरून दोन नौका आनंदानें नृत्य करीत चालल्या होत्या. पुढील नौका बरीच मोठी पण साधी असून, त्यावर माणसांची गर्दीही बरीच होती. तिच्या मागून कांहीं अंतरावरून चाललेली मागील नौका लहानच पण क्रीडाभुवना-प्रमाणें सुसज्जित व सुंदर होती. ह्या नौकेच्या छोट्या गच्चीवर एक तरुण सृष्टिशोभा अवलोकन करीत व एक गाणें आपल्याशीं मधुर स्वरानें गुणगुणत बसला होता.

कांहीं वेळानें पुढील नौकेवर गलबला ऐकूं येऊं लागला, म्हणून मागील नौकेवरील तरुण तिकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहूं लागला, तों पुढील नौकेवर बरीच धांदल चालली आहे, तीरावरील जंगलांतून कांहीं लोक नदींत उड्या टाकून नौकेकडे पोहत येत आहेत व कांहीं नौकेवर चढत आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. इतक्यांत काठ्यांची खणाखणी त्याच्या कानावर आली आणि तरवारींची चकमकही क्षीण चंद्रप्रकाशांत त्या तरुणाच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर खचित कांहीं तरी दगा आहे, अशी त्या तरुणाची खात्री झाली. त्यानें आपल्या कमरेचा तमंचा एक-दम हवेंत झाडला आणि गच्चीवरून खालीं येऊन आपली नांव झपा-ट्यानें वल्हऊन पुढील नौकेला ताबडतोब गांठण्याविषयीं त्यानें नावि-कांस हुकूम केला. पिस्तुलाचा बार व नाविकांची दंगल ऐकून नौकेंतील सर्व मंडळी बाहेर आली.

वृद्धशिरोमणी ठाकूर त्या तरुणाजवळ येऊन म्हणाले, " काय रे, बाळा, कल्याणसिंह काय गडबड आहे ? "

कल्याणसिंह—" ठाकुरदादा, आपल्या खजिन्याच्या नौकेवर दर-वडा आला आहे असें वाटतें ! हाणामारी व आरडाओरड यांची दंगल चालली आहे ! तुम्हांला ऐकूं येत नाहीं का ? त्यांच्या मदतीला गेलें पाहिजे, नाहीं तर सर्व नाश होईल. "

शिरोमणी ठाकुरांनीं कान टवकारून ऐकलें, तेव्हां कल्याणसिंहाचा तर्क खरा आहे अशी खात्री झाली. सरकारी खंडणीची रकम कुमार

गोविंदरामांनीं आपल्या स्वाधीन केलेली जर दरवडेखोरांनीं चोरून नेली तर, गोपीकृष्णरायांची मुक्तता कशी होणार, अशी धास्ती पडून शिरोमणी ठाकूर आतिशय घाबरून गेले. इतर नोकर माणसें तर " चोर, चोर, मेलों मेलों मेलों ! " अशी उगीच आरडाओरड करूं लागलीं. कल्याणसिंहानें त्या सर्वांना दरडावून शांत केलें. त्यांची नौका पुढील नावेजवळ आली, तों त्या नावेवरील दंगा शांत झाल्याचें कल्याणसिंहाच्या दृष्टीस पडलें. कांहीं लोक नदींतून पोहत तीराकडे जात आहेत असेंही त्याला दिसून आलें. ते चोरटेच असावेत असा तर्क करून, कल्याणसिंहानें त्यांच्यावर पुनः पिस्तुल रोंखलें; परंतु पाठ दाखवून जाणाऱ्या शत्रूवर मागून घाव घालणें नामर्दपणाचें आहे असा विचार करून कल्याणसिंहानें तशांतहि आपला हात आंवरला.

कल्याणसिंहाची नौका पुढील नौकेजवळ येतांच तो चटकन उडी मारून पुढील नौकेवर गेला. जमादार रघुवीरसिंग यानें कल्याणसिंहाचें प्रणामपूर्वक स्वागत केलें. इतर सैनिकांनीं त्याला सलामी दिली आणि सर्वांनीं गोपीकृष्णरायांचा व कल्याणसिंहाचा जयजयकार केला.

" जमादार," कल्याणसिंह घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला—" आपला सर्व खजिना लुटला गेला कीं काय ? "

रघुवीर—" नाहीं सरकार ! आपला एक पैसासुद्धां चोरांच्या हातीं लागला नाहीं ! खजिन्याचें त्यांना नुसतें दर्शन देखील झालें नाहीं ! "

कल्याणसिंह एक दीर्घ निश्वास सोडून शांत स्वरानें म्हणाला,—"अहाहा ! ही ईश्वराची एक कृपाच झाली ! बरें, पण आमच्या मंडळीपैकीं कोणाला कांहीं दुखापत झाली आहे कीं काय ?

रघुवीर—" कांहीं थोड्या लोकांना किरकोळ जखमा झाल्या आहेत, पण त्या विशेष काळजी करण्यासारख्या नाहींत. "

कल्याणसिंह—" चोर किती होते, आणि त्यांची काय व्यवस्था झाली ? "

रघवीर—" चोरटे पंचवीस तीस तरी असावेत, असें वाटतें. ते शेजारच्या जंगलांतून एकदम नदींत उड्या टाकून पोहत नौकेवर आले. त्यांच्यापैकीं कोणाच्या हातांत लाठ्या व कोणाच्या हातांत सुरे होते.

आम्ही कांहीं बेसावध नव्हतों ! नौकेवर हल्ला होणार असें दिसतांच आम्ही सशस्त्र होऊन त्यांचा प्रतिकार करण्यास सिद्ध झालों. त्यांची आमची बराच वेळ झटापट उडाली. त्यांत आमच्यापैकीं मला व आणखी दोन तीन असामींना अल्पस्वल्प दुखापती झाल्या, त्याचप्रमाणें त्या दरवडेखोरांपैकींहि पुष्कळ असामींना बऱ्याच जखमा झाल्या; पण कोणाचीहि प्राणहानी झाली नाहीं. इतक्यांत आपण आपल्या नौकेवर पिस्तुलाचा बार केलेला दरवडेखोरांच्या कानीं आला आणि आपली नौका झपाट्यानें आमच्याकडे येत असलेली त्यांच्या दृष्टीस पडली तेव्हां त्यांनीं भयभीत होऊन पोबारा केला. तरी त्यांच्या टोळीचा नाईक आणि त्याचे चार साथीदार आमच्या हातीं लागले आहेत. त्यांना आम्हीं तळमजल्यावर बंदोबस्तानें ठेविलें आहे. आपली आज्ञा होईल त्याप्रमाणें त्यांची व्यवस्था करावयाची ! ”

कल्याणसिंह तेथें असलेल्या एका आसनावर बसला, आणि त्यानें दरवडेखोरांच्या नाईकाला आपल्यासमोर आणण्याविषयीं हुकूम केला. थोड्याच वेळानें दोन शिपाई एका शृंखलाबद्ध तरुणास कल्याणसिंहासमोर घेऊन आले. त्या तरुणाची पाणीदार मुद्रा, तेजस्वी नेत्र, पीळदार शरीर व बुद्धिमत्ता निदर्शक भव्य भालप्रदेश पाहून कल्याणसिंहाच्या अंतःकरणांत त्याच्याविषयीं अनुकूल भावना उत्पन्न झाली.

तरुण दस्यु सरदार कल्याणसिंहाला प्रणाम करून अधोवदन उभा राहिला. त्याच्याकडे भेदक दृष्टीनें पहात कल्याणसिंह म्हणाला—“भल्या गृहस्था, तूं आज अत्यंत दुष्ट कर्म केलें आहेस ! ह्या पातकाचें प्रायश्चित्त भोगण्याकरितां तुला उद्यां मुराशिदाबादेस नेऊन नबाबसाहेबांच्या स्वाधीन केलें पाहिजे ! ”

दस्यु सरदार—“ सरकार, मी आपल्या ताब्यांत सांपडलों आहें, त्याअर्थी माझी वाटेल ती व्यवस्था करण्यास आपण मुखत्यार आहां ! तथापि माझी एवढीच प्रार्थना आहे, कीं, पाहिजे तर तरवारीनें तुम्ही माझी गर्दन उडऊन द्यावी, वाटेल तर मला गोळी घालून ठार करावें किंवा मर्जी असेल तर माझे हातपाय बांधून मला ह्या भैरवी नदींत लोटून द्यावें; पण कृपा करून मला त्या क्रूर नबाबाच्या हातीं देऊं नये ! त्या

नराधमाचें व माझें हाडवैर आहे ! त्यानें माझा सर्व नाश केला आहे ! किंबहुना मला ही स्थिति प्राप्त होण्यास तोच राक्षस कारण आहे ! मी आपल्याजवळ प्राणयाचना करीत नाहीं. कारण, तसें करणें नामर्दपणाचें आहे ! पण मला माझ्या शत्रूच्या हातीं देऊं नये, एवढीच माझी प्रार्थना आहे ! ”

दस्यु सरदाराचें हें विलक्षण भाषण ऐकून कल्याणसिंहास त्याच्या पूर्व चरित्राविषयीं जिज्ञासा उत्पन्न झाली. कल्याणसिंह त्याला सौम्य स्वरानें म्हणाला—“ तुम्हीं कधीं मुरशिदाबादेस होतां काय ? नबाबसाहेबांची व तुमची ओळख आहे काय ? तुमच्याशीं त्याचें इतकें हाडवैर कां जडलें आहे ? ”

दस्यु सरदार—“ सरकार, मी जातीचा दरवडेखोर नसून, कुलीन ब्राह्मण आहें ! मी मुरशिदाबादेसच रहात होतों. तेथें माझे आईबाप घरदार धनसंपत्ति सर्व कांहीं यथास्थित होतें. मी थोडेंबहुत शिक्षणही संपादन केलें आहे. पण आतां ह्या जगांत माझें असें कांहींच उरलें नाहीं ! नबाबानें माझ्या संसाराला लावलेली आग अद्यापि माझ्या अंतःकरणांत धडधड जळत आहे ! त्या आगीनें माझ्या हृदयांतील दयामाया, स्नेहममता धर्म, नीति इत्यादि सर्व सद्गुण जळून खाक झाले, म्हणून मी दरवडेखोर बनलों ! लोकांना लुटून पैसा मिळविण्याची मला इच्छा नाहीं ! द्रव्य घेऊन मला काय करावयाचें ! परंतु मजवर झालेल्या अनन्वित अत्याचारांतून मला कोणींहि सोडाविलें नाहीं, ह्यासाठीं जगाचा सूड घेण्याच्या दुर्निवार इच्छेनें मी कांहीं तरुण मंडळी जमवून हा धंदा सुरू केला आहे ! ”

कल्याणसिंह—“ तुमचें पूर्व चारित्र समजून घेण्याची मला फार इच्छा आहे ! तुमची कांहीं हरकत नसेल तर, आपलें पूर्ववृत्त सविस्तर सांगाल काय ? ”

दस्यु सरदार—“ अहाहा, महाराज, इतक्या दयामय दृष्टीनें आजपर्यंत ह्या दुर्दैवी प्राण्याकडे कोणींहि अवलोकन केलें नाहीं ! इतक्या कळकळीनें माझा कोणीं एकदांही समाचार घेतला नाहीं. आपल्या अंतःकरणांत जर माझ्यासंबंधानें इतकी कळकळ उत्पन्न झाली आहे, तर

मी माझ्या दुर्दैवाची कहाणी आपल्या चरणीं अवश्य निवेदन करतों ! आपल्या प्रेमळ मुद्रेवरूनच आपलें अंतःकरण दयामय आहे, अशी माझी खात्री झाली ! माझी मुक्तता करून घेण्याच्या हेतूनें मी आपली खुशामत करीत आहें असें मनांत देखील आणूं नये. कारण मला जगून काय करावयाचें आहे ? माझ्याकरितां जगांत कोणीं एक अश्रुबिंदुही गाळणार नाहीं ! असो. ”

“मुरशिदाबादेस आमचा एक भव्य वाडा होता, आणि मुरशिदाबादेच्या जवळच आमची वडिलार्जित जहागीरही थोडीशी होती. त्या जहागिरीवर रेझाखानाचा फार डोळा होता. गेल्या वर्षीं आमच्याकडील खंडणीची रक्कम थोडीशी बाकी राहिली; त्याबद्दल रेझाखानानें आमच्या वडिलांना पकडून नेलें. त्यांनीं रक्कम भरण्यास कांहीं मुदत मागितली पण त्या क्रूर नराधम रेझाखानानें एक दिवसाचीहि मुदत न देतां, अनन्वित अत्याचार करून बाबांचा खून केला, आणि आमची जहागीर खालसा करून, नबाबाकडून आपल्या नांवानें करून घेतली. ह्या अन्यायाबद्दल मीं दिल्लीच्या बादशहाकडे अर्ज करून दाद मागितली; हें रेझाखानाला कळतांच त्यानें माझा सूड घेण्याकरितां नबाबाच्या हुकुमानें खंडणीच्या बाकीकरितां आमच्या वाड्यांतील सर्व संपत्ति लुटून नेली. इतकेंच करून तो राक्षस स्वस्थ बसला नाहीं. माझ्या वाड्याची जागा नबाबसाहेबांस क्रीडाभुवन बांधण्याकरितां पाहिजे आहे, ती तत्काळ रिकामी करून दिली पाहिजे असा त्यानें मला हुकूम केला. त्या वेळीं माझी वृद्ध माता फार आजारी होती. मजजवळ एक पैसाही शिल्लक राहिला नव्हता. कोणाकडे कर्ज मागण्याचीहि सोय नव्हती. अशा बिकट परिस्थितींत काय करावें हें मला सुचेना. पूर्व परिचित स्नेही मंडळींना सल्ला विचारला; त्यांनीं मुकाट्यानें घर सोडावें असा सल्ला दिला, पण चार दिवस आश्रय द्यावयास मात्र कोणींहि तयार होईना ! शेवटीं मीं कोतवालास एक आठवड्याची मुदत देण्याविषयीं प्रार्थना केली, परंतु त्याला माझी दया न येतां उलट त्यानें अवहेलना करून मुदत देण्याचें साफ नाकारलें. ह्याप्रमाणें नाइलाज झाल्यामुळें मी माझ्या आईला घेऊन घरांतून बाहेर पडलों. हाय हाय ! त्या वेळच्या भयंकर स्थितीचें स्मरण

झालें म्हणजे अद्यापिही अंगावर शहारे येतात व डोळे पाण्यानें भरून येतात."

दस्यु सरदाराच्या डोळ्यांतून खरोखरच अश्रुवर्षाव होऊं लागला. तें पाहून कल्याणसिंहाचें अंतःकरण द्रवलें व त्याचेहि नेत्र अश्रूंनीं भरून आले. कल्याणसिंह पुढें म्हणाला, " बरें, मग ? "

दस्यु सरदार—" मग काय, महाराज, मी माझ्या वृद्ध मातेसह रस्त्यांत उभा राहिलों ! हाय हाय ! तोच सूर्यप्रकाश, तेंच नीच नभोमंडळ आणि जवळून वहात असलेला तोच भागीरथीचा तरंगतरल प्रवाह ! परंतु मला हें नेहमींचें रमणिय दृश्य अत्यंत भिषण व शून्य दिसूं लागलें ! ज्या घरांत माझे वाडवडील सुखानें नांदले, ज्या ठिकाणीं माझें बालपण आनंदांत गेलें, तें माझें आवडतें घर सोडून जातांना माझें हृदय विदीर्ण होऊन गेलें ! परंतु उपाय काय ! मी आईचा हात धरून मुकाट्यानें तेथून चालता झालों ! "

कल्याणसिंह—" मग तेथून तुम्हीं कोणीकडे गेलां ? "

दस्यु सरदार—" कोठें जावयाचें ? कोणाचा आश्रय नाहीं, कोणी इष्टमित्र नाहीं ! ओळखीचे कोणी आश्रय देण्यास धजेनात, तेव्हां निरुपाय होऊन, आईसह रस्त्यानें फिरूं लागलों, आणि पोटाकरितां भिक्षा मागूं लागलों ! मुरशिदाबाद सोडून गंगातीरानेंच आम्ही निघालों ! आपण श्वशुराच्या आश्रयास जावें, असा माझ्या आईचा आग्रह होता, पण मला ती गोष्ट मुळींच पसंत नव्हती. कारण, आमचे श्वशुर श्रीमान् जहागीरदार ! त्यांच्या घरीं अशा दरिद्री दीन निराश्रित स्थितींत गेल्यास आपला अपमान होईल असें मला वाटत होतें. तथापि कोठें तरी जावयाचेंच, म्हणून आईच्या समजुतीकरितां त्याच मार्गानें निघालों. माझ्या आईला पायीं प्रवास करण्याचा व भिक्षान्न भोजनाचा कधींच प्रसंग नसल्यामुळें, दोनच दिवसांत ती अगदीं थकून गेली. तिच्यानें एक पाऊलही चालवेना, तेव्हां गंगातीरीं एका गांवाबाहेर एक शंकराचें जीर्ण देवालय होतें तेथें मुक्काम केला. मी गांवांतून भिक्षा मागून तांदूळ आणी, आणि एका मडक्यांत ते शिजवून मी व आई जाईल तितकें खात असूं ! परंतु एवढ्या अत्यल्प सुखाचाहि उपभोग आमच्या नशिबीं

नव्हता. आईला भयंकर ताप येऊं लागला. तिला औषधोपचार करण्यास मजपाशीं पैसा नाहीं ! अशा अगतिक स्थितींत एक आठवड्यानें माझी वृद्ध माता परलोकीं गेली ! मी तिचें मस्तक मांडीवर घेऊन अतिशय शोक केला. गांवांतील कांहीं मंडळीच्या साह्यानें प्रेतसंस्कार उरकला. नंतर मी माझ्या स्थितीचा विचार करूं लागलों. अत्यल्प काळांत माझ्या स्थितींत किती भयंकर फरक झाला. बाप, घरदार धनदौलत सर्व नष्ट होऊन, मी भणंग भिकारी बनलों ! ईश्वराचा मी कोणता अपराध केला नसतां त्यानें मला हें अन्यायानें शासन केलें, आणि अनुकूल कालां मी अनेक लोकांवर यथाशक्ति उपकार केले असतां, ह्या प्रसंगीं मला मात्र कोणींहि साह्य करावयाला तयार होऊं नये, हा जगाचा कृतघ्नपणा होय; असे विचार मनांत येऊन, मला नबाबाचा, जगाचा आणि ईश्वराचा देखील अत्यंत तिटकारा आला ! माझ्या अंतःकरणांतील शोक पार नाहींसा झाला. संतापानें माझें अंग थरथर कापूं लागलें. डोळे तारवटून गेले, आणि नाकांतून दीर्घ निश्वास वाहूं लागले. जगाचा व विशेषतः धनिक लोकांचा पुरा सूड उगवावयाचा आणि त्यांचें द्रव्य हरण करून दीन अनाथांना देऊन टाकावयाचें, असा निश्चय करून मी तेथून निघालों, लवकरच मला कांहीं तरुण अनुयायी मिळाले आणि त्यांच्या साह्यानें मी हा वाटमारीचा धंदा सुरू केला."

कल्याणसिंह—"वाटमारी करून मिळविलेलें द्रव्य तुम्ही गरीबगुरीबांस देऊन त्यांचें दुःख निवारण करीत असाल; पण तुमच्या हातून हें पापकर्म होतें हें तुम्हांला कळत नाहीं का ? "

दस्यु सरदार—" पापपुण्याचा विचार मीं अजीबात सोडून दिला आहे ! ती कल्पनाहि मी मनांत आणीत नाहीं. मी जें करतों तें पुण्याकरितां किंवा पापाकरितां म्हणून मुळींच करीत नाहीं ! घरदार, अन्नवस्त्र किंवा आश्रय नसला म्हणजे कशी दशा होते, याचा मला अनुभव आला असल्यामुळें, तशी कोणाची दुःस्थिति दृष्टीस पडली म्हणजे, त्याचें दुःख शक्य तितकें दूर केल्यावांचून माझ्यानें रहावतच नाहीं ! आपल्या हातून उन्मत्त धनिकांना शासन मिळालें आणि निराश्रितांचे कष्ट अंशतः

तरी कमी झाले, म्हणजे माझ्या मनाला एक प्रकारचा संतोष वाटतो, आणि तेवढ्यावरच मी खुष असतों ! ”

कल्याणसिंह—“ पण सगळेच धनिक उन्मत्त असतात काय ? उन्मत्ताबरोबरच कांहीं निरपराधी विनीत धनिकांनाहि तुमच्यापासून उपद्रव होत असेल, त्याची वाट काय ? ”

दस्यु सरदार—“ त्याला उपाय नाहीं ! माझ्या आटोक्यांत येणारा धनिक उन्मत्त आहे कीं विनित आहे, हें अगोदरच समजण्याचें साधन जोंपर्यंत मजपाशीं नाहीं, तोंपर्यंत अशा गोष्टी घडणें अपरिहार्य आहे ! ”

कल्याणसिंह—“ मग असला अनिश्चित वाममार्ग स्वीकारण्यापेक्षां तुम्ही आपल्या मातुश्रीच्या आज्ञेप्रमाणें श्वशुरगृहीं कां गेलां नाहीं ? आपली सासुरवाडी कोणत्या गांवीं आहे ? ”

दस्यु सरदार—“ गोष्ठविहारचे राजे गोपीकृष्णराय हे माझे श्वशुर सुशिल आहेत ! त्यांची कन्या कल्याणकुमारी ही माझी पत्नी. माझा विवाह होऊन सात वर्षें झालीं; पण विवाहानंतर आजपर्यंत एकदांहि मी गोष्ठविहारला गेलों नाहीं. माझ्या पत्नीचें व माझें नुसतें दर्शन देखील झालें नाहीं. आतां तर मी असा निराश्रित दरिद्री झालों आहें ! अशा स्थितींत गोष्ठविहारच्या राजाच्या घरीं जाणें लाजिरवाणें नाहीं का ? मी अशा हीन वेषानें तेथें गेलों तर मला माझे श्रीमान श्वशुर व माझी सुशिक्षित पत्नी नुसती ओळखणार देखील नाहीं ! मग समजून उमजून अपमान करून घेण्यांत काय अर्थ ? ”

दस्यु सरदाराचें हें भाषण ऐकतांच कल्याणसिंह एकाएकी चकित होऊन निस्तब्ध झाले. त्यांचा कंठ भरून आला. कांहीं वेळ त्यांच्या तोंडून शब्दहि फुटेना व दस्यु सरदाराकडे दृष्टि वर करून पहावेनाहि !

बऱ्याच वेळानें कल्याणसिंह रुद्ध स्वरानें म्हणाला, “ तुम्ही तरी आपल्या श्वशुरांना किंवा आपल्या पत्नीला ओळखूं शकाल काय ? ”

दस्यु सरदार—“ गोपीकृष्णरायांना मी खचित ओळखीन ! पण कल्याणकुमारीला विवाहसमयीं एक दोनदांच काय तें लज्जावनत दृष्टीनें ओझरतें पाहिलें असल्यामुळें तिला कदाचित ओळखितां येणार नाहीं ! ”

कल्याणसिंह—“ तुम्ही गोष्ठविहारास गेलां असतां तर, तुमच्या

श्वशुरांनीं, निदान तुमच्या पत्नीनें तरी तुमचा योग्य परामर्ष घेतला नसता काय ! ”

दस्यु सरदार—“ अशा हीन स्थितींत तिनें माझा सत्कार केला असता, असें मला वाटलें नाहीं ! कारण, ती सुशिक्षित व शहाणी, तर मी अशिक्षित मूर्ख ! ती राजप्रासादांत वास करणारी विलासवती राजकन्या, तर मी रानोमाळ भटकणारा भणंगभिकारी ! ती सुकुमार लावण्यवती, तर मी कठोर व क्रूर राक्षस ! याप्रमाणें तिच्या–माझ्यामध्यें जमीनअस्मानाचें-अंतर पडलें असतां, माझ्याविषयीं तिच्या अंत:करणांत प्रेम किंवा आदर उत्पन्न होणें अगदींच अशक्य ! ”

कल्याणसिंहाचे नेत्र पुन: अश्रुसंयोगानें तेजस्वी दिसूं लागले. तो गद्गदस्वरानें ह्मणाला—“ महाशय, आपल्या समजुतींत ही मोठिच चूक झाली ! आर्य स्त्रियांना पति हीच मुख्य देवता ! पति हेंच ऐहिक व पारलौकिक सुखसाधन ! पति हाच परमार्थ ! खरी आर्यमहिला आपल्या पतीच्या अंगचे दोष आपल्या प्रेमळ वर्तनानें दूर करण्याचा प्रयत्न करील ! पति कसाहि असला तरी त्याचा तिरस्कार करण्याची कल्पना साध्वी पत्नीच्या स्वप्नांतहि कधीं येणार नाहीं ! आपण हा नीच व्यवसाय सोडून गोष्ठविहारास जाल तर, माझ्या ह्मणण्याची सत्यता आपल्या अनुभवास येईल ! ”

“ आपल्या हातून जिवंत सुटल्यावर पुढचा विचार ! ” दस्यु सरदार स्मितपूर्वक उद्गारला.

कल्याणसिंह—“ आतां आपल्याला लेशमात्रहि भीति बाळगण्याचें कारण नाहीं ! आपल्या ह्या परिचयावरून आपण आमचे कुटुंबी आहां! ईश्वराची कृपा, ह्मणूनच आज स्वजन हत्येचें महापातक आमच्या सैनिकांच्या हातून घडलें नाहीं ! ”

“ म्हणजे ? ” दस्यु सरदार चकित स्वरानें म्हणाला—“आपण गोपीकृष्णरायांचे आप्त आहां काय ? ह्या नौका कोणाच्या ? आणि इकडे कोणीकडे चालल्या आहेत ? ”

कल्याणसिंह अडखळत म्हणाला हो–समजा, कीं, “गोपीकृष्णराय हे माझे मामा आहेत. नबाबाच्या हुकमावरून ते मुरशिदाबादेस गेले

आहेत, आणि मी खंडणीच्या बाकीची रकम घेऊन तिकडेच चाललों आहें! ही रकम त्यांना वेळेवर पोंचली नाहीं तर, त्यांच्यावर भयंकर अत्याचार होईल!"

"अरेरे!" दस्यु सरदार खिन्न स्वरानें उद्गारला—"आज माझ्या हातून केवढा अनर्थ होणार होता! ईश्वरानें आज मला अपयश देऊन मजवर मोठाच उपकार केला! आपल्या सदुपदेशानें आज माझे डोळे उघडले! यापुढें असलें अन्यायाचें पापकर्म माझ्या हातून कधींहि होणार नाहीं! मीं हा नीच व्यवसाय आजपासून अजीबात सोडून दिला! शिव शिव!"

कल्याणसिंह—"तर मग आपण आतां गोष्ठविहारास जाणार ना? मी आपल्याबरोबर एक मनुष्य देतों!".

दस्यु सरदार—"छे छ! मी एकटा जाणार नाहीं! आपल्याबरोबर मला मुराशीदाबादेस न्यावें! अहाहा! मला कोणी आप्त नाहीं, जगांत माझें असें कांहीं नाहीं असा जो आतांपर्यंत माझा समज होता, तो आतां एकदम नष्ट झाला! आपल्या अल्पसहवासानें मला आपण माझे आत्मीय स्वजन वाटूं लागलां आहां! किंबहुना, हें संपूर्ण विश्व मला माझ्या कुटुंबाप्रमाणें भासूं लागलें आहे! सत्संगतीचा महिमा अगाध खरा!"

कल्याणसिंह—"आपलें अंतःकरण शुद्ध झालेलें पाहून मला फार आनंद होत आहे! पण आपल्याला मुरशिदाबादेस नेता येणें शक्य नाहीं, हें कळविण्यास मला दिलगिरी वाटते! शिवाय आह्मांला तेथें किती दिवस लागतील याचाहि नियम नाहीं. त्याचप्रमाणें ज्या ठिकाणीं आपली इतकी दुर्दशा झाली, त्या मुरशिदाबादेस पुनः जाणें आपल्यालाहि बरें वाटणार नाहीं!"

दस्यु सरदार—"तर मग आपल्याला वाटेल तशी माझी व्यवस्था करावी! मात्र मी एकटा कांहीं गोष्ठविहारास जाणार नाहीं! पाहिजे तर मला आपल्या नौकेवरच ठेवून घ्यावें!"

कल्याणसिंह कांहीं वेळ विचार करून म्हणाला—"आपण तुर्त येथेंच उतरून आपल्या ठिकाणीं जावें. इतउत्तरं चोरीचा नीच व्यव-

साय आपल्या हातून होणार नाहीं अशी माझी खात्री आहे ! तथापि दीनदुबळ्यांना यथाशक्ति साह्य करण्याचें आपलें व्रत तसेंच चालूं द्या ! आपल्या टोळींतील सर्व साथीदारांनाहि सन्मार्गाला लावणें हें आपलें कर्तव्य आहे. यथासाध्य परोपकार पण तो नीतिमार्गानें करीत रहाण्याचा सर्वांनीं प्रयत्न करावा ! ”

दस्यु सरदार—“ आपली आज्ञा शिरसामान्य ! माझें क्षुद्र जीवन मीं आपल्या चरणीं अर्पण केलें आहे ! त्याजवर आतां माझा यत्किंचितहि अधिकार नाहीं ! आपल्या आज्ञेप्रमाणें दीनांची सेवा करण्यांत मी व माझे साथीदार कालक्षेप करूं ! आपण परत जातांना मला आपल्या-बरोबर गोष्ठविहारास घेऊन जावें ! ज्या ठिकाणीं आपल्या नौकेवर आम्हीं हल्ला केला, त्याच ठिकाणीं गंगातीरीं आमची वस्ती आहे ! तेथें कालीमातेचें एक प्राचीन मंदिर आहे त्यावरून आम्हीं त्या स्थानाला कालीपूर असें नांव दिलें आहे ! त्या ठिकाणीं कालीमातेच्या मंदिरांत मी रात्रंदिवस आपली मार्गप्रतीक्षा करीत राहीन ! ”

कल्याणसिंह—“ ठीक आहे ! परत जातांना मी येथें येऊन आपणाला घेऊन जाईन ! ”

कल्याणसिंहाच्या आज्ञेप्रमाणें नाविकांनीं नौका तीराला लाविली. नंतर दस्यु सरदार व त्याचे सहायक यांना शृंखलामुक्त करून तीरावर उतरविण्यांत आलें. परस्परांचा निरोप घेतल्यावर दस्यु सरदार आपल्या लोकांसह जंगलांत निघून गेला व कल्याणसिंहाच्या दोन्ही नौका मुरशिदाबादेकडे चालूं झाल्या. हातीं आलेल्या चोरांना कांहींच शासन न करितां सोडून दिलेलें पाहून कल्याणसिंहाच्या सैनिकांना फार आश्चर्य वाटलें आणि आपल्या मालकाच्या फाजील दयाळूपणाबद्दल थोडासा विषादहि वाटला. पण दस्यु सरदार हे गोपीकृष्णरायांचे जामात नीलकंठराय आहेत, सामान्य दरोडेखोर नव्हेत, असें रघुवीरसिंगाकडून कळल्यावर सर्वांचेंच समाधान झालें. उपाध्याय शिरोमणि ठाकूर यांना ही हकीकत कळल्यावर त्यांनाहि फार आनंद झाला, आणि त्यांनीं हंसत हंसत कल्याणसिंहाची खूप थट्टा केली.

कुमार नीलकंठराय यांच्या अकल्पित भेटीनें व परिचयानें कल्याणसिंहाला जो अवर्णनीय आनंद झाला त्याचें खरें कारण मात्र त्याच्याशिवाय व शिरोमणिमहाशयाशिवाय दुसऱ्या कोणालाही कळणें शक्य नव्हतें.

---

## प्रकरण ३ रें.



### फूलवाली.



प्रभातकालीन रम्य वेळीं कल्याणसिंहाच्या दोन्ही नौका मुरशिदाबादेपासून एक कोसावर असलेल्या गंगातीरस्थ एका लहानशा खेड्यासन्निध येऊन सुखरूप पोंचल्या. येथें प्रातर्विधि आटोपून मग मुरशिदाबादेस जावयाचें, असा कल्याणसिंह व शिरोमणि ठाकूर यांचा विचार ठरला. त्यांच्या सूचनेप्रमाणें नाविकांनीं नौका तीरास लावून एकमेकींस सांगडून तीरस्थ वृक्षास बांधून टाकिल्या. सर्व मंडळी प्रातर्विधि आटोपण्याकरितां खालीं उतरली. शिरोमणिमहाशय स्नानसंध्यादि नित्यकर्म साधनाकरितां जवळच्या छोट्या घांटावर गेले. कल्याणसिंहही गंगाकिनाऱ्यानें सृष्टिशोभा अवलोकन करीत फिरूं लागला. उदयाचलावर येणाऱ्या सूर्यनारायणाच्या सुवर्णमय किरणांनीं दशदिशा प्रकाशमय होऊन गेल्या होत्या. गंगातीरस्थ वृक्षराजींतून असंख्य पक्षिसमुदाय आपल्या किलकिलाटानें सूर्यनारायणाचीं व गंगामातेचीं स्तुतिस्तोत्रें गात होते. नवप्रस्फुटित वन्य कुसुमांचा मधुर परिमल, मंद समीरण दशदिशांनीं वाहून नेत होता. जवळच्या खेड्यांतील उद्यमशील स्त्री-पुरुषांची स्नानाकारितां घांटावर बरीच गर्दी झाली होती. हा सर्व रमणीय देखावा पाहून कल्याणसिंहाचें अंतःकरण उल्हासयुक्त झालें.

इतक्यांत एक मेणा गंगातीरीं एका वृक्षाखालीं येऊन उतरला. वाहक भोइ मेणा खालीं ठेवून कांहीं अंतरावर जाऊन दुसऱ्या एका

झाडाखालीं बसून तंबाकूच्या तयारीस लागले. मेण्याबरोबरचा घोडेस्वार चटकन घोड्यावरून उतरून लगाम हातांत धरून मेण्याजवळ येऊन उभा राहिला. मेणा उतरण्याच्या धक्क्यानें आंत निद्रित असलेला पोक्त वयाचा गृहस्थ जागा होऊन उठून बसला आणि जांभया देत म्हणाला, " कारे, येथें कां उतरलां ? "

घोडेस्वार—" आपण ठरविल्याप्रमाणें हा सुवर्ण घांट आला ! "

" होय का ! " असें म्हणून मेण्यांतील गृहस्थ चटकन् उठून बाहेर आला व मेण्यांतून एक लोटा काढून घेऊन घांटाकडे निघाला. त्याच्या-बरोबरचा गृहस्थही जवळच्या एका झाडाला घोड्याची काढणी गुंतवून त्या वयोवृद्ध गृहस्थाबरोबर चालता झाला.

भोईलोक ज्या झाडाखालीं तंबाकू ओढीत बसले होते, त्या झाडाकडे कल्याणसिंह हळू हळू आला. त्याला पाहतांच ते भोई अदबीनें उठून उभे राहिले. कल्याणसिंहाचा उंची पेहराव, सतेज मुद्रा व पाणीदार दृष्टि पाहून, हा कोणी तरी राजपुत्र असावा, अशी त्या भोयांची समजूत होऊन, त्यांनीं कल्याणसिंहाला लवून मुजरा केला.

कल्याणसिंह स्मितपूर्वक मृदु स्वरानें म्हणाला—" चालूं द्या ! मला पाहून कां उठलां ? मी कांहीं तुमचा धनी नव्हे ! "

भोई—" छे छे, सरकार, आपल्यासारखे थोर गृहस्थ कोणीही असले तरी आम्हां गरीबांचे धनीच आहेत ! "

कल्याणसिंह—" बरें, हे मेण्यांतून आलेले गृहस्थ कोण ? "

भोई—" ते कृष्णनगरच्या राजाचे दिवाणसाहेब आहेत ! खंडणीच्या बाकीकरितां कृष्णनगरच्या महाराजांना मुरशिदाबादेस नेलें आहे, त्यांना रकम पोंचविण्याकारितां हे मुरशिदाबादेस चालले आहेत. त्यांच्याबरोबर घोड्यावरून आलेले गृहस्थ त्यांचे नायब मदतनीस आहेत ! "

" बरें तर, तुमच्या तंबाखूंत व्यत्यय नको ! " असें म्हणून कल्याण-सिंह त्यांचा निरोप घेऊन तेथून निघाला व जेथें मेणा उतरला होता, तेथें आला. तों दिवाणजी व त्यांचे नायब गंगेकडून तेथें आले. त्या वेळीं त्यांचें भाषण कल्याणसिंहाच्या कानीं आलें.

दिवाणजी—" काय हें नायब ! अहो, महाराज इकडे रेशाखाना

त्या बंदींत हालअपेष्टा सोशीत पडले आहेत! अद्यापि एक लक्ष रुपये खंडणी भरावयाची आहे! त्यापैकीं मीं दहा हजार रुपये आणिले आहेत, आणि तुम्ही सारे पांच हजारच आणिले! एवढ्यानें होणार काय? ह्यापैकीं निमी रकम तरी नवाबाचे अत्याचार बंद करण्याकरितां, रेहाखानांस चिरीमिरी म्हणून द्यावी लागणार! अशानें खंडणीची भरती होणार कधीं? ह्या वेळीं न्याय अन्याय, धर्म अधर्म किंवा प्रजेच्या सोई गैरसोई पाहून कसें चालेल? वाटेल त्या रीतीनें रकम गोळा करून महाराजांची मुक्तता करणें भाग आहे!"

नायब—"काय सांगूं महाराज? एवढी रकम जमविण्यास मला प्रजेवर किती जुलूम करावा लागला, हें माझें मलाच माहीत! ती स्थिति नुसती ऐकून देखील आपल्या अंगावर शहारे येतील!"

दिवाण—"तें सारें खरें! पण महाराजांच्या संरक्षणाकरितां आपल्याला ह्या वेळीं कठोर अंतःकरण केलेंच पाहिजे. त्यावांचून गत्यंतर नाहीं!"

नायब—"आतां पैसा जमविण्याकरितां लोकांच्या आयाबहिणी आणि बायकामुलीच लिलांव केल्या पाहिजेत!"

दिवाण—"तें कांहीं ऐकून घेण्याची सोय नाहीं! चला आतां परत! मी सर्व रकम घेऊन मुराशीदाबादेस जातों! तुम्ही मात्र शक्य तितकी लवकर रकम जमवून आणण्याची तजवीज करा! तरच महाराजांचा बचाव होणार आहे!"

दिवाणजींचा निरोप घेऊन नायब घोड्यावर आरूढ होऊन वायुवेगानें चालते झाले! वरील भाषण ऐकून कल्याणसिंहाचें मन अत्यंत उद्विग्न झालें. "हर हर! काय प्रसंग हा!" असे दुःखोद्गार न कळत त्याच्या तोंडून बाहेर पडले.

कल्याणसिंहाचे उद्गार ऐकून दिवाणजींनीं त्याच्याकडे पाहिलें. त्याचा उंची पोषाख व सुंदर आणि पाणीदार स्वरूप पाहून दिवाणजींना कौतुक वाटलें. तो कल्याणसिंहाजवळ येऊन मृदुस्वरानें म्हणाले—"तरुणा, तूं कोण? इकडे कोणीकडे चालला आहेस?"

कल्याणसिंह--" महाराज, मला कल्याणसिंह म्हणतात. मी गोष्ठ-विहाराहून आलों, आणि मुरशिदाबादेस जात आहे. "

दिवाणजी—" मुरशिदाबादेस ? कशाला जात आहांत ? "

कल्याणसिंह—" गोष्ठविहारचे राजे गोपीकृष्णराय खंडणीच्या बाकी-करितां तेथें प्रतिबंधांत आहेत. मी कांहीं रकम घेऊन आलों आहें, ती भरणा करून त्यांना सोडविण्याची खटपट करणार आहें ! त्या झाडाला बांधलेल्या दोन नौका आमच्या आहेत. "

" अरेरे ! " दिवाणजी खिन्न स्वरानें उद्गारले—" गोपीकृष्णरायही त्याच संकटांत आहेत तर ? युवका, बंगालच्या राजे व जमीनदार लोकां-वर सध्यां मुराशिदाबादेस काय अमानुष अत्याचार होत आहेत, याची तुला कल्पनाही नसेल! त्या राक्षसी अत्याचारांतून जिवंत सुटणें म्हणजे पुनर्जन्मच ! तुम्ही जितके लवकर मुरशिदाबादेस जाल, तितकें तुमच्या राजाच्या हिताचें आहे ! खंडणीची संपूर्ण बाकी देतां आली नाहीं तरी हरकत नाहीं ! थोडीशी रकम त्या राक्षसांच्या तोंडावर टाकली, म्हणजे त्यांचा जठराग्नि अंशतः शांत होऊन कांहीं दिवस तरी सवलत मिळेल ! "

कांहीं काळ अंशतः विस्मृत झालेली घोर चिंता कल्याणसिंहाच्या अंतःकरणांत पुनः जागृत झाली. त्याचे डोळे अश्रूंनीं भरून आले. तो रुद्ध स्वरानें दिवाणजींस म्हणाला—" महाराज, मी मुरशिदाबादेस कधीं गेलों नाहीं ! तेथें माझी कोणाशीं ओळखही नाहीं ! आणि नबाबसाहे-बांच्या दरबारचीही मला कांहीं माहिती नाहीं ! तेथें कोणास भेटावें, कोणास नजर नजराणे द्यावे, कोणाच्याद्वारें दरबारांत प्रवेश करून घ्यावा, राजेसाहेबांची मुक्तता करण्यास काय काय इलाज करावे, इत्यादि गोष्टी मला आपण कृपा करून समजून सांगाल तर मजवर अत्यंत उपकार होतील ! "

दिवाणजी—" ठीक आहे. मी तुला तें सर्व सांगेन. कांहीं काळजी करूं नको ! पण येथें बोलत बसण्यास सवड नाहीं. मीही मुरशिदाबादे-सच जात आहें. तुझें व माझें काम एकाच प्रकारचें आहे. तेथें सदर घाटावर कृष्णनगरच्या राजाच्या वाड्यांत ये, म्हणजे माझी गांठ पडेल. मग आपण पुढील विचार ठरवूं. "

इतक्यांत दिवाणजींचे लोक नौका तयार करून घेऊन आले. दिवाणजी नौकेंत जाऊन बसले. कल्याणसिंह त्यांचा निरोप घेऊन आपल्या नौकांकडे आला. दिवाणजींची नौका मुरशिदाबादेकडे रवाना झाली.

लवकरच शिरोमणि ठाकूर आपलें आन्हिक आटोपून तेथें आले. कल्याणसिंहानें त्यांना कृष्णनगरच्या दिवाणजींच्या भेटीची सर्व हकीगत सांगितली. नंतर त्यांचीही निघण्याची तयारी होऊन, कल्याणसिंह आपल्या सर्व मंडळीसह मुरशिदाबादेकडे जाण्यास निघाला.

दोन प्रहरच्या सुमारास कल्याणसिंहाच्या नौका मुरशिदाबादच्या घांटावर येऊन दाखल झाल्या. कल्याणसिंह व शिरोमणि ठाकूर खालीं उतरले शिरोमणि ठाकूर पूर्वी एकवार गोपीकृष्णरायांबरोबर मुरशिदाबादेस आले असल्यामुळें, त्यांना गोष्ठविहारच्या राजाचा तेथील वाडा माहीत होता. नौकांतील सर्व सामान नोकर लोकांना घेऊन येण्यास ताकीद करून, कल्याणसिंह ठाकूर महाशयांसह वाड्याकडे चालते झाले.

नबाब मुरशिदकुलीखान यांनीं मुरशिदाबाद शहर नवीन वसविलें त्या वेळीं, नबाबाच्या हुकमावरुन, बंगल्यांतील सर्व संस्थानिकांनीं तेथें एकेक वाडा बांधून ठेविला होता. तेथें जरूरी पुरते नोकर व एक वरिष्ठ प्रतीचा वहिवाटदार नेमिलेला असे. ह्या वहिवाटदारास मुखत्यार ह्मणत असत. संस्थानिकांचें दरबाराशीं चालणारें सर्व कामकाज ह्या मुखत्यारामार्फत चालत असे.

वाड्यांत येतांच कल्याणसिंहाला अशी हकीगत समजली, कीं, गोपीकृष्णराय इतके दिवस आपल्या वाड्यांतच महमद रेझाखानाचे नजरकैदेंत होते; पण दोन दिवसांपूर्वी त्यांना रेझाखानाच्या हुकमावरून तुरुंगांत पोंचविण्यांत आलें. हें भयंकर वर्तमान कानीं पडतांच कल्याणसिंह भयभीत व हतबुद्ध होऊन गेला. पुढें काय करावें हें त्याला सुचेना. तुरुंगांतील भीषण अत्याचारांचें त्यानें ऐकलेलें स्वरूप त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. राजांची भेट घेण्यास आणि त्यांची कारागृहांतून मुक्तता करण्यास काय इलाज करावा हें समजून घेण्याकरितां, कल्याणसिंहानें मुखत्यारास बोलावणें पाठविलें.

कांहीं वेळानें मुखत्यार दिवाणखान्यांत आला व कल्याणसिंहास नम्र-

पर्णे प्रणाम करून अदबीनें उभा राहिला. त्याच्याकडे खिन्न दृष्टीनें पहात कल्याणसिंह म्हणाला--" मुखत्यार, महाराजांना कारागृहांत नेलें आहे असें ऐकलें! त्यांची भेट कशी होणार? त्यांची मुक्तता कशी करावयाची? तुम्ही याबद्दल कांहीं विचार केला आहे कां?"

मुखत्यार विनीत स्वरानें म्हणाला—" सरकार, रेझाखानापुढें कांहीं उपाय चालणें शक्य नाहीं! कारण, खंडणीची बाकी भागविल्यावांचून ते कोणतीही गोष्ट ऐकत नाहींत! रकमेची तजवीज झाली आहे कां?"

कल्याणसिंह--" होय! जमली तितकी रकम आणिली आहे! पण तेवढ्यानें खंडणीची बाकी चुकती होणें शक्य नाहीं।"

मुखत्यार--" एक पैसा बाकी राहिली तरी रेझाखान हे महाराजांना सोडणार नाहींत!"

कल्याणसिंह—" कांहीं नजर नजराणा दिला तर भागणार नाहीं कां?"

मुखत्यार---" नुसत्या नजराण्यानें रेझाखानाचा संतोष होणार नाहीं! खंडणीचा कांहीं अंश देऊन, मग नजराणा दिला तर, काहीं तरी होईल!"

कल्याणसिंह—" तसें केलें तर महाराजांची मुक्तता तरी होईल कां?"

मुखत्यार--" छे, बाकी चुकती झाल्याशिवाय सुटकेचें तर नांवच नको! पण त्यांच्यावर होणारे अमानुष अत्याचार मात्र कांहीं काळ तहकूब होतील!"

कल्याणसिंह--" काय! नजराण्याचा एवढाच का उपयोग?"

मुखत्यार—" होय महाराज! पण सरकार जोंपर्यंत आपल्या वाड्यांतच नजर कैदेंत होते, तोंपर्यंत जर खंडणीची कांहीं रकम आणि नजराणा पोंचला असता, तर येथून त्यांना कारागृहांत जावें लागलें नसतें! पण आतां मात्र सर्व बाकी चुकती झाल्याशिवाय बंदींतून मुक्तता होण्याची आशा नाहीं!"

कल्याणसिंहाचें अंतःकरण अत्यंत विव्हळ झालें, त्याच्या तोंडून दुःखपूर्ण निःश्वास बाहेर पडला, आणि त्याचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. कांहीं वेळ विचार करून तो खिन्न स्वरानें म्हणाला—" महाराजांचे कष्ट शक्य तितके कमी करणें अवश्य आहे! त्याकरितां आम्ही आणिलेल्या रकमे-

पैकीं कांहीं खंडणीबद्दल व कांहीं नजराणा म्हणून रेशाखानाकडे पोंचविली पाहिजे! बरें; पण नजराणा तरी किती द्यावा लागेल?"

मुखत्यार—"त्याचें कांहीं प्रमाण नाहीं! तथापि खानसाहेब दहा हजारांच्या खालीं मात्र नजराणा कधींच स्वीकारीत नाहीं!"

"काय म्हणता!" कल्याणसिंह दचकून चकित स्वरानें उद्गारला—"अहो, ज्या संस्थानिकांना पैशाकरितां कारागृहांत कोंडण्यांत आलें आहे, ज्यांना पैशाच्या पायीं पशुतुल्य अत्याचार सहन करावे लागत आहेत, त्यांच्याकडून इतका भयंकर नजराणा घेणें योग्य आहे काय! हाय हाय! जयदुर्गे, कालीमाते, तुझी लीला विचित्र आहे!"

मुखत्यार—"महाराज, आपण गोष्ठविहारचे युवराज नसलां तरी सरकारचे आत्मीय स्वजन तरी खचित आहां! म्हणूनच आपल्याला महाराजांबद्दल इतकी कळकळ वाटत आहे! त्या अर्थी आपणही आमचे प्रभूच आहां! म्हणून मी आपल्याला नम्रपणें एक विनंति करितों कीं, हें मुसलमानी राज्य आहे, येथें न्याय अन्याय कांहीं नाहीं, आपला स्वभाव न्यायप्रिय व पाणीदार असल्यामुळें, येथील अव्यवस्था पाहून आपल्याला राग येणें साहजिक आहे; पण तो मनोविकार मुखावाटें प्रगट करण्याची येथें बिलकूल सोय नाहीं! आपले असे कांहीं उद्गार कोणाच्या कानावर गेले तर महा अनर्थ ओढवेल! यासाठीं येथें फार जपून वागलें पाहिजे. स्पष्ट विनंतीबद्दल राग नसावा!"

वृद्ध मुखत्याराची सूचना कल्याणसिंहाच्याही मनाला तत्काळ पटली. तो स्मितपूर्वक म्हणाला—"ठीक आहे. तुमची सूचना योग्य आहे! बरें; पण रेशाखानाकडे जाऊन सर्व तजवीज तुम्ही केव्हां करणार?"

मुखत्यार—"आजची वेळ गेली! आतां उद्यां सर्व तजवीज करूं! रेशाखान रोज सकाळीं दरबारास येतात, त्या वेळीं काय तीं सर्व कामें पाहतात. पुनः दिवसभर त्यांची भेट होत नाहीं!"

"ठीक आहे!" असें म्हणून कल्याणसिंहानें मुखत्यारास निरोप दिला, व पुढें काय काय करावयाचें याचा विचार करण्यांतच त्यानें एकांतांत सर्व दिवस घालविला.

सायंकाळच्या वेळीं कल्याणसिंह दरबारी पेहराव करून, एकटाच

वाड्यांतून बाहेर पडला. त्याच्या डोकीवरील जरीकांठी रेशमी तलम फेटा, अंगांतील पायघोळ अंगरखा, तंग तुमान, कमरेस कसलेला गुलाबी शेला, पायांत दिल्लीशाही चढाव व हातांत रंगीत छडी, असा त्याचा पोषाख त्याच्या सुंदर स्वरूपाला फारच खुलून दिसत होता.

सायंकाळच्या अस्तोन्मुख सूर्याचे कोमल सोनेरी किरण मुरशिदाबादच्या उत्तुंगसौधशिखरांवर चमकत होते, गंगाप्रवाहावरून गार वारा सुटला होता, तथापि शहरचे प्रशस्त रस्ते स्वच्छ असल्यामुळें, धुरळा बिलकूल उडत नव्हता. श्रीमान् अमीर-उमरावांच्या हवेल्यांपुढील सुंदर बगीच्यांतून नवविकसित निशिगंधादि सुवासिक पुष्पाचा मधुर सुगंध चोहोंकडे दरवळून राहिला होता. सुनील आकाशांत अरुण मेघखंड मंदगतीनें इतस्ततः संचार करीत होते. चैनी लक्ष्मीपुत्र सहल करण्याकरितां आपापल्या वाड्यांतून बाहेर पडत होते, आणि गरीब शेतकरी व दरिद्री कामकरी दिवसभर उन्हा-तान्हांत काबाडकष्ट केल्यामुळें थकून-भागून आपापल्या झोंपड्यांकडे परत येत होते. राजवाड्याच्या उच्च नगारखान्यावर झडणाऱ्या चौघड्याचा व नौबतीचा गंभीर ध्वनि प्रत्येकाच्या अंतःकरणास नबाबसाहेबांच्या अमलाचें स्मरण देत होता. बाजारांत व्यापाराची अगदीं घनचक्कर उडाली होती. ह्याप्रमाणें शहरांत जिकडे तिकडे चळवळ व चांचल्या दिसत असतां, कल्याणसिंहाचें अंतःकरण मात्र उदास व स्तब्ध होतें. एवढें विस्तीर्ण व कार्यव्यापृत मुरशिदाबाद शहर; पण कल्याणसिंहाला शून्यवत् भासत होतें.

सदर घांटावरील कृष्णनगरच्या राजाच्या वाड्यांत जाऊन दिवाणजींची भेट घ्यावी व त्यांचाहि सल्ला विचारावा, अशा उद्देशानें कल्याणसिंह आपल्या वाड्यांतून निघाला होता; पण सदर घांट कोणीकडे आहे, हें त्याला मुळींच माहीत नव्हतें. तथापि तो कोठें तरी गंगातीरावरच असला पाहिजे, असा तर्क करून तो गंगप्रवाहाशीं समांतर असणाऱ्या एका प्रशस्त रस्त्यानें निघाला. सायंकाळीं त्या रस्त्यावर किरकोळ चैनीच्या पदार्थांचा मोठा बाजार भरत असल्यामुळें, तेथें लोकांची खूप गर्दी झाली होती. एखादा रिकामा मनुष्य भेटेल व त्याला आपण कृष्णनगरच्या राजवाड्याचा पत्ता विचारूं अशी कल्याण-

सिंहाला आशा वाटत होती. परंतु जो पहावा तो आपल्याच धांदलींत गर्क दिसे. ह्याप्रमाणें बराच वेळ झाला. सायंकाळ होऊन जिकडे तिकडे दिवेहि लागले; तरी कल्याणसिंहाला रिकामा मनुष्य भेटेना आणि त्याला इष्ट असलेला पत्ताहि समजेना. आतां काय करावें, असा तो आपल्याशींच विचार करीत हळुहळू पुढें चालला होता, इतक्यांत एक वृद्ध फूलवाली त्याच्याजवळ येऊन आदरयुक्त स्वरानें ह्मणाली—"साहेब, फुलें घेतां कां? उत्तम सुवासिक ताजीं फुलें आहेत!"

कल्याणसिंहाला फुलांची अपेक्षा नव्हती. कारण, फुलाच्या सुवासाचा आनंद अनुभवण्याच्या स्थितींत त्याचें अंतःकरण नव्हतें. तथापि, उद्दिष्ट कार्य साधण्यास ही संधि ठीक आहे असा विचार करून, कल्याणसिंहानें फूलवालीच्या पाटींतील एक मोतियाचा गजरा उचलून घेतला आणि एक पावली फूलवालीच्या हातीं दिली. कल्याणसिंहाचें हें औदार्य पाहून फूलवाली संतुष्ट दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागली. कल्याणसिंहाचें अप्रतिम स्वरूप व मोहक आणि मनोहर मुद्रा पाहून, फूलवाली चकित झाली.

हा सुंदर तरुण ह्या शहरचा नव्हे हें त्या फूलवालीनें तत्काळ ओळखलें. ती नम्र स्वरानें ह्मणाली—"साहेब, आपण येथील रहिवासी दिसत नाहीं! आपण कोठून आलां? आणि ह्या वेळीं इकडे कोणीकडे एकटेच चाललां आहां?"

कल्याणसिंह—"मी आजच ह्या शहरांत आलों आहे! कृष्णनगरच्या राजवाड्यांत मला जावयाचें आहे! तो वाडा इकडेच आहे ना?"

कल्याणसिंहाचा कोकिळांसहि लाजविणारा मधुर आवाज ऐकून तर फूलवाली अगदीं मुग्ध होऊन गेली. ती स्मितपूर्वक ह्मणाली—"छे छे, महाराज, तो वाडा इकडे नाहीं, सदर घांटावर आहे."

कल्याणसिंह—"सदरघांट कोणीकडे आहे? मला दाखवील का?"

फूलवाली—"माफ करा साहेब, मला बेगममहालांत फुलें द्यावयास जावयाचें आहे! तथापि आपण मजबरोबर तेथवर येण्याची

सनदी घेत असाल, तर मी तेथून परत येतांना आपल्याला तो रस्ता दाखवीन ! "

कल्याणसिंहानें ती गोष्ट मान्य केली, आणि तो फूलवालीबरोबर निघाला. जातांना फूलवाली म्हणाली—" आपलें राहणें कोणत्या देशांत असतें ? "

कल्याणसिंह—" मी गोष्ठविहारचा राहणारा आहें ! "

फूलवाली—" आपल्या पेहेरावावरून आपण हिंदू दिसतां. "

कल्याणसिंह—" हो. मी ब्राह्मण आहें ! "

फूलवाली—" गोष्ठविहाराचे राजपुत्र वाटतें ! "

कल्याणसिंह—" हें तूं कशावरून म्हणतेस ? "

फूलवाली—" असें मनोहर लावण्य राजघराण्यावांचून इतरत्र असणें शक्य नाहीं ! "

कल्याणसिंह हंसून म्हणाला—" तूं नेहमीं याच शहरांत रहात असतेस का ? "

फूलवाली—" होय महाराज ! माझा फूलविक्रीचा धंदा आहे. सर्व मोठमोठ्या अमीरउमरावांच्या वाड्यांत मीच फुलें देत असतें ! आपण येथें कोणत्या वाड्यांत उतरलां आहां ? "

कल्याणसिंह—" गोष्ठविहाराच्या राजवाड्यांत ! " बरें, पण तूं जातीची मुसलमानीन आहेस का ? "

फूलवाली—" छे छे, साहेब, मी अस्सल हिंदू आहें ! "

कल्याणसिंह—" तर मग, हिंदुद्वेष्ट्या मुसलमान बेगमसाहेबांच्या वाड्यांत तुझीं फुलें कशीं खपतात ? "

फूलवाली—" फुलांचे हार, तुरे, गजरे, पंखे, वेण्या इत्यादि जिन्नस माझ्यासारखे कोणत्याहि मुसलमान फूलवालीला बनवितां येत नाहींत. माझी कारागिरी बेगमसाहेबांना फार पसंत पडल्यामुळें, त्यांचा मला आश्रय मिळाला आहे ! "

कल्याणसिंह—" ह्या बेगमसाहेब कोण ? "

फूलवाली—" सैय्यद महमद रेझाखानांच्या आवडत्या बेगमसाहेब !

नबाबसाहेब हे बेगमसाहेबांचे आजोबा असल्यामुळें, त्यांना काय कमी आहे ! "

कल्याणसिंह—" सैयदसाहेबांना एकच बेगम आहे का ? "

फूलवाली—" तें कां ? चार बेगमा आहेत ! चौघींचे चार निरनिराळे महाल आहेत. नबाबसरकारची आवडती नात नेफिसाबेगम यांच्याशीं सैयदसाहेबांनीं निका केला, तेव्हांच त्यांना दिवाणगिरी मिळाली ! पण त्यांचें खरें प्रेम मात्र फतिमाबेगमवर आहे ! "

कल्याणसिंह—" मग, ही गोष्ट नेफिसाबेगमला व नबाबसाहेबांना कशी खपते ? "

फूलवाली—" खपते कशाची ? नेफिसाबेगम रात्रंदिवस विरहव्यथेनें झुरत असतात ! त्या प्रेमाच्या अत्यंत भुकेल्या आहेत ! वयानें तरुण असून स्वरूपानें अप्रतिम सुंदर आहेत ! त्याचप्रमाणें स्वभावानें फार कोमल आहेत ! पण सैयदसाहेबांचें त्यांच्याकडे लक्षच नाहीं ! मला त्यांची फार कींव येते ! मजवर त्यांचा अतिशय विश्वास आहे ! "

कल्याणसिंह—" जाऊं द्या ! थोरांच्या घरच्या गोष्टींची पंचाईत आपल्याला कशाला हवी ! बरें, पण तूं राहतेस कोठें ? "

फूलवाली—" मी महाजन मोहल्ल्यांत रहात असतें ! गोष्ठविहारचा राजवाडा मला ठाऊक आहे ! आपल्याला फुलांची आवड असेल तर मी आपल्या वाड्यांत फुलें घेऊन येत जाईन ! "

कल्याणसिंह—" ठीक आहे ! मला फुलांची जरूर लागेल तेव्हां मी तुझ्याकडूनच फुलें घेत जाईन ! "

फूलवाली—" बरें तर, मी केव्हां केव्हां आपल्या वाड्यांत येऊन आपल्याला भेटत जाईन ! परवानगी आहे ना ? "

कल्याणसिंह—" कांहीं हरकत नाहीं; खुशाल येत जा ! "

बोलत बोलत दोघेहि एका चौकांत आलें. तेव्हां फूलवाली कल्याणसिंहाला म्हणाली, " सरकार, बेगमसाहेबांच्या महालांतून परत यावयास मला कदाचित् रात्र होईल. यासाठीं येथूनच मी आपल्याला रस्ता दाखवितें ! ह्या डाव्या हाताच्या मोठ्या रस्त्यानें सरळ चला. पुढें एक सोनचांफ्याचें झाड आहे. त्या झाडासमोर एक आडवा रस्ता जातो.

त्या रस्त्यानें पुढें गेल्यावर एक उत्तरेकडे तोंड करून तांबड्या रंगाचा भव्य दरवाजा उजव्या हातास लागतो, तोंच कृष्णनगरचा राजमहाल ! लक्षांत राहील का ? ”

“ हो हो ! ” असें म्हणून कल्याणसिंह फूलवालीचा निरोप घेऊन तिनें निर्दिष्ट केलेल्या रस्त्यानें निघाला व फूलवालीहि बेगममहालाकडे चालती झाली.

कृष्णनगरच्या राजमहालांत पोंचल्यावर बाहेर उभ्या असलेल्या सेवकांस “ दिवाणसाहेब आहेत का ? ” असें कल्याणसिंहानें विचारिलें. दिवाणजी आंतील दिवाणखान्यांत एका गालिच्यावर बसलेले असून दुसऱ्या एका गृहस्थाशीं बोलत होते. कल्याणसिंहाचे शब्द कानीं पडतांच “ कोण आहे ? ” असा त्यांनीं आंतूनच प्रश्न केला.

“ मी कल्याणसिंह आहें महाराज ! ” कल्याणसिंहानें बाहेरूनच उत्तर दिलें ! ”

“ या या ! कल्याणसिंह ! ” दिवाणजी दाराजवळ येऊन आदरानें म्हणाले, व त्याला आंत नेऊन त्यांनीं आपल्या शेजारीं गालिच्यावर बसविलें. नंतर म्हणाले, “ कसें काय ? तुमच्या महाराजांकडील काय खबर ? ”

कल्याणसिंह—“ खंडणीची बाकी भरणा करण्याची मुदत पुरी होऊन गेल्यामुळे रेझाखानानें त्यांना कारागृहांत टाकलें ? ”

दिवाण—“ मग पुढें काय ? ”

कल्याण—“ आमचे मुखत्यार म्हणतात कीं, खंडणीच्या बाकीपैकीं कांहीं रकम आणि भरपूर नजराणा दिल्यावांचून कांहीं उपाय चालणार नाहीं ! ”

दिवाण—“ तें खरें आहे ! खंडणीची बाकी एकदम चुकती करितां येणें शक्य नसेल तर, मुखत्यार सांगतात तसें केल्यावांचून गत्यंतर नाहीं ! ”

कल्याणसिंह—“ पण मुखत्यार म्हणतात, रेझाखान दहा हजारांखालीं नजराणा घेतच नाहीं ! आणि इतका नजराणा देऊनसुद्धां मुक्तता प्राप्त होणार नाहीं ! फक्त बाकीचा भरणा करण्यास कांहीं मुदत मिळेल

आणि तेवढ्या मुदतींत तुरुंगांत होणारे अत्याचार बंद राहतील ! पण मुदतींत भरणा झाला नाहीं तर पुनः अमानुष अत्याचार सुरू होणारच!'

दिवाणजी—" होय ! मुखत्याराचें सांगणें अक्षरशः खरें आहे. त्या मुदतीनंतर बाकी राहील तर पुनः थोडी खंडणीची रकम आणि आतां-प्रमाणेंच पुनः नजराणा द्यावा लागणार ! त्याशिवाय महाराजांच्या संरक्षणांस दुसरा इलाजच नाहीं ! "

दिवाणजीचा हा निश्चित अभिप्राय ऐकतांच कल्याणसिंहाचें सुंदर मुखकमल म्लान होऊन गेलें. परंतु लवकरच त्याच्या चेहेऱ्यावर पाणीदार क्षात्र तेज चमकूं लागलें. यवनांविषयींचा द्वेष व नेभळट बंगाली जमनिदारांविषयींचा तिरस्कार त्याच्या तीक्ष्ण दृष्टीमध्यें दृग्गोचर होऊं लागला. त्या वेळची त्याची पाणीदार मुद्रा पाहून वृद्ध दिवाणजीस मोठें कौतुक वाटलें; पण दिवाणजींच्या समोरच एका प्रशस्त गादीवर बसलेल्या तरुणाला मात्र कल्याणसिंहाकडे पाहून भीति वाटूं लागली. हा तरुण, कृष्णनगरचा युवराज कुमार रघुराम होता. त्याला रघुवीर असेंही म्हणत असत.

कृष्णनगरचे राजे रामजीवनराय हे खंडणीच्या बाकीबद्दलच मुराशीदाबादेस रेझाखानच्या कैदेंत होते. त्यांचा पुत्र युवराज रघुराम हा वडिलांची मुक्तता करण्याच्या खटपटीसाठींच आला होता आणि दिवाणजीहि त्याच कामाकरितां कांहीं रकम घेऊन आज आले होते.

कल्याणसिंह एक दीर्घ निश्वास सोडून चटकन् उठून उभा राहिला. तेव्हां दिवाणजी म्हणाले, " कां ? काय विचार ठरला ? "

कल्याणसिंह—" कांहीं नाहीं ! कसला विचार आणि कसचें काय?'

दिवाण—" कल्याणसिंह, तुम्ही नुकतेंच राजकारणांत पाऊल टाकीत आहां, पण ह्या कुटील राजनीतीशीं झगडतां झगडतां माझे काळयाचे पांढरे झाले आहेत ! माझ्यापासून तुम्हांला कोणतीहि भावना छपवितां येणार नाहीं ! पण मी तुम्हांला एवढें सांगतों, कीं, तुम्ही मनांत आणिलेली गोष्ट ह्या वंग देशांत अगदींच असाध्य आहे बारा पुरभय्ये आणि तेरा चुल्हे अशी एक म्हण प्रसिद्ध आहे. ती तुम्हांला माहीत आहे ना ? तशीच स्थिति आह्मां बंगाली जमीनदारांची आहे ! कोणाचा

पायपोस कोणाच्या पायांत नाहीं. तेथें काय होणार ! तथापि तुह्मांला एक सूचना करून ठेवतों, कीं, ही नबाबशाही आहे. तुम्ही यवन राजधानींत आहां ! येथें आपले तेजस्वी मनोविकार अत्यंत गुप्त ठेवले पाहिजेत ! जर कां त्याची यत्किंचित् परिस्फुटता झाली तर प्राणावर बेतेल, हें पक्कें लक्षांत ठेवून नेहमीं सावधगिरीनें वागत चला ! आमच्यामध्यें जर एकी आणि स्वाभिमान असता तर, आपल्या लोकांचे असे अमानुष छळ निमूटपणे सोसण्याचा प्रसंग आह्मांवर कां आला असता ? "

कल्याणसिंह तीव्र स्वरानें म्हणाला, " ह्या क्रूर अत्याचारांना प्रतिरोध करण्यास समर्थ असा एकही तेजस्वी पुरुष बंगाली जमिनदारांत नाहीं का ? जर कोणी असेल तर मी आपली क्षुद्र शक्ति त्याच्या चरणीं अर्पण करण्यास तयार आहे ! "

" हां हां ! कल्याणसिंह ! " दिवाणजी भीत स्वरानें उद्गारले. "असें भलभलतें बडबडूं नको ! ह्या बेसावधपणानें प्राण गमावून बसशील ! सावध रहा ! "

कल्याणसिंह उत्तेजित स्वरानें ह्मणाला, " दिवाणजी, काय बोलतां हें ! ज्या देशांतील सन्मान्य संस्थानिक अत्याचाराच्या आगींत होरपळून निघत आहेत, ज्या देशांतील थोर व्यक्तींना रस्त्यांतील कोल्ह्याकुत्र्यां इतकी देखील किंमत नाहीं, ज्या देशांतील परमपूज्य माता, प्रियभगिनी, धर्मपत्नी यांच्या पातिव्रत्यावर केव्हां घाला पडेल याचा भरंवसा नाहीं, ज्या देशांतील लोकांची धनसंपत्ति त्या विदेशी चोरांच्या चैनीकरितां वाटेल केव्हां लुटली जाते, त्या देशांतील तरुण म्हणविणाऱ्या निर्बल षंढ प्राण्यांनीं जगण्यापेक्षां मरणें काय वाईट ? "

राजकुमार रघुराम इतका वेळ स्तब्ध बसला होता, तो एकदम म्हणाला, " शाबास, कल्याणसिंह, तूं खरा वीरपुरुष आहेस ! "

कल्याणसिंह—" छे छे, महाराज मी वीर कसचा, आणि पुरुष तरी कशाचा ? मी वीर असतों तर माझ्या महाराजांना नबाबाच्या बंदीखान्यांत हाल सोशीत मरूं दिलें असतें काय ? माझ्या अंगीं जर मनुष्यत्व असतें तर, परमपूज्य वडील माणसांवर असे भयंकर अत्याचार होत असलेले निमूट पहात राहिलों असतों काय ? "

दिवाणजी चकितदृष्टीनें कल्याणसिंहाकडे व रघुरामाकडे पहात राहिले. रघुराम मोठा शूर, धाडसी व बुद्धिमान् असल्याबद्दल त्याची ख्याति होती; पण कल्याणसिंहाच्या आवेशापुढें तो अगदीं दिपून गेला आणि पुनः स्तब्ध होऊन बसला.

दिवाणजी त्याच्याकडे निर्देश करून कल्याणसिंहास म्हणाले, " हे आमचे युवराज, राजकुमार रघुराम ! "

कल्याणसिंह—" होय का ? तर मग आपण व मी समदुःखीच आहों ! आपले वडीलही खंडणीच्या बाकीबद्दल रेझाखानच्या बंदींत आहेत म्हणे ! "

रघुराम—" हो ! खंडणीचा भरणा केल्याशिवाय त्यांच्या मुक्ततेला काय इलाज आहे ? "

कल्याणसिंह—" अरेरे ! कृष्णनगरचे महाराज केवढे संस्थानिक ! त्यांचा मानमरातब केवढा ! योग्यता केवढी ! आपल्यासारखा तरुण वीरपुरुष त्यांचा पुत्र ! असें असतां, आपली ही दुर्दशा ! मग आमच्या सारख्यांची कथा काय ? "

रघुराम—" तें सर्व खरें ! पण सांप्रत मोंगल बादशहा सम्राटेश्वर आणि नबाब मुरशिदकुलीखान हे त्यांचे प्रतिनिधी ! त्यांच्या पुढें इतर कोणाची योग्यता आणि मानमरातब काय चालणार ? "

कल्याणसिंह—" आपलें म्हणणें ठीकच आहे ! ज्यांचा जन्म दास्यांत गेला, त्याला वीरत्वाची कल्पना तरी कोठून येणार ? "

कल्याणसिंहाचे हे उद्गार ऐकून रघुराम क्रुद्ध दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागला. आतां येथें अधिक वेळ राहाणें सुरक्षित नाहीं; असा विचार करून कल्याणसिंह त्या उभयतांचा निरोप घेऊन झटकन् निघून गेला.

रघुराम व दिवाणजी परस्पराकडे बराच वेळ पहात राहिले. नंतर रघुराम म्हणाला—" कोंवळा पोर ! त्याला अद्याप दरबारचा व राजकारणाचा कांहींच अनुभव नाहीं ! "

दिवाणजींनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. एक दीर्घ निश्वास सोडून ते तेथून दुसरीकडे मुकाट्यानें चालते झाले.

# प्रकरण ४ थें.



## भीषण दृश्य.



दुसरें दिवशीं सकाळीं कल्याणसिंह आपल्या वाड्यापुढील बगीचांत फिरत असतां, एक शिपायाची टोळी रस्त्यानें जात असलेली त्याच्या दृष्टीस पडली. शिपाई सुमारें पंचवीस तीस होते. इतके शिपाई एकत्र जमून कोणीकडे चालले असावेत हें पाहण्याकरितां, कल्याणसिंह बगीच्याच्या प्राकाराजवळ उभा राहिला. तों त्या शिपायांच्या गराड्यांतून 'दुर्दैवी जमीनदार कैदी' अधोवदन होत्साते हळू हळू चालले आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. बंगालच्या कुलीन व सन्मान्य संस्थानिकांची ही विटंबना पाहतांच कल्याणसिंहाच्या अंगावर शहारे आले. कैद्यांची संख्या सारी दहा-बारा होती. त्यांचीं कृश शरीरें, निस्तेज मुद्रा व हीन वेष पाहून कल्याणसिंहास अतिशय खेद वाटूं लागला. इतक्यांत त्याच शृंखलाबद्ध हतभाग्य जनांमध्यें गोष्ठाविहारचे राजे वृद्ध गोपीकृष्णरायहि त्याच्या दृष्टीस पडतांच त्याला घेरी आली. त्याच्यानें उभें राहावेना. दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेऊन तो मटकन् खालीं बसला आणि मोठमोठ्यानें हुंदके देऊं लागला. गोपी कृष्णरायांचें वार्धक्यांतहि प्रमाणबद्ध दिसणारें पीळदार शरीर अगदीं कृश होऊन गेलें होतें; त्यांची सतेज अंगकांति अगदीं काळवंडून गेली होती; त्यांच्या पाणीदार चेहेऱ्यावर शुद्ध प्रेतकळा आली होती. तें भीषण दृश्य कल्याणसिंहाच्यानें पहावेना. शृंखलांचा मर्मभेदक ध्वनि कानांवर येईनासा झाल्यावर त्यानें डोळे उघडले, अश्रुपूर्ण दृष्टीनें आकाशाकडे पाहून एक दीर्घ निश्वास सोडला आणि जड अंतःकरणानें तो वाड्यांत परत गेला. कैद्यांना घेऊन शिपाई लोक केव्हांच आपल्या मार्गानें निघून गेले होते.

कल्याणसिंह आपल्या दिवाणखान्यांत एकटाच किती तरी वेळ बसला

होता. त्याचें डोकें धुंद होऊन गेलें होतें. आपण काय पाहिलें, खरी स्थिति काय आहे, किंबहुना, आपण कोण, व कोठें आणि कशाकरितां आलों आहों, हें देखील त्याला नीटसें स्मरेना. आपल्या शरीरांतील अथवा सर्व सृष्टींतील चैतन्यच एकाएकीं नष्ट झालें कीं काय, असें त्याला वाटूं लागलें.

कांहीं वेळानें कल्याणसिंह आपल्या वाड्यांतून पुन्हां बाहेर पडला आणि एका रस्त्यानें हळू हळू निघाला. आपण कोठें व कशाकरितां चाललों आहों हें त्याचें त्याला माहीत नव्हतें. थोड्या वेळानें त्याच्या मागून कोणी तरी येऊन त्याच्या खांद्यावर हात ठेविला आणि त्याला हांक मारिली.

कल्याणसिंहानें एकदम दचकून मागें पाहिलें, तों कृष्णनगरचे दिवाणजी व युवराज रघुराम आपल्याजवळ उभे असलेले त्याच्या दृष्टीस पडले.

कल्याणसिंह चकित मुद्रेनें त्यांच्याकडे पहात म्हणाला—" दिवाणजी, कुमारसाहेब, आपण इकडे कोणीकडे निघालां आहां ? "

दिवाणजी—" थोड्या वेळापूर्वीं कैदी संस्थानिकांना शिपाई लोक याच रस्त्यानें घेऊन गेलेले तुम्हीं पाहिलें नाहींत का ? त्यांमध्येंच तुमचे महाराज व आमचे महाराजहि होते, ते तुमच्या दृष्टीस पडले नाहींत का ? "

कल्याणसिंह—" हो, मीं पाहिलें खरें ! पण काय हो ? त्यांना कोणीकडे नेलें ? आपल्याला माहीत आहे का ? "

दिवाण—" वैकुंठाकडे ! वैकुंठ नांवाचें एक नरककुंड रेशाखानानें तयार करविलें आहे, तेथें आपल्या कृतकर्माचे भोग भोगण्यासाठींच त्यांना नेलें असेल ! "

कल्याणसिंहानें दोन्ही हातांनीं आपली छाती घट्ट दाबून धरून हुंदका आंवरला व नेत्रांतील अश्रु महत्प्रयासानें मागें फिरावले. नंतर खिन्न मुद्रेनें त्यांच्याकडे पहात म्हणाला—" आपण तिकडेच निघालां आहां कीं काय ? तो भयंकर देखावा प्रत्यक्ष पाहण्याची आपणास उत्कंठा लागली आहे वाटतें ? युवराज, तर मखमली पेहराव चढवून, बरोबर दोन हुजरे घेऊन अगदीं दरबारी थाटानें निघालेले दिसतात ! काय हें ? कुमारसाहेब, आपला प्रत्यक्ष पिता त्या घोर नरककुंडांत यमयातना

भोगीत असतां आपण त्यांच्यापुढें अशा थाटा-माटानें जाऊन उभें रहावें, त्यापेक्षां अंगाला राख फांसून—दांतीं तृण धरून रेझाखानाची पदधुली मस्तकीं धारण करा आणि त्याला शरण जा, म्हणजे त्याला दया येऊन तो आपल्या परमपूज्य पिताजींची मुक्तता तरी करील!"

कुमार रघुराम, कल्याणसिंहाकडे क्रुद्ध दृष्टीनें पहात दिवाणास ह्मणाला, "दिवाणजी, ह्या तरुणाचें डोकें बिघडल्यासारखें दिसतें! ह्याच्याशीं बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं!"

दिवाणजी युवराजास कांहींच उत्तर न देतां कल्याणसिंहाकडे वळून म्हणाले—"तुम्ही येणार कां तिकडे?"

कल्याणसिंह—"छे छे छे, माझ्यानें तो भयंकर देखावा क्षणभर देखील पाहावणार नाहीं!"

रघुराम—"संपदा आणि आपदा, सुख आणि दुःख हीं दोन्हीं सारखींच सहन करण्याचें ज्याच्या हृदयांत सामर्थ्य असेल, तोच खरा वीर!"

कल्याणसिंह—"तें सामर्थ्य माझ्या हृदयांत नाहीं असें नाहीं; पण त्यांच्या हालअपेष्टा आणि मानखंडना पाहून लाभ तरी काय? नुसत्या डोळ्यांनीं पाहिल्यानें त्या कमी का होणार आहेत? मला वाटतें, अशा मानहानीकारक शारीरिक यातना आप्तस्वजनांच्या दृष्टीस पडल्या तर त्या भोगणारांना अधिकच असह्य होतील!"

दिवाण—"तें खरें; पण वेळ येईल त्या वेळीं क्रूर यवनांच्या ह्या राक्षसी अत्याचारांचें यथार्थ वर्णन करितां यावें, ह्मणून एकदां ते प्रत्यक्ष पाहून ठेवलेलेंच बरें! चला तुम्ही आमच्याबरोबर! म्हणजे तुह्मांलाहि ह्या रेझाखानाच्या वैकुंठाची एकदां यथातथ्य कल्पना होईल!"

कल्याणसिंहानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. दिवाणजी, त्याचा हात धरून त्याला आपल्याबरोबर घेऊन निघाले, व तोहि कळसूत्री बाहुल्या-प्रमाणें त्यांच्या समागमें जाऊं लागला.

हतभाग्य बंगाली जमीनदारांना रेझाखानाच्या हुकमानें हा दुर्धर वैकुंठवास भोगण्याचा प्रसंग येई, त्या वेळीं त्या वैकुंठाच्या आवारांत तमासगीर लोकांना मज्जाव असे. तथापि त्या दुर्दैवी जमीनदारांच्या आप्तइष्टांना मात्र आंत जाऊं द्यावें, अशी रेझाखानाची परवानगी असे.

त्यांस त्याचा असा हेतु होता, कीं, वैकुंठवासाचे हाल प्रत्यक्ष दृष्टीस पडल्यावर त्यांच्याकडून खंडणीची बाकी लवकर वसूल होईल!

वैकुंठाच्या आवाराच्या दरवाजाजवळ जातांच दिवाणजींनीं पाहरेवाल्यास आपला, रघुरामाचा व कल्याणसिंहाचा परिचय करून दिल्यावर पाहरेवाल्यानें त्यांना आंत जाऊं दिलें.

दरवाजांतून आंत जातांच वैकुंठांतील दुर्गंधीनें कल्याणसिंहाचें मस्तक फिरूं लागलें. परंतु दहा बारा दुर्दैवी जमीनदार तसल्या त्या घाणेरड्या डबक्यांतील कमरेभर पाण्यांत उभे केलेले त्यांच्या दृष्टीस पडले. त्या खातवडांतील कृमि-कीटक त्या बिचाऱ्या जमीनदारांचे कोमल नग्नदेह आपल्या तीक्ष्ण दंशांनीं क्षतविक्षत करीत होते; पण त्यांच्या हातांत खोडे असल्यामुळें त्यांना त्या कृमि-कीटकांचें निवारण करितां येणें शक्य नव्हतें. शिवाय, त्यांच्या भोंवतीं शिपाईलोक भाले रोंखून बसलेले असल्यामुळें, इकडे तिकडे हालण्याचीहि सोय नव्हती.

हें अघोर दृश्य अवलोकन करितांच कल्याणसिंहाची कंबरच खचली. तो मटकन् खालीं बसला. त्याच्यानें तें पाहवेना, म्हणून त्यानें दोन्ही हातांनीं आपले डोळे झांकून घेतले. इतक्यांत बाहेरून एक घोडेस्वार दवडत आला आणि त्यानें एक लखोटा वैकुंठाधिपतीच्या हातीं दिला. त्यांनीं त्यांतील मजकूर वाचून पाहिल्यावर, गोष्ठविहारचे राजे गोपीकृष्णराय यांना बाहेर काढण्याविषयीं आपल्या शिपायास आज्ञा केली. गोपीकृष्णरायांचें नांव ऐकतांच कल्याणसिंहानें डोळे उघडून अधीर दृष्टीनें पाहिलें, तों दोन शिपायांनीं गोपीकृष्णरायांस वैकुंठांतून वर काढून दुसरे कपडे दिले, आणि त्या शिपायांच्या पाहाऱ्यांत देऊन त्यांना त्या स्वारासह बाहेर रवाना करण्यांत आलें.

कल्याणसिंह चटकन् उभा राहून अश्रुपूर्ण दृष्टीनें दिवाणजींच्या विषण्ण वदनाकडे पाहात, कंपित स्वरानें हळूच म्हणाला—" त्यांना कोणीकडे नेत आहेत! त्यांचा ह्यापेक्षांहि अधिक तीव्र छळ करण्याचा तर दुष्ट रेझाखानाचा बेत नसेल!"

दिवाणजी—" छे छे, त्यांना कारागृहाकडे परत पाठविलें. ह्यावरून, तुमच्या मुखत्यारानें रेझाखानास भेटून नजराण्याची वगैरे तजवीज केली

असावी, असें वाटतें ! आतां कांहीं दिवस तरी त्यांच्यावरील अत्याचार तहकूब राहतील ! ”

कल्याणसिंह—“ तसें असेल तर, आपणहि कृष्णनगरच्या महाराजांचें संरक्षण करण्याची तजवीज कां करीत नाहीं ? ”

दिवाणजी—“ आम्हींहि पुष्कळ प्रयत्न करून पाहिले; पण आमच्याकडे खंडणीची बाकीहि फार आहे आणि रेझाखानानें नजराण्याची रकमहि भलतीच मागितली. इतकी रक्कम भरण्यास पुरेसा ऐवज अद्यापि आमच्यापाशीं जमला नाहीं, त्यामुळें नाइलाज झाला आहे ! तुमच्या महाराजांची येथून मुक्तता झाली आहे. तुम्ही आतां पाहिजे तर आपल्या वाड्यांत परत जा ! येथें कशाला उभे राहतां ? ”

कल्याणसिंहानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. वैकुंठस्थित दुर्दैवी जमीनदाराचे अमानुष हाल पाहून आणि त्यांचे आर्तनाद श्रवणकरून त्याचें हृदय विदीर्ण होऊन गेलें होतें. तो दोन्ही हात छातीवर ठेवून, खालीं मान घालून एकसारखा अश्रुवर्षाव करीत उभा होता.

ह्याप्रमाणें बराच वेळ गेल्यावर कांहीं जमिनदारांना ते हाल असह्य होऊन, ते एकदम मूर्छित होऊन दुर्गंधयुक्त जलाशयांत पडले तेव्हां बाकीचे करुणस्वरानें ओरडूं लागले.

वैकुंठाधिपतीनें इषारा करतांच शिपायांनीं सर्वांना वैकुंठांतून वर काढून त्यांच्यापुढें ओळीनें उभें केलें, तेव्हां वैकुंठाधिपति स्मितपूर्वक दाढी हालवीत तीव्र स्वरानें म्हणाले—“ पापी काफर, सरकारची खंडणी न देता, जहागिरी चैनीनें खात बसण्यास तुमच्या अपवित्र शास्त्राची तुम्हांला परवानगी आहे वाटतें ? निमकहराम, इतके हाल होत आहेत तरी, अद्यापि सरकारची खंडणी देऊन टाकण्याचें तुमच्या मनांत येत नाहीं काय ? पण सैतानजाद्यानों, तुम्ही याद धरून असा कीं, तुम्ही बऱ्याबोलानें खंडणीची रकम भरली नाहीं तर, तुमचे पापी देह कोल्ह्याकुत्र्यांकडून खावविण्यांत येतील, तुमच्या जहागिरी काढून घेण्यांत येतील, आणि तुमच्या बायकामुली, [illegible] [illegible] [illegible] करून, खंडणी वसूल करण्यांत येईल !

नंतर कृष्णनगरचे दिवाण, राजकुमार व इतर जहागीरदारांचे तेथें जमलेले आप्तइष्ट यांच्याकडे तीव्र दृष्टिपात करून वैकुंठाधिपति म्हणाले— " काय रे ए कुत्र्यांनों, तुमच्या मालकांची अशी दुर्दशा होत असतां तुम्ही दगडासारखे स्वस्थ उभे राहून मौज पहातां ! तुम्हांला लाज नाहीं वाटत ! खंडणीची तजवीज करून आपापल्या मालकांना सोडविण्याचा कांहीं तरी प्रयत्न करा ! "

वैकुंठाधिपतीचें भाषण ऐकून सर्वजण हात जोडून अवनत मुखानें खालीं पहात स्तब्ध उभे राहिले. कोणासच कांहीं बोलण्याची छाती होईना. तेव्हां कल्याणसिंह पुढें होऊन वैकुंठाध्यक्षाला सलाम करून अश्रुपूर्ण दृष्टीनें त्याजकडे पहात गद्गद स्वरानें म्हणाला—" हुजूर, आपण आपल्यासमोर ज्या हतभागी लोकांची दावण उभी केली आहे, ते ह्या वंग देशांतील सन्मान्य जमीनदार, जहागीरदार असे थोर लोक असून, जातीनें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य अशा उच्च वर्गांतील आहेत, हें आपल्या लक्षांत आहे का ? अशा श्रेष्ठजनांवर आपण जे पशुतुल्य अत्याचार करीत आहां, ते एखाद्या क्षुद्र पशूलादेखील सहन होणार नाहींत. पशूदेखील अशा स्थितींत अत्याचार करणाराचा तरी प्राण घेईल; किंवा आपला तरी प्राण देईल ! परंतु हे बिचारे दुर्दैवी जमीनदार तेंहि करण्यास समर्थ नाहींत ! हे सारे नामधारी जहागीरदार बनले आहेत. त्यांना स्वाभिमानाची कल्पना देखील उरलेली नाहीं. आपल्या पादुका मस्तकावर धारण करून नाचणें हीच त्यांना इतिकर्तव्यता वाटते. जन्मोजन्मीं आपल्या दारांत कुत्र्यासारखें पडून राहून आपली पदधूलि चाटावयास मिळावी, हीच त्यांची महत्त्वाकांक्षा आहे, अशी कां आपली भावना आहे ? खानसाहेब, हे जहागीरदार लोक द्रव्य लोभानें जाणून बुजून सरकारी खंडणीची बाकी ठेवून असले अमानुष अत्याचार हौसेनें सोसतात, अशी का आपली समजूत आहे ? देशाची काय दुर्दशा उडाली आहे, प्रजा किती हैराण व नित्राण होऊन गेली आहे, चोरांच्या आणि दरोडेखोरांच्या लुटालुटीनें लोकांची किती शोचनीय स्थिति झाली आहे आणि प्रजाजन अन्नवस्त्रालादेखील कसे मोताद झाले आहेत, याची आपल्याला वार्ता तरी आहे का ? एव-

केंहि असून हे बिचारे जमीनदार लोक, सरकारच्या भीतीनें आपल्या दीन प्रजेच्या हालअपेष्टांकडे डोळेझांक करून, शक्य तितकी रकम वसूल करून सरकारांत भरणा करीतच असतात ! आणि खंडणीची बाकी राहिली म्हणून अशी दुर्दशा व्हावी काय ? सरकार, ह्या सर्व गोष्टींचा विचार करून, खंडणीची बाकी सोईसोईनें वसूल करण्याचें ठरवाल, तर सरकारची खंडणीहि वसूल होईल, ह्या जमीनदारांचा छळहि वांचेल आणि गरीब प्रजाजनांचाहि बचाव होईल ! नाहीं तर, ह्या वंग देशांतील धन, मान, प्राण ह्या सर्वांचाहि नाश होईल ! बंगाली लोक अगदीं जडमूढ होऊन गेले आहेत ! हे जमीनदार लोक जे अद्यापि तरवारी धारण करीत आहेत, ते पण त्या प्रजारक्षणाकरितां नसून, उलट त्यांचेंच रक्त शोषण करण्याकरितां आहेत ! ते आपल्याला पुरुष ह्मणवितात; पण तें पौरुष गाजविण्याकरितां नसून, बायकांना भुलवून गुलामांची संख्या वाढविण्याकरितां ! खरें सामर्थ्य, खरें पौरुष आजकाल आपल्या अंगीं मात्र आहे ! आम्ही वंगवासी लोक, आपल्या हातांतलि बाहुलीं बनलों आहों ! आपण नाचवाल, तसें नाचावयाचें, बोलवाल तसें बोलावयाचें आणि खेळवाल तसें खेळवयाचें ! आम्ही सर्व आपले गुलाम आहों ! पण महाराज, धन्यांच्या शरीरांप्रमाणेंच दासांची शरीरेंही रक्त-मासांचींच असतात, हें विसरूं नये ! आपली खंडणीची बाकी पैन् पै घ्या, किंबहुना दुप्पट घ्या; पण तजविजी तजविजीनें घ्या ! आम्ही दीन दास खरे, पण आमचे जीव राखाल तर, आपली खंडणी वसूल होईल, नाहीं तर कशी होणार, याचा विचार करा ! "

कल्याणसिंहाचें हें मनोहर, मुद्देसूद व बाणेदार भाषण ऐकून, तेथें असलेले सर्व लोक अगदीं थक्क होऊन गेले, यवन वैकुंठाध्यक्षालाहि मोठें कौतुक वाटलें. तो आपल्या लांब दाढीवरून हात फिरवीत, स्मितपूर्वक ह्मणाला—" आहाहा, तरुण वीरा, तुझ्या सुंदर मुखांतून निघालेलें मधुर भाषण अक्षरशः खरें आहे ! पण आम्ही तरी काय करावें ! आम्हीहि सरकारचे नोकरच ! सरकारच्या हुकमाप्रमाणें वागणें एवढेंच आमचें काम ! तुझें ह्मणणें आह्मांला कितीहि खरें वाटलें, तरी त्याचा काय

उपयोग ! ह्या जमीनदारांना आतां वेताच्या छडीनें फटके मारण्याचा हुकूम आहे, त्याप्रमाणें आह्मांला केलेंच पाहिजे ! ”

कल्याणसिंह—“ छे छे, महाराज, असलें राक्षसी क्रूरकर्म करूं नका ! हे बिचारे अगोदरच मरणोन्मुख होऊन गेले आहेत, त्यांना फटकें सोसण्याची मुळींच ताकद उरलेली नाहीं ! असा सैतानी अत्याचार कराल तर, ते खचित मरून जातील ! ”

यवन कामगार—“ त्याला इलाज नाहीं ! खंडणी वसूल होईपर्यंत नित्य कटके मारण्याविषयीं सक्त हुकूम आहे, तो अक्षरशः अमलांत आणणें भाग आहे ! ”

कल्याणसिंह अश्रुपूर्ण दृष्टीनें आकाशाकडे पाहत उच्च स्वरानें ह्मणाला—“ हाय हाय ! ह्या हतभाग्य वंग राजांना ह्या त्रैलोक्यांत कोणी त्राता उरला नाहीं काय ? कोणाचे पुत्र, कोणाचे आप्त, कोणाचे कामगार येथें जमले आहेत, त्यांपैकीं एकाच्याहि अंगीं चैतन्य नाहीं काय ? अरेरे, हे यवन कामगार आह्मांला कुत्रे म्हणतात, आणि कुत्र्यासारखें वागवितात; पण आम्ही तर कुत्र्यांहूनहि नीच बनलों आहों ! कुत्रा आपल्या धन्याशीं कधींहि बेइमान होत नाहीं. धन्यावर संकट आलें असतां, आपल्या जिवावर देखील उदार होऊन त्याचा प्रतिकार करितों; पण आम्ही, प्रत्यक्ष आमचे परमपूज्य जनक, प्रिय सुहृद, जन्माचे अन्नदाते, अमानुष अत्याचारानें मरण पावत असतां, दगडासारखें जड मूढ होऊन स्वस्थ पहात राहतों ! धिक्कार असो आम्हां बंगवासी तरुणांना ! ”

कल्याणसिंहाचें हें तेजस्वी भाषण श्रवणकरून, जमीनदारांचें नेत्र अश्रुंनीं भरून आले. तेथें जमलेल्या त्यांच्या आप्त स्वकीयांनीं वैकुंठाध्यक्षाला प्रणाम करून त्याची अतिशय विनवणी केली, आणि खंडणीची बाकी लवकर भागविण्याचें वचन देऊन, थोडीशी मुदत मागितली. त्या यवन कामगाराच्या कठोर अंतःकरणावरहि कल्याणसिंहाच्या कळकळीच्या शब्दांचा परिणाम झाल्यावांचून राहिला नव्हता; त्यामुळें त्यानेंहि खंडणी भरण्यास पंधरा दिवसांची मुदत दिली, आणि जमीनदार कैद्यांस तुरुंगाकडे परत नेण्यास शिपायांना हुकूम केला.

दुर्दैवी जमीनदारांनीं कारागृहाकडे परत जातांना एकवार कल्याण-

सिंहाकडे सप्रेम अवलोकन केलें. ते मनांत म्हणाले—" देवा, बंगवासी सर्व तरुणांच्या अंतःकरणांत जर अशी तेजस्विता असती, तर आह्मांवर आणि आमच्या जन्मभूमीवर असा दुर्धर प्रसंग कधींच आला नसता !"

बंदीवान् जमीनदार व यवन कामगार निघून गेल्यावर इतर सर्व मंडळी आपापल्या घराकडे चालती झाली. गोष्ठविहारच्या राजवाड्याजवळ येतांच कृष्णनगरचे दिवाण कल्याणसिंहाचा हात धरून हळूंच म्हणाले—" तरुण वीरा, आज रात्रीं आमच्या वाड्यांत अवश्य ये. मला तुझ्याशीं एका महत्त्वाच्या बाबतींत पुष्कळ बोलावयाचें आहे ! "

दिवाणजींची विनंति मान्य करून, कल्याणसिंह आपल्या वाड्यांत गेला, आणि दिवाणजीहि युवराज रघुरामासह कृष्णनगर राजमहालाकडे चालते झाले.

# प्रकरण ५ वें.



## नेफिसा बेगम.



सायंकाळचे सोनेरी सूर्य किरण महमद रेझाखानाच्या अंतःपुरोद्यानांतील वृक्षलतांच्या मस्तकांवरील हिरण्यागार कोमल पल्लवांना आलिंगनपूर्वक निरोप घेत होते. पल्लवांच्या आश्रयानें राहिलेल्या कोमल कलिका मंदमारुतानें डोलत डोलत नुकत्याच प्रस्फुटित होऊं लागल्या होत्या. लहान लहान पक्ष्यांच्या मधुरकलरवानें उद्यानवृक्ष मुखरित झाले होते; अशा सुरम्य वेळीं, पुष्पवाटिकेंतील माधवीकुंजाच्या समीपभागीं एका श्वेतमर्मरनिर्मित चबुतऱ्यावरील मृदु बैठकीवर यौवनभराक्रांता लावण्यलतिका नेफिसाबेगम अर्धशयान स्थितींत आराम करीत होती.

नेफिसाबेगम ही बंगालबहार व ओरिसा प्रांतांचे पराक्रमी नवाब मुरशिद-कुलीखान यांची लाडकी नात व नवाबसाहेबांचे कुलमुखत्यार महमद

रेझाखान यांची पत्नी होती. महमदरेझाखानाला नेफिसाबेगममुळेंच नबाबांची दिवाणगिरी प्राप्त झाली असल्यामुळें, ते नेफिसाबेगमपुढें खूप प्रेम प्रदर्शन करीत असत; परंतु त्यांचें अंतःकरण त्यांच्या प्राणप्रिय फतिमा बेगमनें हरण केलें होतें, ही गोष्ट नेफिसाबेगमहि पूर्णपणें जाणून असल्यामुळें, तिचें मन अत्यंत खिन्न असे.

नेफिसाबेगम ह्या वेळीं पिरोजरंगाची एक रेशमी तलम ओढणी परिधान करून सुवासिक पुष्पशय्येवर विश्रांति घेत होती. तरुण, सुंदर व सुवेष सजित अशा दोन दासी तिची पादसेवा करण्यांत गढून गेल्या होत्या. पतिप्रेमवंचिता नेफिसा उदास अंतःकरणानें वारंवार दीर्घ निश्वास सोडीत होती. इतक्यांत फूलवाली दोन सुवासिक पुष्पहार घेऊन हळूच तेथं आली आणि नम्र स्वरानें ह्मणाली—"बेगमसाहेब, आपल्या आज्ञेप्रमाणें हे पुष्पहार तयार करून आणिले आहेत. दासीची ही सेवा मान्य करावी !"

नेफिसाबेगमेनें आपलें कोमल शरीर किंचित् उत्तोलन करून, फूलवालीनें पुढें केलेले पुष्पहार आपल्या उजव्या हातांत घेतले आणि त्यांच्याकडे सकौतुक दृष्टीनें अवलोकन करीत ती मृदु स्वरानें ह्मणाली—"आहाहा ! ह्या पुष्पहारासारखें पुरुषांचें हृदय कोमल असतें तर, काय बहार झाली असती !"

फूलवाली हात जोडून हळूच ह्मणाली—"सरकार, दासीचा अपराध माफ असावा ! आपले स्वामी रेझाखानसाहेब अत्यंत सुंदर आहेत, अशी तर सर्वत्र प्रसिद्धी आहे !"

नेफिसा खिन्न स्वरानें ह्मणाली—"अग वेडे, ह्या पुष्पांची मोहकता नुसत्या त्यांच्या सौंदर्यांत नसून, त्या सौंदर्याबरोबर असलेल्या कोमलतेमुळें त्यांना ती प्राप्त झाली आहे ! अंतःकरणांत प्रेमाची कोमलता नसेल तर, नुसत्या बाह्य स्वरूपाची काय किंमत !"

फूलवाली किंचित हंसून ह्मणाली—"मोठमोठ्या राजकारणांत गढून गेलेल्या माणसांच्या अंतःकरणांत प्रेमासारख्या कोमल मनोविकारांना अवकाशच नसेल !"

नेफिसा—"छे, तसें असतें तर त्यांचें फतिमेवर तरी प्रेम कसें दृढ

झालें असतें! मोहकता बाह्य स्वरूपांत नसून ती अंतःकरणांतील प्रेमांत असते! प्रेमाला बाह्य स्वरूपाची अपेक्षाच नसते! जें स्वरूप अवलोकन केलें असतां दुसरें कांहीं पाहण्याची इच्छाच होऊं नये, तेंच खरें मनोहर रूप! अशा मनोज्ञ दर्शनानें जो आनंद होतो, तो कोरड्या बाह्य स्वरूपानें कधीं तरी होणें शक्य आहे का?"

फूलवाली—"माफी असावी सरकार, अशा मनोहर स्वरूपाचें दर्शन आपल्याला आजपर्यंत कधींच झालें नाहीं का?"

नेफिसा—"छे, मुळींच नाहीं! फूलवाली, तुला खऱ्या प्रेमाची कल्पना नाहीं, म्हणून तूं असले भलते भलते प्रश्न करितेस!"

फूलवाली—"सरकार, मी एक दरिद्री हिंदू स्त्री आहें, तरी मनुष्यच आहें! प्रेम हा मनोविकार केवळ जातीवर किंवा श्रीमंतीवरच अवलंबून नाहीं, तो सर्व मनुष्य जातींत सारखाच असावयाचा!"

नेफिसा—"काय? तुम्ही काफर लोक प्रेम जाणतां? प्रेम करण्यासारखीं सुंदर व कोमल अंतःकरणाचीं माणसें तरी तुमच्या जातींत आहेत का? माझी तर अशी समजूत आहे कीं, प्रेम म्हणजे काय, याची हिंदू स्त्रियांना कल्पनादेखील नसावी!"

फूलवाली—"छे छे, बेगमसाहेब, आर्य स्त्रियांच्या प्रेमासारखें सात्विक प्रेम जगांत कोठेंहि आढळणार नाहीं! असें असतां, आपली अशी विलक्षण समजूत कां झाली?"

नेफिसा—"मीं असें ऐकलें आहे कीं, हिंदू मुलींना, त्यांचे आईबाप ज्या पुरुषांशीं विवाह करून देतील, ते कसेहि असले तरी त्यांच्याशींच त्यांना जन्मभर संसार करावा लागतो!"

फूलवाली—"मग? आपलीहि स्थिति तशीच का?"

नेफिसा—"छे, मुळींच नाही! मला वाटेल तर मी आतांच्या आतां आपल्या पतीला काडी मोडून देऊन मोकळी होईन आणि मर्जीस येईल त्या दुसऱ्या पुरुषाशीं निका लावीन!"

फूलवाली—"म्हणूनच मुसलमान रमणींना एकनिष्ठप्रेम करितां येत नाहीं! जन्मभर एकानिष्ठेनें एकध्यान करीत राहिल्यावांचून अंतःकरण तन्मय होणें शक्यच नाहीं!"

नेफिसा—" ही तुह्मां हिंदु स्त्रियांची मोठीच भूल आहे ! ज्यांत आपल्या स्वतःला सुखसमाधान नाहीं, तें प्रेम कसलें ? प्रेम हें आपल्या सुखाकरितां आहे ! "

फूलवाली—" पण आम्हां आर्य स्त्रियांची अशी दृढ समजूत आहे, कीं, प्रेमाच्या ओघांत स्वार्थपर सर्व मनोविकार साफ धुऊन जातात ! "

नेफिसा—"हिंदू स्त्रिया महामूर्ख असतात ! पति मेला म्हणजे त्याच्या प्रेताबरोबर आपल्यालाहि जिवंत जाळून घेतात ! हें का प्रेम ? जीव दिल्यावर प्रेम कसलें आणि सुख कसलें ? "

फूलवाली—" आर्यस्त्रीची आपल्या पतीच्या अंतःकरणाशीं इतकी एकतानता झालेली असते, कीं, पतिवियोगानें तर तिला जिवंत रहाण्याची इच्छाच उरत नाहीं ! आर्यस्त्रीला जितक्या उत्कट प्रेमाची आकांक्षा असेल, तितकें प्रेम ती आपल्या एकनिष्ठ पतिसेवेनें अखेरीस संपादन केल्यावांचून रहात नाहीं ! "

नेफिसा—" वेडीच आहेस ! अग, तारुण्य कांहीं कालाची वाट पहात बसत नाहीं ! ही क्षणिक यौवनावस्था एकदां संपून गेल्यावर, मग प्रेम संपादन करून त्याचा काय उपयोग ? "

फूलवाली—" प्रेमाचा हेतु केवळ विषयोपभोग एवढाच आहे, अशी आम्हां आर्य स्त्रियांची भावनाच असत नाहीं ! "

नेफिसा—" तर मग, अंतःकरणाचें समाधान होण्यासारखे सुंदर व सुकुमार पुरुषच तुम्हां काफर लोकांत नसतील ! "

फूलवाली—" बेगमसाहेब, रागावूं नये; पण मुसलमान पुरुषांचें सौंदर्य ज्यांच्या पासंगालाहि पुरणार नाहीं, असे मनमोहक, लावण्यसंपन्न तरुण पुरुष आर्य लोकांत किती तरी आहेत ! आपण कधीं पाहिले नाहींत का ? "

नेफिसा—" खरेंच का ? तर मग, अशा एखाद्या सुंदर सुकुमार तरुणाची व माझी भेट करून देशील का ? "

फूलवाली भयभीत स्वरानें म्हणाली—" छे, छे, बेगमसाहेब, असल्या संकटांत मला गरीब दासीला घालूं नये ! "

नेफिसा—“ त्यांत संकट कसलें ! तुला कशाची भीति वाटते ? ”

फूलवाली—“ सरकार, आपले पति रेशाखान बहादूर म्हणजे प्रत्यक्ष कर्दन काळ आहेत ! त्यांच्या रोषास कोणीं बळी पडावें ? ”

नेफिसा—“ खरेंच, ते काळ आहेत खरे ! त्यांना हिंसा कर्माची मोठी हौस ! आणि मला तर त्या गोष्टीची अत्यंत चीड; पण माझ्या पुढें त्यांचा क्रूरपणा कांहीं चालावयाचा नाहीं ! माझ्यावर त्यांचें प्रेम नाहीं, हें माझ्या लक्षांत येऊं नये म्हणून ते फार जपत असतात ! माझ्या आजोबांच्या मेहेरबानीमुळेंच त्यांना इतकी योग्यता प्राप्त झाली आहे ! आणि मीं मनांत आणिलें तर त्यांना एका क्षणांत धुळीस मिळवूं शकेन अशी त्यांची खात्री आहे, म्हणून ते मला फार भीत असतात ! तुला भय बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं ! मग, दाखवितेस ना ? ”

फूलवाली—“ खरेंच ! बेगमसाहेब, एक दर्शनीय मनोहर तरुण पुरुष नुकतांच माझ्या अवलोकनांत आला आहे ! तो आपल्या दृष्टीस पडेल तर, आर्यकुमार किती मोहक व सुकुमार असतात याविषयीं आपली खात्री होऊन जाईल ! मी इतकी वयातीत झालें आहें तरी, त्या तरुणाच्या दर्शनानें माझें मन देखील क्षणभर तल्लीन होऊन गेलें ! ”

नेफिसा—“ खरेंच का ? तर मग त्या तरुणाचें स्वरूप तरी कसें काय आहे तें सांग पाहूं ! ”

फूलवाली—“ काय सांगूं, बेगमसाहेब, त्या तरुण राजपुत्राचें वय फार तर अठरा-वीस वर्षांचें असेल ! अद्यापि त्याच्या ओंठावर श्मश्रूची छायाहि आलेली नाहीं, त्यामुळें त्याचें मुखकमल फारच सुकुमार दिसतें ! त्याची सुवर्णकेतकीप्रमाणें सतेज अंगकांति, विशाल व भव्य भालप्रदेश, प्रफुल्लकमलदलांप्रमाणें पाणीदार नेत्र, बुद्धिमत्तादर्शक सरळ व उन्नत नासिका, मौक्तिकांप्रमाणें दंतपंक्ति, पक्वबिंबफलसमान अधरोष्ठ, सारंगी-सारखा कर्ण-मधुरस्वर आणि चंद्रकिरणांसमान आल्हादकारक मधुर हास्य, यांचें यथार्थ वर्णन करितां येणें मुळींच शक्य नाहीं ! इतकेंहि असून, अंतःकरण किती कोमल, स्वभाव किती उदार, भाषण किती पाणीदार ! मी तर एका क्षणांत वेडी होऊन गेलें ! ”

नेफिसा—“ आहाहा ! फूलवाली, कसेंहि करून त्यांची एकवार

मला भेट करील ! त्यांच्या ह्या रसभरित वर्णनानेंच माझी उत्कंठा अनावर झाली आहे ! हें घे तुला बक्षीस ! आणि माझें अंतःकरण प्रसन्न झालें तर आणखीहि देईन ! ”

नेफिसा बेगमेनें आपल्या गळ्यांतील रत्नहार काढून फूलवालीच्या अंगावर टाकला. तो घेऊन फूलवाली नम्र स्वरानें ह्मणाली—“ पण बेगमसाहेब, ती गोष्ट माझ्या स्वाधीनची नाहीं ! मीं त्यांना आपला निरोप कळवीन, त्यांचें मन वळविण्याचा शक्य तितका प्रयत्न करीन; पण इतकेंहि करून ते आले नाहींत तर मी काय करणार ? त्याबद्दल मज गरीबावर इतराजी होऊं नये ! ”

नेफिसा—“ तसें होणें शक्यच नाहीं ! तुझ्या हुषारीविषयीं माझी खात्री आहेत ! तूं मनःपूर्वक प्रयत्न करशील तर त्यांचें मन आपल्या इच्छेप्रमाणें खचित वळविशील ! तथापि माझ्या दुर्दैवानें, त्यांना मजवर अनुग्रह करण्याची इच्छा झाली नाहीं तर, मीच त्यांच्या दर्शनाला जाईन ! तुझ्यावर मुळींच रागावणार नाहीं; तूं अगदीं भिऊं नको ! ”

फूलवाली—“ पण, सरकार, ते इकडे येण्यास कदाचित् तयार झालेच तर, त्यांचा येथें जनानखान्यांत प्रवेश कसा होणार ? परकी आणि त्यांतहि हिंदू तरुणाला, पाहरेवाले आंत कसे सोडतील ? ”

नेफिसाबेगम किंचित् विचार करून, आपल्या दासीकडे वळून म्हणाली—“ जा, माझ्या महालांतील परवाना घेऊन ये. ”

एक दासी चटकन् महालांत गेली आणि थोड्याच वेळांत परवाना घेऊन आली. तो परवाना फूलवालीच्या हातीं देऊन नेफिसाबेगम म्हणाली—“ हा परवाना त्यांच्याजवळ दे, म्हणजे त्यांना कोणी कोठेंहि प्रतिबंध करणार नाहीं ! ”

फूलवाली—“ हा परवाना कोणाचा आहे, सरकार ? ”

नेफिसा—“ तो आजोबांचा—नबाब मुरशिदकुलीखानांचा आहे ! त्याचा प्रभाव असा आहे, कीं, हा परवाना दाखविणाराचा हुकूम, लहान थोर, अमीर-उमराव, इत्यादि सर्वांनीं तात्काळ बिनहरकत मानिलाच पाहिजे ! ”

फूलवाली—“ असें असेल तर, ह्याच्या साह्यानें त्यांचा आपल्या महा-

लांत बिनहरकत प्रवेश होईल ! पण एक हिंदू तरुण आपल्या महालांत आला होता, असा बोभाटा नाहीं का होणार ? "

नेफिसा हंसून म्हणाली--" खुळीच आहेस ! त्या बाबतींत इतकी काळजी करण्याचें कारणच नाहीं ! महालांत येतांना त्यांच्या अंगावर एक पायघोळ जनानी बुरखा घाल म्हणजे झालें ! मग बोभाटा होण्याचें काय कारण ? "

फुलवाली--" वाहवा, बेगमसाहेब, आपल्या हुषारीची आणि बुद्धिमत्तेची कमाल आहे ! बरें तर, मला आतां निरोप घेण्यास आज्ञा असावी ! "

नेफिसा--" ठीक आहे ! पण माझें काम मात्र विसरूं नको हो ! मी उद्यां सायंकाळीं तुझी मार्गप्रतीक्षा करीत राहीन ! माझ्या उत्कंठेची निराशा मात्र करूं नको ! "

" दासी आपल्या सेवेंत कसूर करणार नाहीं ! " असें म्हणून फुलवाली बेगमसाहेबांचा निरोप घेऊन तेथून निघून गेली.

नेफिसा आपल्या दोघी दासींकडे वळून म्हणाली--" पोरींनों, तुम्हीं काय काय ऐकलें ? तुमचें इकडे लक्ष होतें कां ? "

दासी--" छे छे, सरकार, आम्ही एक अक्षरही ऐकलें नाहीं, आणि आमच्या लक्षांतही कांहीं नाहीं ! आम्ही आपले कान, डोळे, तोंड इत्यादि सर्व इंद्रियें, किंबहुना सर्व देहच सरकार चरणीं अर्पण केले आहे ! त्यावर आमचा काय अधिकार आहे ! "

नेफिसा--" शाब्बास ! तुम्ही अशा शहाणपणानें व हुशारीनें वागलां तर, मी तुमचें जन्माचें कल्याण करीन ! "

इतक्यांत एक दासी महालांतून तेथें आली. भोजनाची तयारी आहे, असें तिनें नम्र स्वरानें बेगमसाहेबांस सुचाविलें. तेव्हां नेफिसा बेगम आपल्या दासींसह महालांत निघून गेली.

# प्रकरण ६ वें.



## कल्याणसिंह व रघुराम.



कृष्णनगर राजमहालांत कल्याणसिंहाचें दळणवळण नित्याचें झालें असल्यामुळें तेथील सर्व मंडळीशीं त्याचा पूर्ण परिचय झाला होता. विशेषतः वृद्ध दिवाणजींच्या अंतःकरणांत कल्याणसिंहाविषयीं दृढ प्रेमादर उत्पन्न झाला होता.

कृष्णनगरचे राजे रामजीवनराय हे रेझाखानच्या कैदेंत अमानुष अत्याचार सोशीत असल्याचें सर्वांनीं प्रत्यक्ष पाहिलें होतें; पण खंडणीची बाकी त्यांच्याकडे फारच यकली असल्यामुळें, ती भागवितां येणें त्यांना अशक्य वाटूं लागलें होतें. रेझाखानाला नजराणा द्यावा तर तो खंडणीच्या मानानें नजराणाहि अवाढव्य मागूं लागला. शिवाय खंडणीचा कांहीं अंश दिल्याखेरीच नुसता नजराणा तो कधींच घेत नसे. ह्याप्रमाणें चोहोंकडून अडचण आल्यामुळें दिवाणजी व युवराज रघुराम दोघेहि निरुपाय व हतबुद्ध होऊन गेले होते.

सायंकाळीं दिवाणजी व रघुराम राजमहालांतील एका लहानशा दिवाणखान्यांत बसले होते. खिन्नअंतःकरणानें दोघेंही परस्पराशीं एक अक्षरही न बोलतां आत्मगत विचार करीत होते आणि मधून मधून दीर्घ निश्वास सोडीत होते. इतक्यांत कल्याणसिंह भेटावयास आले असल्याबद्दल सेवकानें हळूंच वर्दी दिली. दिवाणजींनीं त्याला आंत पाठविण्यास सांगितलें. सेवक बाहेर निघून गेला आणि थोड्याच वेळानें कल्याणसिंह दिवाणखान्यांत आला.

दिवाणजींनीं कल्याणसिंहाचें स्वागत केल्यावर तो दिवाणजी व राजकुमार यांच्या समोरच कांहीं अंतरावर बसून उभयतांकडे स्थिर दृष्टीनें पहात विषण्ण स्वरानें म्हणाला—"कां दिवाणसाहेब, आपण उभयतांहि

अत्यंत खिन्न दिसतां ! महाराजांकडील कांहीं विशेष वर्तमान कळलें आहे कीं काय ! "

रघुराम किंचित वक्र दृष्टीनें कल्याणसिंहाकडे पहात म्हणाला— "कल्याणसिंह, प्रत्यक्ष पाहिलेली भीषणास्थिति अंतःकरणांत तळमळ उत्पन्न करण्यासारखी नाहीं असें कां तुम्हांला वाटतें ? आणखी वर्तमान कसलें कळावयाचें ! "

कल्याणसिंह—" युवराज, माझा तसा उद्देश नाहीं; पण आम्हां-सारख्या तरुण पुरुषांनीं, त्याबद्दल बायकांसारखें कोंपऱ्यांत मुळू मुळू रडत बसावें याचें मला सखेदाश्चर्य वाटतें ! "

रघुराम—" त्याशिवाय दुसरा काय उपाय आहे ? "

कल्याणसिंह—" युवराज, आमच्या आर्यधर्माप्रमाणें मातापिता ही इहलोकची सर्वश्रेष्ठ परम पूज्यदेवता ! असें असतां त्या देवतेचा प्राणांतिक छळ डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहून देखील कर्तव्याकर्तव्याचा निर्णय अंतःकरणांत होऊं नये, हें दुर्दैव नव्हे काय ! "

रघुराम—" कर्तव्य निश्चित करण्यासाठीं तर इतका विचार चालला आहे ! असभ्य व रानटी माणसांप्रमाणें संतापाच्या स्वाधीन होऊन अविचारानें आणि उतावीळपणानें एखाद्या घोर कर्मांत उडी घालणें हें सभ्य व सुशिक्षितपणाचें काम नव्हे ! "

कल्याणसिंह—" तर काय ! गुडघ्यांत मान घालून मुळूं मुळूं रडत बसणें हें सभ्यपणाचें सुधारलेलें लक्षण वाटतें ! "

रघुराम—" बोलणें फार सोपें आहे, पण प्रचंड मोंगल सामर्थ्यापुढें टिकाव लागणें कितपत शक्य आहे आणि किती नीतिसंमत आहे, हें ठरविणें फार कठीण आहे ! "

कल्याणसिंह—" युवराज, सर्वच गोष्टी नीतिशास्त्राच्या धर्मकांट्यावर तोलून भागत नसतात ! चाललेले राक्षसी अत्याचार तरी कोठें नीतिचे आहेत ? सहनशीलतेलाहि कांहीं सीमा आहे ना ? रेह्मानखानाचे अत्याचार आतां सहनशीलतेच्या सीमेबाहेर गेले ! आतां त्यांचा प्रतिरोध करण्याची छाती केल्यावांचून गत्यंतर नाहीं ! अत्याचारांच्या मानानें प्रतिकारहि तसाच जोराचा करावयास नको का ? "

रघुराम—" पण बादशाही अवाढव्य सत्तेविरुद्ध शस्त्र उचलणें म्हणजे एखाद्या पतंगानें दावाग्नींत उडी घालणें होय ! " असल्या अविचारानें आत्मघाताशिवाय दुसरा काय लाभ होणार !

कल्याणसिंह—" हाय हाय ! अशा स्थितींत जगून तरी काय उपयोग ! ज्यांचे परमपूज्य जनक घोर अत्याचारांनीं जर्जर होऊन गेले आहेत, यवनांच्या वेत्राघातांनीं ज्यांचीं शरीरें रक्तबंबाळ झालीं आहेत, छळ असह्य झाल्यामुळें जे वारंवार मूर्छित होत आहेत, असले अमानुष छळ सोशीत राहण्यापेक्षां, देवा, आह्मांला मृत्यु दे ! अशी जे देवाची प्रार्थना करीत आहेत त्यांचा आर्त हाहाकार आणि त्यांच्या नेत्रांतील दुःखाश्रु मुकाट्यानें ऐकवत व पहात जगण्यापेक्षां, मरण काय वाईट ? "

रघुराम—" आम्हीं प्राणत्याग केला म्हणजे त्यांचे हाल कमी का होणार आहेत ? उलट त्यांच्या दुःखांत पुत्रशोकाची आणखी भर मात्र पडणार ! "

कल्याणसिंह—" पुत्रशोक ! पित्याचे हाल प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहून देखील ज्याला चीड येत नाहीं, पित्याची दुर्दशा जो उघड्या डोळ्यांनीं पण दगडी पुतळ्याप्रमाणें स्वस्थ उभा राहून पाहूं शकतो, आणि पिता कारागृहांत असह्य छळ व अमर्याद मानखंडना सोशीत असतां जो आपल्या महालांत स्वस्थ पडून राहतो, असल्या कवडीमोल पुत्राच्या मृत्यूबद्दल कोणता बाप काय ह्मणून शोक करील ? किंबहुना असल्या कुसंतानाला पुत्र तरी कोण म्हणेल ? "

रघुराम—" पण पुत्राच्या प्राणत्यागाचा पित्याला थोडा तरी उपयोग झाला पाहिजे ना ? "

कल्याणसिंह—" उपयोग तर खचित होईल ! ह्या अत्याचारांचा प्रतिकार करण्याकरितां तुम्ही आम्ही शक्य तितकें सैन्यबल सज्ज करून उभें राहिलों, तर आणखी किती तरी समदुःखी बांधव आम्हांला येऊन मिळतील ! इतकेंहि करून जरी आपल्याला यश आलें नाहीं, तरी अत्याचारी यवनांना कांहीं तरी वचक बसेल, आणि पुन्हां असे अत्याचार करितांना ते थोडा तरी विचार करितील ! "

रघुराम—" पण एवढ्या यत्किंचित् फायद्याकरितां आम्हांला प्राणत्याग

करावा लागेल ना ! समजून उमजून प्राण देणें हें शौर्य नव्हे, हा निवळ अविचार ! शुद्ध वेडेपणा ! ”

कल्याणसिंह रघुरामाकडे तीव्र दृष्टीनें पहात खिन्न स्वरानें म्हणाला—“ युवराज, तुमच्यासारखें जर माझ्या अंगांत सामर्थ्य असतें, तुमच्या संस्थानासारखेंच आमचेंहि संस्थान जर विस्तृत असतें, तर एका क्षुद्र संस्थानिकाच्या हातूनहि किती पराक्रम होणें शक्य आहे, हें दाखविलें असतें ! ”

रघुराम-“ शिवाय, मोंगल बादशहा हे आमचे राजे आहेत. राजा म्हणजे विष्णूचा अवतार! त्यांच्याशीं विरोध करणें हा राजद्रोह नव्हे काय ?”

कल्याणसिंह—“ तुम्ही म्हणतां तसें शास्त्र आहे खरें ! पण त्याच शास्त्रांत राजांची जीं कर्तव्यें सांगितलीं आहेत, तीं जो बरोबर पाळील, तोच राजा ! सर्व प्रजाजनांना समदृष्टीनें व न्यायानें वागविणें, अपत्या-प्रमाणें प्रजेवर प्रेम ठेवणें, त्यांच्या कल्याणाकरितां अहर्निश झटणें, अत्या-चारांपासून त्यांच्या जीवितवित्ताचें संरक्षण करणें, इत्यादि कर्तव्यें जो योग्य रीतीनें बजावीत नाहीं, इतकेंच नव्हे तर, त्यांच्या अगदीं उलट वागतो, तो राजा नसून निवळ दरवडेखोर चोर होय ! तो देव नसून प्रत्यक्ष सैतान होय ! त्याचा विरोध करण्यांत मुळींच पाप नाहीं ! किंब-हुना, त्याचा निग्रह अवश्य केला पाहिजे ! ”

रघुराम-“ हां हां, कल्याणसिंह, असें भलभलतें बडबडूं नको ! बादशाही मुलखांत आणि खुद्द नबाबसाहेबांच्या राजधानींत जर तूं असें अविचारानें बडबडूं लागलास, तर तुला जिवंत राहण्याची आशाच करा-वयास नको ! ”

कल्याणसिंह-“ असलें लाजिरवाणें जिणें असून तरी काय उपयोग ! ”

रघुराम-“ तर मग भागिरथीच्या डोहांत उडी टाकून जीव दे जा, म्हणजे पुण्य तरी लागेल ! ”

कल्याणसिंह-“ तुमच्या सारख्यांना शेवटीं तोच मार्ग स्वीकारावा लागणार ! ”

रघुराम-“ पण तुझ्यासारख्या अविचारी मूर्खाला मात्र सुळाच्या खांबावर लटकावें लागणार ! ”

कल्याणसिंह—" मरणाची मी मुळींच परवा करीत नाहीं ! आपल्या मातृभूमीचा उद्धार कसा होईल, वंगवासी जमीनदारांचा मान कसा राहील, त्यांचा अमानुष छळ कसा बंद होईल, ह्याच गोष्टींचें विचार माझ्या डोक्यांत नेहमीं घोळत असतात ! ज्यांनीं शौर्य धैर्य पराक्रम गाजवावयाचा, ते तर दगडासारखे जड होऊन अमानुष अत्याचार आणि असह्य छळ मुकाट्यानें सहन करीत आहेत ! याला उपाय काय ? "

रघुराम—" उपाय एकच ! कांहीं प्रमुख जमीनदारांनीं दिल्लीला जावें आणि बादशहांच्या चरणीं ह्या अत्याचारांची हकीगत निवेदन करून, प्रतिकाराविषयीं प्रार्थना करावी ! "

कल्याणसिंह—" हेः, अगदींच वेडगळ कल्पना ! दिल्लीच्या बादशाही खजिन्यांत अलीकडे कित्येक वर्षे बंगाल देशाची खंडणी मुळींच पोंचलेली नव्हती. ती ह्या मुरशिदकुलीखानाच्या अमलांत दरसाल भरपूर पोंचूं लागली आहे ! अशा वेळीं बादशहा जमीनदारांची दाद घेऊन नबाबाचे वसुलाचे मार्ग बंद करील आणि आपलें नुकसान करून घेईल असें तुह्मांला वाटतें काय ? हे मुसलमान लोक परदेशाहून इकडे आले आहेत, ते धर्मराज्य करण्याकरितां नव्हे; चैनीनें यथास्थित विषयोपभोग घेण्याकरितां आले आहेत ! ते आपल्या ऐषआरामांत व्यत्यय आणणारी कोणतीहि गोष्ट कधीं तरी करतील काय ? "

रघुराम—" तर काय ? नबाबसाहेबांविरुद्ध बंड केल्यानें हे अत्याचार बंद होतील ? "

कल्याणसिंह—" वंगवीरांच्या अंगीं अद्यापि पौरुष आहे असें सिद्ध झाल्यास, अत्याचारांचा अंशतः तरी प्रतिकार होईल ! "

रघुराम—" छे छे, कल्याणसिंह, हा अविचार अजीबात सोडून दे ! नाहीं तर तूं फांशी गेल्याची दुष्ट वार्ता आमच्या कानांवर लवकरच येईल ! "

कल्याणसिंह—" बरें, माझा विचार राहूं द्या; पण आपण आपल्या परमपूज्य प्रिय पित्याच्या उद्धारासाठीं काय उपाय योजणार आहां ? "

रघुराम—" रेझाखानाची करुणा भाकावयाची ! "

कल्याणसिंह—" युवराज, रेझाखान किती द्रव्यलोभी मनुष्य आहे, हें आपणांस माहीतच आहे ! वंगवासी जमीनदारांच्या घरांत जी कांहीं

संपत्ति होती, ती सगळी रेझाखानाच्या भांडारांत जाऊन पडली आहे! बंगवासी यांचा सर्व ऐषआराम रेझाखानाच्या हस्तगत होऊन चुकला आहे! आतां रेझाखानाला काय देऊन त्याची करुणा संपादन करणार?"

रघुराम—" नाहीं तर नबाबसाहेब मुरशिदकुलीखानांची करुणा भाकली पाहिजे!"

कल्याणसिंह—" हेः, अगदींच पोरकट विचार! हे अत्याचार आणि हाःहाःकार नबाबास माहीत नाहींत असें आपणांस वाटतें का? नबाबाची आज्ञा—निदान अनुमति तरी असल्याशिवाय असले भीषण प्रकार करण्याची रेझाखानाची काय छाती होती!"

रघुराम—" तरी पण एकवार प्रयत्न तरी करून पाहूं!"

कल्याणसिंह—" आजपर्यंत असा प्रयत्न कोणींच केला नाहीं काय?"

वृद्ध दिवाणजी इतका वेळ ह्या उभयतां तरुण राजकुमारांचा संवाद मुकाट्यानें ऐकत होते, ते आतां म्हणाले—" होय! नुकताच चार पांच महिन्यापूर्वी सर्व जमीनदारांनीं मिळून ह्या अत्याचारांची सविस्तर हकीकत लिहून त्यांचा प्रतिकार करण्याविषयीं नबाबसाहेबांकडे एक विनंति अर्ज पाठविला होता. त्यावर नबाबसाहेबांनीं असा जबाब दिला कीं, अत्याचाराबद्दल आपणास दिलगिरी वाटते; परंतु रेझाखानावर वसूलाची जबाबदारी असल्यामुळें, त्याच्या कामांत हात घालण्याची आपली इच्छा नाहीं. जमीनदारांनीं खंडणीची बाकी चुकती करावी म्हणजे त्यांच्यावर अत्याचार होणार नाहींत!"

कल्याणसिंह—" असल्या क्षुल्लक अर्जांना असेच जबाब मिळावयाचे! आणि दिल्लीचा बादशहा देखील हाच जबाब देणार! असो! युवराज, दिवाणसाहेब, बंगवासी जमीनदारांचा अमानुष छळ अवलोकन करून माझ्या अंतःकरणांत असह्य तळमळ होत असल्यामुळें, माझ्या तोंडून कठोर शब्द निघाले असतील, त्यांबद्दल मला क्षमा असावी!"

युवराज रघुरामानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. दिवाणजी म्हणाले— " कल्याणसिंह, तुझे उद्गार फाजील स्पष्ट आहेत खरे; पण त्यांत राग येण्यासारखें खोटें नाहीं! आम्ही तुर्त दगडासारखे जडमूढ बनलों आहों! म्हणून हे अत्याचार मुकाट्यानें सहन करण्यावांचून गत्यंतर नाहीं!"

कल्याणसिंह–" छे छे, दिवाणसाहेब, आपली समजूत चुकीची आहे! बंगभूमींतील सगळेच तरुण ह्या रघुरामासारखे आहेत असें मला वाटत नाहीं! वंगमातेच्या असंख्य पुत्रांपैकीं कांहीं तरी वीरपुत्र निघतील आणि ते आपल्या परमपूज्य वाडवडिलांचा उद्धार करण्याचा प्रयत्न कर-तील! येतों आतां, राम राम!"

कल्याणसिंह चटकन् उठला. त्याच्या मर्मभेदक वाक्प्रहारनें रघुराम संतापून उठला आणि त्यानें आपल्या तरवारीस हात घातला. इतक्यांत वृद्ध दिवाणजी त्याचा हात धरून हळूच म्हणाले—" हां हां युवराज, माफ करा, कल्याणसिंह अद्यापि अल्लड तरुण पोर आहे, त्याच्या शब्दा-कडे लक्ष देऊं नका!"

कल्याणसिंह रघुरामाकडे तिरस्कारानें पहात तेथून चालता झाला व आपल्या वाड्यांत परत आला.

---

# प्रकरण ७ वें.



## बेगमेशीं एकांत.



कल्याणसिंह कृष्णनगर राजवाड्यांतून बाहेर पडला त्या वेळीं तासभर रात्र होऊन गेली होती. काळोखी रात्र होती तरी रस्त्यांतील दिव्यांचा स्वच्छ प्रकाश पडला होता. सायंकालच्या शीत-मंद वाऱ्यानें कल्याणसिं-हाचें प्रक्षुब्ध अंत:करण बरेंच शांत झालें. तो आपल्याशींच विचार करीत हळू हळू आपल्या वाड्यांत परत आला. तों पुढील सदरेवरच रमानाथ ठाकूर उभा होता, तो म्हणाला—" महाराज, आपल्याला रोज फुलें आणून देणारी फूलवाली केव्हांची येऊन आपली वाट पहात दिवाणखान्यांत बसली आहे!"

कल्याणसिंह रमानाथाशीं कांहींच न बोलतां, तसाच दिवाणखान्यांत

गेला. फूलवालीनें चटकन् उठून त्याला मुजरा केला. कल्याणसिंह जवळच्या एका आसनावर बसला आणि फूलवालीस बसावयास खूण करून स्मितपूर्वक म्हणाला, " कां आज फार वेळ माझी वाट पहात बसलां आहां ? "

फूलवाली हंसत ह्मणाली—" सरकार, आपल्याकारितां मोठ्या प्रयत्नानें एक अतिसुंदर मोहनमाला तयार केली आहे. तिला अद्यापि चंद्रसूर्यांचा देखील स्पर्श झालेला नाहीं ! आपण तिचा स्वीकार कराल तर ती धन्य होईल ! "

फूलवालीचें स्मित हास्य व भ्रूभंग पाहून, तिच्या शब्दांचा कांहीं तरी गूढ अर्थ आहे, एवढें कल्याणसिंहाच्या तत्काळ लक्षांत आलें; पण तिचा उद्देश त्याला बरोबर कळला नाहीं, ह्मणून तो म्हणाला—" तूं काय म्हणतेस तें मला अद्यापि नीटसें समजलें नाहीं ! काय तें स्पष्ट सांग पाहूं ! "

फुलवाली—" सरकार, आपल्या स्वरूपासारखें सुंदर आणि मोहक स्वरूप ह्या जगांत फारच दुर्मिळ आहे ! "

" असेल ! " कल्याणसिंह हंसून म्हणाला. " पण माझ्या स्वरूपाची येथें यवनी राजधानींत कोणाला आकांक्षा असणार ? "

फूलवाली—" जिला अद्यापि सूर्यकिरणांचाहि स्पर्श झालेला नाहीं, अशी एक लावण्यवती तरुणी आपल्या दर्शनासाठीं अत्यंत उत्सुक झाली आहे ! "

कल्याणसिंह —" खरेंच कीं काय ? ती कोण ? "

फुलवाली—" नेफिसाबेगम ! "

" काय ? " कल्याणसिंह चकित स्वरानें उद्गारला—" नेफिसाबेगम ? नबाब मुरशिदकुलीखानाची नात, महमद रेझाखानाची पत्नी ? "

फूलवाली—" होय, तीच ! आपलें तखदीर-शिकंदर, ह्मणून हा सुयोग जुळून आला आहे ! "

कल्याणसिंह—" पण माझी व तिची कधीं नुसती दृष्टिभेटहि झाली असल्याचा संभव नाहीं, असें असतां, ती मजवर अनुरक्त कशी झाली असेल ? "

फुलवाली-" त्यांत अशक्य काय आहे ? नलराजाच्या वर्णनानेंच दमयंति मोहित झाली नाहीं का ? गोपालकृष्णाच्या मुरली-नादानें गोपी तल्लीन होत नव्हत्या का ?

कल्याणसिंह स्मितपूर्वक ह्मणाला-"पण माझें नांव तरी नेफिसाबेगमच्या कानावर कसें गेलें ? "

फुलवाली-" सरकार, माफी असावी ! ह्या गरीब फुलवालीच्या तोंडून आपलें रूपगुणवर्णन बेगमसाहेबांनीं श्रवण केलें आणि त्यामुळें त्यांची उत्कंठा अतिशय वाढली ! "

कल्याणसिंह-" मग त्यांची काय आज्ञा आहे ? "

फुलवाली--" आतां त्यांच्यानें धीर धरवत नाहीं. ह्यासाठीं त्यांना दर्शन देऊन कृतार्थ करावें ! "

कल्याणसिंह-" केव्हां ? आणि कोठें ? "

फुलवाली-" आतांच, त्यांच्या जनानखान्यांत चलावें ! "

कल्याणसिंह-" जनानखान्यांत मजसारख्या परकी परधर्मी पुरुषाचा प्रवेश कसा होणार ? "

फुलवाली--" बेगमसाहेबांनीं हा परवाना दिला आहे ! ह्याच्या योगानें आपल्याला वाटेल तेव्हां पाहिजे तेथें बिन हरकत जातां येईल ! "

कल्याणसिंहास मुसलमानी भाषा येत असल्यामुळें, त्यानें फुलवालीच्या हातून परवाना घेऊन वाचून पाहिला. ज्याच्याजवळ हा परवाना असेल, त्याची आज्ञा लहान थोर सर्व कामगारांनीं तत्काळ बिनहरकत मानिली पाहिजे, असा नबाबाचा सहीशिक्यानिशीं स्पष्ट हुकूम परवान्यांत असलेला पाहून कल्याणसिंहाच्या मनांत अनेक विचार एकदम उद्भुत झाले. तो आपल्या आसनावरून चटकन् उठला आणि आपल्याशींच विचार करीत दिवाणखान्यांत फिरूं लागला. फुलवाली त्याच्याकडे उत्कंठित दृष्टीनें पहात होती. बराच वेळ विचार केल्यावर कल्याणसिंहानें आपल्या मनाचा एक निश्चय केला. तो पुनः आपल्या आसनावर बसून फुलवालीला ह्मणाला--" ह्या परवान्यानें मला जनान-

खान्यांत जातां येईल ! पण मी तेथें गेल्याबद्दल बोभाटा झाला, किंवा रेशाखानाला समजलें तर ? ”

फूलवाली-“ त्याची काळजी आपल्याला नको ! बेगमसाहेब त्या सर्व गोष्टींचा बंदोबस्त करण्याला पूर्ण समर्थ आहेत ! शिवाय त्यांच्या जनानखान्यांतील हा जनानी बुरखा अंगावर घेऊन आंत जावयाचें ? म्हणजे बोभाटा होण्याचा मुळींच संभव नाहीं ! ”

कल्याणसिंह—“ वाहवा ! खूपच तयारी आहे ! बरें पण ह्या गोष्टीचा विचार करावयास मला आजचा दिवस सवड पाहिजे ! ”

फूलवाली—“ छे छे सरकार ! आज आपण मजबरोबर आलां नाहीं तर माझी जान रहाणार नाहीं ! ”

कल्याणसिंह—“ पण स्वतःचा जीव बचावण्याकरितां माझा जीव धोक्यांत घालण्यास तुला कांहींच दिक्कत वाटत नाहीं का ? ”

फूलवाली-“ सरकार, परमेश्वरास स्मरून सांगतें कीं, आपल्या केसास देखील धक्का लागणार नाहीं ! ”

कल्याणसिंह-“ ठीक आहे. मी तुजबरोबर येण्यास तयार आहें. पण माझा सर्व भार तुजवर आहे, हें मात्र विसरूं नको ! ”

फूलवाली-“ महाराज, आपली प्रणयदेवता आपला भार घेण्यास पूर्ण समर्थ आहे. मी गरीब दासी निमित्तमात्र आहें ! ”

कल्याणसिंह परवाना खिशांत घालून फूलवालीसह वाड्यांतून बाहेर निघाला. रस्त्यावरील एका झाडाखालीं येतांच फूलवालीनें आपल्या जवळचा पायघोळ जनानी बुरखा कल्याणसिंहाच्या अंगावर घातला आणि ती पुढें निघाली, तेव्हां कल्याणसिंहहि मुकाट्यानें तिच्या पाठोपाठ जाऊं लागला.

सुमारें प्रहररात्र होऊन गेली असल्यामुळें, रस्त्यांतील रहदारी बरीच कमी झाली होती, राजवाड्यांतील नगारखान्यावरील प्रहराचा चौघडा नुकताच थांबला होता, अशा प्रशांत वेळीं जनानखान्यांत आपल्या क्रीडामंदिरांतील मृदुसुगंधयुक्त पुष्पशय्येवर लावण्यवतितरुणी नेफिसा बेगम उत्कंठित अंतःकरणानें आपल्याशींच विचार करीत पडली होती. अप्सरोपम दोन तरुण दासी बेगमेच्या सेवेंत तत्पर होत्या. मंदिराचें

द्वार हळूच उघडून दोन व्यक्ति पदशब्द न करितां आंत आल्या. त्यांस पहातांच नेफिसाबेगम उठून बसली. फूलवाली दृष्टीस पडतांच तिच्या-बरोबरची व्यक्ति तिनें सांगितलेला हिंदू युवकच असला पाहिजे, हें नेफिसाबेगमेनें तत्काळ ओळखलें. ती चटकन उठून उभी राहिली. पापमार्गाकडे तिची ही प्रथम प्रवृत्ति असल्यामुळें तिची छाती धडधडूं लागली, सर्वांग कंप पावूं लागलें, शिराशिरांतून विद्युत्स्पंदन होऊं लागलें आणि तोंडास कोरड पडल्यामुळें तिच्या मुखांतून एकहि अक्षर निघे-नासें झालें. ती विस्फारित व चकित दृष्टीनें फूलवालीकडे, अवगुंठ-नावृत कल्याणसिंहाकडे व आपल्या दासींकडे आळीपाळीनें पाहूं लागली.

फूलवाली पुढें होऊन कुरनिस करून ह्मणाली—"बेगमसाहेब, दासी आपलें कार्य फत्ते करून आली आहे! बेगमसाहेबांनीं बक्षिस दि-लेली मौक्तिकमाला दासीनें स्वीकारली त्याचप्रमाणें दासीनें आणिलेला हा रत्नहार बेगमसाहेबांनीं स्वीकारावा!"

फूलवालीनें कल्याणसिंहाच्या अंगावरील अवगुंठन काढून घेतलें आणि ती दूर जाऊन उभी राहिली.

कल्याणसिंहाचें दिव्य स्वरूप दृष्टीस पडतांच नेफिसाबेगम चकित होऊन गेली. असलें मोहक व सुकुमार सौंदर्य तिनें आजपर्यंत कधींच अवलोकन केलें नव्हतें. कल्याणसिंहाचें सुहास्यमुखकमल पहातांच नेफिसा तल्लीन होऊन गेली. तिच्या अंतःकरणांतील भीति एकदम नाहींशी होऊन त्या ठिकाणीं मधुर प्रेमनिर्झर उत्पन्न झाला. कल्याण-सिंहाकडे तिच्यानें एकसारखें पहावेना, ह्मणून तिनें आपली सलज्जदृष्टि अवनत केली.

बेगम राजकुमाराचा कांहींच सत्कार करीत नाहीं असें पाहून फूलवाली हंसून ह्मणाली—"बेगमसाहेब, राजकुमार बराच वेळ उभे आहेत. आपल्या अनुमतीशिवाय त्यांना आसनस्थ होतां येणार नाहीं!"

नेफिसाबेगमनें दचकून फूलवालीकडे स्मितपूर्वक अवलोकन केलें आणि समोरच्या कोचावर बसण्याविषयीं कल्याणसिंहास आदरपूर्वक हस्त—संकेत केला. कल्याणसिंह कोचावर बसल्यावर बेगमहि आपल्या पर्यंकावर बसली.

फूलवाली हळूच ह्मणाली—" राजकुमार, मी आतां घरीं जातें. मला फार भूक लागली आहे ! "

कल्याणसिंह—" छे छे, तूं एकटीच जाऊं नको. थोड्या वेळानें तूं व मी बरोबरच जाऊं ! "

नेफिसा एका दासीकडे वळून हळूच ह्मणाली—" जा, फूलवालीच्या उपहाराची उत्तम व्यवस्था कर ! "

दासी फूलवालीसह तेथून निघून गेल्यावर नेफिसाबेगमनें दुसऱ्या दासीला नेत्रसंकेत केला. त्याबरोबर तीहि शेजारच्या खोलींत गेली.

एकांत होतांच कल्याणसिंह स्मितपूर्वक म्हणाला—" बेगमसाहेबांच्या मनोज्ञ दर्शनानें आज मी धन्य झालों ! मला कां बोलाविलें होतें ? बेगमसाहेबांची आज्ञा पालन करण्यास मी अत्यंत तत्पर आहें ! "

नेफिसाबेगम स्निग्ध दृष्टीनें कल्याणसिंहाकडे पहात सलज्ज स्वरानें ह्मणाली—" फूलवालीच्या तोंडून आपलें वर्णन ऐकल्यामुळें, आपल्या प्रत्यक्ष दर्शनाची माझ्या मनाला अत्यंत उत्कंठा लागली होती, ती आपण माझ्या विनंतीस मान देऊन पूर्ण केली, याबद्दल मी आपली अतिशय आभारी आहें ! आपल्या मनोहर दर्शनानें माझ्या नेत्रांचें सार्थक झालें ! "

इतक्यांत दासी उत्तम शिराजीच्या दोन सुवर्ण पात्रें घेऊन आली आणि एक कल्याणसिंहापुढें व दुसरें नेफिसापुढें ठेवून दूर उभी राहिली.

नेफिसा—" राजकुमार, ही अस्सल शिराजी आहे, तिचा आदर करावा ! "

कल्याणसिंह—" माफ करा, बेगमसाहेब ! आह्मां ब्राह्मण लोकांना मद्यपानाचा अत्यंत निषेध आमच्या धर्मशास्त्रांत सांगितला आहे ! आम्ही जन्मजन्मांतरींहि मद्यपान केलेलें नाहीं. यासाठीं मला आग्रह करूं नये. आपल्याला इच्छा असली तर आपण खुशाल घ्यावी ! "

नेफिसा—" तर मग मीहि घेणार नाहीं ! आपल्याला ज्या वस्तूची अभिरुचि नाहीं, ती वस्तु यापुढें मी केव्हांहि स्वीकारणार नाहीं ! "

कल्याणसिंह—" माझ्याकरितां आपण आपल्या सुखाचा त्याग कां करितां ? "

नेफिसा—" आतां आपलें जें सुख, तेंच माझें सुख ! "

नेफिसानें नेत्रसंकेत करितांच दासी दोन्ही सुवर्णपात्रें घेऊन निघून गेली. नंतर नेफिसा कल्याणसिंहाकडे सप्रेम दृष्टीनें अवलोकन करीत म्हणाली—" हें तन मन आपल्या सुखाकरितां आपल्या सेवेस अर्पण केलें आहे ! "

कल्याणसिंह—" खरेंच का मजवर आपलें इतकें प्रेम जडलें आहे ? नबाबसाहेबांचे कुलमुकत्यार, पराक्रमी महंमदरेझाखान आपले पति असतां त्यांचा आपण अनादर कां करितां ? "

नेफिसा—" त्यांच्याविषयीं माझ्या मनांत प्रेमादर कधींच उत्पन्न झाला नाहीं ! त्यांचें अंतःकरण फतिमाबेगमनें हरण केलें असल्यामुळें, मला अर्पण करण्यास त्यांच्याजवळ प्रेमाचा एक लेशहि उरलेला नाहीं ! त्यांचें मन सुप्रसन्न करण्याचा मीं पुष्कळ प्रयत्न करून पाहिला, परंतु त्यांत माझी पूर्ण निराशा झाल्यामुळें, मीं तो नाद सोडून दिला आहे ! आजोबाच्या भीतीनें आणि अधिकारलोभामुळें ते माझा अपमान करण्यास धजत नाहींत हें खरें; पण प्रेमपिपासुअंतःकरण खऱ्या प्रेमनिर्झरावांचून शुष्कबाह्योपचारांनीं कसें शांत होणार ? "

कल्याणसिंह—" माझ्याकडून तरी आपली प्रेमतृष्णा परिपूर्ण होईल असें मानण्यास काय प्रमाण आहे ? कदाचित माझें प्रेम आपल्या ठिकाणीं दृढ झालें, तरी आपल्यासारख्या रूपयौवनसंपन्न, नबाबजाद्या, सत्तासंपत्तियुक्त बेगमसाहेबांचें प्रेम मजवरच चिरकाल राहील, असा काय भरंवसा ? "

नेफिसा—" राजकुमार, आपलें मनोहर, दयार्द्र व सुहास्य वदन अवलोकन करितांच आपण माझा अनादर करणार नाहीं अशी माझी खात्री झाली ! माझ्या प्रेमाच्या अढळपणाबद्दल माझें अंतःकरणच आपल्या अंतःकरणास साक्ष देईल ! शिवाय आपण पाहिजे तर माझ्या एकनिष्ठेची परीक्षा पहावी ! आपली इच्छा असेल तर, मी ह्या सर्व सत्ता

संपत्तीवर लाथ मारून आपल्याबरोबर आपल्या देशाला यावयास तयार आहे ! "

कल्याणसिंह—" छे छे, असलें अमूल्य रत्न राजप्रासादावांचून इतर ठिकाणीं मुळींच खपणार नाहीं! आपल्याला येथून बाहेर नेल्यास आपणां उभयतांचाहि तत्काळ नाश होईल ! "

नेफिसा–" तर मग आपणच येथें राहून माझी सेवा ग्रहण करीत जावी ! आज दिलेला परवाना आपल्या जवळच ठेवावा आणि आजच्या-प्रमाणेंच अवगुंठन घेऊन येत जावें, म्हणजे आपल्याला कोणाचीहि भीति बाळगण्याचें कारण नाहीं ! "

कल्याणसिंह–" पण येथें नवाबसाहेब किंवा आपले पति अकस्मात् आले तर ? "

नेफिसा—" आजोबा इकडे कधींच येत नाहींत. मीच केव्हां केव्हां त्यांना भेटावयास जात असतें; आणि माझे पति पूर्वसूचनेशिवाय व माझ्या अनुमतीशिवाय माझ्या महालांत येण्यास केव्हांहि धजत नाहींत. अर्थात् दोघांविषयींहि काळजी करण्याचें कारण नाहीं ! "

कल्याणसिंह–" ठीक आहे ! आतां माझ्या मनाचें पूर्ण समाधान झालें ! "

नेफिसा—" मग आतां असें दूर किती बसावयाचें ? "

कल्याणसिंह—" आणखी थोडे दिवस ! मला अशौच आहे, तें संपेपर्यंत मला आपल्याला स्पर्शकरितां येणार नाहीं याबद्दल दिलगिरी वाटते ! पण त्याला इलाज नाहीं ! "

नेफिसा एक दीर्घनिश्वास सोडून दीन मुद्रेनें कल्याणसिंहाकडे पहात म्हणाली–" आपल्याला ज्यांत सुख नाहीं, तें करण्यास मीहि आग्रह करीत नाहीं ! पण अशौचमुक्त होईपर्यंत नुसत्या भेटीला तर कांहीं हरकत नाहीं ना ? आपला वियोग मला फार वेळ सहन होणार नाहीं ! "

कल्याणसिंह—" भेटीला तर अवश्य येत जाईन ! कारण मला तरी आपल्या दर्शनावांचून कसें चैन पडेल ? "

कल्याणसिंहाच्या आश्वासनपर प्रेमळ शब्दांनीं नेफिसाबेगमचें अंतः-करण आनंदानें प्रफुल्लित झालें. नंतर कल्याणसिंहानें बेगमेचा निरोप

घेऊन फूलवालीला हाक मारली व तिच्यासह जनानखान्यांतून बाहेर पडून तो गुप्तपणें आपल्या वाड्यांत परत आला.

---

# प्रकरण ८ वें.



## गोविंदराम.



वसूल झालेला खजिना मुरशिदाबादेस रवाना करण्याची तजवीज केल्यावर, गोष्ठविहारचे युवराज गोविंदराम बाकीच्या वसूलाकरितां ताबडतोब निघाले. ते प्रथम विनोदपूर येथें आले. गोष्ठविहार जहागिरीपैकीं विनोदपूर महाल सुसंपन्न असल्यामुळें, तेथें बराच ऐवज वसूल होईल अशी गोविंदरामाची खात्री होती. विनोदपूर येथें राजाची महाल-कचेरी असून, वसुलाच्या कामावर एक नायबहि नेमिलेला होता.

गोविंदराम विनोदपुरास येतांच नायबांनीं त्याचा योग्य आदर-सत्कार केला. युवराजानें नबाबाच्या खंडणीच्या बाकीबद्दल आपल्या पित्याचा—राजा गोपीकृष्णराय यांचा किती छळ होणार आहे, हा सविस्तर वृत्तांत नायबास निवेदन केला आणि जमेल तितका ऐवज शक्य तितका सत्वर वसूल करण्याविषयीं सूचना केली. नंतर उभयतांनीं विचार करून विनोदपूरच्या प्रमुख नागरिकांची सभा दुसरे दिवशीं बोलवावयाची आणि ह्याबद्दल सर्वांस जाहीरविनंति करावयाची, असें ठरविलें.

विनोदपूर शहरांत मदनमोहनाचें एक भव्य मंदिर असून, भगवान् मदनमोहनावर तेथील सर्व लोकांची अत्यंत भक्ति असे. गोष्ठविहारच्या राजाकडून ह्या देवस्थानास पुष्कळ इनामें मिळालेलीं असल्यामुळें, देवाची पूजा-अर्चा, उत्सव वगैरे सर्व समारंभ थाटानें व व्यवस्थित रीतीनें चालत असत. शिवाय धनिक नागरिकांकडूनहि देवस्थानाला चांगली

मदत होत असे. नायब व ग्रामस्थ चार पंच यांच्या नजरेखालीं देवस्थानची सर्व व्यवस्था चालत असे.

नायबांच्या निमंत्रणाप्रमाणें दुसरे दिवशीं दोनप्रहरीं मदनमोहनमंदिरांत विनोदपूरचे प्रमुख नागरिक एकत्र जमले. नेमल्या वेळीं युवराज गोविंदराम आपल्या लवाजम्यासह सभास्थानीं येऊन दाखल झाले. सर्व नागरिकांनीं त्यांचा योग्य सत्कार केला. नंतर नायबांनीं सभा भरविण्याचा उद्देश थोडक्यांत सर्वांस कळविला. त्यानंतर युवराज गोविंदराम यांनीं नबाबांचा कडक अंमल, रेझाखानाचे अमानुष अत्याचार, वंग जमीनदारांची दुःस्थिति व विशेषतः गोष्ठविहारच्या वृद्ध राजावरील सध्यांचा दुर्धर प्रसंग यांची करुणकथा गद्गदस्वरानें सर्वांस निवेदन करून शेवटीं अशी प्रार्थना केली कीं, ह्या संकटसमयीं राजनिष्ठा, भूतदया, स्वदेशाभिमान इत्यादि गोष्टींचा विचार करून सर्वांनीं शक्य तितकी मदत अवश्य केली पाहिजे.

नंतर नायबांनीं अशी सूचना केली कीं, विनोदपूरच्या नागरिकांनीं ह्या प्रसंगीं आपल्या परमपूज्य राजेसाहेबांना निदान एक लक्ष रुपयांची तरी मदत केली पाहिजे.

गोष्ठविहारच्या वृद्ध राजाची हृदयद्रावक स्थिति श्रवणकरून कांहीं वृद्ध नागरिकांच्या अंगांवर शहारे आले, आणि त्यांनीं नायबांची सूचना तत्काळ मान्य केली. परंतु त्यांत रामशरण नावाचा एक श्रीमान् तरुण सावकार होता, त्याला ही वृद्ध नागरिकांची अनुमति पसंत पडली नाहीं. आपण बडे सावकार असतां, आपल्याला न विचारितां मान्यता दिल्याबद्दल त्याला फार राग आला. तो एकदम उठून ह्मणाला—"युवराजांची हकीगत व नायबांची सूचना आम्हीं सर्वांनीं ऐकिली आहे; परंतु ह्या गोष्टीचा पूर्ण विचार केल्यावांचून, अविचारानें एकदम निश्चित उत्तर देणें योग्य नाहीं. ह्याकरितां आजचा दिवस विचार करून उद्यांक आमचा निश्चय आम्ही नायबसाहेबांना कळवूं!"

रामशरण बाबूच्या ह्या उपसूचनेस आणखीहि बऱ्याच तरुण मंडळीनीं संमति दिल्यामुळें, युवराजांच्या अनुमतीनें नायबांनीं उद्यांपर्यंत विचार करावयास मुदत दिली, आणि सभा बरखास्त केली.

युवराज गोविंदरामास रामशरणच्या ह्या फाजीलपणाबद्दल अत्यंत संताप आला; पण ह्या प्रसंगीं अविचारानें कांहीं बोलणें किंवा करणें वेडेपणाचें होईल असा विचार करून त्यानें मोठ्या प्रयासानें आपलें मन शांत केलें.

त्या दिवशीं रात्रीं रामशरणबाबूंच्या वाड्यांत त्याचे स्नेही व आणखी कांहीं तरुण सावकार एकत्र जमून सर्वांनीं विचार केला, आणि युवराजास ऐवज मिळूं द्यावयाचा नाहीं असा निश्चय ठरला. शेतकरी व व्यापारी लोकांचे हेच सावकार असल्यामुळें, कोणालाहि कर्ज द्यावयाचें नाहीं असा त्यांनीं आपापसांत ठराव केला. इतकेंच करून ते स्वस्थ राहिले नाहींत तर "राजपुत्र गोविंदराम अत्यंत दुष्ट आहे, त्यानें एका कुलीन युवतीस भ्रष्ट करण्याचा प्रयत्न केला, यासाठीं त्याला शासनच करणें अवश्य आहे, ह्मणून त्याला कोणी एक पैशाचीहि मदत करूं नका!" असें ते गुप्तपणें सर्वांस खोटेंच सांगूं लागले.

ठरल्याप्रमाणें दुसरे दिवशीं रामशरणाकडून नायबांस कांहीं जबाब मिळाला नाहीं आणि कोणी वसूलहि आणून दिला नाहीं. त्यावरून आपल्याला द्रव्य सहाय्य करावयाचें नाहीं, असा ग्रामस्थांनीं कट केला असावा, असें युवराज व नायब यांनीं अनुमान केलें. तथापि एकदम कडक उपाय अमलांत न आणितां आणखी एकवार सवलत देऊन पहावी असा विचार करून युवराजानें दुसरे दिवशीं पुन: एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्यांत असा मजकूर होता:—"राजाला प्रजाजनांचा पैसा मोफत घ्यावयाची इच्छा नाहीं. प्रसंगाचें महत्त्व मनांत आणून ह्या वेळीं प्रजाजनांनीं राजाला कर्ज द्यावें. तें व्याजासुद्धां परत देण्यांत येईल; पण इतक्याहि सवलतीनें योग्य मदत झाली नाहीं तर मात्र न्यायान्याय बाजूस ठेवून वाटेल त्या उपायांनीं ऐवज वसूल करण्यांत येईल. मग त्या कामीं कोणावर अत्याचार झाल्यास त्याचा दोष राजाकडे येणार नाही!"

रामशरण व त्याच्या पक्षाची तरुण मंडळी ह्यांनीं ह्या जाहीरनाम्यासहि दाद दिली नाहीं; पण इतर कांहीं कुलीन गृहस्थांनीं मात्र आपापल्या ऐपतीप्रमाणें रकमा आणून नायबाकडे हजर केल्या; ह्याप्रमाणें

सर्व मिळून पंचवीस हजारांची रकम जमली; पण तेवढ्यानें काय होणार? मुरशिदाबादेस एक लक्ष रुपये पाठविण्याची मुदत तर भरत आली. आपल्या परमपूज्य प्रियपित्याच्या अमानुष छळाचें भीषण स्वरूप गोविंदरामाच्या दृष्टीसमोर उभें राहिलें. त्यामुळें तो उद्विग्न व निराश झाला आणि संतापाच्या भरांत त्यानें विनोदपूर शहर लुटण्याचा हुकूम दिला. मात्र ज्यांनीं वसूल दिला होता, त्यांला कोणत्याहि प्रकारें उपसर्ग न देण्याविषयीं त्यानें आपल्या लोकांस सक्त ताकीद दिली. त्याबरोबर सरकारी कामगार सर्व शहरभर पसरले आणि त्यांनीं एका क्षणांत दशदिशांना हांहांकार उडवून दिला.

रामशरण व तत्पक्षीय तरुण मंडळींना असें कांहीं तरी होणार, हें भविष्य कळून चुकलेंच होतें. ह्मणून त्यांनीं आपली संपत्ति शक्य तितकी अदृश्य करून ठेविली आणि विनोदपुराजवळच यशोहर येथें नबाबाचें ठाणें होतें, तेथील ठाणेदारास नजराणा देऊन त्याचें लष्करहि आपल्या मदतीस बोलाविलें होतें.

मुसलमान ठाणेदारास असल्या गोष्टींची हौसच होती! त्यानें तत्काळ आपल्या लष्करास विनोदपूरचा बंदोबस्त करून येण्यास हुकूम दिला. त्याप्रमाणें सायंकाळचे सुमारास मुसलमानी लष्कर विनोदपुरास येऊन दाखल झालें. शहरांत राजसेवकांनीं लुटीचा धुमाकूळ चालविलेला पाहून मुसलमान अंमलदारांनीं एकदम शहरांत घुसून राजसेवकांवर हल्ले करण्यास आरंभ केला. तेव्हां लुटीचें काम बंद पडलें आणि हिंदु मुसलमानांची हाणामारी सुरू होऊन जिकडे तिकडे रक्तपात होऊं लागला.

मुसलमानी लष्कर संख्येनें अधिक असून युद्धाच्या तयारीनें आलें असल्यामुळें, राजसेवकांच्यानें त्याच्यापुढें फार वेळ टिकाव धरवेना. ते मागें हटत हटत राजवाड्यापर्यंत आले. वाड्याबाहेरचा गलबला ऐकतांच युवराज गोविंदराम आपल्या घोड्यावर स्वार होऊन वाड्यांतील लोकांसह बाहेर आला व मुसलमानी लष्कर पहातांच राजपुत्र चकित झाला. सर्व प्रकार तत्काळ लक्षांत आला. त्यानें आपल्या सैनिकांस उत्तेजन देऊन मुसलमानांशीं सामना करण्यास आरंभ केला. त्यानें

शौर्याची व पराक्रमाची शिकस्त करून अनेक यवनांना आपल्या समशेरीचें पाणी दाखविलें; पण त्याचें सैन्यबल फारच कमी होत गेल्यामुळें यवनांपुढें त्याचा कांहीं इलाज चालेना. आतां अविचार करून व्यर्थ प्राणास मुकण्यापेक्षां, पुनः तयारी करून यवनांची खोड मोडणें अधिक श्रेयस्कर होय, असा विचार करून गोविंदरामानें आपला घोडा फिरविला आणि विनोदपुरांतून बाहेर पडून एकदम गोष्ठविहाराचा मार्ग सुधारला.

गोविंदराम दिसेनासा होतांच त्याचे सैनिकहि गलितधैर्य होऊन दशदिशांनीं पळत सुटले. याप्रमाणें यवनांचा पूर्ण जय झाला. त्यांनीं राजवाडा लुटून गोविंदरामानें वसूल केलेला सर्व ऐवज आपल्या ताब्यांत घेतला; शिवाय रामशरण वगैरे मंडळींची कामगिरी योग्य रीतीनें बजाव-ल्याबद्दल त्यांच्याकडूनहि बरेंच बक्षिस मिळविलें आणि यशोहर ठाण्याची वाट धरली.

ह्याप्रमाणें रामशरणबाबूंच्या मूर्खपणाच्या अविचारामुळें, विनोदपूरच्या प्रजाजनांचें व्हावयाचें ते नुकसान झालेंच पण त्याचा उपयोग गोष्ठविहारच्या राजाला यत्किंचितहि न होतां मुसलमान ठाणेदाराचा मात्र यथेच्छ फायदा झाला ! !

गोष्ठविहारास परत येतांच गोविंदरामानें सर्व हकीकत सविस्तर मुरशिदाबादेस जासुद पाठवून कळविली. खंडणीची बाकी येण्याची निराशा झालेली पाहून कल्याणसिंहाचें अंतःकरण अत्यंत उद्विग्न झालें. पुढें काय करावें हें त्याला कांहींच सुचेना. दोनदिवस तो एकसारखा अहोरात्र ह्याच विचारांत गढून गेला होता. परंतु तिसरे दिवशीं त्यानें आपल्या मनाचा निश्चय ठरविला आणि तो त्याप्रमाणें तजविजीस लागला.

युवराज गोविंदरामानें पित्याच्या मुक्ततेचा विचार तूर्त बाजूस ठेविला आणि तो यवन ठाणेदाराची खोड मोडून झालेल्या अपमानाची भरपाई करून घेण्याच्या तयारीस लागला.

गोष्ठविहारच्या राजाचा सेनापति कालीप्रसाद हा शूर, धाडसी, बलशाली, व युद्धविद्यानिपुण वीर होता. युवराज गोविंदरामानें त्याला विनोदपूरची

व यशोहरच्या यवन ठाणेदाराची हकीगत सांगून युद्धाची सिद्धता करण्यास आज्ञा केली. आणि तयारीच्या खर्चाकरितां घरांतील बहुतेक संपात्ति त्याच्या स्वाधीन केली. कालीप्रसादानें तावडतोब लष्कर भरतीची व युद्ध-सामग्रीच्या सिद्धतेची तजवीज चालविली. प्रतिदिवशीं लष्करी-शिक्षण व कवाईत सुरू झाली. शिवाय सैन्य एकदम विनोदपुरास नेण्यास सोपें जावें म्हणून कालीप्रसादानें गोष्ठविहार प्रासादाजवळच्या महेश्वरी-नदींतून विनोदपूरच्या भैरवी-नदीपर्यंत नावा चालण्यासारखा एक प्रशस्त कालवा तयार केला. ( हा कालवा अद्यापिहि मोडकळलेल्या स्तिथींत गतकालीन इतिहासाची साक्ष देत आहे. )

सुमारें एक महिन्यांत सेनापति कालीप्रसादानें स्वारीची जय्यत तयारी केली. हें पाहून युवराज गोविंदरामास अत्यंत संतोष झाला आणि त्यानें सेनापतीची मोठी प्रशंसा करून " सरदार " असा किताब देऊन त्याचा योग्य गौरव केला.

सुमुहूर्त पाहून युवराज गोविंदराम व सेनापति सरदार कालीप्रसादबरोबर दहा हजार कसलेलें सैन्य व अपरिमित युद्ध-सामग्री घेऊन, मोठमोठ्या नौकांतून नवीन कालव्याच्या मार्गानें विनोदपुराकडे रवाना झाले.

ह्या स्वारीचा बेत तूर्त तहकूब ठेवून वडिलांच्या मुक्ततेचा अगोदर विचार करावा, ह्मणून युवराज्ञी ललितागौरीनें आपल्या प्रियपतीची वारंवार विनवणी चालविली होती; परंतु गोविंदरामाचें अंतःकरण अपमानाच्या तीक्ष्ण ज्वालांनीं होरपळत असल्यामुळें, त्यानें प्रियपत्नीच्या प्रार्थनायुक्त नयनाश्रूंकडे यत्किंचित् देखील लक्ष दिलें नाहीं.



# प्रकरण ९ वें.



## बेगम महाल.



महमद रेझाखानाच्या जनानखान्यांतील अंतर्महालांत नेफिसा-बेगम मृदुपुष्पशय्येवर अर्धशयनावस्थेंत आराम घेत होती. तिच्या नेहमींच्या दोघी लावण्यवती दासी तिची सेवा करण्यांत गुंग होत्या. समोर दोन नर्तकींचें मधुर गायन चालू होतें. सुगंध तैलपूर्ण समुज्वल दीपांच्या रम्य प्रकाशांत पुष्पांचा व अत्तरांचा सुवास दरवळून राहिला होता. तथापि नेफिसा-बेगमच्या अंतःकरणांत स्वस्थता नव्हती. ती उत्कंठित दृष्टीनें वारंवार महालाच्या दाराकडे पाहून दीर्घ निश्वास सोडीत होती. नाच-गाण्याचा रंग चालला होता; पण बेगमसाहेबांनीं आज शिराजीचें नांव देखील काढलें नाहीं. प्रहर रात्र झाल्यावर तिनें नर्तकीला निरोप दिला. आज आपले मनोरथ पूर्ण होण्याचा संभव दिसत नाहीं, असें वाटून तिचें प्रेमपूर्ण मन निराशेनें व्याप्त झालें. इतक्यांत महालाचें दार हळूंच उघडून कल्याणसिंह आंत आला.

कल्याणसिंहास पाहतांच नेफिसाबेगमचें मुखकमल प्रफुल्लित झालें. ती चटकन् उठून बसली; तिच्या नेत्रसंकेताबरोबर दोघीहि दासी तेथून निघून गेल्या; व कल्याणसिंह बेगमच्या शय्येजवळच एका कोंचावर बसला.

बराच वेळ झाला तरी नेफिसाबेगम एक अक्षरहि बोलेना, तेव्हां कल्याणसिंह स्मितपूर्वक नम्रस्वरानें म्हणाला—" आज सेवकावर अव-कृपा दिसते आहे ! फूलवालीनें आपली आज्ञा कळविली म्हणून आज येण्याचें धाष्टर्य केलें. त्याबद्दल तर राग आला नाहीं ना ? मागील खेपेस सेवकाचा सत्कार होऊन शिराजीचाहि आग्रह चालला होता; पण आज कांहींच दिसत नाहीं ! सेवकाच्या हातून असा अपराध तरी कोणता घडला ? "

नेफिसा कल्याणसिंहाकडे प्रेमपूर्ण दृष्टीनें अवलोकन करीत स्मितपूर्वक मृदुस्वरानें ह्मणाली—" अपराध कांहीं लहान-सहान नाहीं ! राजकुमार, माझ्या सर्व इंद्रियांच्या शक्तींसह माझें अंतःकरण आपण चोरून नेलें आहे ! माझ्याजवळ माझें असें आपण कांहीं सुद्धां शिल्लक ठेवलें नाहीं ! मग आपला सत्कार तरी कशानें आणि कोणीं करावयाचा ? " शिराजीचें तर मला स्मरण देखील उरलें नाहीं ! आपल्याला जी वस्तु अप्रिय, ती मला तरी प्रिय कशी वाटणार ? आतां आपली इच्छा तीच माझी इच्छा ! आणि आपलें सुखदुःख तेंच माझें सुखदुःख ! ह्या देहाची चालक-जीवनकला आपणच आहां ! "

नेफिसाचे प्रेमपूर्ण उद्गार ऐकून कल्याणसिंहाला हंसूं आलें. तें मधुर हास्यमुख अवलोकन करून नेफिसा अगदीं तल्लीन होऊन गेली. तिला वाटलें, कीं, ह्या मनोहर मुखकमलावरून शतशः पूर्णचंद्र ओवाळून टाकावे. ती हळूच ह्मणाली—" आतां असें दूर कां ? आपण सांगितलेली मुदत संपली ! कां अजूनहि दासीचा अंत पहावयाचा आहे ? "

कल्याणसिंह—" नेफिसा, खरोखरच कां मजवर तुझें इतकें निःसीम प्रेम आहे ? "

नेफिसा खिन्न स्वरानें ह्मणाली—" राजकुमार, अद्यापि आपल्याला शंका असेल, तर माझें हें हृदय उघडून दाखवितें ! "

कल्याणसिंह—" पण हें प्रेम स्वरूपावर आहे कीं, गुणावर आहे ? "

नेफिसा—" नुसत्या स्वरूपावर प्रेम जडणें शक्य असतें तर तें एखाद्या सुंदर चित्रावरहि जडलें असतें ! त्याचप्रमाणें नुसते गुणच प्रेमचें आश्रयस्थान होऊं शकले असते तर, तें एखाद्या उत्तम ग्रंथावरहि दृढ झालें असतें ! पण मला वाटतें, उत्तम गुणांनीं युक्त सुंदर स्वरूप हाच प्रेमाचा खरा विषय असला पाहिजे ! "

कल्याणसिंह—" रूपगुणांचा अनुरूप समुच्चय कसा असतो, हें तुला माहीत आहे का ? "

नेफिसा—" माझ्यासारख्या अज्ञान अबलेला इतका सूक्ष्म विचार कसा समजणार ? "

कल्याणसिंह-" मनुष्याच्या अंतःकरणांत यावज्जन्म ज्या रूप-गुणांची

भावना दृढ झालेली असते, त्या रूप-गुणांची प्रतिमा पुढील जन्मीं त्याच्या अंतःकरणावर उमटलेली असते आणि तदनुसार व्यक्तीचा लाभ झाला म्हणजे, त्या माणसाला धन्यता वाटते! रूप हें गुणांचेंच बाह्य स्वरूप आहे! रूप दृष्टीस पडतांच आपल्याला न कळत अंतःकरणांतील भावनाबद्ध गुणांची विचारणा सुरू होते. आणि त्या गुणांचें प्रमाण बरोबर जमलें म्हणजेच त्या स्वरूपावर प्रेम जडतें!"

नेफिसा—"पण तुमच्या हिंदुशास्त्रांत देखील प्रेमाचा इतका सूक्ष्म विचार केलेला दिसत नाहीं! कारण हिंदुशास्त्रमतें स्त्रीचा ज्या पुरुषांशीं एकवार विवाह झाला असेल, त्याच्या ठिकाणीं तिनें तुष्ट असावें तिच्या भावनेप्रमाणें रूपगुणांचा समुच्चय नसला तरी तिला आपल्या भावनेला अनुरूप असा दुसरा पति वरण्यास परवानगी नाहीं!"

कल्याणसिंह—"हिंदुकुलवतीला असल्या परवानगीची जरूरच नसते! कारण, आनुवंशिक संस्कारांनीं तिची इच्छाशक्ति इतकी प्रबल बनलेली असते कीं, आपल्या पतीचे रूप गुण आपल्या भावनेला अनुरूप नसले तरी ते आपल्या प्रबल इच्छाशक्तीच्या जोरानें तिला पाहिजे तसे अनुरूप करून घेतां येतात. हिंदु-रमणी दुसऱ्याच्या बागेंतील गुलाबचें फूल चोरून आणण्याची इच्छा कधींहि न करितां ती आपल्याच घरीं गुलाबाचें फूल आपल्या सतत प्रयत्नानें उत्पन्न करिते! हा प्रयत्न म्हणजे आर्यस्त्रियांची पतीचे ठिकाणीं अनन्य एकनिष्ठा!"

नेफिसा—"आम्हां मुसलमान स्त्रियांना असें करितां येणें शक्य नाहीं!"

कल्याणसिंह—"कां नाहीं? मानवी प्राणी सर्व सारखेच आहेत! तुम्हांला जर योग्य उपदेश मिळेल, आणि बरोबर वळण लागेल तर, तुम्हांला देखील आपल्या इच्छाशक्तीच्या साह्यानें आपल्या पतीचें अंतःकरण आत्मवश करून घेतां येईल! मग तुम्हांला पर-पुरुषाकडे पाहण्याची देखील वासना होणार नाहीं!"

नेफिसा—"पण अंतःकरणाच्या इच्छाशक्तीवर एवढा जुलूम करण्यापेक्षां, अयोग्य पतीचा त्याग करून अनुरूप पुरुषाची प्राप्ति करून घेणें काय वाईट?"

कल्याणसिंह—"अत्यंत वाईट! अतिशय निंद्य! जी स्त्री पतीचा

अनादर करून परपुरुषाची इच्छा करिते, तिला ह्या जन्मीं तर सुख प्राप्ति होतच नाहीं; पण मृत्युनंतर तिला अक्षय नरकप्राप्ति होते, असा आमच्या शास्त्राचा सिद्धांत आहे, आणि तो सत्य आहे ! कारण, अंतःकरणाची अपेक्षा निराळीच असते. बाह्य स्वरूपानें अंतःकरणाचें समाधान होणें कधींच शक्य नाहीं ! अंतःकरणाचें अंतःकरणाशीं मीलन व्हावयास दोन्ही अंतःकरणें एकरूप व्हावीं लागतात आणि इच्छाशक्तीचा उपयोग केल्यावांचून आपलें अंतःकरण दुसऱ्याच्या अंतःकरणाशीं एकरूप होत नाहीं ! स्त्रीनें विवाहसमयीं ज्या पुरुषाला ईश्वरासमक्ष आपला देह समर्पण केलेला असतो, त्याच्या अंतःकरणास आपलें अंतःकरणहि समर्पण करणें हेंच तिचें कर्तव्य आहे. पतीच्या अंतःकरणाशीं आपलें अंतःकरण एकरूप केल्यावांचून तिला आत्मसमर्पण करितां येणार नाहीं ! ह्यालाच व्यावहारिक भाषेंत प्रेम व शास्त्रीय भाषेंत ध्यान असें ह्मणतात. ध्यान व प्रेम यांत कांहीं फरक नाहीं.

नेफिसा—" असें आहे तर, ज्याच्यावर आपलें प्रेम असेल त्यालाच आत्मसमर्पण करावें, त्याच्या अंतःकरणाशीं आपलें अंतःकरण एकरूप करावें, आणि त्याचेंच एकनिष्ठेनें ध्यान करावें, म्हणजे झालें ! "

कल्याणसिंह—"आत्मसमर्पण हें कोणत्याहि बाबतींत सारखेंच कठिण आहे ! मग पतिवंचना करून धर्म आणि नीति उल्लंघन करण्यांत काय फायदा ? हें पहा, मजवर तुझें अत्यंत प्रेम आहे ! तूं सर्व संपत्तीवर लाथ मारून मजबरोबर देशत्याग करण्यास तयार आहेस ! किंबहुना, मजबरोबर भिक्षा मागण्यासहि तूं मागेंपुढें पहाणार नाहींस ! इतके असह्य कष्ट सोसून तूं मला आत्मसमर्पण करण्यास सिद्ध झाली आहेस; पण पतीला आत्मसमर्पण करण्यास तुला याच्या शतांश तरी कष्ट पडतील का ? "

नेफिसा—" पण त्यांच्यावर माझें प्रेम नाहीं ! "

कल्याणसिंह—" हा तुझा निवळ भ्रम आहे ! प्रत्येक वस्तूच्या बाबतींत भ्रमात्मक व प्रेमात्मक असें दोन प्रकारचें ज्ञान संभवतें. भ्रमनिरास झाला म्हणजेच यथार्थ ज्ञान होत असतें ! त्याचप्रमाणें माझ्या-

विषयींचा तुझा भ्रम नष्ट झाला म्हणजे तुला माझ्या म्हणण्याची सत्यता पटेल ! माझ्या सहवासाविषयीं तूं अत्यंत अधीर आणि उत्सुक झाली आहेस ! तर ये ! मला गाढ आलिंगन देऊन सुखी हो पाहूं ! ”

कल्याणसिंहाची अनुमति मिळतांच नेफिसानें एकदम उठून कल्याणसिंहाच्या गळ्यास मिठी घालून त्याला गाढ आलिंगन दिलें आणि त्याच्या गुलाबी गालाचें आपल्या बिंबाधरानें यथेच्छ चुंबन घेतलें.

कल्याणसिंह नेफिसाला आपल्याजवळ बसवून म्हणाला—“ कसें काय ? ”

नेफिसा—“ आतां माझें पूर्ण समाधान झालें ! ”

कल्याणसिंह—“ सुंदर स्त्रिये, तुझा हा आनंद किती भ्रमात्मक व क्षणभंगुर आहे हें तुला आतां दाखवितों ! ”

कल्याणसिंहानें आपल्या डोकीचा फेटा काढून बाजूस ठेवला, अंगांतील पायघोळ झगा काढून टाकला आणि आपला विस्तृत कृष्णकेशकलाप झाडून पाठीवर मोकळा सोडला. अंगरख्याच्या आंत असलेली रेशमी साडी, कंचुकीनें अवगुंठित उन्नत वक्ष प्रदेश, आणि मृदुल सतेज केशकलाप दृष्टीस पडतांच नेफिसा बेगम एकदम चकित झाली आणि दचकून उठून दूर उभी राहून पर्यंकस्थित रम्यरमणीमूर्तीकडे तरल दृष्टीनें पाहूं लागली.

कल्याणकुमारी हंसून म्हणाली—“ बेगमसाहेब, भिऊं नका ! मीं कोणी सैतान नसून आपल्यासारखीच मानवी स्त्री आहें ! आतां तरी तुमचा मोह दूर झाला का ? ”

नेफिसाबेगम लज्जित होऊन अधोवदन उभी होती. ती कल्याणकुमारीकडे चकित दृष्टीनें पहात हळूच म्हणाली—“ मोह दूर झाला, पण तुम्ही खरोखर कोण आहां, मानवी स्त्री आहां कीं परस्तानच्या परी आहां, हें मला अद्यापि कांहीं समजत नाहीं ! ”

कल्याणकुमारी—“ बेगमसाहेब, मीं खरोखरच आपल्यासारखी मानवी स्त्री—राजकन्या आहें ! पवित्र प्रेमभावनेविषयीं आपली जी भलतीच समजूत झाली होती, ती दूर करण्याकरितां मला इतकी

खटपट करावी लागली. आतां तरी तुम्हांला प्रेमाचें यथार्थ ज्ञान झालें का ? ”

नेफिसा—“ होय, तुमचें सर्व भाषण माझ्या अंतःकरणांत पूर्णपणें बिंबलें आहे ! माझें अज्ञान दूर झालें ! पतीवर एकनिष्ठ प्रेम करणें हेंच पत्नीचें कर्तव्य, अशी माझी खात्री झाली ! तथापि मला आणखी एक शंका आहे. मी आपल्या पतीवर एकनिष्ठ प्रेम ठेवलें, आणि त्यांनीं त्या प्रेमाचा अनादर केला तर माझ्या मनाला समाधान किंवा सुख कसें होणार ? ”

कल्याणकुमारी—“ ही तुमची भावना स्वार्थपर आणि क्षुद्र आहे ! बेगमसाहेब, प्रेम करण्यांत जें सुखसमाधान आहे तें प्रेम करून घेण्यांत मुळींच नाहीं, अशी तुमची अनुभवानेंच खात्री होईल ! ”

नेफिसा—“ अहाहा ! माझी अशी समजूत जर पूर्वींच पडली असती, तर माझ्या हातून परपुरुष ध्यानाचें पातक कधींच घडलें नसतें ! राजकुमारी, तुम्ही माझ्या गुरु आहां ! योग्य उपदेश करून माझा तुम्ही उद्धार केला आहे ! आतां ह्या घडलेल्या पातकाचें प्रायश्चित्त सांगा. तें मीं करण्यास तयार आहें ! ”

कल्याणकुमारी—“ह्या गोष्टीचें नित्यस्मरण ठेवा, बाह्य स्वरूपानें मोहित होऊं नका, आणि पति हाच देव मानून त्याच्यावर पूर्ण निष्ठा ठेवा, हेंच ह्या पातकाचें प्रायश्चित्त ! ”

नेफिसा—“ बरें, पण आपण हा पुरुषवेष कां धारण केला आहे ? आणि आपलें खरें स्वरूप फूलवालीला माहीत आहे का ? ”

कल्याणकुमारी—“ छे छे, ही गोष्ट माझ्या गुरूवांचून दुसऱ्या कोणासहि माहीत नाहींत आणि तिची परिस्फुटता होऊं नये अशीच माझी इच्छा आहे ! मी एका विशेष महत्त्वाच्या हेतूनें हें वेषांतर केलें आहें. तो हेतु मी आपल्याला केव्हां आणखी तरी विदित करीन ! बरें, येऊं तर आतां ? ”

नेफिसा—“पुन्हां केव्हां येणार ? आपल्या सहवासांत मला जो आनंद होतो, तो इतर कोणत्याहि गोष्टीनें होणें शक्य नाहीं ! आपल्याजवळ पर-

बाना आहेच ! आपल्या वेषांतराची परिस्फुटता कधींहि होणार नाहीं ! मग येणार ना ? ”

कल्याणकुमारी—“ ठीक आहे ! सवड झाली कीं मी येईन ! ”

कल्याणकुमारीनें पुनरपि कल्याणसिंहाचा वेष परिधान केला, आणि नेफिसाबेगमेचा प्रेमपूर्वक निरोप घेऊन, तो तेथून निघून आपल्या वाड्यांत परत आला.

---

# प्रकरण १० वें



## शेवटचा उपाय.



खंडणीच्या बाक्या भरण्यासाठीं जमीनदारांनीं मागितलेली मुदत पुरी होऊन गेली; तथापि बाक्या चुकत्या झाल्या नाहींत. दिल्लीच्या बादशहाकडे खजिना पाठविण्याचा समय जवळ आला. नबाबानीं रेझाखानास खजिन्याची भरती करण्याविषयीं तगादा लाविला. तेव्हां क्रूर रेझाखानाच्या राक्षसी अत्याचारांना अधिकच ऊत आला. दुर्दैवी जमीनदारांचा अमानुष छळ होऊं लागला. बिचाऱ्या जमीनदारांच्या हालांचें वर्णन ऐकून लोकांच्या अंगावर शहारे येऊं लागले. पण कोणाचा कांहीं इलाज नव्हता.

एके दिवशीं दोनप्रहरीं जमनिदारांच्या वैकुंठवासाची व वेत्राघाताची बातमी कल्याणसिंहाच्या कानावर आली. अत्याचारांचें व आपल्या परम पूज्य वृद्ध पित्याच्या दुःस्थितीचें भीषण दृश्य त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. त्याला वाड्यांत बसून चैन पडेना, म्हणून तो बाहेर पडून वेड्या सारखा रस्त्यारस्त्यांनीं भटकत फिरूं लागला.

कांहीं वेळानें कृष्णनगरचे युवराज रघुराम समोरून येतांना कल्याणसिंहाच्या दृष्टीस पडले. त्यांच्याजवळ जाऊन त्यांचा हात धरून

कल्याणसिंह दीन स्वरानें ह्मणाला—" युवराज, कोठें गेलां होतां ? काय विशेष खबर ? "

रघुराम—" खबर कशाची ! कल्याणसिंह, आमचे पिताजी आणि गोष्ठविहारचे राजे यांना वैकुंठवास आणि वेत्राघात असह्य झाले ! त्यांचीं शरीरें रक्तबंबाळ झालीं ! त्यांना बेशुद्ध स्थितींतच कारागृहाकडे परत नेण्यांत आलें ! आणखी पुष्कळ जमीनदारांचीहि अशीच शोचनीय अवस्था झाली ! त्यांचे हृदयद्रावक आर्तस्वर—"

कल्याणसिंहाच्यानें पुढें ऐकवेना. रघुरामाकडे एकवार तिरस्कारानें अवलोकन करून तो तेथून झटकन निघून गेला व आपल्या वाड्यांत परत आला. "ह्या पोराला खचित वेड लागलें आहे!" असें आपल्याशींच पुटपुटत रघुरामहि आपल्या वाड्याकडे चालता झाला.

त्याच दिवशीं सायंकाळीं नडियाच्या राजाच्या वाड्यांत सर्व बंदीवासी जमीनदारांचे मुखत्यार व राजपुत्र यांची गुप्तसभा भरण्याचा निश्चय ठरला. त्याप्रमाणें सर्व मंडळी नडियाच्या राजप्रासादांत नियमित वेळीं एकत्र जमून, अत्याचारांच्या प्रतिकारास व जमीनदारांच्या मुक्ततेस काय उपाय करावा, याविषयीं विचार करूं लागली.

कोणी म्हणाले, " ह्या पाशवीय अत्याचारांची समग्र हकीगत लिहून त्यांचा तात्काल प्रतिकार करण्याविषयीं एक विनंतिअर्ज सर्वांच्या सह्यांनिशीं दिल्लीच्या बादशहाकडे ताबडतोब रवाना करावा."

त्यावर दुसऱ्या कित्येकांनीं अशी सूचना केली कीं, अर्जाचा कांहीं उपयोग होणार नाहीं ! पूर्वी अनेक वेळां असे अर्ज पाठविले आहेत, परंतु त्यांपासून कांहींच फलप्राप्ति झाली नाहीं. त्यापेक्षां प्रत्येक जमिनदाराचा एकेक प्रतिनिधि घेऊन, त्या सर्वांनीं दिल्लीस जावें, आणि बादशहाची समक्ष भेट घेऊन त्यांच्या चरणीं ही अमानुष छलाची सविस्तर हकीगत निवेदन करावी, आणि ह्याचा सत्वर बंदोबस्त करण्याची प्रार्थना करावी, म्हणजे कांहीं तरी दाद लागेल !"

आणखी कांहींजणांनीं अशी कल्पना काढिली कीं, " हे अत्याचार तत्काळ बंद झाले नाहींत तर, आम्हांला जहागिरीची जरूर नाहीं

असें ह्मणून सर्वांनीं बादशहापुढें आपापल्या जमीनदारीचे राजीनामे सादर करावे ! ”

कल्याणसिंह एकदम उठून आवेशयुक्त वाणीनें म्हणाला—“ बांधवहो, ह्या तुमच्या सर्व कल्पना फोल आहेत ! ह्यापैकीं एकाहि उपायाचा यत्किंचित् देखील उपयोग होणार नाहीं, हें मी खचित सांगतों ! हे मुसलमान लोक आपला देश सोडून इतके दूर आमच्या देशांत आले आहेत, ते धर्मप्रसाराकरितां आले नसून आमच्या देशांतील संपत्ति लुटून चैन करण्याकरितां आले आहेत ! त्यांच्यापासून न्यायाची आणि भूतदयेची अपेक्षा करणें वेडेपणाचें आहे ! बादशहाला पैसा पाहिजे आहे व त्यांचा यवन अधिकाऱ्यांवर पूर्ण विश्वास आहे ! जमीनदारांवर कोणत्याहि प्रकारें अत्याचार करू नये, असा बादशहा कधींहि हुकूम देणार नाहीं. आणि जरी कदाचित् त्यानें तसा हुकूम दिला, तरी नबाबासारखे अधिकारी आणि रेझाखानासारखे त्यांचे हस्तक, बादशहाची अशी समजूत करून देतील, कीं, हे जमीनदार लोक मोठे हरामखोर आहेत, त्यांच्या जवळ पैसा असतांना ते लबाडीनें बादशाहि खंडणी देत नाहींत, अर्थात् त्यांना खंडणी देणें भाग पाडल्या वांचून त्यांच्याकडून वसूल होण्यास मार्गच नाहीं ! अशा स्थितींत बादशहाला आपल्या अधिकाऱ्यांचें म्हणणें खरें वाटेल कीं, जमीनदारांचें रडगाणें खरें वाटेल, याचा तुम्हींच विचार करा ! ”

कल्याणसिंहाचें हें स्पष्ट भाषण ऐकून सर्व लोक चकित मुद्रेनें त्यांच्याकडे पाहूं लागले. थोड्या वेळानें कांहींजण हळूच म्हणाले—“ तर मग ह्याला कांहींच उपाय नाहीं का ? ”

कल्याणसिंह—“ ह्याला एकच उपाय आहे ! वंग-जमीनदारांचे पुत्र आणि कामगार हीं जिवंत माणसें आहेत, त्यांच्या अंगीं पौरुष आहे, त्यांच्या हातांत अद्यापि शस्त्रधारण करण्याचें सामर्थ्य आहे, अशी यवनांची खात्री पटली तरच ह्या भीषण अत्याचारांचा बंदोबस्त होईल ! ”

ह्यावर नडियाचे दिवाण म्हणाले–“ छे छे, ह्याचा परिणाम अगदींच विपरीत होईल ! हल्लीं बहुतेक जमीनदार नबाबाच्या कैदेंत आहेत. अशा स्थितींत त्यांच्या लोकांनीं विद्रोह केल्याचें ह्यांना समजतांच, ते

एकदम सर्व जमीनदारांची कत्तल उडवतील! मग आपण शस्त्र उचल-ल्याचा उपयोग काय?"

कल्याणसिंह—" तेवढ्या गोष्टीचा बंदोबस्त मी करितों! एका रात्रींत सर्व जमीनदारांना बंधमुक्त करून मुरशिदाबादेच्या सीमेबाहेर पोंचविण्याची जबाबदारी मी एकटा आपल्या शिरावर घेतों! पण बाकीची सगळी तजवीज करण्याची तुम्हां सर्वांची तयारी असली पाहिजे!"

कल्याणसिंहाचे हे विलक्षण शब्द ऐकतांच सर्व लोक विस्मयचकित दृष्टीनें त्याच्याकडे पहात राहिले. नडियाचे दिवाण हळूच म्हणाले— "तरुण राजकुमार, तूं हें अशक्य कार्य कसें करूं शकणार? आणि आम्ही तयारी कसली करावयाची?"

कल्याणसिंह—" माझें वचन खरें करण्याचें माझ्या अंगीं पूर्ण सामर्थ्य आहे, हें मी परमेश्वराच्या साक्षीनें निश्चित सांगतों! ह्यापेक्षां अधिक स्पष्ट खुलासा करण्याची माझी इच्छा नाहीं! परंतु तुम्ही सर्वांनीं आपापलें सर्व सैन्यबल, सर्व धनसंपत्ति आणि सर्व युद्धसामग्री एकवटून, आपल्या राजांचें संरक्षण करण्याची प्रतिज्ञा केली पाहिजे, तरच मी माझें वचन खरें करीन! आपणा सर्वांपुढें मूठभर मुसलमानांचा किती वेळ टिकाव लागणार आहे? पाहतां पाहतां सर्व अविंधांचा नायनाट करून आपल्या मातृभूमीला त्यांच्या असह्य जाचांतून मुक्त करूं! म्हणा तर हरहर महादेव!"

कल्याणसिंहाचें हें भयंकर भाषण ऐकून सर्व मंडळी भयभीत होऊन गेली. कांहीं तरुण राजपुत्र एकदम उठून ओरडले—" हां हां, अविचारी तरुणा, जीभ आंवर! तुझे हे मूर्खपणाचे उद्गार जर बाहेर कोणाच्या कानावर गेले, तर आम्हांपैकीं एकाचाहि प्राण राहणार नाहीं!"

कल्याणसिंह—" असल्या दुर्दशेंत देखील जिवंत राहण्याची तुह्मांला इच्छा आहे काय? तुमचे अन्नदाते, तुमचे जन्मदाते, यवनांच्या वेत्राघातांनीं जर्जर व रक्तबंबाळ होऊन मुमूर्षु स्थितींत बेशुद्ध पडले असतां, तुमची जगण्याची आशा आणि मरणाची भीति सुटत नाहीं! धिक्कार असो असल्या जीवनाला!"

ह्यावर कोणीच कांहीं उत्तर दिलें नाहीं. सर्वजण परस्परांच्या कानास लागून एकेकानें सभास्थानांतून काढता पाय घेतला.

सर्व मंडळी निघून गेल्यावर नडियाचे दिवाण कल्याणसिंहाचा हात धरून हळूच म्हणाले—" राजपुत्रा, तुम्ही सूचना अमलांत आणण्यास हा काल अनुकूल नाहीं! योग्य परिस्थिति येईपर्यंत यवनांचा जुलूम मुकाट्यानें सहन करण्यावाचून गत्यंतर नाहीं! यासाठीं फार विचारानें वाग आणि असे अविचाराचे उद्गार आपल्या तोंडांतून पुन्हां बाहेर काढीत जाऊं नको!"

कल्याणसिंह—" वंगवासीयांच्या ह्या मनोदौर्बल्यामुळेंच त्यांना ही पशुतुल्य गुलामगिरी प्राप्त झाली!"

कल्याणसिंह निराश होऊन विमनस्क स्थितींत आपल्या वाड्यांत परत आला. त्याला रात्रभर झोंप आली नाहीं. पुढें काय करावें, ह्या विचाराची तीव्र तळमळ त्याच्या अंतःकरणास एकसारखी लागून राहिली होती. शेवटीं प्रभातसमयीं त्याच्या मनाचा एक निश्चय ठरला.

प्रातःकालीं कल्याणसिंह शिरोमणीपंडितास बोलावून म्हणाला—" गोष्ठविहाराहून खजिना येण्याची आतां आशा दिसत नाहीं. मग येथें राहून काय करावयाचें? दादा तर ह्या वेळीं भलत्याच नादास लागला आहे! आपण गोष्ठविहारास परत जाऊन खंडणीची रकम जमविण्याची कांहीं तरी तजवीज करूं या. त्यावांचून बाबांची मुक्तता होणें शक्य नाहीं! तुम्ही सर्व मंडळीसह आतांच्या आतांच एका नौकेंतून पुढें व्हा. मी आज सायंकाळीं दुसऱ्या नौकेंतून निघून तुह्मांला येऊन मिळेन! आटपा लवकर!"

शिरोमणी—" तुम्ही एकाकी मागें राहून काय करणार?"

कल्याणसिंह—" दुसरें कांहीं नाहीं, मी बाबांची भेट झाल्यास घेऊन त्यांना आश्वासन व धीर देऊन मग निघणार! हं! उठा लवकर! व्यर्थ विलंब करूं नका! माझी नौका सायंकाळीं तयार ठेवण्यास नावाड्यांस सांगा!"

शिरोमणी—" पहा बरें! ह्या यवन राजधानींत तुम्ही एकाकी राहणें अत्यंत धोक्याचें आहे! फार विचारानें आणि सावधगिरीनें वागा, म्हणजे झालें!"

कल्याणसिंहानें किंचित् हास्य केलें. शिरोमणी-पंडितांनीं सर्व नोकर

लोकांना ताबडतोब निघण्याची तयारी करण्यास आज्ञा केली. सर्वांनाच घरीं परत जाण्याची उत्कंठा असल्यामुळें तयारीला फार वेळ लागला नाहीं. दोनप्रहरच्या आंत सर्व मंडळी स्वदेशाकडे रवाना झाली.

सायंकाळपर्यंत कल्याणसिंह वाड्यांतून मुळींच बाहेर पडला नाहीं. दिवे लावणीच्या सुमारास तो अगदीं साध्या वेषानें बाजारांत गेला आणि त्यानें यवन सैनिकाचा एक पोषाख खरेदी करून आणिला.

मध्यरात्रीच्या सुमारास कल्याणसिंहानें आणिलेला यवनी पोषाख अंगावर घातला, आणि तो थेट मुसलमान सैनिक बनला. नंतर नबाबी परवाना खिशांत घालून व कपडे वगैरे सामानाचें एक लहानसें बोचकें हातांत घेऊन तो वाड्यांतून बाहेर पडला. कांहींसा दूर गेल्यावर त्याला रिकामी भाडोत्री गाडी भेटली. ती थांबवून त्यानें गाडीवानाशीं भाड्याचा ठराव केला, आणि चटकन् गाडींत बसून तुरुंगाकडे गाडी वळविली.

तुरुंगाजवळ येताच कल्याणसिंह गाडींतून उतरून तुरुंगाच्या दरवाज्याजवळ गेला आणि त्यानें दरवाज्यावर थाप मारली.

" कोण ? " असें पहारेवाल्यानें आंतून हाटकताच, " मीं महमद रेझाखानसाहेबांचा सेवक आहें, तुरुंगदरोग्यांस त्यांचा महत्त्वाचा निरोप कळवावयाचा आहे, झटकन दार उघड आणि दरोगेसाहेबांना बोलावून आण ! " असें अस्सल मुसलमान भाषेंत कल्याणसिंहानें उत्तर दिलें.

पहारेवाल्यानें दरवाजा उघडला. मुसलमान सैनिकास पहातांच त्यानें त्याला सलाम करून आंत बोलाविलें आणि आपल्या देवडीवर बसवून घेऊन, आपल्या सोबत्यास दरोगेसाहेबांकडे पाठविलें.

थोड्याच वेळांत दरोगेसाहेब डोळे चोळीत व जांभया देत देवडीवर येऊन दाखल झाले. कल्याणसिंहानें त्यांना अदबीनें सलाम केला, तेव्हां ते म्हणाले—" रेझाखानसाहेबांकडून तुम्ही आलां आहां काय ? त्यांचा काय हुकूम आहे ? तुमच्याजवळ त्यांनीं कांहीं पत्र वगैरे दिलें आहे का ? "

कल्याणसिंहानें नबाबी परवाना खिशांतून काढून दरोग्याला दाखविला. दरोग्यानें तो परवाना ओळखून त्याला अत्यंत नम्रतापूर्वक

कुर्निस केला. नंतर तो कल्याणसिंहास विनयपूर्वक म्हणाला–" खान-साहेबांचा हुकूम तामिल करण्यास बंदा तयार आहे ? त्यांची काय आज्ञा आहे ?"

कल्याणसिंह—" गोष्ठविहारच्या राजाला बंधमुक्त करून ताबड-तोब माझ्या स्वाधीन करा ! त्याला खानसाहेबांपुढें हजर करावयाचें आहे ! "

दरोग्यानें तत्काळ आपले लोक पाठवून वृद्ध गोपीकृष्णरायांच्या बिड्या काढून त्याला कल्याणसिंहापुढें आणून उभें केलें. बापाची दुर्दशा अवलोकन करून कल्याणसिंहाचें हृदय भरून आलें, तथापि मोठ्या प्रया-सानें आत्मसंयमन करून तो ह्मणाला–" तुह्मांला खानसाहेबांच्या महाला-पर्यंत चालत जातां येईल का ?"

गोपीकृष्णराय क्षीण कंपितस्वरानें म्हणाले–" नाहीं बाबा, मला नुसतें उभें रहाण्याचें देखील सामर्थ्य उरलेलें नाहीं ! "

कल्याणसिंह–" ठीक आहे ! मीं गाडी आणिली आहे, त्यांत बसून चला ! तुह्मांला खानसाहेबांनीं बोलाविलें आहे ! "

गोपीकृष्णराय अतिशय घाबरून गेले. अपरात्रीं रेझाखान आपला आणखी काय छल करणार आहे कोण जाणे, अशी त्यांना धास्ती पडली. तथापि निरुपाय असल्यामुळें ते कांपत कांपत मुकाट्यानें कल्या-णसिंहाबरोबर निघाले. दरोग्याचा निरोप घेऊन कल्याणसिंह गोपीकृष्ण-रायांसह तेथून निघाला आणि दोघेहि गाडींत बसल्यावर कल्याणसिंहाच्या सूचनेप्रमाणें गाडी भर वेगानें चालती झाली.

कैद्याकरितां रेझाखानानें मुद्दाम गाडी कशी पाठविली, अशी कल्पना मनांत येऊन दरोग्याला थोडी शंका आली. तथापि नवाबी परवान्या-पुढें त्याचा कांहीं इलाज नव्हता. तरी पण हा शिपाई कैद्याला घेऊन कोठें जातो व काय करितो हें गुप्तपणें पाहून खबर देण्यासाठीं त्यानें आपला एक मनुष्य गाडीच्या पाठोपाठ दवडला.

कल्याणसिंहाची गाडी गंगातीरीं पोंचतांच दोघेहि गाडींतून उतरले. गाडीवानास निरोप देऊन ते एका झाडाखालीं आले. तेथें नौका तया-रच होती. दोघेहि नौकेंत बसतांच नावाड्यांनीं नौका हाकारली.

इतक्यांत दरोग्याचा सेवक गंगातीरीं येऊन दाखल झाला. गाडीवान मोकळी गाडी घेऊन परत गेलेला त्याला आढळला, व एक नौका झपाट्यानें गंगाप्रवाहांतून चाललेली त्याच्या दृष्टीस पडली. त्यावरून शिपाई व कैदी त्या नौकेंतूनच गेले असावे, असें त्यानें अनुमान केलें परंतु नौकेवर नबाबी निशाण नसल्यामुळें, ती नौका सरकारी नव्हे अशी त्याची खात्री झाली. त्यावरून त्यालाहि संशय आला, आणि दरोग्यास हें वर्तमान कळविण्याकरितां तो त्याच पावलीं परत निघाला.

दरोग्यास ही बातमी कळतांच तो अतिशय घाबरला. आतां महमद रेझाखान आपल्याला जिवंत ठेवणार नाहीं, अशी त्याला भीति पडली आणि त्यानें आपल्या हाताखालच्या कामगाराबरोबर आणखी कांहीं लोक देऊन, त्यांना आपल्या ताब्यांतील सरकारी मचवा घेऊन त्या दोघांचा ताबडतोब पाठलाग करावयास आणि त्यांना पकडून आणावयास हुकूम केला. अर्थात् कल्याणसिंहाच्या नौके मागून थोड्याच वेळानें हा सरकारी मचवा त्यांच्या पाठलागास अत्यंत वेगानें निघाला.

कृष्णाष्टमीची रात्र असल्यामुळें चंद्र नुकताच उदय पावला होता. कल्याणसिंहाचें लक्ष मागें होतेंच ! कांहीं वेळानें हिरव्या बावट्याचा एक मचवा मोठ्या त्वरेनें आपल्या मागून येत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर खरा प्रकार चटकन् त्याच्या लक्षांत आला. त्यानें समोर पाहिलें तों थोड्याच अंतरावर गंगातीरीं एक दाट जंगल त्याच्या दृष्टीस पडलें. त्यानें नावाड्यांस त्या जंगलाजवळ आपली नौका तीरास लावावयास सूचना केली. त्याप्रमाणें नौका तीरास लागतांच कल्याणसिंह गोपीकृष्णरायांसह जमीनीवर उतरला आणि त्यानें नावाड्यांस पुन्हां आपली नौका गोष्ठविहाराकडे पूर्ण वेगानें हाकारण्यास सांगितलें. मागून येणाऱ्या सरकारी मचव्यानें त्यांना गांठून विचारल्यास, " मुखत्याराच्या हुकमाप्रमाणें आम्ही गोष्ठविहारास खजिना आणण्याकरितां जात आहों, " असें सांगावयास बजावलें. नौका पुढें निघून गेल्यावर गोपीकृष्णरायास एका मोठ्या वृक्षाआड बसवून कल्याणसिंह गंगाप्रवाहाकडे पहात एका वृक्षछायेखालीं उभा राहिला.

कांहीं वेळानें नबाबी मचवा तेथें आला आणि नौका वेगानें पुढें

चाललेली पाहून झपाट्यानें पुढें निघाला. कल्याणसिंहानें एक दीर्घ निश्वास सोडला आणि तो गोपीकृष्णरायांचा हात धरून हळू हळू जंगलांतून मार्ग काढीत पुढें चालता झाला.

---

# प्रकरण ११ वें.



## वनवास.



शुभ्र चंद्रकिरण वृक्षांतरलांतून मार्ग काढून भूप्रदेशाचा आश्रय करीत होते. नील आकाशांत तेजस्वी तारका मोठ्या दिमाखानें चमकत होत्या. मंद मारुतलहरी नानाप्रकारचे वन्यसुगंध दशदिशांना उधळीत होत्या. सृष्टिदेवी ह्याप्रमाणें सुप्रसन्न होती तरी, वृद्ध गोपीकृष्णरायांच्या निराश व भयविव्हल अंतःकरणावर कांहींच सुपरिणाम होणें शक्य नव्हतें. थोडा वेळ आपल्या सहचराबरोबर हळू हळू मार्गक्रमण केल्यावर गोपीकृष्णराय मटकन् खालीं बसला आणि आपल्या बरोबरच्या यवन सैनिकाकडे दीन मुद्रेनें पहात म्हणाला—" बाबा, आतां माझ्यानें एक पाऊलहि चालवत नाहीं ! रेझाखानानें मला गंगेंत बुडविण्याचा हुकूम दिला असेल, आणि लवकरच माझ्या सर्व हालअपेष्टांचा शेवट होऊन मी एकदांचा ह्या दुःखमय संसारांतून मुक्त होईन, अशी मला आशा वाटत होती; पण तीहि निराशा झाली ! आतां मला कोठें घेऊन जाणार ? व आणखी काय छळ करणार ? हाय ! हाय ! ह्या काळीं वंग देशांत जन्मास येणें, आणि विशेषतः जमीनदाराच्या कुलांत उत्पन्न होणें, ह्यासारखें महत्पाप कोणतेंहि नसेल ! ह्यापेक्षांहि मी एखाद्या दरिद्र्याच्या पोटीं आलों असतों, तर खुशाल भिक्षा मागून सुखानें राहिलों असतों ! अहो, खानसाहेब, तुम्हांला माझी कांहींच दया येत नाहीं का ! "

कल्याणकुमारीला आतां धीर निघेना. तिनें डोकीवरील मुसलमानी

पगडी व कृत्रिम दाढीमिशा काढून टाकून गोपीकृष्णरायांचे घट्ट पाय धरले, आणि त्यावर उष्ण अश्रुजलाचा वर्षाव करीत ती गद्गदस्वरानें ह्मणाली—" बाबा, बाबा, क्षमा करा! मी आपली दुर्दैवी कन्या कल्याणी आहे! मला आपण अद्यापि ओळखलें नाहीं का? "

गोपीकृष्णराय आश्चर्यानें स्तंभित झाले. त्यांनीं दोहों हातांनीं कल्याणकुमारीचें मस्तक वर उचलून, तिच्या तोंडाकडे चकित दृष्टीनें पाहिलें. त्यांना तत्काळ ओळख पटली. त्याबरोबर त्यांनीं तिला पोटाशीं धरून तिच्या मस्तकाचें अवघ्राण केलें. त्यांच्याहि नेत्रांतून अश्रुप्रवाह वाहूं लागला.

कांहीं वेळानें गोपीकृष्णरायांच्या मनांत एक शंका येऊन, ते किंचित् मागें सरून कल्याणकुमारीकडे स्थिर दृष्टीनें पहात म्हणाले—" कल्याणी, पोरी, तूं ह्या राक्षसी यवन प्रदेशांत कशी आलीस? तूंहि नबाबाच्या अत्याचारांस बळी पडलीस काय? तुला ह्या दुष्ट यवनांनीं धर्मनीतीपासून भ्रष्ट केलें काय? अरेरे! असें असेल, तर ही दुर्भाग्याची परमावधि पाहण्यास मी कशाला जगलों! "

कल्याणकुमारी—" बाबा, बाबा, शांत व्हा! अशी भलतीसलती शंका मनांत देखील आणूं नका! आर्य कुलवतीचें पातिव्रत्य भ्रष्ट करण्याची प्रत्यक्ष काळाचीहि छाती नाहीं! मग ह्या नीच यवनांची कथा काय? मी आपल्या संरक्षणाखालीं जितकी पवित्र होतें, तितकीच आतांहि आहें हें, मी आपले पाय स्मरून सांगतें! "

कल्याणकुमारीचें निश्चित भाषण ऐकून गोपीकृष्णरायांचें समाधान झालें. नंतर कल्याणकुमारीनें गोष्ठविहाराहून निघाल्यापासून आतांपर्यंतची सर्व हकीगत आपल्या प्रिय पित्यास सविस्तर निवेदन केली. ती ऐकून गोपीकृष्णरायांस साभिमान कौतुक वाटलें. आपल्या लाडक्या कन्येचें प्रेमभरानें चुंबन घेऊन ते म्हणाले—" शाबास, कल्याणी, पुत्राच्या हातून देखील जी गोष्ट होणें शक्य नव्हतें, ती तूं कन्या असून केलीस! धन्य धन्य आहे तुझी! तथापि तूं हें अविचाराचें कृत्य केलेंस! "

कल्याणकुमारी—" बाबा, परमपूज्य पित्याचा अमानुष छळ मुलांच्यानें पाहवेल काय? त्यापेक्षां पुढें वाटेल तो परिणाम झाला तरी बेहेत्तर, पण

ह्या अत्याचारांतून पित्याची मुक्तता करणें हें आपलें आद्य कर्तव्य होय, असा विचार करून मीं हें धाडस केलें ! "

गोपीकृष्णराय—" पण ह्याचा परिणाम अनिष्ट होणार ! आम्ही स्वदेशीं परत गेलों, तर यवन अधिकारी आपल्याला तत्काळ धरून नेऊन फांशी देतील ! बरें स्वदेशीं न जातां कोठें तरी छपून राहिलों, तर बिचाऱ्या गोविंदरामाला पकडून कैदेंत ठेवितील, आणि घरदार लुटून जहागीरहि जप्त करितील ! शिवाय माझें हें जीर्ण शरीर अंतर्बाह्य इतकें क्षतविक्षत होऊन गेलें आहे कीं, ह्यांतून बरा होण्याची किंवा फार दिवस जगण्याची मलाहि आशा उरलेली नाहीं ! "

कल्याणकुमारी—" बाबा, जसजसें अदृष्टांत असेल, तसतसें घडून येईल ! त्याबद्दल आतां काळजी कशाला करितां ? सध्यां यवनांच्या असह्य अत्याचारांतून तुमची मुक्तता झाली आहे ! आतां आपण उभयतां कोठें तरी गुप्तपणानें कांहीं दिवस राहूं या, आणि तुमची प्रकृति दुरुस्त झाल्यावर मग पुढचा विचार ठरवूं ! आतां माझ्या खांद्यावर भार घालून हळू हळू चला. जवळच कोठें तरी एखादें गांव असेल असें वाटतें. तेथेंच तूर्त कांहीं काळ आपण मुक्काम करूं ! "

कल्याणकुमारीनें पुन्हां डोकीवर पगडी घातली, दाढीमिशा बसविल्या आणि बापाचा हात धरून ती हळू हळू पुढें निघाली. कांहींसें पुढें गेल्यावर त्यांना एक जीर्ण देवालय दिसलें. देवालय फार प्राचीन पण अगदीं मोडकळीस आलेलें दिसत होतें. त्याच्या सभोंवती आम्र, वट, अश्वत्थ वगैरे मोठमोठ्या वृक्षांची गर्द झाडी होती. हें एकांतस्थान रिकामें असल्यास आपल्याला थोडे दिवस गुप्तपणें राहण्यास सोईचें होईल, असा विचार कल्याणकुमारीच्या मनांत आला, व तो तिनें गोपीकृष्णरायांस निवेदन केला. नंतर बापास एका वृक्षाखालीं बसवून, ती एकटीच मंदिर पहावयास गेली. मंदिरास द्वार मुळींच नव्हतें, तथापि आंतील व बाहेरील जागा स्वच्छ दिसत होती. कल्याणकुमारीनें आंत डोकावून पाहिलें, तों एका कोपऱ्यांत धुमी पेटलेली तिच्या दृष्टीस पडली; ह्या सर्व चिन्हांवरून, येथें कोणाचें तरी वास्तव्य असावें अशी तिची

खात्री झाली. अर्थात् येथें राहण्याचा विचार रहित करून ती परत निघाली. इतक्यांत, " कोण आहे ? " असा आंतून गंभीर ध्वनि आला.

" मीं एक प्रवासी आहें ! " कल्याणकुमारीनें भीत भीत उत्तर दिलें.

" प्रवासी ! आणि अशा अपरात्रीं ह्या निर्जन वनांत कां ? " असें म्हणून एक व्यक्ति मंदिराच्या दाराशीं आली.

स्वच्छ चंद्रप्रकाशांत त्या व्यक्तीची भव्य शरीराकृति, शुभ्र जटादाढी, भस्मलेपित तनु व रुद्राक्षमाळा दृष्टीस पडतांच, हे कोणी तरी तपस्वी योगी आहेत अशी कल्याणकुमारीची खात्री होऊन, तिनें त्यांच्यापुढें साष्टांग नमस्कार घातला.

योगी कल्याणकुमारीकडे चौकस दृष्टीनें पहात चकित स्वरानें म्हणाला—" तरुणा, तुझा वेष तर यवन सैनिकासारखा दिसतो, आणि तूं नमस्कार कसा करितोस ? तूं कोण आहेस आणि येथें कां आला आहेस ? "

कल्याणकुमारी—" योगीमहाराज, आपण देवासारखे पूज्य व दयाळू आहां ! हा माझा छद्मवेष आहे ! आम्ही मोठ्या संकटांत आहों ! आपण अभय देत असाल तर सर्व निवेदन करीन ! "

योगी—" मी राजा नव्हे किंवा राजाचा अधिकारीहि नव्हे ! एक तपस्वी बैरागी आहें ! माझ्यापासून भय तरी कसलें आणि अभय तरी कसलें ? तथापि तुजवर कोणतें संकट आहे, तें इच्छा असल्यास सांग. मला कांहीं परिहार सुचल्यास मी तुला आनंदानें मदत करीन ! "

कल्याणकुमारी—" महाराज, तपःसामर्थ्यानें आपण राजापेक्षांहि श्रेष्ठ आहां ! मी व माझा वृद्ध पिता यवनांच्या कैदेंतून पळून आलों आहों ! आम्ही ब्राह्मण आहों ! आम्हांला आपण कृपा करून आपल्या जवळ कांहीं काळ आश्रय द्याल तर, आमच्यावर अनंत उपकार होतील. " असें म्हणून कल्याणकुमारीनें कृत्रिम दाढीमिशा काढून टाकल्या.

कल्याणकुमारीचें सुंदर सुकुमार मुखकमल पाहून योगी हंसून म्हणा-

ला—"येथें रहाण्याची तुमची इच्छा असेल तर खुशाल रहा! माझी कांहीं हरकत नाहीं! पण हें स्थान तुह्मांला सुरक्षित होईल असें मला वाटत नाहीं! जा लवकर, तुझ्या पित्याला घेऊन ये."

कल्याणकुमारी योग्याला पुनः प्रणाम करून परत गेली, आणि पित्याचा हात धरून त्याला हळू हळू मंदिराकडे घेऊन आली. योग्यानें त्यांना मंदिरांतील एका बाजूची जागा दाखविली, आणि धुमीला आणखी लांकूड लावून मोठा जाळ केला, त्या उजेडांत योगी त्या उभतांकडे निरखून पहात कल्याणकुमारीस म्हणाला—"मुली, तूं आणि तुझा पिता असाधारण सन्मान्य व्यक्ति दिसतां! तुम्ही नबाबाच्या अत्याचारांनीं जर्जर झालां आहां असें वाटतें. तर तुमची सर्व खरी हकीगत मला सांग पाहूं!"

कल्याणकुमारी—योगिराजांच्या दिव्यज्ञान दृष्टीपुढें कोणतीहि गोष्ट छपून रहाणें शक्य नाहीं! मी कित्येक दिवस मुरशिदाबादेस पुरुषवेषानें वावरत असतां मला कोणींहि ओळखलें नाहीं, पण महाराजांनीं खरी स्थिति तत्काळ जाणली!"

योगी—"स्त्रीपुरुषांमधील पार्थक्य नुसत्या बाह्य वेषांत नसून, त्यांच्या शिराशिरांत देखील फरक असतो, हें सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करणाऱ्या कोणाहि मनुष्यास सहज कळविण्यासारखें आहे. त्याला दिव्य ज्ञानाचीच गरज आहे असें नाहीं. असो. तुझें इतिवृत्त सांग. तें ऐकण्याची मला फार उत्कंठा लागली आहे!"

कल्याणकुमारीनें आपला संपूर्ण इतिहास योग्याला सविस्तर निवेदन केला. आणि गोपीकृष्णरायांनींहि रेझाखानाच्या क्रूर अत्याचारांची हकीगत सांगितली.

योगी बराच वेळ आत्मगत विचार करून गंभीर स्वरानें म्हणाला—"कल्याणकुमारी, यवनांच्या जाचांतून तूं आपल्या पित्याचा उद्धार केलास, हें तूं मोठेंच धाडसाचें व पराक्रमाचें कृत्य केलेंस खरें! पण त्यामुळें तुह्मांवर दुसरें महत्संकट उत्पन्न झालें! नबाबाचे लोक तुमच्या तपासास चहूंकडे फिरूं लागतील, तुमची जहागीर जप्त होईल, नबाबासारख्या प्रबल शत्रूशीं टक्कर देऊन आत्मसंरक्षण करण्याचें सामर्थ्य

तुमच्या छोटेखानी संस्थानाच्या अंगीं असणें शक्य नाहीं. ह्या प्रसंगीं दुसरे कोणी संस्थानिक तुम्हांला आश्रय देतील किंवा साह्य करतील, ही आशाच नको! बंगवासी संस्थानिकांना एकजुटीनें व सहकारितेनें काम करण्याची अक्कल नाहीं! ती असती तर त्यांना यवनांचें दास्य कां पतकरावें लागतें? अशा स्थितींत तुम्ही पुढें काय करणार?"

कल्याणकुमारी—"आत्मोद्धाराची आशाच नसेल, तर आम्हांला ती जहागीरहि नको, आणि संसारहि नको! आम्ही उभयतां आपली सेवा करून, योगाभ्यासांत उरलेलें आयुष्य घालवूं म्हणजे मानवजन्माचें सार्थक तरी होईल!"

योगी हंसून म्हणाला—"मुली, तूं अजून तरुण आहेस! योगाभ्यास फार कठिण आहे! त्याला अगोदर पूर्ण वैराग्य अंतःकरणांत बाणावें लागतें! तुझ्या हातून इतक्यांतच योगाभ्यास होणें शक्य नाहीं! आतां मी सांगतों असें करा! येथून जवळच गंगातीरीं उदयग्राम नांवाचें छोटें शहर आहे. ती वडनगरचा राजा उदयनारायण याची जन्मभूमि आहे. उद्यां राजा उदयनारायणाचा वाढदिवस असल्यामुळें, तो आपल्या जन्मभूमीची पूजा करण्याकरितां उदयग्रामास आला आहे. उदयनारायण राजा मोठा बलाढ्य असून मुरशिदकुलीखानाच्या दरबारीं त्याचें उत्तम वजन आहे. राजा जातीनें ब्राह्मण असून, दयाळू, उदार व धर्मशील आहे. कल्याणकुमारी, तूं अशाच पुरुषवेषानें उद्यां सकाळीं उदयग्रामास जाऊन राजाची भेट घे, आणि त्याला आपली सर्व खरी हकीगत सांग, म्हणजे तो तुम्हांला आश्रय देईल—इतकेंच नव्हे, पण नबाबाकडे खटपट करून तुम्हांला माफीहि मिळवून देईल, असें मला वाटतें!"

कल्याणकुमारी—"आपल्या आज्ञेप्रमाणें करण्यास मीं तयार आहें, पण राजाजवळ माझी दाद कशी लागेल, आणि त्यांना माझी कर्मकथा ऐकून घेण्यास केव्हां सवड मिळेल! शिवाय बाबा अतिशय क्षीण झाले आहेत, त्यांना येथेंच ठेवून मी गेलें, आणि मला तिकडे एक दोन दिवस रहावें लागलें तर बाबांची शुश्रूषा कशी होईल!"

" योगी–" राजाकडे तत्काळ दाद लागण्यासाठीं मी एक खूण देतों. मजवर राजाची पूर्ण भक्ति आहे. माझी खूण पोंचतांच तो तुझी सर्व हकीगत ऐकून घेईल. पित्याविषयीं तूं कांहीं काळजी करूं नको. तूं परत येई पर्यंत मी त्यांची योग्य शुश्रूषा करीन ! "

कल्याणकुमारी—" पण राजानें आम्हांस आश्रय देण्याचें नाकारलें तर ? "

" योगी–" मग दुसरा कांहीं तरी विचार करतां येईल. बुडत्या माणसानें काडीचादेखील आश्रय करावयास आळस करूं नये ! "

गोपीकृष्णराय खिन्न स्वरानें म्हणाले—" कल्याणी, बाळ, आतां हे कष्ट पुरे झाले. राजकुलांत जन्म घेऊन, भिकाऱ्यासारखा दारोदार आश्रय मागण्याचा तुजवर प्रसंग यावा, यापेक्षां दुर्दैव तें कोणतें ? अशा लाजिरवाण्या जिण्यापेक्षां मरण काय वाईट ? चल, आपण दोघेंहि एकदम गंगाप्रवेश करून ह्या सर्व दुःखांतून मुक्त होऊं या ! "

कल्याणकुमारीचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. तिच्या तोंडून एकहि अक्षर निघेना. योगी गोपीकृष्णरायास म्हणाले—" रायजी, आपण वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध आहां ! मीं आपणांस सांगावें असें नाहीं. स्वतःचा प्राण देऊन दुःखमुक्त होणें हें मानवजन्माचें खरें सार्थक नव्हे ! मनुष्याला आपल्या कुटुंबाचें, आपल्या समाजाचें, आपल्या देशाचें कांहीं कर्तव्य ह्मणून असतें. तें त्यानें योग्य रीतीनें बजावलें तरच त्याच्या जन्माचें साफल्य झालें ! असे निराश होऊन भलताच अविचार मनांत आणूं नका. ईश्वरावर भार ठेवा. तो सर्व संकटें दूर करण्यास समर्थ आहे ! "

योगाच्या ह्या भाषणानें गोपीकृष्णरायाचें मन बरेंच शांत झालें. नंतर कल्याणकुमारी म्हणाली—" राजा उदयनारायणाचें नेहमींचें वास्तव्य कोठें असतें ? "

योगी—" उदयग्रामापासून जवळच वडनगर येथें त्यांची मुख्य राजधानी आहे. शिवाय वीरकिटी, देवीनगर इत्यादि चार पांच ठिकाणीं त्यांचीं राजकीय ठाणीं आहेत. त्या प्रत्येक ठिकाणीं मजबूत किल्ले, भरपूर युद्धसामग्री आणि सुसज्ज सैन्य असा पूर्ण बंदोबस्त असतो.

राजा कधीं राजधानींत, कधीं उदयग्रामीं किंवा कधीं एखाद्या राजकीय ठाण्यांत वास्तव्य करितो. उद्यांचा मुक्काम उदयग्रामीं आहे मोठा सुयोगच म्हणावयाचा !"

नंतर योग्यानें एका शुष्क भूर्जपत्रावर सांकेतिक भाषेत कांहीं मजकूर लिहून तें कल्याणकुमारीच्या स्वाधीन केलें. पहाट होतांच योग्यानें सांगितलेल्या दिशेनें कल्याणकुमारी यवनसैनिक वेषानें उदयग्रामाकडे चालती झाली.

---

## प्रकरण १२ वें.



### याचना.



उदयग्राम आज प्रभातकालापासूनच दशदिशांनीं मुखरित झालें होतें. राजप्रासादासमोरील पटांगणांत कुंकुमाचे सडे व पंचरंगी रांगोळ्या घालण्यांत आल्या होत्या. जिकडे तिकडे ध्वजपताका व मंगलमय पुष्पपल्लवांचीं तोरणें उभारलीं होतीं. नगारखान्यावर चौघडे झडूं लागले होते. दीनदुबळ्या याचकांना यथास्थित धर्म मिळाल्यामुळें ते अंतःकरणपूर्वक राजाला शुभाशीर्वाद देत होते. दूरदूरचे निमंत्रित विद्वान पंडित राजवाड्यांत एकत्र जमले होते. वास्तुपूजा व होमहवनाची तयारी करण्यांत उपाध्यायांची धांदल उडाली होती. सूर्योदयापूर्वीच मंगलस्नान करून व देवब्राह्मणांना वंदन करून राजा उदयनारायण पूजास्थानीं आला. पूजा व होमहवनादी विधि भक्तिपूर्वक मोठ्या समारंभानें यथासांग संपादन झाल्यावर ब्राह्मणांना दक्षिणा व संभावना देऊन संतुष्ट करण्यांत आलें. आणि दोनप्रहरीं सर्व जातींच्या संपूर्ण प्रजाजनांस मुक्तद्वार भोजन घालण्याचीही सिद्धता झाली.

पूजासमारंभ आटोपल्यावर ब्राह्मणांचा आशीर्वाद व देवतांचा तीर्थ-

प्रसाद घेऊन राजा उदयनारायण आपल्या महालाकडे निघाला; इतक्यांत एक सेवक पुढें येऊन प्रणाम करून नम्र स्वरानें म्हणाला—
" महाराज, एक मुसलमान तरूण आला असून, सरकारची तावडतोब भेट घेण्याविषयीं फार आग्रहपूर्वक विनंति करीत आहे ! तो बहुतकरून नबाबसाहेबांकडील कोणी कामगार असावा ! "

राजा—" ठीक आहे ! मी महालाच्या मागील उद्यानांत आहें. त्याला तिकडे पाठवून दे. "

उद्यानाच्या मध्यभागीं असलेल्या संगमरवरी चबूतऱ्यावरील मृदु सुखासनावर राजा उदयनारायण अर्धशयानस्थितींत आराम करीत असतां, कल्याणकुमारी यवन वेषानें तेथें आली. तिनें राजाला नम्रपणें प्रणाम करून योग्यानें दिलेलें भूर्जपत्र त्याच्यापुढें ठेविलें. राजानें भूर्जपत्रावरील मजकूर वाचून तें वंदन करून मस्तकास लावलें.

भूर्जपत्रावर मजकूर असा होता—" हें भूर्जपत्र घेऊन येणारी वेषधारी तरुणी आपल्याला स्वतःची हकीकत गुप्तपणें निवेदन करणार आहे. तिची हकीकत साग्र ऐकून घेऊन, आपल्या इच्छेस व विचारास येईल तसें करावें. त्या बाबतींत माझा कोणत्याही प्रकारें आग्रह नाहीं; मात्र तिचा वृत्तांत श्रवण करण्यास विलंब करूं नये.

योगानंद स्वामी.

राजा उदयनारायण कल्याणकुमारीकडे पाहून स्मितपूर्वक म्हणाला—
" मुली, तुझा हा छद्मवेष आतां काढून ठेव. आणि मोकळ्या मनानें तुझी सर्व हकीकत सांग ! गुरुमहाराजांच्या आज्ञेप्रमाणें तुझा वृत्तांत ऐकून घेण्यास मी तयार आहें ! "

कल्याणकुमारीनें तत्काळ एका झाडाआड जाऊन यवनवेष काढून ठेविला, आणि आपल्या साडीचा पदर नीट सरसावून घेऊन, ती राजा उदयनारायणासमोर मर्यादेनें बसली, तिचें अप्रतिम लावण्य पाहून वृद्ध उदयनारायण देखील चकित झाला. आणि अपत्यस्नेहपूर्णदृष्टीनें तिच्याकडे पहात मृदुस्वरानें म्हणाला—" मुली तूं सामान्य स्त्री नसून थोर व कुलीन दिसतेस ! तुझ्या सांप्रतच्या स्थितीवरून तुजवर कांहीं तरी संकट आलें असावें, आणि त्या कामीं माझें तुला साह्य पाहिजे असावें,

असें माझें अनुमान आहे ! भिऊं नको. तूं आपला वृत्तांत मला सांग. मी तुला शक्य ती मदत करीन. कांहीं काळजी करूं नको ! "

राजाच्या आश्वासनपर शब्दांनीं कल्याणकुमारीला बराच धीर आला. तिनें आपली व आपल्या पित्याची सर्व हकीगत राजाला सविस्तर निवेदन केली. नंतर ती म्हणाली—" महाराज, माझा पिता आपल्यासारखाच एक ब्राह्मण जमीनदार आहे ! यवनांच्या अत्याचारापासून त्याचे प्राण वांचविण्याकरितां मीं हा साहसाचा प्रयत्न केला आहे ! आतां आम्हांला आश्रय देऊन आमचा प्रतिपाल करण्यास आपल्यावांचून कोणीं समर्थ नाहीं. म्हणून आम्ही आपला आश्रय मागण्यास आलों आहों ! "

कल्याणकुमारीचें साहस व चातुर्य श्रवण करून राजाला अत्यंत कौतुक वाटलें. तथापि नबाब विद्रोही माणसांना आश्रय देणें किती धोक्याचें आहे, हाही विचार त्याच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं. बराच वेळ विचार करून राजा गंभीरस्वरानें म्हणाला—" मुली, तूं आपल्या आपत्यधर्मास आणि पितृभक्तीस अनुरूप असें आपलें कर्तव्य केलेंस, यांत शंका नाहीं ! पण अशा बिकट परिस्थितींत तुम्हांला आश्रय देणें हें सोपें काम नाहीं ! नबाबाच्या अवाढव्य सामर्थ्यापुढें आमचा टिकाव लागणें शक्य नाहीं ! तुम्हांला आश्रय दिल्यास तुमच्यासह आमचाही नाश होण्याचा संभव आहे ! "

कल्याणकुमारी—" महाराज, आम्ही बंडखोर नाहीं ! नबाबाशीं आम्हीं द्रोह केलेला नाहीं ! अत्याचारांस भिऊन प्राण वांचविण्याकरितां आम्ही पळून आलों, हा मोठासा अपराध नव्हे ! आपण खटपट केल्यास नबाबसाहेब आम्हांला ह्या अपराधाबद्दल माफी देखील करतील ! "

राजा आणखी कांहीं वेळ विचार करून म्हणाला—" ठीक आहे. मुली, तूं आतां गुरुमहाराजांच्या आश्रमांत परत जा. मी उद्यां वडनगरास परत जाणार आहें. तूं आपल्या पित्यासह तेथें येऊन भेट. मग विचार करून काय तें ठरवूं ! "

कल्याणकुमारीः—" तेथें राजवाड्यांत माझी दाद कशी लागेल ? आपल्यापर्यंत माझा प्रवेश कसा होईल ? "

राजा आपल्या हातांतील मुद्रांकित आंगठी काढून कल्याणकुमारीच्या हातीं देऊन म्हणाला—" ही आंगठी दाखीव म्हणजे तुला कोठेंही प्रतिबंध होणार नाहीं ! "

कल्याणकुमारी ती अंगठी घेऊन राजास प्रणाम करून दीनमुद्रेनें त्याच्याकडे पहात करुणस्वरानें म्हणाली—" महाराज, आम्ही जमीनदार असतांना या विषमप्रसंगीं दीन असहाय्य होऊन आपल्या चरणाजवळ आश्रय मागत आहों, ह्या गोष्टीचा दयार्द्र अंतःकरणानें विचार करावा एवढीच प्रार्थना आहे ! "

कल्याणकुमारीच्यानें पुढें बोलवेना. ती अश्रुपूर्ण नेत्रांनीं राजाचा निरोप घेऊन तेथून निघाली, आणि पुनः यवनवेष परिधान करून वाड्यांतून बाहेर पडून योग्याच्या आश्रमाकडे चालती झाली.

कल्याणकुमारीची करुणमुद्रा अवलोकन करून राजा उदयनारायणाचेंहि अंतःकरण अस्वस्थ झालें. तो एकटाच पुष्कळ वेळ विचार करीत तेथें बसला होता. शेवटीं भोजनाची सिद्धता झाल्याची वर्दी आल्यावर तो महालांत निघून गेला. कल्याणकुमारीची करुणकहाणी ऐकून राजाचें मन जें एकदां खिन्न व विचारमग्न झालें, तें सायंकाळच्या दीपोत्सवानें किंवा नृत्यगायनादि मनोरंजक गोष्टींनींहि पुनरपि उल्लसित झालें नाहीं.

कल्याणकुमारीनें अरण्यांतील जीर्णमंदिरांत परत येऊन योग्याला सर्व हकीगत निवेदन केली, आणि राजाची मुद्रिकाहि दाखविली.

योगी आनंदानें म्हणाला—" आतां तुह्मांस काळजी करण्याचें कारण नाहीं. राजा उदयनारायण तुम्हांला आश्रय देईल, आणि नबाबाकडून क्षमाहि मिळवून देईल असें वाटतें ! "

गोपीकृष्णराय सर्व वृत्तांत ऐकून खिन्नस्वरानें म्हणाले—" दुसऱ्याच्या आश्रयाला आणि त्यांच्या कृपेवर अवलंबून जीवित कंठणें किती लाजिरवाणें आहे ! "

योगी—" रायजी, यवनांचे वेत्राघात सोशीत, त्याच्या कारागृहांत दिवस घालविण्यापेक्षां आपल्याच जातीधर्माच्या व आपल्याबरोबरीच्या राजाच्या आश्रयास राहणें बरें नव्हे काय ? "

गोपीकृष्ण—" ईश्वराच्या मनांत आमची आणखी काय काय विटंबना करावयाची आहे कोणास ठाऊक ! "

योगी—" छे, छे, महाराज, तुमच्यासारख्या सुज्ञांनीं आपल्या कर्मभोगाबद्दल ईश्वराला दोष देणें योग्य नव्हे ! "

गोपीकृष्ण—" पण कर्ता करविता व बुद्धिदाता परमेश्वरच आहे ना ! तो जशी आम्हांला वासना देईल, जशीं आमच्या हातून कर्में घडवील तशीं घडणार. मग त्या कर्मांची जबाबदारी आमच्यावर कां ? "

योगी—" ही तुमची मोठीच गैरसमजूत आहे ! ईश्वर कार्यकारणातीत आहे ! तो स्वतः कांहीं करीतहि नाहीं किंवा दुसऱ्याकडून कांहीं करवीतहि नाहीं. हा सारा प्रकृतीचा खेळ आहे ! संसारमग्न लोक प्रकृतिवश होऊन जीं कर्में करितात, त्यांचीं फळें त्यांना जन्मोजन्म भोगावीं लागतात. त्यांत ईश्वराचा काय संबंध ? ह्या विकट प्रकृतिबंधांतून मुक्त होण्यासाठींच परमेश्वराचें ध्यान आणि भजनपूजन करावयाचें ! "

ह्याच विषयावर आणखी पुष्कळ वेळ उभयतांचा वादविवाद झाल्यावर गोपीकृष्णरायांची समजूत पटली, आणि त्यांचें पूर्ण समाधान झालें. बापाचा व योग्याचा हा वादविवाद ऐकून कल्याणकुमारीचें मन इतकें तल्लीन झालें कीं, रात्रभर तेच विचार तिच्या अंतःकरणांत घोळत राहिल्यामुळें तिला झोंप देखील आली नाहीं.

पहाटेच्या तासभर रात्रीस योगी जवळच्या पुष्करणींतून स्नान करून आले; तेव्हां कल्याणकुमारी चटकन उठून त्यांना प्रणाम करून नम्रस्वरानें ह्मणाली—" गुरुमहाराज, मला ज्ञानाचा आणि योगाचा उपदेश देऊन कृतार्थ करावें; आणि आपल्या सेवेस ठेवून घ्यावें ! मला आतां ह्या ऐहिक सुखदुःखांचा वीट आला आहे ! "

योगी हंसून म्हणाले—" बाई, तुला ह्या ज्ञानमार्गाला लावण्यास अद्यापि थोडा अवकाश आहे ! जगांत अजून तुझें कांहीं कर्तव्य उरलें आहे ! तें पूर्ण झाल्यावर मी तुला पुन्हां एकवार भेटेन आणि त्या वेळीं तुला योग्य मार्ग दाखवीन ! "

कल्याणकुमारीचा निरुपाय झाला. ती उठून नित्य कर्में संपादन करू लागली. योग्यानें आणून दिलेल्या वनस्पतींचें औषध तयार करून तिनें

सापास दिलें, अरण्यांतून कंदमुळें आणून तीं भाजून व शिजवून सर्वांच्या भोजनाची तयारी केली. ह्याप्रमाणें तो दिवस पितापुत्रींनीं त्या अरण्यांतील एकांत जीर्णमंदिरांत योगानंद-स्वामींच्या सान्निध्यांत शांततेनें घालविला.

दुसरे दिवशीं सुप्रभातीं योगानंदस्वामींचा आशीर्वादपूर्वक निरोप घेऊन, आपल्या पित्यासह कल्याणकुमारी आपल्या नैसर्गिक स्त्रीवेषानें अरण्यांतून निघाली आणि वडनगराकडे चालती झाली. दोन दिवसांच्या पूर्ण विश्रांतीनें व योग्याच्या औषधोपचारानें गोपीकृष्णरायांची प्रकृति कांहींशी सुधारली असून, हळू हळू प्रवास करण्याइतकी त्यांच्या अंगीं शक्तिहि आली होती.

---

# प्रकरण १३ वें.



## आश्रय लाभ.



मुरशिद-कुलीखानानें राज्य व्यवस्थेच्या व वसुलाच्या सोईकारितां वंग देशाचे तेरा परगणे केले होते. त्यांपैकीं राजशाही परगणा सर्वांत विस्तृत, सुसंपन्न व विशेष लोकवस्तीचा होता. हल्लींचा मुरशिदाबाद जिल्हा, वीरभूम जिल्हा व सांताळ परगणा ह्यांतील बहुतेक प्रदेश त्या काळीं राजशाही परगण्यांत मोडत असे. हा राजशाही परगणा पद्मानदीच्या दोन्ही तीरांनीं पुष्कळ लांबपर्यंत पसरलेला होता. ह्या समृद्ध व विस्तृत प्रदेशाचा जहागीरदार राजा उदयनारायण होता.

राजा उदयनारायण शांडिल्यगोत्री ब्राह्मण होता. त्याची पत्नी श्रीमतीदेवी ही गणकरचे भरद्वाजगोत्री ब्राह्मण जमीनदार घनःश्यामराय यांची कन्या होती. उदय नारायणाचें वय ह्या वेळीं सुमारें चाळीस वर्षांचें होतें. त्याला एक पुत्र व दोन कन्या अशीं तीन अपत्यें होतीं.

राजपुत्र साहेबराम ह्याचें वय हल्लीं २०।२१ वर्षांचें होतें. त्याच्या दोघी बहिणी त्याच्याहून लहान होत्या.

राजा उदयनारायणाचें राजधानीचें शहर 'वडनगर' हें भागीरथीच्या पश्चिमतीरावर वसलेलें होतें. ह्या शहरांत ह्या काळीं व्यापाराची अत्यंत भरभराट होती. दूरदूरचे सर्वप्रकारचे व्यापारी येथें येऊन उदीमव्यवहार करीत असत. गंगातीरीं मजबूत किल्ला असून त्यांत भव्य, विस्तृत व मनोहर राजवाडा होता. तेथेंच राजाचें वास्तव्य असे.

उदयग्रामाहून परत आल्यावर दोनप्रहरीं भोजनोत्तर राजा आपल्या महालांत पर्यंकावर एकटाच विचार करीत पडला होता. कांहीं वेळानें राणी श्रीमतीदेवी महालांत आली; पण राजा विचारमग्न स्थितींत असल्यामुळें, त्याचें राणीकडे लक्ष गेलें नाहीं. तेव्हां राणी विनीतस्वरानें ह्मणाली—" इतका गहन विचार कसला चालला आहे ? तबकांत विडे करून ठेवले आहेत, त्यांतला एकहि विडा घेतलेला दिसत नाहीं ! इतकेंच काय, पण मीहि जवळ येऊन उभी राहिलें, तरी देखील तें आपणास समजलें नाहीं, असला काय गहन विचार पडला आहे ? "

राजा वक्रदृष्टीनें राणीकडे पाहून पर्यंकावर उठून बसून किंचित् हास्यपूर्वक म्हणाला—" होय ! विचार तर गहन खराच ! "

राणी पर्यंकाजवळ उभी राहून लडिवाळस्वराने ह्मणाली—" राजकारणांतलें एखादें गहनगूढ असलें तर, मजसारख्या अज्ञान अबलेला कशानें समजणार ? "

राजा—" खरेंच ! राजनीतींतील मोठा विकट प्रश्न आहे ! "

राणी—" मग तो येथें महालांत कशाला ? दरबारांत त्याचा विचार झाला म्हणजे वृद्ध मंत्री आणि शहाणे मुत्सद्दी यांची योग्य सल्ला-मसलत तरी मिळेल ! "

राजा—" तसा तो उघड चर्चेचा प्रश्न नाहीं ! त्याचा ऊहापोह प्रथम एकांति अंतःपुरांतच झाला पाहिजे ! "

राणी—" सांगावा तर मग असा कोणता विकट प्रश्न येऊन पडला आहे तो ! "

राजा—" काल उदयग्रामांत प्रासादोपवनांत बसलों असतां, एक तरुण स्त्री मजकडे आली, आणि दनिमुद्रेनें व करुणस्वरानें माझा आश्रय मागूं लागली."

राणी—" कोण ती? आणि बिचारीवर संकट तरी काय आलें होतें?"

राजा—" ती गोष्ठविहारचे राजे गोपीकृष्णराय यांची कन्या कल्याणकुमारी! तिच्या बापाला खंडणीच्या बाकीबद्दल नबाबाच्या अधिकाऱ्यांनीं कैदेंत ठेवून त्याचे अतिशय हालहाल चालविले होते. कल्याणकुमारीनें मोठ्या धाडसानें व चातुर्यानें पित्याला गुप्तपणें बंधमुक्त करून त्याच्यासह ती पळून आली आहे; पण आतां नबाबाच्या लोकांच्या हातीं लागल्यास फांशीं जावें लागेल ह्या भितीनें ती मला शरण येऊन माझा आश्रय मागत आहे!"

राणी—" मग? त्यांत एवढा विचार कसला पडला आहे? शरणांगतास आश्रय देणें हा तर मुख्य गृहस्थधर्मच आहे! त्यांतहि गोपीकृष्णराय जातीचे ब्राह्मण आणि आपल्या बरोबरीचे जमीनदार! त्यांना तर अवश्य आश्रय दिला पाहिजे!"

राजा—" हें नीतिशास्त्र मलाहि मान्य आहे! पण ही गोष्ट इतकी सुलभ नाहीं! नबाबासारख्या प्रबल प्रतिस्पर्ध्याशीं वैर जोडण्याचा प्रसंग आहे! याचा विचार करावयास नको का?"

राणी—" तो विचार मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें ठरवावा! त्यांत मला काय समजणार? पण शरणागताचें रक्षण हेंच आर्यधर्मांतील मुख्य कर्तव्य अशी माझी समजूत आहे!"

राजा—" माझेंहि मत तसेंच आहे आणि तदनुकुलविचार करण्याकरितांच आज सायंकाळीं मंत्रिमंडळाची खासगी सभा मीं बोलाविली आहे! जें करावयाचें तें सर्वांच्या अनुमतानें करणें विशेष श्रेयस्कर!"

राजाचा निश्चय ऐकून राणीला संतोष झाला. नंतर आणखी कांहीं वेळ गप्पागोष्टी झाल्यावर उभयतांहि आपापल्या नित्य कार्यास निघून गेलीं.

सायंकाळीं खासगी दरबारमहालांत राजाज्ञेप्रमाणें सेनापति गुलाब-

महमद, दुय्यम सेनाध्यक्ष कालिया जमादार विनोदलाल, पंडित पूर्णानंद तर्करत्न व युवराज साहेबराम हे एकत्र जमले. नियमित वेळीं राजा उदयनारायण तेथें येऊन दाखल झाल्यावर दरबारच्या कामास सुरुवात झाली.

प्रथमतः राजा उदयनारायण यानें, गोष्ठविहारचा राजा गोपीकृष्णराय व त्याची कन्या कल्याणकुमारी यांचा साद्यंत वृत्तांत सर्वांस थोडक्यांत निवेदन केला. नंतर तो म्हणाला—" उभयतां पितापुत्री माझा आश्रय मागत आहेत. अशा स्थितींत त्यांना आश्रय द्यावा कीं नाहीं याबद्दल विचार करण्याकरितां आज तुम्हां सर्वांना येथें बोलाविलें आहे. तर त्या उभयतां याचकांची स्थिति, आपलें सामर्थ्य, नबाबाची सत्ता आणि नीतिदृष्ट्या कर्तव्याकर्तव्य इत्यादि सर्व गोष्टींचा पूर्ण विचार करून, प्रत्येकानें आपापलें स्पष्ट मत कळवावें. सर्वानुमतें जें योग्य ठरेल तेंच करावयाचें ! "

राजाचें भाषण ऐकून सर्व मंडळी बराच वेळ विचारमग्न झाली. नंतर तर्करत्न गंभीर स्वरानें म्हणाले—" महाराज, शरणागताचें रक्षण करणें हा तर सनातनधर्मच आहे ! परंतु साध्यासाध्य विचार अवश्य केला पाहिजे. शरणागतांस आश्रय दिल्यानें स्वतःच्या सुरक्षितेस बाध येत नसेल, तर त्यांना अवश्य आश्रय द्यावा. पण त्यांत स्वतःलाच धोका येण्याचा संभव असेल तर त्या कामांत पडूं नये, हें उत्तम ! "

साहेबरामः—" पंडितजी, आश्रयप्रार्थी जनांनीं हा साध्यासाध्य विचार अगोदरच केलेला असतो ! धनकनकसंपन्न, सैन्यसामंतयुक्त, समृद्धिशाली, विस्तृत राजशाही संस्थानचे अधिपति, महाराज उदयनारायण यांच्या आश्रयाची प्रार्थना त्यांनीं कांहीं अविचारांनीं केलेली नाहीं ! "

पुत्राचें भाषण ऐकून राजाला आनंद झाला, आणि त्यानें साभिमान व सप्रेम दृष्टीनें युवराजाकडे अवलोकन केलें.

पंडित तर्करत्न पुढें म्हणाले—" युवराज, आपलें म्हणणें यथार्थ आहे ! पण मला असें वाटतें कीं, गोष्ठविहारचे राजे व राजकन्या हे नबाबाचे अपराधी असल्यामुळें, त्यांना उघडपणें आश्रय देऊन नबाबाशीं वैर संपादन करणें योग्य नाहीं ! नबाबांच्या अवाढव्य सामर्थ्याचा

विचार केला असतां, ही बलिष्टाशी स्पर्धा होत असल्यामुळें, न्याय-संमत नाहीं!"

साहेबराम--"पंडितजी, तुमचें हें स्वार्थपरन्यायशास्त्र उदारधी आणि दयाधर्मनिष्ठ महाराजांस खचित पटणार नाहीं! ऐश्वर्य, संपत्ति, हय, हस्ती, दुर्ग, प्राकार, सैन्य, सामंत, इत्यादि सरंजाम केवळ शोभे करितांच काय? अत्याचारजर्जर झालेल्या एका सन्मान्य व्यक्तीचा देखील परामर्ष घेतां आला नाहीं, तर येवढ्या मोठ्या अवडंबरांचा उपयोग तरी काय?"

पुत्रास नेत्रसंकेतानें स्वस्थ करून राजा सेनापतीकडे वळून म्हणाला-"सेनापति, तुम्ही राज्याचे मुख्य आधारस्तंभ! तुमच्या पराक्रमावर आमची सारी भिस्त! अर्थात तुमचें मत विशेष महत्त्वाचें आहे! ह्या बाबतींत तुमचा काय विचार आहे?"

गुलाबमहमद—"सरकार, बंदा हुकमाचा ताबेदार आहे! नबाब माझ्या जातीचे असले तरी त्यांच्याशीं माझा कांहीं संबंध नाहीं! हा देह सरकारच्या अन्नानें वाढला आहे तो सरकारच्या सेवेंतच खर्चीं पडावयाचा आहे! विधर्मी ह्मणून सेवकावर अविश्वास करण्याचें कारण नाहीं! हा निमकहलाल सेवक फक्त अन्नदात्याची आज्ञा जाणतो! धर्म, जाति, नीति, कांहीं जाणत नाहीं! तथापि दीन अनाथांचें रक्षण करणें हा समर्थांचा मुख्य धर्म होय, अशी माझी समजूत आहे!"

विनोदलाल प्रधान—"शरणागताचें रक्षण करणें केव्हांहि अवश्य आहे, तथापि कालपरिस्थितीकडे लक्ष देऊन कर्तव्याची दिशा निश्चित केली पाहिजे! गोष्ठविहारचे राजे व राजकन्या यांना आश्रय देणें भागच आहे, पण आजच उघडपणें नबाबाशीं विरोध उत्पन्न न होईल अशी कांहीं तरी गुप्तपणें तजवीज करावी. नंतर अनुकूल संधि पाहून नबाबांकडून त्यांना माफी मिळविण्याची व्यवस्था पहावी. होतां होईपर्यंत युद्ध प्रसंग उत्पन्न होऊं देऊं नये! आणि इतकेंहि करून लढाईचा प्रसंग न टळल्यास, त्या मार्गानेंहि तयारी ठेवावी. मग कांहींहि परिणाम होवो!"

कालियाजमादार—"सरकार, प्रधानजींची सल्ला मलांदेखील पसंत

आहे ! शरणागताचें रक्षण तर केलेंच पाहिजे ! पण साधल्यास तें गुप्तरूपानें करावें. नच साधल्यास लढाईचा प्रसंग आला तरी आमची तयारी आहे ! ”

पंडित तर्करत्न—“ शरणागताचें रक्षण करण्यास माझी देखील हरकत नाहीं, पण तें विचारानें करावें ! त्यांना आश्रय द्यावा, द्रव्यसहाय करावें, त्यांची खंडणीची बाकी असेल ती सगळी महाराजांनीं पाहिजे तर आपल्या खजिन्यांतून भरावी, शिवाय त्यांच्या गुन्हेगारीबद्दल आणखी दंडहि भरावा, आणि कसेंहि करून नबाबाची व त्यांची एकी करावी; पण युद्धाचा प्रसंग मात्र कदापि आणूं नये. कारण, त्यांत यश येणार नाहीं ! ”

ह्याप्रमाणें ऊहापोह होऊन शेवटीं असें ठरलें कीं, गोपीकृष्णराय व त्यांची कन्या कल्याणकुमारी यांना आश्रय द्यावा, पण त्यांना तूर्त उदयग्रामच्या प्रासादांत ठेवावें; आणि विनोदलाल प्रधानांनीं मुरशिदाबादेस जाऊन त्यांच्या खंडणीची बाकी चुकती करावी व आणखी कांहीं नजराणा देऊन, नबाबाकडून त्यांना क्षमा मिळविण्याचा प्रयत्न करावा, इतक्या उपरहि घटनाचक्र जसें फिरेल तसें होईल ! सेनापतींनीं मात्र युद्धाची सिद्धता जय्यत ठेवावी. असा सर्वानुमतें निश्चय होऊन दरबार बरखास्त झाला.

* * *

सायंकाळीं गोपीकृष्णराय व कल्याणकुमारी वडनगरास येऊन पोचली राजमुद्रा दाखवितांच त्यांचा राजवाड्यांत प्रवेश झाला. राजा राणी, राजपुत्र व राजकन्या ह्या सर्वांनीं त्यांचें मोठ्या आदरानें स्वागत केलें. यांची ती दीन स्थिति अवलोकन करून सर्वांनाच फार दुःख झालें. राजा व राजपुत्र यांनीं गोपीकृष्णरायास पूर्ण अभयपूर्वक आश्वासन दिलें. नंतर त्यांची रहाण्याची व्यवस्था तूर्त उदयग्रामच्या प्रासादांत केली असल्याचें त्यांना कळविण्यांत आलें. राजाच्या ह्या औदार्याबद्दल गोपीकृष्णराय व कल्याणकुमारी ह्या उभयतांनींहि त्याचे अत्यंत आभार मानिले, नंतर सर्वांचीं भोजनें झाल्यावर गोपीकृष्णराय व कल्याणकुमारी विश्रांतीसाठीं स्वस्थानीं गेलीं.

गोपीकृष्णरायांची अगोदरच क्षीण झालेली प्रकृति प्रवासाच्या श्रमानें फारच थकली. त्यामुळें त्यांना रात्रभर झोंप आली नाहीं. अर्थात् कल्याण-कुमारीनेंहि बापाची शुश्रूषा करण्यांत सर्व रात्र जागून काढली. दुसरे दिवशीं पहाटेस त्या उभयतां पितापुत्रींची उदयग्रामास गुप्तपणें रवानगी करण्यांत आली.

अगोदर दूत पाठवून राजानें उदयग्रामप्रासादांत गोपीकृष्णराय व कल्याणकुमारी यांच्या रहाण्याची तजवीज करून ठेविली असल्यामुळें त्यांना तेथें गेल्यावर कोणत्याहि प्रकारें त्रास किंवा गैरसोय उत्पन्न झाली नाहीं. तथापि उभयतांच्याहि अंतःकरणांत शांतता नसल्यामुळें त्यांना बाह्योपचारांनीं सुखसमाधान होणें शक्यच नव्हतें.

दरबारांत ठरल्याप्रमाणें विनोदलाल प्रधान थोड्याच दिवसांत बरोबर बराच मोठा खजिना व लोकांचा सरंजाम घेऊन मुरशिदाबादेकडे रवाना झाले.

---

# प्रकरण १४ वें.



## संशय पिशाच्च.



कल्याणकुमारी आपल्या पित्यासह गंगातीरीं अरण्यांत उतरल्यावर त्यांची नौका पुनः झपाट्यानें पुढें गोष्ठविहाराकडे निघाली. परंतु कांहीं वेळानें त्या नौकेचा पाठलाग करणाऱ्या नवाबी मचव्यानें तिला गांठून थांबविलें. मचव्यांतील यवनकामगारांनीं विजयानंदानें नौकेंत उड्या टाकल्या; पण त्यांचा तो आनंद फार वेळ टिकला नाहीं. कारण, त्यांनीं सर्व नौका धुंडाळली तरी तींत चार नावाड्यांवाचून कोणीहि मनुष्य त्यांना आढळलें नाहीं, तेव्हां ते अगदीं हतबुद्ध झाले.

यवनकामगार संतप्त स्वरानें नावाड्यांस म्हणाला—" गोष्ठविहारचा राजा आणि त्याचा साह्यकर्ता हे कोठें आहेत ? "

नावाडी—" आम्हांला काय ठाऊक ! आमचे महाराज तर मुरशिदाबादेस नबाबसाहेबांच्या कैदेंत आहेत ! "

कामगार—" तुम्ही इतक्या गडबडीनें कोठें निघालां ? "

नावाडी—" महाराजांना मुक्त करण्यासाठीं गोष्ठविहाराहून खजिना आणावयाचा आहे, तो घेऊन या, असें मुखत्यारांनीं सांगितलें, ह्मणून आम्ही गोष्ठविहारास निघालों आहों ! "

कामगार—" तुम्ही लबाड लोक आहां ! गोष्ठविहारच्या राजाला त्याच्या एका तरुण साथीदारानें लबाडीनें तुरुंगांतून सोडविलें, आणि त्या दोघांना तुम्ही घेऊन चाललां होतां ! आम्हांस पाहतांच तुम्ही त्यांना मध्यें कोठें तरी उतरलें असावें हें खचित ! कोठें उतरलें, हें खरें सांगा, नाहीं तर प्राणास मुकाल ! "

नावाडी—" तुम्ही काय म्हणतां, तें आम्हांला कांहींच समजत नाहीं !"

कामगार—" असें काय ? चला तर परत मुरशिदाबादेस ! तुह्मांला महमद रेझाखानसाहेबांपुढें हजर केलें पाहिजे ! "

यवनकामगारांनीं त्या बिचाऱ्या नावाड्यांना कैद करून आपल्या मचव्यावर आणिलें, आणि त्यांची नौका मचव्यास बांधून मचवा परत हांकारला. ते दुसरे दिवशीं पहाटेस मुरशिदाबादेस येऊन पोंचलें, नंतर त्यांनीं त्या नावाड्यांस तुरुंगदरोग्यापुढें नेऊन हजर केलें, आणि घडलेलें सर्व वर्तमान त्यांस साविस्तर सांगितलें.

तुरुंगदरोग्याच्या तोंडचें पाणी पळालें. महमद रेझाखान आपल्याला काय शिक्षा करील कोण जाणें, अशी त्याला धास्ती पडली. तथापि आतां ही गोष्ट गुप्त राखणें श्रेयस्कर नाहीं असा विचार करून, त्यानें तत्काळ महमद रेझाखानाची भेट घेऊन त्याला सर्व वर्तमान निवेदन केलें. तें ऐकून रेझाखानासहि अत्यंत आश्चर्य वाटलें व अतिशय संताप आला. त्यानें तुरुंगदरोग्याची यथेच्छ निर्भत्सना केली; नंतर उभयतांनीं गोष्ठविहार प्रासादाची झडती घेतली, परंतु तेथें संशययुक्त असें कांहींच आढळून आलें नाहीं. मुखत्यार व त्याचे नेहमींचे नोकर एवढेच काय ते प्रासादांत होते. त्यांच्याकडून माहितीहि कांहीं मिळाली नाहीं. नंतर त्यांनीं रात्रीच्या गाडीवाल्याचा तपास करून त्याला हकीगत विचारली. परंतु

' आपण त्या दोघांना गंगातीरीं पोंचविलें. ' यापेक्षां अधिक माहिती त्याला कांहींच सांगतां येईना.

शेवटीं रेझाखान तुरुंगदरोग्यासह नबाबसाहेबांकडे गेले. दरोग्यानें नबाबसाहेबांस सर्व हकीगत सविस्तर निवेदन केली. ती ऐकून नबाबहि आश्चर्यचकित झाले. ' हुजूरनीं असा परवाना कोणास दिला होता का ? ' असें रेझाखानानें विनयपूर्वक विचारिल्यावरून, नबाब मुरशिदकुलीखान कांहीं वेळ विचार करून खिन्नस्वरानें म्हणाले—" होय ! मी माझ्या नेफिसाला असा एक परवाना देऊन ठेविला होता खरा ! पण तो त्या तरुणाच्या हातीं कसा लागला असावा कोण जाणें ! तिच्या दासीपैकीं कोणी तरी तो चोरून नेऊन त्याला दिला कीं काय न कळे ! "

रेझाखान—" त्याचाच प्रथम तपास केला पाहिजे ! गोष्ठविहारच्या राजाचा शोध करून त्याला पकडून आणण्याचीहि तजवीज करितों ! "

उभयतांनींहि नबाबाचा निरोप घेतल्यावर दरोगा आपल्या कामावर निघून गेला व रेझाखान नेफिसा बेगमच्या महालाकडे निघाला. त्याच्या मनांत नानातऱ्हेच्या कल्पना उत्पन्न होऊं लागल्या. नबाबांच्या परवान्या-सारखा महत्त्वाचा कागद दासींच्या सहज हातीं लागण्यासारखा अव्यव-स्थितपणें कोठें तरी टाकण्याइतकी, नेफिसा निष्काळजी नाहीं, अशी त्यांची खात्री होती, त्यावरून हा परवाना तिनेंच कोणास तरी दिला असावा, असें त्याला वाटूं लागलें; गोष्ठविहारचें नांव देखील तिनें कधीं ऐकलें नसेल, अर्थात् गोपीकृष्णरायाविषयीं तिच्या मनांत कळवळा उत्पन्न होऊन त्याची मुक्तता करण्यासाठीं तिनें हा परवाना कोणास दिला असणें शक्यच नाहीं; तर मग दुसऱ्या कोणत्या हेतूनें तो तिनें कोणास दिला असावा, असा विचार करितां करितां शेवटीं नेफिसाच्या पातिव्रत्याविषयीं रेझाखानाच्या प्रक्षुब्ध अंतःकरणांत दृढतर शंका उद्भूत झाली.

कल्याणकुमारीचा सदुपदेश नेफिसाच्या अंतःकरणांत पूर्णपणें ठसला असल्यामुळें, ती आपल्या पतीचें भक्तीपूर्वक ध्यान करण्यांत निमग्न असे. आज आपल्याला पतिदर्शनाचा लाभ होणार, अशी तिला कल्पनाहि नसतां, रेझाखानांची स्वारी महालांत आली असल्याची वर्दी अकस्मात्

तिच्या कानावर आली. नेफिसानें तत्काळ महालांत येऊन पतीचें प्रेमादरपूर्वक स्वागत केलें. पतिदर्शनानें तिचें अंतःकरण आनंदित झालें.

आपली पत्नी नेहमींप्रमाणें आपल्याशीं बेपर्वाईनें न वागतां, आज विशेषच प्रेम व लीनता दाखवीत आहे, असें पाहून रेझाखानाच्या मनांतील कुशंका अधिकच दृढ झाली. तथापि आपल्या मुद्रेवर तसें कांहीं चिन्ह न दाखवितां, रेझाखानानें पत्नीचा हात धरून तिला आपल्याजवळ बसवून घेतलें आणि तिला आलिंगन देऊन एक चुंबनहि घेतलें.

हा अकल्पित प्रेमभर पाहून तर नेफिसाचें अंतःकरण आनंदानें भरून आलें, आणि कल्याणकुमारीच्या उपदेशाचें फळ इतक्या लवकर प्राप्त झाल्याबद्दल तिनें मनांतल्या मनांत कल्याणकुमारीला धन्यवाद दिले.

प्रथम औपचारिक क्षेम कुशल प्रश्नोत्तरें झाल्यावर, रेझाखानानें नवाबसाहेबांच्या परवान्याची गोष्ट काढली. त्यासरशी नेफिसा बेगम एकदम दचकली. त्यामुळें रेझाखानाचा संशय अधिकच दृढतर झाला.

रेझाखान नेफिसाला दूर सारून संतप्त स्वरानें म्हणाला—" नेफिसा, तो परवाना कोठें आहे ? तो आतांच्या आतां मला आणून दाखव ! "

नेफिसा नम्र स्वरानें म्हणाली—" महाराज, तो मी आपल्या एका हिंदु मैत्रिणीला दिला आहे, तिच्याकडून आणवून सायंकाळपर्यंत आपल्याला दाखवीन ! "

रेझाखान—" त्या तुझ्या जिवलग मैत्रिणीचें नांव-गांव, ठावठिकाण सांग पाहूं ! म्हणजे मी आतांच तिला येथें बोलावून आणवितों ! "

नेफिसा—" तिनें मला आपलें नांव गांव सांगितलें नाहीं, आणि मींहि तिला विचारलें नाहीं ! पण त्या परवान्याची आतांच इतकी जरूर काय आहे ! "

रेझाखान—" वाः हा मोठाच चमत्कार ! जिचें नांव देखील तुला माहीत नाहीं, तिच्याशीं तुझा इतका घनदाट स्नेह तरी कसा जमला ! तिच्याशीं तुझी ओळख तरी कशी झाली ! "

नेफिसा—" फुलवालीच्या मार्फत तिची माझी प्रथम ओळख झाली. तिचा सुशील स्वभाव व शुद्ध अंतःकरण पाहून, माझा तिच्यावर विश्वास

बघला, आणि तिला वाटेल तेव्हां माझ्या महालांत बिनहरकत येतां यावें म्हणून मीं तो परवाना तिच्याजवळ देऊन ठेविला आहे ! "

रेझाखान क्रुद्धस्वरानें म्हणाला--" दुष्टे, तूंहि निव्वळ खोटी—बनावट हकीगत रचून सांगून, मला फसविण्याचा प्रयत्न करीत आहेस ! पण मी अशा थापांनीं किंवा तुझ्या लाडीगोडीनें बिलकुल फसणार नाहीं, हें पक्कें समज ! परवाना कोणाला आणि कां दिला आहेस, हें मला खरें कळलें पाहिजे ! "

नेफिसा हात जोडून नम्र स्वरानें म्हणाली—" खाविंद, दासीवर विनाकारण राग करूं नये ! मीं सांगितलेल्या हकीकतींत एक अक्षर देखील खोटें नाहीं ! एक तासाच्या आंत मी तो परवाना आणून आपल्या स्वाधीन करितें ! मग तर झालें ना ? "

रेझाखानः—" नुसता परवाना घेऊन मला काय करावयाचा आहे ! तो तूं कोणाला दिला आहेस हें मला समजलें पाहिजे ! थांब, तुझी लबाडी आतांच तुझ्या पदरांत घालतों ! "

रेझाखानानें एका शिपायास बोलावून फुलवालीला तावडतोब पकडून आणावयास हुकूम केला. शिपाई निघून गेल्यावर रेझाखान प्रक्षुब्ध अंतःकरणानें आपल्याशींच विचार करीत महालांत इकडे तिकडे फिरूं लागला. ह्याचा परिणाम काय होणार, याविषयीं बिचाऱ्या नेफिसा बेगमेचा कांहींच तर्क चालेना. ती भयभीत अंतःकरणानें, खालीं मान घालून एका बाजूस उभी राहिली.

कांहीं वेळानें फुलवाली महालांत आली. पण रेझाखानास पाहतांच एकदम दचकून मागें सरली.

नेफिसा तिला हळूंच म्हणाली—" फुलवाली तो परवाना तेवढा आतांच्या आतां परत घेऊन ये जा ! खाविंदांना तो पहावयाचा आहे !"

फुलवाली सलाम करून चटकन मुकाट्यानें परत फिरली, इतक्यांत रेझाखान तिला दरडावून म्हणाला—" थांब येरडे ! तो परवाना हिनें कोणाला दिला आहे, हें अगोदर सांग ! खोटें बोलशील तर येथल्या-येथेंच तुझी कत्तल करीन. "

फुलवाली घाबरून थरथर कांपूं लागली, आणि भयभीत मुद्रेनें नेफिसा

बेगमकडे पाहूं लागली. तेव्हां रेझाखान तिच्या अंगावर धांवून ओरडून म्हणाला—" सांगतेस कीं नाहीं लवकर ? कां घालूं लाथा ? "

फुलवाली हात जोडून अडखळत अडखळत म्हणाली—" सांगतें सरकार ! मला गरीबाला मारूं नका ! मजकडे कांहीं अपराध नाहीं ! बेगमसाहेबांच्या आज्ञेवरून मीं तो परवाना गोष्ठविहार प्रासादांतील राजकुमारास दिला आहे ! "

रेझाखान विकट हास्य करून नेफिसाकडे तीक्ष्ण दृष्टीनें पहात म्हणाला—" दुष्टे, जारिणी, ही थेरडी तुझ्या समक्ष काय सांगते तें ऐकलेंस का ? आतां मुकाट्यानें आपलें पातक कबूल करून योग्य प्रायश्चित भोगण्यास तयार हो ! "

पतीच्या मनांत आपल्याविषयीं काय भावना उत्पन्न झाली आहे, हें नेफिसाला आतां कळून चुकलें. ती अश्रुपूर्ण दृष्टीनें पतीकडे पहात दीन स्वरानें म्हणाली—"खाविंद, फुलवालीची ही गैरसमज झाली आहे! तो राजकुमार नसून राजकुमारी होती ! कांहीं विशिष्ट उद्देशानें तिनें पुरुषवेष धारण केला होता, त्यामुळें फुलवाली तसें सांगत आहे ! पण खरोखर ती स्त्रीच आहे ! "

रेझाखान—" हें मोठेंच आश्चर्य ! एखादा पुरुष जनानखान्यांत गुप्तपणें प्रवेश करून घेण्यासाठीं कदाचित् स्त्रीवेष घेईल ! पण प्रत्यक्ष स्त्री असतांना मुद्दाम पुरुषवेष घेऊन जनानखान्यांत शिरण्याचा प्रयत्न करून आपल्यावर भलतेंच संकट ओढवून घेईल, हें संभवनीय तरी दिसतें का ? अरेरे, निर्लज्ज कुलटे, ह्यापेक्षां दुसरी एखादी शक्य दिसण्यासारखी बतावणी केली असतीस तर, मला क्षणभर तरी खरी वाटली असती ! पण माझा इतका दरकार बाळगण्याचें तरी तुला काय प्रयोजन ! नबाबांच्या जोरावर तूं मला कस्पटासमान मानीत असतेस हें मी जाणून आहें ! तुझ्याशीं विवाह केल्यामुळें नबाबांनीं मला एवढ्या योग्यतेस चढाविलें, अर्थात् तुझ्या कोणत्याही नीच अपराधाकडे मी कानाडोळा करीन, अशी तुला घमेंड असेल; पण मला असल्या पोकळ मोठेपणाची मुळींच परवा नाहीं ! जारिणीपति म्हणवून घेऊन जन्मभर

अपमान सहन करीत राहण्यापेक्षां, तुझा त्याग केल्यानें मला फकीर बनावें लागलें तरी बेहेत्तर ! ती स्थिति मी आनंदानें पतकरीन ! ”

नेफिसा गुडघे टेकून हात जोडून दीन स्वरानें म्हणाली—“ हाय हाय ! महाराज ! ह्या दीन दासीवर असा वृथा आरोप करूं नये ! अल्लाच्या साक्षीनें आपले पायं स्मरून सांगतें कीं, माझ्या हातून अनीतीचें वर्तन आजपर्यंत कधींहि घडलें नाहीं ! अभिमानाच्या कुकल्पनेनें आजवर मजकडून आपला अनादर झाला असेल खरा, पण त्याबद्दल मला क्षमा करावी ! माझ्या अंतःकरणांत पाप वासनाही एकवार उत्पन्न झाली होती, पण ती राजकुमारीच मला गुरु झाली ! तिच्या सदुपदेशानें प्रेमाचें रहस्य व पत्नीचें कर्तव्य मला पूर्णपणें समजून आलें, आणि त्या महापातकापासून माझा बचाव झाला ! आतां आपणच माझें इहपरलोकचें परमपूज्य दैवत आहां ! आपणच माझा स्वीकार करा किंवा त्याग करा, त्याबद्दल मी आपल्याला मुळींच दोष देत नाहीं ! मी मात्र आपले चरण जन्मभर सोडणार नाहीं ! ”

रेझाखान—“ बस, बस ! तुझें हें मानभावीपणाचें बोलणें पुरे कर ! महापापिणी, कुलटे, तुझें जारकर्म सप्रमाण तुझ्या पदरीं येत असून देखील, निर्लज्जपणानें पातिव्रतेचें ढोंग करण्यास तुला शरम नाहीं वाटत ? याउपर मी तुझें मुखावलोकन देखील करणार नाहीं ! इतकेंच काय, पण हें सर्व वृत्त मी नबाबसाहेबांना निवेदन करून माझा निश्चयही कळविणार ! मग त्यांची मजवर कितीही इतराजी झाली, आणि त्यांनीं मला कोणतेंही शासन केलें तरी हरकत नाहीं. ”

रेझाखान संतापानें पाय आपटीत महालांतून चालता झाला. जातां जातां त्यानें वृद्ध फुलवालीला कैद करून ठेवण्याविषयीं शिपायाला हुकूम दिला, आणि तो तडक आपल्या कचेरीकडे निघून गेला.

आपल्यावर हा घाणेरडा आरोप विनाकारण आलेला पाहून नेफिसाला अत्यंत दुःख झालें. तिनें बराच वेळ शोक केला. नंतर आपल्या पापवासनेबद्दल ईश्वरानें आपल्याला हें योग्य प्रायश्चित दिलें, अशी तिनें आपल्या मनाची समजूत करून घेतली आणि परमेश्वराचा धांवा करून आपल्या अपराधाची क्षमा मागण्याविषयीं व ह्या भयंकर आरोपांतून

मुक्त करण्याविषयीं अनन्यभावानें प्रार्थना केली. तेव्हां तिचें मन अमळ शांत झालें. आपल्या हातून जर पापाचरण घडलेलेंच नाहीं तर आपली शुद्धता केव्हां ना केव्हां तरी सिद्ध झाल्यावांचून खचित राहणार नाहीं; असा तिला भरंसाहि वाटूं लागला. तिच्या मनाची खिन्नता जरी नष्ट झाली नाहीं, तथापि ईश्वरावर भार ठेवून कल्याणकुमारीच्या उपदेशाप्रमाणें वागण्याचा तिनें निश्चय केला. मात्र तेव्हांपासून ऐषआरामाचा त्याग करून ती एखाद्या तपस्विनीप्रमाणें राहूं लागली.

---

# प्रकरण १५ वें.



## दृढनिश्चय.



आपली पत्नी खरीच जारिणी आहे अशी रेझाखानाची खात्री झाल्यामुळें त्याचें अंतःकरण संतापानें उद्विग्न होऊन गेलें. नेफिसा ही नबाबाची नात असल्यामुळेंच वांचली; नाहीं तर क्रूर रेझाखानानें तेथल्या तेथें तिचा तत्काळ खूनच केला असता ! आपल्या अब्रूवर दरवडा घालणारा हा घाडसी चोर तरी कोण होता, याचा पत्ता लावून, त्याला मात्र कडक शासन करण्याचा रेझाखानानें निश्चय केला.

गोष्ठविहारच्या मुखत्यारास बोलावून आणून, रेझाखानानें त्याजपाशीं चौकशी केली, त्यावरून त्या तरुणाचें नांव कल्याणसिंह असून, तो गोष्ठविहारच्या राजाचा भाचा होता, एवढी माहिती मिळाली.

कैद केलेल्या नावाड्यांचाहि रेझाखानानें अनन्वित छळ करून पाहिला, पण गोपीकृष्णराय व त्याचा साह्यकर्ता हे कोठें उतरले आणि कोणीकडे गेले, ह्यासंबंधानें त्यांच्याकडून यत्किंचित् सुद्धां थांग लागला नाहीं. तेव्हां त्या बाबतीत निराश होऊन, रेझाखानानें त्या नावाड्यांचा नाद सोडून दिला.

शेवटीं रेझाखानानें आपल्या विश्वासू गुप्तचरांस बोलावून आणून, त्यांना मोठमोठ्या बक्षिसांचीं अभिवचनें देऊन गोपीकृष्णराय व कल्याणसिंह ह्या उभयतांना पकडून आणण्यासाठीं चोहोंकडे रवाना केलें.

सायंकाळीं नबाबांची एकांतीं भेट घेऊन, रेझाखानानें त्यांना सर्व हकीगत सविस्तर सांगून टाकली. वृद्ध नबाबाचें आपल्या लाडक्या नातीवर अत्यंत प्रेम असल्यामुळें, त्यांना रेझाखानाची हकीगत मुळींच खरी वाटली नाहीं. उलट आपल्या प्रिय नेफिसावर असला घाणेरडा आरोप केल्याबद्दल त्यांनीं रेझाखानाची पुष्कळ निर्भत्सना केली. तथापि ह्या बाबतींत नेफिसाचें म्हणणें काय आहे तें ऐकून घेऊन मग याचा निर्णय करूं, असें सांगून नबाबांनीं रेझाखानास निरोप दिला.

रेझाखानानें सांगितलेली हकीगत ऐकून नबाबाचें चित्त अत्यंत अस्वस्थ होऊन गेलें. रेझाखान निघून गेल्यावर ते बराच वेळ आपल्याशीं विचार करीत राहिले. नंतर त्यांनीं नेफिसाला बोलावणें पाठविलें. ती आल्यावर त्यांनीं तिला आपल्या परवान्याविषयीं विचारलें. तेव्हां तिनें घडलेलें इत्थंभूत वर्तमान आजोबांस निवेदन केलें. आणि त्यावरून आपल्या पतीला आलेला संशय व त्यांनीं आपल्यावर केलेला आरोप सर्वथैव मिथ्या आहे असेंहि प्रतिपादन केलें.

नेफिसाचें भाषण ऐकून नबाब कांहीं वेळ आत्मगत विचारांत निमग्न झाले. नंतर नेफिसाकडे तीक्ष्ण दृष्टीनें अवलोकन करीत म्हणाले—"पोरी, तूं आजपर्यंत माझ्या पुढें कधीं खोटें बोलली नाहींस, किंवा कोणत्याहि गोष्टींत लबाडी केली नाहींस, म्हणून तुझें बोलणें सर्वस्वी खोटें आहे असें माझ्यानें म्हणवत नाहीं! तथापि घडलेल्या गोष्टींवरून कोणालाहि शंका येणें साहजिक आहे कीं नाहीं, हें तूंच विचार करून सांग!"

नेफिसा—"होय, आजोबा! तशी शंका येणें साहजिक आहे, हें मी कबूल करितें! आणि त्याबद्दल मी आपल्याला किंवा माझ्या पतीला हि मुळींच दोष देत नाहीं! हा सर्व माझ्या दुर्दैवाचा खेळ आहे!"

नबाब—"मग? ह्या शंकेचें निरसन तूं कसें करणार?"

नेफिसा—"आजोबा, ह्या संशयाचें पूर्ण निराकरण करण्यास ती माझी प्रियसखी पुनरपि तशाच पुरुषवेषानें तो परवाना घेऊन आली

पाहिजे ! त्यावांचून गत्यंतर नाहीं ! आणि मी खरोखर निर्दोषी असल्यामुळें, माझा असा पूर्ण भरंसा आहे कीं, परमेश्वर ती गोष्ट लवकरच घडवून आणील, आणि माझें पातिव्रत्य सिद्ध होईल ! ”

नबाब—“ नेफिसा, तुझा परमेश्वरावर, महमद पैगंबरावर आणि पवित्र धर्मशास्त्रावर जर एवढा भरंसा आहे, तर तूं तें कुराण हातांत घेऊन, आपल्या निर्दोषपणाबद्दल शपथ करण्यास तयार आहेस का ? पण विचार कर ! खोटी शपथ हें अत्यंत महत्पाप आहे ! तूं जर खरोखर अपराधी असशील, तर तसें प्रांजलपणें कबूल कर ! रेशाखानानें जरी तुला क्षमा केली नाहीं, तरी मी तुला क्षमा करीन ! त्याचा विवाहसंबंध तोडून टाकून, मी तुला आपल्या जवळ ठेवून घेईन ! तूं कांहीं काळजी करूं नको, आणि खरें बोलण्यास भिऊं नको ! ”

नेफिसा मेजावरील कुराणाचें पुस्तक मस्तकावर धारण करून नबाबापुढें गुडघे टेकून बसली, आणि त्यांचे पाय धरून त्यांच्याकडे स्थिर दृष्टीनें पहात निश्चल स्वरानें ह्मणाली—“ छे छे, आजोबा, माझ्या विषयीं अशी भलती शंका बिलकुल मनांत आणूं नका ! मी त्या सर्व साक्षी परमेश्वरासमक्ष, परमपूज्य महमद पैगंबराच्या साक्षीनें आपले हे पाय स्मरून खरें खरें सांगतें कीं, माझें पातिव्रत्य भ्रष्ट झालेलें नाहीं ! मीं आपला परवाना परकी पुरुषाला दिलेला नसून, पुरुषवेषधारी राजकन्येला दिला आहे ! आणि माझ्या अंतःपुरांत तीच माझी प्रिय मैत्रिण येत होती ! ह्या माझ्या देहाला परपुरुषाचा विटाळ देखील कधीं झालेला नाहीं ! हें जर खोटें असेल, तर मला अक्षय नरकवास प्राप्त होवो ! ”

नबाबाचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले. त्यांनीं नेफिसाला उठवून आपल्या जवळ बसवून घेतलें, आणि तिला पोटाशीं धरून प्रेमभरानें तिच्या मस्तकाचें चुंबन घेतलें. बराच वेळपर्यंत दोघांच्याहि तोंडून शब्द निघाला नाहीं. नेफिसाच्या नेत्रांतूनहि अविरल अश्रुप्रवाह वहात होता.

शेवटीं नबाब म्हणाले—“ बाळे, तूं कांहीं चिंता करूं नको ! तुझ्या पवित्रपणाबद्दल माझी पूर्ण खात्री झाली ! रेशाखानाचीहि समजूत घालण्याचा मी प्रयत्न करीन ! तथापि त्याचें मन नच वळलें, तर त्याचा विवाहसंबंध तोडून टाकीन ! तूं खुशाल राजवाड्यांत रहा ! ”

नेफिसा—" हां हां, आजोबा, असला भलताच विचार मनांत देखील आणूं नका ! ते मजवर कितीहि संतप्त झाले, माझ्याशीं कितीहि निष्ठुरतेनें वागले, तरी माझे परमपूज्य पतिदेव आहेत ! स्त्रियांना इहपरलोकीं परमेश्वर प्राप्तीला पतिसेवेवांचून दुसरें कोणतेंहि साधन नाहीं ! त्यांचा संबंध तोडून मला अनाथ करूं नका ! त्यांनीं जरी माझा तिरस्कार केला, तरी मी त्यांच्याच ध्यानपूजनांत माझें आयुष्य घालविणार !"

नबाब—" आहाहा ! बाळे, नेफिसे, तुझ्यासारखी सद्बुद्धि सर्व स्त्रियांना होईल तर, जगांतील किती तरी पातकें कमी होतील ! पण तुला हें विलक्षण शहाणपण शिकविलें तरी कोणीं ? "

नेफिसा—" त्याच माझ्या जिवलग मैत्रिणीनें ! आजोबा, जिला मीं परवाना दिला, ती पुरुषवेषधारी राजकन्याच माझी गुरु झाली ! स्त्रीजन्माचें सार्थक कशांत आहे, हें तिनेंच मला समजून दिलें, आणि माझा अज्ञानजन्य मोह व अहंकार नष्ट केला ! "

नबाब—" शाबास ! त्या राजकन्येनें तुला सन्मार्गास लावून तुजवर मोठेच उपकार केले खरे; पण तिनें आमचा एक अक्षम्य अपराध केला आहे ! तिनेंच यवनवेषानें त्या परवान्याचा गैरशिस्त उपयोग करून, गोष्ठविहारच्या राजाला तुरुंगांतून पळवून नेलें असावें असा माझा तर्क आहे ! "

नेफिसा—" आजोबा, त्या उदार राजकन्येच्या हातून अन्यायाचें कर्म कधींहि होणार नाहीं ! जर तिनें गोष्ठविहाराच्या राजास सोडवून नेलें असेल, तर त्यांत तिचा कांहीं तरी शुद्ध व उदात्त हेतु असला पाहिजे, अशी माझी खात्री आहे ! "

नबाब—" ठीक आहे ! नेफिसा, तूं आतां आपल्या महालांत जा. रेझाखानानें त्या उभयतां पळपुट्यांना पकडण्याची योग्य तजवीज केलीच असेल ! ते हातीं लागल्यावर मग ह्या गोष्टीचा पुनः विचार करूं ! "

नबाबांचा निरोप घेऊन नेफिसाबेगम आपल्या महालांत निघून गेल्यावर, नबाबांनीं महमद रेझाखानांस तावडतोब बोलावणें पाठविलें. कांहीं वेळानें रेझाखान हजर झाल्यावर, गोष्ठविहारचा राजा व त्याचा साह्यकर्ता यांना पकडून आणण्याची कशी काय व्यवस्था केली या-

गुप्त हेर शहरांत पाठवून, गोष्ठविहारच्या राजासंबंधानें काय काय चाललें आहे, याबद्दलची बातमी काढली; त्यावरून त्याला सर्व हकीगत समजून आली. नंतर पुढें काय काय तजवीज करावी, याविषयीं तो विचार करूं लागला.

दुसरे दिवशीं विनोदलाल प्रधानानें आपल्या मुखत्यारामार्फत आपण आल्याची वर्दी नबाबास दिली, तेव्हां नबाबांनीं त्याला भेटीस बोलाविलें. त्याप्रमाणें विनोदलाल बरोबर आणिलेला नजर-नजराणा घेऊन नबाबांच्या भेटीस गेला, आणि तो बहुमोल नजराणा नबाबांपुढें ठेवून नम्रपणें प्रणाम करून आदबीनें उभा राहिला. नबाबांनीं त्याचा योग्य सत्कार करून बसावयास आज्ञा केली, तेव्हां विनोदलाल हात जोडून मोठ्या अदबीनें एका बाजूस बसला.

विनोदलालानें अर्पण केलेले मूल्यवान् जिन्नस अवलोकन करून नबाबसाहेब फार खुष झाले. ते प्रसन्नमुद्रेनें विनोदलालाकडे पहात स्मितपूर्वक म्हणाले—" कां, विनोदलाल, आमचे दोस्त उदयनारायण खुशाल आहेत ना ? त्यांच्या कुटुंबांतील सर्व मंडळी क्षेम आहेत ना ? "

विनोदलाल—" होय सरकार ! हुजूरच्या कृपाछत्राखालीं आमचे महाराज परिवारासह सुखरूप आहेत ! हुजूरचेंहि सर्वप्रकारें कुशल आहे ना ?"

नबाब—" हो ! अल्लाच्या कृपेनें सर्व ठीक आहे ! तुमचें ह्या वेळीं अकस्मात् कां येणें झालें ? कांहीं विशेष काम आहे कीं काय ? "

विनोदलाल—" कांहीं नाहीं ! जहांपन्हांचा समाचार बरेच दिवसांत समजला नव्हता, ह्मणून महाराजांनीं मुद्दाम हुजूरच्या दर्शनासाठींच मला पाठविलें आहे ! शिवाय आणखीहि एक किरकोळ काम होतें ! "

नबाब—" तें कोणतें ? "

विनोदलाल—" गोष्ठविहारचे राजे गोपीकृष्णराय हे आमच्या महाराजांचे आप्त आहेत. ते खंडणीच्या बाकीकरितां सरकारच्या प्रतिबंधांत आहेत; पण खजिन्यांत कांहीं शिलक नसल्यामुळें व प्रजेकडून वसूल येण्याचा संभव नसल्यामुळें, गोपीकृष्णरायांचे पुत्र राजकुमार गोविंदराम यांनीं आमच्या महाराजांस ह्या प्रसंगीं मदत करण्याविषयीं विनंति केली. त्यावरून त्यांची, खंडणीची बाकी सरकारांत भरण्याविषयींही महाराजांची

मला आज्ञा झाली आहे. त्याप्रमाणें सर्व रक्कम घेऊन, हुजूरनीं वृद्ध गोपीकृष्णरायांस मुक्त करावें, अशी महाराजांची जहांपन्हांच्या चरणीं प्रार्थना आहे ! ”

नबाब उद्विग्न स्वरानें म्हणाले—“ विनोदलाल, गोपीकृष्णराय येथें प्रतिबंधांत होता खरा; पण त्याच्या एका साथीदारानें कपट करून त्याला तुरुंगांतून पळवून नेलें ! हें तुम्हांला अद्यापि कळलें नाहीं काय ? ”

विनोदलाल—“ छे, छे ! सरकार, तिकडे याबद्दल मुळींच बातमी नाहीं ! असो; पण त्यांच्याकडील खंडणीची बाकी भरण्याविषयीं मला आज्ञा असल्याप्रमाणें, मी ती हजर करण्यास तयार आहे ! ती जमा होऊन, गोपीकृष्णरायांच्या ह्या अपराधाबद्दल त्यांना क्षमा व्हावी, अशी मी आमच्या महाराजांच्याकारितां हुजूरच्या चरणीं विनंति करितों ! ”

नबाब—“ विनोदलाल, गोपीकृष्णराय उदयनारायणाचा आप्त आहे, असें तुम्ही म्हणतां आणि त्याच्याकारितां मजकडे मुद्दाम रदबदली करण्याकारितां तुम्हीं आलां आहां, यावरून गोपीकृष्णराय हल्लीं तुमच्याच आश्रयास असावा, असा मला संशय येत आहे ! खरें काय तें सांगा पाहूं !”

विनोदलाल हात जोडून म्हणाला—“ जहांपन्हां ! आमचे महाराज राजद्रोहाचें कोणतेंहि कृत्य करणार नाहींत, अशी हुजूरची खात्री असेलच ! तथापि हुजूरचें म्हणणेंच क्षणभर मान्य केलें तरी त्यात चूक काय झाली ? आपल्या आप्तांना संकटसमयीं योग्य मदत करणें हें प्रत्येक सभ्य गृहस्थाचें कर्तव्यच आहे ! शिवाय, गोष्ठविहारचे राजे हे कांहीं सरकारच्या विरुद्ध वागणारे, राजद्रोही, बंडखोर, गुन्हेगार नव्हेत ! ते अत्याचारांस भिऊन पळून गेले असतील, किंवा त्यांच्या खुषीविरुद्धहि त्यांना कोणी तरी पळवून नेलें असेल ! ह्या सर्व गोष्टींचा विचार केला असतां, आमच्या महाराजांनीं जरी गोपीकृष्णरायांस आश्रय दिला, तरी दयासागर जहांपन्हां आमच्या महाराजांस त्याबद्दल फारसा दोष देणार नाहींत अशी माझी नम्र समजुत आहे ! ”

नबाब कांहीं वेळ आपल्याशींच विचार करून गंभीर स्वरानें म्हणाले—“ विनोदलाल, ह्या बाबतींत मला आतांच निश्चित असें कांहींच सांगतां येत नाहीं ! गोपीकृष्णराय, महमद रेझाखानाच्या ताब्यांतून गेला आहे.

त्याच्या तपासासाठीं रेशाखानास पाठविलें आहे. त्याच्या सहकार्याशिवाय मला परभारें ह्या गोष्टींचा निकाल करितां येणार नाहीं ! ”

विनोदलाल—“ जहांपन्हां बंगाल, बहार व ओडिसा ह्या विस्तृत प्रांताचे महापराक्रमी स्वतंत्र नवाब आहेत ! ते आपल्या राज्यांत चाहील तें करण्यास पूर्ण समर्थ आहेत ! त्यांच्यापुढें ब्र काढण्याचीहि कोणाची छाती नाहीं ! आमचे महाराज हे हुजूरचे आज्ञांकित दास आहेत ! हुजूरचीहि त्यांच्यावर पूर्ण कृपा आहे ! ह्याकरितां त्यांची प्रार्थना हुजूरकडून अमान्य होणार नाहीं, असा त्यांनाहि मोठा भरंवसा आहे ! ”

नवाब—“ तें खरें ! गोपीकृष्ण तुरुंग फोडून किंवा अन्य रीतीनें पळून गेला असता तर गोष्ट वेगळी होती ! पण त्याला पळवून नेण्याच्या कामीं एका सरकारी परवान्याची भानगड झाली आहे आणि त्यामुळें बराच घोंटाळा उत्पन्न झाला आहे ! याकरितां, गोपकृिष्ण, त्याचा साथीदार आणि तो परवाना हे आमच्या पुढें हजर झाल्यावांचून ह्या प्रकरणाचा निर्णन करितां येणें शक्य नाहीं ! ”

विनोदलाल—“ इतकेंच असेल, तर सरकारांनीं गोपीकृष्णरायांस व त्यांच्या सहाय्यकांस क्षमापत्र द्यावें. सरकारच्या परवान्याचा तपास करून तो परत आणून देण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेण्यास हा दासानुदास तयार आहे ! त्याबद्दल हुजूरनीं बिलकुल शंका मानूं नये ! पण कृपा करून महारजांच्या विनंतीचा अव्हेर होऊं नये, एवढीच पुनः पुन्हां प्रार्थना आहे ! ”

नवाब—“ विनोदलाल, नुसत्या परवान्याचें कांहीं महत्त्व नाहीं ! ते इसमच परवान्यासह हजर झाले पाहिजेत ! त्यांवांचून उदयनारायणाच्या विनंतीचा विचार करितां येत नाहीं ! तेथें आमचा नाइलाज आहे, असें तुम्ही आमच्या मित्रास–उदयनारायणास–कळवा ! ”

विनोदलाल निराश होऊन खिन्न स्वरानें म्हणाला–“ मर्जी हुजूरची ! पण मला अपयश आलेलें पाहून महाराजांस फार खेद होईल ! ”

नबाबांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्यांची मुद्रा क्रुद्ध दिसूं लागली. तेव्हां अधिक बोलणें श्रेयस्कर होणार नाहीं असा विचार करून विनोदलाल चटकन् उठला आणि नबाबांस नम्रपणें प्रणाम करून, त्यांचा

निरोप घेऊन आपल्या वाड्यांत परत आला व त्याच दिवशीं सायंकाळीं सर्व परिवारासह वडनगरास परत चालता झाला.

विनोदलाल निघून गेल्यावर नवाब किंचित् हास्य करून आपल्याशींच उद्गारले—" गोपीकृष्ण उदयनारायणाच्या आश्रयास आहे, यांत तर शंकाच नाहीं ! ठीक आहे, उदयनारायण, तुझा शहाणपणाचा आणि पराक्रमाचा अभिमान नष्ट करण्याची केव्हां संधि मिळेल, अशी मी वाटच पहात होतों ! आतां अनायासें हा प्रसंग आला आहे ! पाहूं आतां माझ्यापुढ तुझा किती वेळ निभाव लागतो तो ! "

* * *

प्रधान विनोदलाल वडनगरास परत आल्यावर त्यांनीं राजा उदयनारायणाची भेट घेऊन नवाबाकडील सर्व वर्तमान सविस्तर निवेदन केलें. तें ऐकून उदयनारायणाची मुद्रा चिंताकुल झाली. गोपीकृष्णराय आपल्या आश्रयास आहे असा नवाबास बळकट संशय असल्यामुळें, तो आतां आपल्यावर स्वारी केल्यावांचून रहाणार नाहीं अशी त्याची खात्री झाली. तथापि गोष्ठविहारच्या राजाला पुन्हां नवाबाच्या स्वाधीन करणें किंवा त्याचा त्याग करणेंहि त्याला योग्य वाटेना.

* * *

दोन प्रहरीं भोजनसमयीं राणी श्रीमतीदेवी राजाच्या चौरंगासन्निध उभी राहून वाळ्याच्या सुंदर पंख्यानें पतीला वारा घालीत प्रेमाच्या गोष्टी बोलत होती; पण पतीचें आज आपल्या बोलण्याकडे लक्ष नाहीं, असें तिच्या लक्षांत आलें. शिवाय पतीचें भोजन नित्याप्रमाणें समाधानवृत्तीनें झालें नाहीं हेंहि तिच्या नजरेस आल्यावांचून राहिलें नाहीं. त्यावरून आज पतीचें चित्त कांहीं तरी खेदजनक विचारांनीं व्यग्र झालें आहे, हें राणीनें तत्काळ ओळखलें.

भोजन आटोपल्यावर राजा उदयनारायण आपल्या अंतःपुरांत येऊन पर्यंकावर बसला. राणी श्रीमतीदेवीहि लागलीच तेथें आली आणि सुवर्णकरंडकांतील तांबूल काढून तिनें राजाच्या हातीं दिला. तो हातीं घेऊन राजा गंभीर स्वरानें म्हणाला—" जा आतां ! उशीर झाला नाहीं कां जेवणाला ? "

राणी—" अंतःकरणाच्या आंत चाललेल्या विचारांत देखील माझा अडथळा होऊं लागला कीं काय? पण आज कसल्या विचारानें मन इतकें व्यग्र झालें आहे हें समजल्यावांचून मला जेवणखाण सुचणार नाहीं!"

राजा—" दुसरें कांहीं नाहीं; विनोदलाल मुरशिदाबादेहून परत आला!"

राणी—" मग काय झालें? नवाबांनीं काय सांगितलें?

राजा—" गोपीकृष्णराय व त्याचा साथीदार यांना हजर केल्याशिवाय कोणत्याहि गोष्टीचा निर्णय करतां येणें शक्य नाहीं, असें नवाबानीं स्पष्ट सांगितलें. शिवाय ते दोघे आमच्याच आश्रयास आहेत, असाहि नवाबांचा पक्का ग्रह झाला आहे!"

राणी—" असें होणार हें ठरल्यासारखेंच होतें! आतां पुढें काय करण्याचें ठरविलें?"

राजा—" तोच विचार करीत आहे! पण ह्या बाबतींत माझ्या एकट्याच्या जबाबदारीवर कोणताहि निर्णय ठरवितां येण्यासारखा नाहीं! मुत्सद्दीमंडळीचा विचार घेऊन सर्वानुमतें जसें ठरेल तसेंच करणें भाग आहे!"

राणी—" तें कांहीं कां ठरेना! पण शरणागताचें रक्षण करणें हाच गृहस्थाश्रमाचा मुख्य धर्म आहे, हें लक्षांत असावें, एवढी आपली माझी नम्र सूचना आहे! वृद्ध गोपीकृष्णरायांची दुर्बलावस्था आणि बिचाऱ्या कल्याणकुमारीची दीन मुद्रा माझ्या डोळ्यांपुढें दिसत आहे!"

राणी खिन्न अंतःकरणानें तेथून मुकाट्यानें निघून गेली आणि राजा उदयनारायण त्याच गोष्टीचा विचार करीत बसले.

सायंकाळीं मुत्सद्दीमंडळींच्या खासगी दरबारांत ह्या गोष्टीचा पुष्कळ ऊहापोह झाला. शरणागताचें रक्षण करणें हेंच आपलें कर्तव्य आहे असें युवराजांनीं स्पष्ट प्रतिपादन केलें व विनोदलाल प्रधान आणि सेनापती गुलाममहमद यांनींहि त्यास पूर्ण अनुमोदन दिलें. पंडित तर्करत्नांनीं पुनः बऱ्याच अडचणी व हरकती दर्शविल्या, परंतु त्यांचा सर्वांनीं निषेधच केला. शेवटीं राजा उदयनारायण यांनीं युवराजांचा निर्णय मान्य केला आणि ह्या सत्कार्याच्यापायीं कितीहि नुकसान झालें व कसेंहि संकट

आलें तरी माघार घ्यावयाची नाहीं, असा आपला निश्चय सर्वानुमतें जाहीर केला.

नवाबाशीं युद्धाचा प्रसंग येणार, हें तर आतां निश्चित ठरलें. त्याप्रमाणें शस्त्रास्त्रें, दारू गोळा वगैरे युद्धसामग्रीची व सैन्याची सिद्धता करण्याविषयीं राजानें सेनापती गुलाबमहमद यांस आज्ञा केली. तेव्हां त्यानें राजाज्ञा शिरसामान्य करून, आपल्या शरीरांत प्राण आहे तोंपर्यंत आपण आपल्या अन्नदात्याशीं निमकहराम होणार नाहीं अशी कुराणाची व तरवारीची शपथ घेतली.

प्रधान विनोदलाल यांनीं उत्तेजनपर शब्दांनीं सेनापतीचें अभिनंदन केलें. राजपुत्र साहेबराम यानें तर गुलाममहमदास प्रेमादरपूर्वक आलिंगन दिलें. पंडितमहाशयांनीं संकटनिवारणार्थ परमेश्वराची प्रार्थना केली. राजाच्या अंतःकरणास पूर्ण समाधान वाटलें आणि तत्काळ तयारीस लागण्याचें ठरवून दरबार बरखास्त करण्यांत आला.

"वीरकिटीरचा किल्ला अत्यंत मजबूत व दुर्भेद्य आहे, याकरितां राजकुटुंबीय मंडळींनीं आपल्या परिवारासह तेथें रहाणें सुरक्षित आहे." असें सर्वांच्या विचारानें ठरल्याप्रमाणें राजघराण्यांतील सर्व मंडळी लवकरच वीरकिटीर दुर्गांत रहावयास गेलीं. राणीच्या व राजपुत्राच्या आग्रहावरून उदयनारायणांनीं राजा गोपीकृष्णराय व राजकन्या कल्याणकुमारी यांसहि उदयग्रामाहून आणवून आपल्या परिवारात सामील केलें. कारण, आतां त्यांना गुप्तपणें ठेवण्याचें कांहींच प्रयोजन उरलें नव्हतें.

कारागृहांतील घोर छळामुळें व मनाच्या अस्वस्थतेमुळें, वृद्ध गोपीकृष्णरायांची प्रकृति अद्यापि सुधारली नव्हती, इतकेंच नव्हे तर, दिवसें दिवस अधिकच क्षीण होत चालली होती. असल्या लाजिरवाण्या जिण्यापेक्षां लवकर मरण येईल तर बरें, असेंच गोपीकृष्णरायास नेहमीं वाटत असे. कल्याणकुमारी प्रेमपूर्वक रात्रंदिवस पित्याची सेवाशुश्रूषा करीत होती, तथापि तिलाहि त्यांच्या जीवनाविषयीं खात्री वाटत नव्हती. वीरकिटीरास आल्यावर गोपीकृष्णरायांच्या औषधोपचाराची व शुश्रुषेची उत्तम व्यवस्था लागली, त्यामुळें कल्याणकुमारीला बरीच विश्रांति मिळूं लागली.

उदयग्रामीं असेपर्यंत कल्याणकुमारी नित्यनियमानें योगानंदस्वामीच्या दर्शनास जात असे आणि पुष्कळ वेळ त्यांच्याजवळ बसून त्यांच्या मुखानें योगाच्या व ज्ञानाच्या गोष्टी श्रवण करीत बसत असे. त्यामुळें ऐहिकसुखोपभोगाविषयीं तिच्या अंतःकरणांत बरेंच वैराग्य उत्पन्न झालें होतें. कल्याणकुमारीची जिज्ञासा, श्रद्धा व बुद्धिमत्ता पाहून योगानंद स्वामीहि तिला मोठ्या आनंदानें ज्ञानयोगाचीं तत्वें सांगत असत. त्यामुळें गुरूसहवास सोडून वीरकिटीरास जाणें कल्याणकुमारीच्या जिवावर आलें. तथापि पितृसेवा हें संततीचें आद्यकर्तव्य असल्यामुळें, तें केव्हांहि सोडतां येणार नाहीं, असें स्वामींनीं निक्षून सांगितल्यामुळें नाइलाजास्तव ती स्वामींचा निरोप घेऊन आपल्या परमपूज्य पित्यासह वीरकिटीरास निघून गेली.

---

# प्रकरण १७ वें



## आत्मयज्ञ.



गोष्ठविहारचा राजपुत्र गोविंदराम यानें आपल्या सेनापतीच्या साह्यानें सैन्याची व युद्धसामग्रीची जय्यत सिद्धता करून, विनोदपूरच्या विद्रोही लोकांची खोड मोडण्याची पूर्ण तयारी केली; आणि मोठ्या त्वरेनें कूच करून विनोदपूर शहरावर मोर्चे लाविले.

रामशरण वगैरे विनोपूरस्थ विद्रोही मंडळीहि बेसावध नव्हती. त्यांनींहि गोविंदरामाचा प्रतिकार करण्याची शक्य तितकी सिद्धता केली व यशोहरच्या यवनठाणेदाराचें कांहीं लष्करहि आपल्या मदतीस बोलाविलें. नवाबसरकारची अगाऊ परवानगी घेतल्याशिवाय कोणत्याहि ठाणेदारानें हिंदी जमीनदारांच्या भांडणतंट्यांत पडूं नये, असा नबाबांचा सक्त हुकूम होता. तथापि रामशरणाकडून ठाणेदाराला यथास्थित

लांच मिळाल्यामुळें, त्यानें तो हुकूम अमान्य करून आपलें कांहीं सैन्य विनोदपुरास रामशरणाच्या मदतीस पाठविलें.

गोविंदरामाच्या सैन्यानें विनोदपुरावर हल्ला करितांच तेथील लोकांनीं त्याचा खूप जोरानें प्रतिकार केला. तेव्हां उभयपक्षांत तुंबळ युद्ध सुरू झालें. रामशरणाच्या पक्षास शहराचा आश्रय असल्यामुळें, त्यांनीं बरेच दिवस टिकाव धरून शहर लढविलें. तथापि त्या झटापटींत उभयपक्षांकडेहि प्राणहानी अतिशय झाली. परंतु गोविंदरामाकडे सैन्यबल अधिक असल्यामुळें शेवटीं त्याचीच सरशी झाली. राजसैन्याच्या असह्य मारानें विनोदपूरकर कच खाऊन मागें सरूं लागले. रामशरण व त्याचे साह्यकर्ते ह्यांनीं आपल्या लोकांत उमेद व उत्तेजन आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेरीस यवनसैनिकांनीं निराश होऊन मागें तोंड फिरविलें आणि एकदम आपल्या यशोहर ठाण्याची वाट सुधारली. त्याबरोबर विनोदपूरकरांचा धीर सुटून ते सैरावैरा धांवूं लागले आणि राजसैनिक विजयोत्साहानें हर्षभरित होऊन शत्रूचा पाठलाग करीत करीत सांपडतील त्यांची कत्तल करूं लागले. थोड्याच वेळांत रणभूमि निर्वैर झाल्यावर राजपुत्र गोविंदरामानें मोठ्या विजयोत्सवानें शहरांत प्रवेश केला.

राजपुत्र गोविंदरामानें विनोदपुरांत प्रवेश करितांच तावडतोब नाकेबंदी केली आणि ह्या सर्व अनर्थास मूळ कारण असलेल्या रामशरण वगैरे विद्रोही लोकांस पकडून आणण्यासाठीं लोक पाठविले. परंतु ते दुष्ट लोक अगोदरच पळपुट्या यवनसैन्याबरोबर यशोहरच्या ठाणेदाराकडे आश्रयार्थ पळून गेले असल्यामुळें, राजपुत्राच्या हातीं लागले नाहींत. त्यामुळें गोविंदरामास थोडा खेद वाटला. तथापि त्यानें रामशरण व त्याचे साथीदार यांचीं घरेंदारें लुटून जाळून जमनिदोस्त करून टाकलीं. त्यामुळें सर्व लोकांस चांगलीच दहशत बसली.

कांहीं काळानें जिकडे तिकडे स्थिरस्थावर झाल्यानंतर राजपुत्र गोविंदरामानें आपल्या वहिवाटदारांमार्फत सर्व अवशिष्ट नगरवासीयांस पुनः मदनमोहन मंदिरांत एकत्र जमाविलें. आणि स्वारीखर्च व खंडणीची बाकी मिळून दुप्पट कर देण्याविषयीं फर्माविलें. बिचाऱ्या भयभीत नागरिकांनीं

मुकाट्यानें राजाज्ञा मान्य केली. आणि ते सर्वजण रामशरण व त्याचे विद्रोही साथीदार यांस शिव्याशाप देत आपल्या घरीं परत गेले. दुसरे दिवसापासून कराची रक्कम विनतक्रार भराभर वसूल होऊं लागली आणि एक आठवड्याच्या आंत सर्व रक्कम राजकोशांत हजर झाली.

ह्याप्रमाणें झालेल्या अपमानाची पूर्णपणें भरपाई झाल्यावर राजपुत्र गोविंदराम कृतकार्य होऊन विजयोत्सवानें गोष्ठविहारास परत येण्यासाठीं विनोदपुराहून आपल्या सैन्यासहवर्तमान निघाला. पण हा विजयानंद दीर्घ काळपर्यंत उपभोगण्याइतकें बिचाऱ्याचें भाग्य नव्हतें !

महमद रेझाखान नबाबाच्या आज्ञेप्रमाणें बरेंच सैन्य घेऊन मुरशिदाबादेहून गोपीकृष्णरायास त्याच्या साथीदारासह पकडून आणण्याकरतां निघाला, तो थेट गोष्ठविहारास येऊन दाखल झाला. शहराबाहेर छावणी करून त्यानें गुप्त हेरांकडून गांवांतील बातमी काढली. त्यावरून त्याला असें समजलें कीं, गोपीकृष्णराय गोष्ठविहारास परत आला नाहीं, आणि राजपुत्र गोविंदराम सैन्यासह विनोदपुरास गेला आहे.

शहरांत राजा, राजपुत्र, सेनापति व सैनिक मुळींच नाहींत अशी बातमी समजतांच रेझाखानास आनंद झाला. आणि ह्या दुर्लभ संधीचा फायदा घेऊन त्यानें दुसरे दिवशीं प्रातःकाळींच छावणी उठवून सैन्यासह गोष्ठविहारांत प्रवेश केला. अवशिष्ट राजसैनिकांनीं यवनांना प्रतिकार करण्याची थोडीबहुत खटपट केली पण रेझाखानाच्या सैन्यापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. अर्थात विशेष दंगाधोपा किंवा प्राणहानि न होतां गोष्ठविहार शहर महमद रेझाखानाच्या ताब्यांत आलें. त्यानें राजसैनिकांस कैद करून आपल्या लोकांमार्फत शहराचा कडेकोट बंदोबस्त केला, व सर्व हकीकत नबाब हुजूरकडे लिहून पाठविली. त्यावरून गोष्टविहारचा राजा स्वाधीन होईपर्यंत त्याचें संस्थान जप्त केलें आहे व तूर्त महमद रेझाखान यांस त्या संस्थानचे वहिवाटदार नेमिलें आहे, असा नबाबसाहेबांकडून लवकरच हुकूम आला. ह्याप्रमाणें महमद रेझाखान हाच तूर्त गोष्ठविहार संस्थानचा अधिपति झाला.

गोष्ठविहार शहर जरी रेझाखानच्या ताब्यांत आलें होतें, तरी राज-

वाड्यांत मात्र त्याचा प्रवेश झाला नव्हता. यवनांनीं शहर आक्रमण केल्याचें वर्तमान समजतांच गोविंदरामाची तरुण पत्नी ललितागौरी हिनें प्रासादद्वार बंद करून टाकलें आणि वाड्याचा शक्य तितका बंदोबस्त केला. नंतर तिनें महमद रेझाखानाकडे असा निरोप पाठविला कीं, संस्थानच्या राजकारणाशीं माझा कांहीं संबंध नाहीं. राजवाड्यांत राजमुगुटांतील पुरुष कोणीहि नसून मी एकटीच आहे. अशा स्थितींत तुम्ही जबरदस्तीनें वाड्यांत प्रवेश करण्याचा किंवा इतर अत्याचार करण्याचा प्रयत्न कराल, तर मी तत्काळ जोहार करून वाड्याची राखरांगोळी करीन व त्याची सर्व जबाबदारी तुमच्या शिरावर पडेल, हें पक्कें लक्षांत ठेवा !

ललितागौरीचा निरोप ऐकून रेझाखानानें विचार केला कीं, हे काफर लोक हट्टवादी असल्यामुळें बोलल्याप्रमाणें अविचार करण्यास मागेंपुढें पाहणार नाहींत. आणि तसें झाल्यास सर्व लोक एकदम बिथरतील व त्यांचा बंदोबस्त करणें अशक्य होईल. त्यापेक्षां तूर्त राजवाड्याचा नादच सोडणें बरें. असा विचार करून रेझाखाननें राजवाडा हस्तगत करून घेण्याचा विचार तूर्त तहकूब केला.

आपल्या पतीच्या विनोदपूर येथील पराक्रमाचें व विजयाचें वर्तमान ललितगौरीला समजलें होतें. ते आतां लवकरच आपल्या विजय सैन्यासह परत येतील आणि दुष्ट यवनांची खोड मोडून गोष्ठविहार त्यांच्या तावडींतून मुक्त करतील अशी ललितागौरीला आशा होती, तथापि अत्याचारी क्रूर यवनांच्या भीतीनें ती एकेक दिवस मोठ्या काळजीनें ढकलीत होती.

राजपुत्र गोविंदराम आपल्या सैन्यासहवर्तमान विजयानंदानें गोष्ठविहारास परत यावयास निघाला. परंतु शहरच्या सीमेंत प्रवेश करितांच, रेझाखानानें शहर ताब्यांत घेऊन आपल्या लोकांस कैद केल्याचें दुःखकारक वर्तमान त्याच्या कानांवर आलें. त्याबरोबर त्याचा सर्व आनंद पार वितळून गेला. त्यानें शहरापासून एक कोसावर आपला मुक्काम केला आणि पुढें काय करावयाचें याबद्दल तो आपल्या सेनापतीशीं विचार करूं लागला.

गोविंदरामाचें सैन्य नुकत्याच झालेल्या रणसंग्रामानें बहुतेक थकून गेलें होतें. आता स्वगृहीं जाऊन सुखानें विश्रांति घ्यावयाची, अशी सर्व सैनिकांची मनीषा होती; तोंच पुनरपि यवनांशीं युद्धप्रसंग उपस्थित झालेला पाहतांच त्यांची उमेद खचून गेली. नवीन सैन्याची भरती करण्यास किंवा युद्ध-सामुग्रीची सिद्धता करण्यासहि अवकाश नाहीं; नबाबी सैन्याबरोबरच्या युद्धांत ऐत्या वेळीं कोणास जातीय जमीनदाराची मदत मिळण्याचीहि आशा नाहीं, अशा विकट परिस्थितींत काय करावें हें राजपुत्र गोविंदरामास सुचेनासें झालें. रेझाखानास शरण जाऊन त्याच्या स्वाधीन व्हावें किंवा जीव घेऊन देशांतरास पळून जावें, नाहीं तर जिवावर उदार होऊन यवनांशीं दोन हात करून धारातीर्थी देह ठेवून स्वर्गास जावें, ह्यावांचून गत्यंतर नाहीं अशी गोविंदरामाची खात्री झाली. ह्यापैकीं पहिले दोन मार्ग नामर्दपणाचे व राजधर्माविरुद्ध असल्यामुळें ते सर्वथैव त्याज्य आहेत असें त्यानें तत्काळ ठरविलें. स्वदेशद्रोहाचें महापातक पदरीं घेऊन लाजिरवाणें जिणें राखण्यापेक्षां, मातृभूमीच्या उद्धारार्थ प्राण समर्पण करणेंच अत्यंत श्रेयस्कर होय, असा त्यानें निश्चय केला. सेनापतीनेंहि त्याला अनुमोदन दिलें. नंतर उभयतांनीं मिळून आपल्या सैनिकांस प्रोत्साहनपर उपदेश केला. तेणेंकरून बरेच लोक राजाज्ञा मान्य करण्यास तयार झाले.

दुसरे दिवशीं सुप्रभातीं राजपुत्र गोविंदरामानें सेनापतीसह येतील तितके सैनिक बरोबर घेऊन, प्राणाची परवा सोडून देऊन गोष्ठविहार शहरावर हल्ला केला.

महंमद रेझाखानहि बेसावध नव्हता. राजपुत्र शहरासमीप आल्याची बातमी त्याला समजलीच होती. त्याचप्रमाणें दुसरे दिवशीं शहरावर हल्ला करण्याचा राजपुत्राचा निश्चयहि त्याला गुप्तहेरांमार्फत विदीत झाला होता. त्यानें तत्काळ सैन्याची सिद्धता करून जिकडे तिकडे कडेकोट तयारी ठेविली होती.

रेझाखानाचें सैन्य ताज्या दमाचें असून त्याच्याजवळ युद्धसामुग्रीहि भरपूर होती. शिवाय त्याला शहराचा आश्रयहि होता. परंतु राजपुत्रास ह्यांपैकीं कोणत्याहि गोष्टीची अनुकूलता नव्हती. तथापि अशा प्रातिकूल

परिस्थितींत देखील त्यानें मोठ्या शौर्यानें शहरावर हल्ला चढविला आणि खंदक सर करून शहरच्या तटाला शिड्या लाविल्या पण तटावरील यवनांच्या असह्य माऱ्यामुळ राजसैनिकांचा अपरिमित नाश झाला. राजपुत्राचा विलक्षण पराक्रम पाहून रेझाखानासहि मोठें आश्चर्य वाटलें. बराच वेळ उभयपक्षांची झटापट चालू होती. शेवटीं रेझाखानानें एका कपटयुक्तीचें अवलंबन केलें. त्यानें वेशीच्या आंत बरेंच सैन्य गुप्तस्थळीं सज्ज ठेवून एकदम वेस उघडली. त्यासरशीं राजपुत्र व सेनापति मोठा जयघोष करीत वेशींतून आंत शिरले. त्यांच्या पाठोपाठ बरेच राज-सैनिकहि आंत घुसले. त्याबरोबर छपून बसलेल्या यवन सैनिकांनीं एकदम त्यांना गराडा दिला आणि सरसहा कत्तल सुरू केली. राजपुत्र गोविंदरामानें आपल्या समशेरीला कित्येक अविंधांचें रक्त पाजलें. त्याच्या सेनापतीनेंहि त्याच्या खांद्यास खांदा लावून अचाट पराक्रम गाजविला. परंतु वेशीचीं दारें एकदम बंद झाल्यामुळें बाहेरील राजसैनिकांस आंत येतां आलें नाहीं. यवन-सैन्य संख्याबलानें फारच अधिक असल्यामुळें राजपुत्राचें त्यांच्यापुढें कांहीं चालेनासें झालें. त्याच्या शरीरास कित्येक जखमा झाल्यामुळें त्याची शक्ति अगदीं क्षीण होत चालली आणि शेवटीं एका यवनसरदाराच्या तरवारीचा वार वर्मी लागल्यामुळें राजपुत्र गोविंदराम गतप्राण होऊन घोड्यावरून खालीं पडला. तें पाहतांच यवन सैनिकांनीं हर्षभरानें मोठा जयघोष केला.

यवनलोक ह्याप्रमाणें विजयानंदांत दंग असतां राजपुत्राच्या सेनापतीनें धन्याचें प्रेत चटकन् उचलून आपल्या घोड्यावर घेतलें आणि राजवाड्याकडे धूम ठोकली. त्याला स्वतःला जरी कित्येक जखमा लागून असह्य वेदना होत होत्या, तथापि त्या वेळीं त्यानें स्वतःच्या प्राणाची परवा केली नाहीं.

प्रासादद्वारांत येतांच त्यानें दरवानास हाक मारून सर्व थोडक्यांत हकीगत सांगितली. दरवानानें तत्काळ दरवाजा उघडून सेनापतीस आंत घेतलें आणि पुन्हां दरवाजा बंद केला. राजपुत्राच्या मृत्यूची वार्ता क्षणार्धांत चोहोंकडे पसरली. सेनापति आपल्या पतीचें प्रेत घेऊन आले आहेत असें समजतांच, वीरपत्नी ललितागौरी धांवतच बाहेर आली.

पतिवियोगामुळें अत्यंत शोकाकुल होऊन तिनें पतीच्या चरणांवर लोटां-गण घातलें. सेनापति व इतर आप्तस्वकीय मंडळींनीं तिचें समाधान करण्याचा प्रयत्न चालविला. राजपुत्राला वीरोचित मृत्यु आला असल्या-मुळें त्याला सद्गति मिळाली, त्याच्याबद्दल शोक करण्याचें कारण नाहीं, असें उपाध्याय म्हणाले. त्याबरोबर ललितागौरी एकदम भानावर आली. तिनें तत्काळ सर्व शोक आंवरला आणि आपल्या सहगमनाची लवकर सिद्धता करण्याविषयीं आज्ञा केली. ह्या तिच्या विचारापासून तिला परा-वृत्त करण्यासाठीं सर्व मंडळींनीं अतिशय खटपट करून पाहिली; परंतु वीरपत्नी ललितागौरीचा दृढनिश्चय लेशमात्रहि ढळला नाहीं. शेवटीं निरुपाय होऊन तिच्या इच्छेप्रमाणें सहगमनाची सिद्धता करण्यांत आली आणि सायंकाळच्या प्रशांत वेळीं प्रासादाच्या पश्चाद्भागीं पुण्यवान भागी-रथीच्या तीरीं महापतिव्रता तरुण ललितागौरीनें अत्यंत शांत चित्तानें नबाबी जुलुमात शाप देत आपल्या मृतपतीशीं सहगमन केलें.

महंमद रेझाखानास हें वर्तमान समजल्यावर त्यालाहि मोठें आश्चर्य वाटलें. त्यानें राजवाडा तत्काळ जप्त करून आपल्या ताब्यांत घेतला; राजकुटुंबांतील अवशिष्ट आप्तमंडळीस एक लहानसें घर रहावयास देऊन त्यांच्या निर्वाहासाठीं थोडीशी नेमणूकहि करून दिली आणि झालेलें वर्तमान नबाबसाहेबांकडे साविस्तर विदीत करून महंमद रेझाखान स्वतः आपल्या परिवारासह गोष्ठविहारप्रासादांत चैनीनें वास्तव्य करूं लागला.

महंमद रेझाखानास गोष्ठविहार प्रासादांत सर्व प्रकारचे राजोपभोग प्राप्त होऊं लागले. ह्या उपभोगांची पूर्णता करण्यासाठीं त्यानें आपली प्रियपत्नी फतीमाबेगम हिला गोष्ठविहारास येण्याविषयीं बोलावणें पाठ-विलें. परंतु मुराशिदाबादेसारखें विलासी शहर व तेथील आपले आप्तस्व-कीय सोडून परदेशांत जाण्यास ती तयार झाली नाहीं. तिकडील काम आटोपून तुम्हीच इकडे लवकर यावें असा तिनें पतीला उलट निरोप पाठविला. ही हकीगत दासीजनांकडून नेफिसाबेगमला समजली. तेव्हां नेफिसानें आपल्या आजोबास—वृद्ध नबाबास—भीड घालून व हट्ट धरून पतीसन्निध जाण्यास परवानगी मिळविली. नबाबांनीं प्रथम तिचा पुष्कळ प्रकारें निषेध केला; पण ती आपला आग्रह सोडीत नाहीं असें पाहून

नबाबांनीं आपले विश्वासू लोक बरोबर देऊन तिच्या दासीजनांसह तिची गोष्ठविहारास रवानगी केली आणि रेशाखानास स्वदस्तुरचें एक पत्र पाठविलें. त्यांत त्यांनीं असें स्पष्ट लिहिलें होतें कीं, " नेफिसा पूर्ण निर्दोष आहे अशी माझी खात्री आहे. पण तुमची तिच्या पातिव्रत्याबद्दल जरी खात्री नसली, तरी तिच्या स्वतःच्या अत्याग्रहास्तव मी तिला तिकडे पाठवीत आहे. तुमचें तिजवर प्रेम नसलें तरी माझ्या घराण्याची अब्रु संभाळण्याकरितां व तुमची स्वतःची इज्जत राखण्याकरितां तिला तुम्ही आपल्याजवळ ठेवून घेतलें पाहिजे, अशी तुम्हांस माझी सक्त आज्ञा आहे! "

नबाबाचा हा विलक्षण हुकूम पहातांच महमदरेशाखानास अत्यंत संताप आला. नेफिसाबेगमचें मुखावलोकन करण्याचीहि त्याची इच्छा नव्हती. तथापि नबाबांचा हुकूम अमान्य केल्यास त्याचा परिणाम भयंकर होईल आणि आपण सर्व ऐहिक सुखोपभोगांस मुकूं, अशी त्याला भीति वाटल्यामुळें, त्यानें नाइलाजास्तव नेफिसाबेगमला अंतःपुरांत ठेवून घेतलें. तथापि तिच्याशीं भाषण करावयाचें नाहीं, किंबहुना तिचें दर्शनहि घ्यावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला होता.

प्रेमाचें खरें रहस्य व पतिसेवेचें योग्य महत्त्व कल्याणकुमारीच्या सदुपदेशानें नेफिसाच्या अंतःकरणांत पक्कें बिंबून गेलें असल्यामुळें, पतीच्या तिरस्काराची बिलकूल परवा न करितां, पतिचरणाच्या दर्शनानें व प्रसंगवशात् घडणाऱ्या त्यांच्या अल्पस्वल्प सेवेनेंच ती स्वतःला धन्य मानून घेऊं लागली.



# प्रकरण १८ वें.



## भवितव्यता.



गोपीकृष्णराय व कल्याणकुमारी वीरकिटीरच्या राजप्रासादांत राजा उदयनारायणाच्या कुटुंबांत वास्तव्य करूं लागले. परंतु प्रवासाच्या श्रमानें गोपीकृष्णरायांची प्रकृति अधिकच बिघडली. वीरकिटीर येथें आल्यापासून त्यांनीं कायमचेंच आंथरूण धरिलें. शारीरिक व मानसिक अशा दोन्ही व्यथा प्रबल झाल्यामुळें त्यांना ज्वर येऊं लागला. राजवैद्यानें उत्तम औषधोपचार सुरू केले. कल्याणकुमारी रात्रंदिवस पितृशय्येजवळ बसून आपल्या परमपूज्य व अत्यंत प्रियपित्याची सेवाशुश्रूषा करीत होती. परंतु मानसिक व्याधीपुढें दिव्य औषधींचें आणि प्रेमळ शुश्रुषेचें तरी काय चालणार ? गोपीकृष्णरायांची स्थिति अगदीं मरणोन्मुख झाली. राजवैद्यांनीं हात टेकले. सर्वांची बहुतेक निराशा झाली. तथापि कल्याणकुमारीनें मात्र शुश्रुषेच्या कामीं यत्किंचितहि आळस किंवा दुर्लक्ष केलें नाहीं. पितृसेवा हेंच आपलें पवित्र कर्तव्य समजून ती रात्रंदिवस एक क्षणभर देखील बापाच्या बिछान्यापासून दूर होत नसे. ह्या अविश्रांत श्रमांनीं व मानसिक शोकानें बिचारी इतकी क्षीण व निस्तेज होऊन गेली कीं, तिला कोणीं एकाएकीं ओळखलेंहि नसतें.

सुमारें दोन आठवड्यानंतर एके दिवशीं सायंकाळीं राजवैद्यांनीं निराशाजनक उद्गार काढिले. " आजची रात्र निभावणें कठिण ! " असे वैद्याचे शब्द ऐकतांच कल्याणकुमारीच्या डोळ्यापुढें एकदम अंधेरी आली. तिला सर्व जग शून्य भासूं लागलें. ती बापाच्या मृत्युशय्येवर त्यांच्या उशाशीं बसून त्यांच्या म्लान व निस्तेज मुखाकडे अनिमेष दृष्टीनें पाहूं लागली. तिचें चित्त शोकानें विव्हल होऊन गेलें. क्षणभर बसावें, पुनः उठून उभें रहावें, पुनः बसावें, वारंवार भरून येणारें

हृदय दोन्ही हातांनीं घट्ट दाबून धरावें, पितृमुखावलोकन करितां करितां दीर्घ निश्वास सोडावे, असा तिचा क्रम एकसारखा रात्रभर चालला होता.

गोपीकृष्णराय मुमूर्षु अवस्थेंत डोळे मिटून बेशुद्ध पडले होते. पहाटेच्या वेळीं त्यांच्या मस्तकावर घर्मबिंधु चमकूं लागले. कल्याणकुमारी जवळ बसून हळूं हळूं घाम पुसूं लागली. गोपीकृष्णरायांनीं एकवार डोळे उघडून शून्य दृष्टीनें इकडे तिकडे पाहिलें. नंतर ते अस्पष्ट व क्षीण स्वरानें आपल्याशींच म्हणाले—" अत्याचार ! घोर अत्याचार ! आई जगदंबे, आह्मां अभागी वंगवासीजनांना ह्या संकटांतून तुझ्यावांचून कोण मुक्त करणार ? धांव, धांव !! "

कल्याणकुमारी बापाच्या तोंडाजवळ तोंड नेऊन मृदु व कंपितस्वरानें ह्मणाली—" बाबा, बाबा, काय म्हणतां ? तुमच्या ह्या अभागिनी कन्येकडे एकदां अवलोकन करा ! "

गोपीकृष्णरायांनीं एकवार कन्येच्या मुखाकडे पाहिलें आणि पुनः डोळे मिटले. त्यांचा घसा घरघर वाजूं लागला व कांहीं वेळानें त्यांचा आत्मा हा कष्टमय देह सोडून चालता झाला. कल्याणकुमारीनें पित्याच्या नाकाजवळ हात धरून पाहिलें, तों श्वासोच्छ्वास बंद ! छातीवर हात ठेवून पाहिलें तों हृदयस्पंदनहि बंद ! तेव्हां पित्याचें प्राणोत्क्रमण झालें, हें तिला तत्काळ समजलें. बिचारीनें आतांपर्यंत महत्प्रयासानें आवरून धरलेला शोकावेग एकदम जोरानें बाहेर पडला. "बाबा, मला अभागिनीला एकटी टाकून कसे हो गेला !" असा तिनें एकदम हंबरडा फोडला आणि ती धाडकन बेशुद्ध पडली.

राजवाड्यांतील सर्व मंडळी शोकाकुल झाली. सर्वांनीं कल्याणकुमारीचें प्रसंगानुरूप सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. गोपीकृष्णरायांच्या योग्यतेनुरूप त्यांचें और्ध्वदेहिक कर्म करण्यांत आलें. कल्याणकुमारी शून्य अंतःकरणानें एकांतीं एकटीच रात्रांदिवस आपल्या स्थितीचा विचार करीत बसून राहूं लागली. बाकी सर्वांचे सर्व व्यवहार पूर्ववत् सुरू झाले.

गोपीकृष्णरायांचें उत्तरकार्य समाप्त झाल्यावर एके दिवशीं योगानंद-

स्वामी वीरकिटीर प्रासादांत आले. कल्याणकुमारीला हें वर्तमान समजतांच ती एकांताचा त्याग करून त्यांच्या दर्शनास आली. तिनें स्वामींच्या चरणीं साष्टांग प्रणिपात केला. गुरुदर्शनानें तिला पुनः शोकाचा उमाळा आला. नेत्रांतून अश्रुप्रवाह वाहूं लागला आणि हुंदक्यांनीं कंठ दाटून आला. ती अधोमुख होऊन स्तब्ध उभी राहिली.

कल्याणकुमारीची शोकाकुल स्थिति अवलोकन करून योगानंदस्वामी स्मितपूर्वक ह्मणाले—" बाळ, कल्याणी, अशी वेड्यासारखी रडतेस काय ? तुला मीं जें इतकें ज्ञान सांगितलें, त्याचें हेंच का फल ? प्राणिमात्राला मृत्यु हा निश्चित आहे हें तूं विसरलीस काय ?"

कल्याणकुमारी आपल्या पदरानें डोळे पुसून रुद्ध स्वरानें ह्मणाली—" गुरुमहाराज, बाबा आपल्या घरांत नैसर्गिक मरणानें मृत्यु पावले असते, तर मला इतका शोक झाला नसता ! पण ह्या दुष्ट यवनांच्या क्रूर छलानें त्यांचा अंत झाला, ह्याबद्दलच मला फार खेद होत आहे ! "

योगानंद—" त्याबद्दल तरी तुला दुःख करण्याचें काय कारण ? प्रत्येक प्राण्याचा प्रारब्धभोग त्याच्या संचितानुसार निश्चित झालेला असतो, तो भोगल्यावांचून सुटकाच नाहीं ! प्रारब्धांत बदल करणें जर कोणाच्या हातीं नाहीं, तर त्याबद्दल शोक करणेंहि व्यर्थ होय ! "

कल्याणकुमारी—" महाराज हे प्रारब्धभोग चुकविण्यास कांहींच उपाय नाहीं का ?"

योगानंद—" आहे ! त्याला एकच उपाय आहे ! आणि तो उपाय म्हणजे आत्मयज्ञ संपादन करणें हाच होय ! प्रारब्धभोग हे देहाला असतात. आत्म्याशीं त्यांचा कांहीं संबंध नसतो. अज्ञानी मनुष्य, देह हाच आत्मा मानितात, म्हणून देहाला होणारीं सुखदुःखें आत्म्यालाच होत आहेत अशी त्यांची चुकीची समजूत होते; परंतु आत्मज्ञानी मनुष्याची देहाविषयींची अहंममता नष्ट झालेली असल्यामुळें, देहाच्या सुखदुःखांनीं तो सुखीहि होत नाहीं किंवा दुःखीहि होत नाहीं. तो सदोदित ब्रह्मानंदांत निमग्न असतो ! "

कल्याणकुमारी—" ब्रह्मज्ञानी मनुष्याचा देहाभिमान जर नष्ट होत

असेल, तर त्याला ह्या जगांत कांहींच कर्तव्य उरणार नाहीं! म्हणजे तो अजगरवृत्तीनें कोठें तरी पडून राहील! असेंच ना?"

योगानंद—" छे, छे! ही मोठीच गैरसमजूत! मनुष्याला स्वतःच्या देहाचें संरक्षण करणें एवढेंच कर्तव्य नसून जगाच्या धारणपोषणास शक्त्यनुसार हातभार लावणें हें त्याचें मुख्य कर्तव्य होय! ब्रह्मज्ञानी मनुष्याच्या स्वतःच्या उपभोग वासना नष्ट झालेल्या असतात, तथापि जगाचें हित करण्याचें त्याचें कर्तव्य त्याच्या देहपातापर्यंत त्याला सुटत नाहीं. ह्मणून ब्रह्मज्ञानी मनुष्य सर्वकर्में लोकहितार्थ कर्तव्यबुद्धीनें करीत असतो! ह्यालाच 'निष्कामकर्मयोग' असें ह्मणतात!"

कल्याणकुमारी—" महाराज, ज्ञानी मनुष्याला जगाचें हित करण्याची तरी कामना जर शिल्लक असतेच, तर त्याचीं कर्में निष्काम कशीं म्हणतां येतील?"

योगानंद—" हें पहा, रजोगुण व तमोगुण नष्ट होऊन सत्वगुणाची वृद्धि झाली म्हणजेच त्याला त्रिगुणातीत असें म्हणण्यांत येतें, त्याचप्रमाणें स्वतःच्या उपभोगाची वासना पूर्णपणें नष्ट होऊन केवळ लोकहिताची कामना तेवढी बाकी उरली, म्हणजे त्यालाच निष्काम अशी संज्ञा प्राप्त होते! स्वार्थी वासना हाच 'कर्मबंध' होय. निष्कामकर्मयोगांत तशी वासना नसल्यामुळें, तीं कर्में मोक्षाला प्रतिबंधक होत नाहींत!"

कल्याणकुमारी हात जोडून आनंदित स्वरानें ह्मणाली—" अहाहा! गुरुमहाराज, मला ह्या निष्कामकर्मयोगाचा सविस्तर उपदेश करावा आणि योग्य मार्गास लावून दुःखमुक्त करावें! मी आपल्या चरणीं शरण आलें आहे! ह्या जगांत मला आतां दुसरें कांहीं कर्तव्य उरलें नाहीं!"

योगानंदस्वामी स्मितपूर्वक म्हणाले—" बाळे, अद्यापि तुझें थोडें कर्तव्य अवशिष्ट आहे! तूं आपल्या भावाकडे एकवार जाऊन त्याचें सांत्वन कर, नंतर कांहीं काळ पतीची सेवा कर आणि मग माझ्या आश्रमांत ये म्हणजे मी तुला सन्मार्गाचा उपदेश करीन! आतां मी जातों!"

योगानंदस्वामी जावयास निघाले. कल्याणकुमारीनें पुनः त्यांना प्रणिपात केला. तिला योग्य आशीर्वाद देऊन सर्वांचा निरोप घेऊन स्वामी तेथून निघून गेले.

दुसरे दिवशीं कल्याणकुमारीनें प्रवासाची सिद्धता केली. राजा उदयनारायण व राजपुत्र साहेबराम हेही गोपीकृष्णरायांच्या मृत्यूचें दुःखकारक वर्तमान ऐकून वडनगराहून वीरकिरीट येथें आले होते, त्यांनीं कल्याणकुमारीला आणखी कांहीं दिवस तेथें राहण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला. परंतु आतां आपल्याला येथें राहण्याचें कांहींच प्रयोजन उरलें नाहीं व येथें राहून महाराजांना संकटांत घालण्याची आपली इच्छा नाहीं, असें सांगून तिनें निघण्याचा बेत निश्चित केला. तेव्हां सर्वांचा नाइलाज झाला.

उदयनारायणानें कल्याणकुमारीच्या बरोबर एक दासी व चार सशस्त्र सेवक संरक्षणास देऊन एका उत्तम नौकेंतून तिची गोष्ठविहाराकडे रवानगी करून दिली. कल्याणकुमारीनें निघण्याच्या वेळीं पुन्हां आपला पूर्वींचा पुरुष वेष धारण केला आणि कल्याणसिंह बनून ती सर्वांचा प्रेमपूर्वक निरोप घेऊन खिन्न अंतःकरणानें मार्गस्थ झाली.

कल्याणकुमारीची रवानगी केल्यावर राजा उदयनारायण राजपुत्र साहेबरामासह वडनगरास परत आले आणि त्यांनीं नबाबास पत्र लिहून असें कळविलें कीं, " गोष्ठविहारचा राजा गोपीकृष्णराय कांहीं काळ आपल्या आश्रयास होता; परंतु दुर्दैवानें तो मृत्यु पावला आणि त्याच्याबरोबर असलेली त्याची कन्या कल्याणकुमारी ही गोष्ठविहारास निघून गेली. याकरितां नबाबसाहेबांनीं आपल्याला क्षमा करून आपल्यावरचा राग सोडावा व पूर्वींप्रमाणें कृपालोभ कायम ठेवावा. "

ह्या पत्रानें नबाब मुरशिदकुलीखानाचें समाधान न होतां तो अधिकच संतप्त झाला. उदयनारायणानें आपल्याला फसविण्याकरितां ही खोटी हकीकत लिहिली आहे अशी त्याची कल्पना झाली आणि त्यानें क्रोधावेशानें उदयनारायणास असें उत्तर पाठविलें कीं, " सरकारचा गुन्हेगार गोपीकृष्ण ह्यास आश्रय देऊन तुम्ही राजद्रोहाचा अक्षम्य अपराध केला आहे. गोपीकृष्ण व त्याचा साथीदार यांना हजर केल्यावांचून

ह्या अपराधाबद्दल बिलकुल माफी होणार नाहीं. गोपीकृष्ण खरोखरच मेला असेल तर त्याचें प्रेत हजर करावें. सात दिवसांत ह्याप्रमाणें तुमच्याकडून वर्तन न झाल्यास तुम्ही पूर्ण विद्रोही आहां असें समजून तुमच्यावर एकदम स्वारी करण्यांत येईल, हें पक्कें समजावें. ”

ह्याप्रमाणें नबाबाकडून अपमानकारक जबाब आलेला पाहून, राजा उदयनारायण अतिशय क्रुद्ध झाला आणि त्यानें आपल्या सेनापतीस युद्धाची सिद्धता करण्यास तत्काळ आज्ञा दिली. सात दिवस होऊन गेले तरी उदयनारायणाकडून कांहींच वर्तमान आलें नाहीं असें पाहून नबाबानेंही वडनगरावर स्वारी करण्याचा निश्चय ठरविला.

---

## प्रकरण १९ वें



### स्वजनद्रोह.



एके दिवशीं नबाबांनीं वृद्ध दिवाण खानजहान व सेनापति महंमदजान यांना बोलावून आणून वडनगरावर स्वारी करण्याचा आपला उद्देश त्यांना कळविला. आणि स्वारीची सिद्धता करण्यास सेनापतीस हुकूम केला.

सेनापति महंमदजान हात जोडून नम्र स्वरानें म्हणाला—“ जहांपन्हा, हुजूरचा हुकूम शिरसावंद्य आहे व तो अमलांत आणावयास बंदा केव्हांही तत्पर आहे ! पण दासाची एक विनंति हुजूरनीं ऐकून घ्यावी. वडनगरचा राजा उदयनारायण हा सामान्य जमीनदार नसून मोठा संस्थानिक आहे. तो व त्याचा पुत्र साहेबराम हे महापराक्रमी योद्धे आहेत. त्यांचे सेनापती गुलाम महंमद व कालिया जमादार हे दोघेही रणबहादर वीर आहेत; शिवाय त्यांचें सैन्यही पुष्कळ असून लष्करी शिस्तींत तरबेज आहे ! ह्या सर्व गोष्टींचा विचार होऊन काय ती आज्ञा व्हावी, एवढीच प्रार्थना आहे. ”

नवाब विरक्त स्वरानें म्हणाला—" तर मग तुम्ही उदयनारायणाला भितां काय ? तुमचें सैन्य अशिक्षित आणि अल्पसंख्यांक आहे काय ? कीं तुम्ही त्याला फितूर आहां ? "

महमदजान एकदम उभा राहून म्हणाला—" जहांपन्हां, भीति म्हणजे काय, हें बंदा मुळींच जाणत नाहीं ! त्याचप्रमाणें अन्नदात्याशीं निमकहराम होणें हेंही माझ्या घराण्याचें शील नव्हे, याबद्दल हुजूरची खात्री असली पाहिजे ! तथापि सरकारी लष्करांपैकीं बराच भाग पूर्णिया प्रांतांतील बंडावा मोडून बंदोबस्त करण्याच्या कामीं सध्यां गुंतला आहे, शिवाय महमद रेझाखानांनींही कांहीं सैन्य गोष्टविहारास नेलें आहे. तरीही हुजूरचा हुकूम होईल तर, आहे तेवढेंच सैन्य घेऊन वडनगर आक्रमण करण्यास सेवक तयार आहे ! मग त्या कामीं सेवकाचे प्राण खर्च झाले तरी बेहेत्तर ! परंतु यशापयशाचे मालक जहांपन्हा आहेत, याकरितां विनंति करण्याचें धाडस केलें. "

नवाब मृदु स्वरानें म्हणाला—"बसा सेनापति, असे रागावूं नका. मी तुमचा अपमान करण्याकरितां बोललों नाहीं ! बरें, दिवाणजी, तुमची काय सल्ला आहे ? "

खानजहान—" जहांपन्हां, वडनगरास आतांच स्वारी करण्याचा हुजूरचा निश्चय असेल तर कृष्णनगराधिपतीची ह्या वेळीं मदत घ्यावी, असें मला वाटतें. कृष्णनगरचा राजपुत्र रघुराम हा मोठा धाडसी वीर आहे आणि त्याचें सैन्यही सुशीक्षित व शूर आहे ! कृष्णनगरचा राजा खंडणीकरितां प्रतिबंधांत असल्यामुळें, राजपुत्र रघुरामही सध्यां येथेंच येऊन राहिला आहे ! "

नवाब चकित स्वरानें म्हणाला—" हिंदु राजाशीं युद्ध करण्याच्या कामीं हिंदू राजाचीच मदत मिळणें शक्य तरी आहे का ? हिंदू लोक आपल्याच स्वजनांवर हत्यार चालविण्यास कसे तयार होतील ? आणि त्यांच्यावर आपण विश्वास तरी कसा ठेवावा ? "

खानजहान—"सरकार, ह्या हिंदु लोकांच्या सहवासांतच माझा जन्म गेला असल्यामुळें, त्यांच्या स्वभावाची मला पूर्ण माहिती झाली आहे. हे हिंदु लोक स्वार्थपरायण आहेत ! स्वदेशाच्या किंवा स्वजातीच्या

उन्नतीअवनतीची त्यांना यत्किंचितही कल्पना नाहीं। त्यांच्या अंगीं देशाभिमान किंवा जात्याभिमान असता तर आह्मां मूठभर परदेशी आणि विधर्मी मुसलमान लोकांना एवढा विस्तृत व समृद्ध देश जिंकून ताब्यांत ठेवतां आला असता काय ?"

नबाब स्मितपूर्वक म्हणाला—" हो, तुमचें म्हणणें खरें आहे ! बरें; पण रघुरामाचें मन कसें वळवावें ? आपल्याकडे कांहीं कमीपणा येतां कामा नये तसेंच आपलें नुकसानही होतां कामा नये ! "

खानजहान हुजूरची आज्ञा झाल्यास ती सर्व तजवीज मी बरोबर करितों ! रघुरामाच्या बापाला तूर्त तुरुंगांतून काढून येथें त्याच्या वाड्यांत नजरकैदेंत ठेवावें, आणि रघुरामानें सरकारची कामगिरी योग्य रीतीनें बजाविल्यास त्याच्याकडील खंडणीची बाकी माफ करून त्याच्या बापाला पूर्णपणें खुला करण्याचें वचन द्यावें, म्हणजे झालें ! कामगिरींत चूक झाल्यास किंवा अपयश आल्यास आपण वचनांतून मोकळे होऊं; किंवा यश आल्यास खंडणी इतकी रकम नजराणा म्हणून सहज वसूल करतां येईल ! "

नबाबानें दिवाणाची सल्ला तत्काळ मान्य केली आणि त्याप्रमाणें व्यवस्था करून स्वारीची लवकर तयारी करण्यास आज्ञा करून दिवाण व सेनापति यांस निरोप दिला.

खानजहानानें रघुरामास आपल्या वाड्यांत बोलावून आणून त्याचें मन प्रलोभित केलें. बिचारा रघुराम ह्या लोभास सहज बळी पडला. अत्याचारापासून आपल्या वृद्ध पित्याची तूर्त मुक्तता होत आहे, एवढ्या स्वार्थपरभावनेनें तो स्वजनद्रोहाचें महत्पाप आचरण्यास बेलाशक तयार झाला. आपल्या दुराचरणाचा परिणाम काय होईल याचा त्यानें यत्किंचितही विचार केला नाहीं व तसा विचार करण्याइतकी त्याच्या अंगीं पात्रताही नव्हती.

थोडक्याच दिवसांत राजपुत्र रघुराम आपल्या हिंदी सैन्यासह सेनापति महमदजान यास येऊन मिळाला आणि उभयतांहि नबाबांची आज्ञा घेऊन आपल्या मिश्र सैन्यासह मोठ्या त्वरेनें वडनगराच्या रोखानें निघाले.

कृष्णनगराधिपति व त्याचे वृद्ध दिवाण ह्या उभयतांसहि राजपुत्राचें हें अविचाराचें कृत्य पसंत पडलें नाहीं, पण आतां त्यांचा कांहीं इलाज चालण्यासारखा नसल्यामुळें, नशिबावर हवाला ठेवून स्वस्थ रहाणें भाग पडलें.

सेनापति महमदजान व राजपुत्र रघुराम सैन्यासह मोठमोठ्या मजला घेत वडनगरासन्निध येऊन दाखल झाले. ही बातमी राजपुत्र साहेबराम व सेनापति गुलाममहमद यांना हेरांकडून समजतांच त्यांनीं असा मनसुबा केला कीं, यवन सैन्य दमूनभागून आलें आहे, त्यांना विश्रांति घेऊन ताजेंतवानें होण्यास फुरसद न देतां एकदम त्यांच्यावर छापा घातल्यास, अल्प प्रयासानें पुष्कळ फायदा होण्याचा संभव आहे. राजा उदयनारायणास ही कल्पना पसंत पडून त्यानेंहि तसें करण्यास तत्काळ संमति दिली.

यवन सैनिक योठ्या त्वरेनें कुच करीत आले असल्यामुळें फारच दमून गेले होते. वडनगरासमीप येतांच सेनापतीच्या आज्ञेप्रमाणें सर्व लोक आपापले सरंजाम उतरून छावणी ठोकण्याच्या व जेवणखाणाची तजवीज पहाण्याच्या नादास लागले. सूर्यास्ताची वेळ होत आली होती. महमदजान व रघुराम कांहीं लोकांसह छावणीचा बंदोबस्त करण्याकरितां फिरत होते. आजची रात्र विश्रांति घेऊन उद्ईक प्रातःकाळींच शहरावर हल्ला करावयाचा असा त्यांनीं निश्चय ठरविला होता.

सूर्यास्त होऊन काळोख पडूं लागला. यवन छावणींत ठिकठिकाणीं आगट्या पेटल्या व त्या प्रकाशांत सैनिक जेवणखाणाच्या तयारीस लागले. इतक्यांत शहराकडील बाजूनें घोड्यांच्या टापांचा गंभीर ध्वनि ऐकूं येऊं लागला. महमदजान व रघुराम फिरतां फिरतां एकदम निश्चल उभे राहिले व त्यांनीं आपल्याबरोबरचे कांहीं लोक त्या दिशेकडे टेहळणीस पाठविले. थोड्याच वेळांत ते लोक परत आले आणि त्यांनीं भयभीत स्वरानें सांगितलें कीं, "शहराकडून बरेंच मोठें सैन्य छावणीवर चाल करून येत आहे!"

ही अनपेक्षित खबर कळतांच दोघांहि सेनापतींनीं आपापल्या सैनि-

कांस एकदम तयारीची सूचना दिली. त्याबरोबर सर्वत्र एकच धांदल उडाली. कोणी आपापल्या घोड्यांवर जिनें कसूं लागले, कोणी आपले पोषाख व शस्त्रास्त्रें चढवूं लागले, कोणी आपलें सामानसुमान आवरूं लागले, व कोणी आपलीं हत्यारें शोधण्याकरितां इकडे तिकडे सैरावैरा धांवूं लागले. सर्व छावणभर गोंधळ व गोंगाट माजून राहिला. इतक्यांत वडनगरचें सैन्य एकदम यवनछावणीवर तुटून पडलें. उभयपक्षांत एकाएकीं भयंकर रणधुमाळी माजली. काळोखांत शत्रुमित्रहि ओळखेनातसे झाले. कोण पुढें येईल त्याच्याशीं हाणामारी सुरू झाली. दोहोंकडील सैन्यांत शिस्त बिलकुल उरली नाहीं.

महमदजान व रघुराम आपापल्या सैनिकांस धीर देण्याकरितां मोठमोठ्यानें उत्तेजरपर आरोळ्या ठोकीत होते. त्यांवरून गुलाममहमद व साहेबराम यांनीं त्यांना ओळखून त्यांच्यावर हल्ला केला. ह्या चौघां वीरांचें तुंबळ द्वंद्वयुद्ध बराच वेळ चाललें होतें. अखेरीस राजपुत्र रघुरामाचा घोडा घायाळ होऊन एकाएकीं खालीं पडला, त्याबरोबरच रघुरामहि बेसावधपणें खालीं आला, साहेबरामाच्या लोकांनीं त्याला उचलून त्याचे हातपाय बांधून एकदम शहराकडे पळविलें. रघुराम आपल्याजवळ नाहीं असें पहातांच महमदजान घाबरला आणि युद्ध सोडून दुसरीकडे पळून गेला.

सुमारें एक प्रहरभर ह्याप्रमाणें रणकंदन झाल्यावर गुलाममहमद व साहेबराम यांनीं आपल्या लोकांस खुणेची इषारत दिली. त्याबरोबर त्यांचें सैन्य एकदम मागें फिरून शहराकडे निघून गेलें आणि शहरांत पोंचतांच त्यांनीं वेशी बंद करून घेतल्या.

यवन सैनिकांनीं वडनगरच्या सैन्याचा पाठलाग करण्याचा विचारहि मनांत आणिला नाहीं. आलेलें संकट लवकर टळलें, एवढ्यांतच त्यांनीं समाधान मानिलें आणि ते पुनः आपल्या छावणीच्या व्यवस्थेस लागले.

दुसरे दिवशीं सकाळीं सैनापति महमदजान यानें आपल्या व रघुरामाच्या सैन्याची तपासणी केली. त्यावरून एवढ्या अल्पावधींत आपल्या पक्षाची फारच मोठी हानि झाल्याचें त्याला आढळून आलें. हें नामुष्कीचें वर्तमान नवाबांकडे कळविण्याचीहि त्याला शरम वाटूं लागली.

असें अपयश घेऊन परत जाण्याची तर सोयच नव्हती. शहरावर हल्ला करण्याइतकें सामर्थ्यहि त्याच्या सैन्यांत उरलें नव्हतें. शेवटीं विचार करून, वडनगर शहराला वेढा देऊन स्वस्थ रहाणें त्याला भाग पडलें.

महमदजानला स्वारीवर जाऊन पंधरा दिवस झाले, तरी त्याजकडील वर्तमान कांहींच कळेना, तेव्हां नवाबाचें अंतःकरण साशंक व अस्वस्थ झालें. दिवाण खानजहान यानें हुजूरच्या आज्ञेवरून वडनगराकडे दूत रवाना केले. ते लवकरच परत आल्यावर नवाबाला स्वारीचें सविस्तर वर्तमान समजलें. रघुराम कैद झाला व आपल्या सैन्याची फार खराबी झाली असें समजतांच नवाबास फार वाईट वाटलें व महमदजानच्या हलगर्जीपणाबद्दल अतिशय राग आला.

आतां पुढें काय करावें, याविषयीं नवाबानें वृद्ध दिवाणास सल्ला विचारली. तेव्हां खानजहान म्हणाला---" जहांपन्हां, ह्या वेळीं आपल्याला अनुकूल परिस्थिति नाहीं ! महमदजानला आणखी सैन्याची मदत पाठविण्यास तूर्त सवड नाहीं व असलेल्या सैन्याच्या हातून वडनगरसारखें मजबूत ठिकाण हस्तगत होईल असें वाटत नाहीं ! यासाठीं सध्यां उदयनारायणाशीं कांहीं तरी तडजोड करून ह्या स्वारीचें काम तहकूब करावें, आणि अनुकूल संधीची वाट पहात आपली तयारी करावी, असें मला वाटतें ! याउपर हुजूरची आज्ञा प्रमाण ! "

नवाब--" आपला मानभंग न होतां तडजोड होत असेल तर करावयास माझी कांहीं हरकत नाहीं ! "

खानजहान---" त्याबद्दल सरकारांनीं निष्काळजी असावें, हुजूरच्या इभ्रतीस कमीपणा न येतां तडजोड करितां येईल तरच मी करीन ! "

वृद्ध दिवाण नवाबसाहेबांचा निरोप घेऊन आपल्या वाड्यांत आले, व तडजोड कशी करावी याविषयीं विचार करूं लागले. त्यांनीं बऱ्याच कल्पना मनांत आणिल्या, पण त्यांपैकीं एकहि त्यांच्या मनास पटेना.

दोन दिवसानंतर वडनगराहून एक जासूद पत्र घेऊन आला. त्यांत राजा उदयनारायणानें असें लिहिलें होतें, कीं, " सरकारचा गुन्हेगार

गोपकिृष्णराय हा आपला आप्त असल्यामुळें, त्याला आश्रय देणें भाग पडलें. तथापि त्याबद्दल मी हुजूरची क्षमा मागण्यास तयार आहे. शिवाय गोपकिृष्णराय मृत्यु पावला असून त्याच्याबरोबर आलेली त्याची कन्या कल्याणकुमारी ही गोष्ठविहारास परत गेली आहे ! असें असतां नबाबसाहेबांनीं विनाकारण मजवर गहजब चालविला आहे ! तरी याबद्दल विचार होऊन सैन्य पुनः एकवार परत बोलवावें, व मजवर पूर्ववत् कृपा लोभ ठेवावा, अशी पुनः पुनः विनंति करीत आहे." इत्यादि....

वडनगरच्या सैन्यास पहिल्या तडाक्यास जरी जय मिळाला होता, तरी नवाबाच्या अवाढव्य लष्करापुढें व बादशाही सत्तेपुढें आपला टिकाव लागणार नाहीं हें राजा उदयनारायण पूर्णपणें जाणून होता. शिवाय ज्यांच्याकरितां अभिमान बाळगावयाचा तेहि उरले नाहींत, असा विचार करून उदयनारायणानें हें उपस्थित संकट टाळण्याचा प्रयत्न करून पहाण्यासाठीं वरील पत्र पाठविलें होतें.

दिवाणखानजहान यानें ह्या पत्राचा फायदा घेऊन तत्काळ उत्तर पाठविलें कीं, " इकडून एक स्वतंत्र कामगार गोपकिृष्णरायासंबंधानें चौकशी करण्यास येत आहे. तुमचें म्हणणें यथार्थ आहे अशी त्याची खात्री झाल्यास, नवाबसाहेब वडनगरचा वेढा उठवून सेनापतीस परत बोलावितील."

दिवाणांनीं लागलीच एका विश्वासू अंमलदाराची ह्या कामगिरीवर नेमणूक केली. त्यानें उदयग्राम, वडनगर व वीरकिटीर येथें जाऊन चौकशी केली. त्यांत गोपकिृष्णराय खरोखरच मृत्यु पावला असून, त्याच्याबरोबर त्याच्या कन्येशिवाय दुसरें कोणीहि नव्हतें व ती कन्याहि गोष्ठविहारास निघून गेली, अशी त्याची खात्री झाली. दिवाणांनीं हें सर्व वर्तमान नबाबसाहेबांस विदित केलें व त्यांच्या आज्ञेनें सेनापति महमदजान यास सैन्यासह परत बोलाविलें. मात्र ह्या स्वारीचा खर्च उदयनारायणानें द्यावा, व रघुरामास मुरशिदाबादेस सुरक्षित परत पाठवावें असें उदयनारायणास फर्माविण्यांत आलें.

उदयनारायणानें दोन्ही अटी मान्य केल्या. राजपुत्र रघुराम लवकरच मुरशिदाबादेस आला. नबाबांनीं त्याच्या हलगर्जीपणाबद्दल त्याची खूप निर्भत्सना केली व त्याच्या बापाची नजरकैद कायम ठेवून त्याला खंडणीची बाकी हजर करण्यास एक वर्षाची मुदत दिली. ह्याप्रमाणें रघुरामाचे श्रम व्यर्थ गेले व स्वजनद्रोहाचें पातक मात्र पदरीं आलें. याबद्दल त्याला पूर्ण पश्चात्ताप झाला.

---

# प्रकरण २० वें.



## संशय निवृत्ति !



कल्याणकुमारी पुन्हां पुरुषवेषधारी कल्याणसिंह बनून वीरकिटीरहून निघाल्यावर कांहीं काळानें, जेथें त्यांच्या खजिन्याच्या नौकेवर चोरांनीं छापा घातला होता, त्या ठिकाणीं त्यांची नौका आली. कल्याणसिंहानें नावाड्यांस नौका तीरावर नांगरण्यास सांगितलें व आपण एकटाच खालीं उतरून पुढें गेला. नदीतीरापासून थोड्या अंतरावर असलेलें कालीमातेचें जीर्ण देवालय त्याच्या दृष्टीस पडलें. त्या देवालयासभोंवतीं व्यवस्थित रीतीनें बांधलेल्या बऱ्याच झोंपड्याहि त्याच्या दृष्टीस पडल्या. झोंपड्या लहान लहान पण अंतर्बाह्य स्वच्छ असून प्रत्येक झोंपडीपुढें एक एक प्रशस्त तुलसीवृंदावन दिसत होतें.

कल्याणसिंह कालीमातेच्या मंदिरांत आलेला पाहतांच शेजारच्या झोंपड्यांतून कांहीं लोक मंदिरांत आले आणि त्यांनीं कल्याणसिंहाचा प्रेमपूर्वक यथोचित आदरसत्कार केला.

कल्याणसिंह त्या लोकांना मृदुस्वरानें म्हणाला—“ येथील वस्ती नवीन दिसते आहे ! ह्या गांवाचें नांव काय ? ”

ग्रामस्थ—“ पूर्वीं आम्ही ह्या ठिकाणाला कालीपूर म्हणत होतों;

पण गेल्या वर्षापासून ह्या गांवाचें नांव कल्याणपूर पडलें आहे! आमचे धनी नीलकंठराय यांच्या इच्छेवरून हें नांव बदलण्यांत आलें!"

आपण स्थान चुकलों नाहीं, अशी कल्याणसिंहाची खात्री झाली. नंतर नीलकंठराय व त्यांचे साथीदार यांचें वर्तन कितपत सुधारलें आहे हें पाहण्याकरितां तो म्हणाला—"तुम्ही ह्या अरण्यांत राहून काय व्यवसाय करीत असतां?"

ग्रामस्थ—"ठाकूर नीलकंठरायांच्या सदुपदेशाप्रमाणें दीन दुबळ्यांना शक्य तितकी मदत करीत असतों! नीलकंठरायांच्याच प्रोत्साहनानें आणि मदतीनें आम्हीं जंगल तोडून थोडथोडी शेती केली आहे व गाई बाळगल्या आहेत! गरीब प्रवासी व यात्रेकरू लोकांचा यथासाध्य परामर्श घेऊन कालीमातेची सेवा करीत येथें आनंदानें रहात असतों. ठाकूर नीलकंठराय म्हणजे केवळ ईश्वरावतार! त्यांनीं आपल्याबरोबर आम्हां सर्वांना नरककुंडांतून मुक्त केलें! त्यांनींच आमचा उद्धार केला! तेच आमचे धनी आणि गुरु! त्यांचें विस्मरण आम्हांस कदापि होणार नाहीं!"

कल्याणसिंहाच्या मनांत कांहीं शंका येऊन त्याचें चित्त अस्वस्थ झालें. तो कंपित स्वरानें म्हणाला—"ते हल्लीं कोठें आहेत?"

कल्याणसिंहाचा प्रश्न ऐकतांच सर्वांचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. त्यापैकीं प्रमुख गृहस्थ रुद्ध स्वरानें म्हणाला—"हाय, हाय, महाराज, ते आम्हां पातक्यांचा त्याग करून स्वर्गास निघून गेले! एक महिन्यापूर्वी त्यांना एक भयकर स्वप्न पडलें, नंतर त्यांना ज्वर आला आणि आठ दिवसांतच ह्या कालीमातेच्या सन्निध त्यांचा अंत झाला! आम्हीं त्यांचें उत्तरकार्य यथाविधि केलें आणि त्यांच्या स्मरणार्थ त्यांच्या पादुका स्थापन केल्या. कालीमातेबरोबर त्यांचीहि आम्ही नित्यपूजा करीत असतों!"

ग्रामस्थांचें हें भाषण ऐकतांच कल्याणसिंह मट्कन् खालीं बसला. त्याला एकदम शोकाचा उमाळा आला; पण त्यानें तो मोठ्या विवेकानें व महत्प्रयासानें दाबला. तथापि त्याच्या नेत्रांतून अविरल अश्रुप्रवाह बाहेर पडला.

कल्याणसिंहाची ही शोकमग्न अवस्था पाहून ग्रामस्थांस मोठें आश्चर्य

वाटलें आणि ते हळूच म्हणाले—" महाराज, आपली व ठाकूरजींची ओळख होती काय ? "

कल्याणसिंह अश्रु पुसून गद्गदस्वरानें म्हणाला—" होय ! गेल्या वर्षी इकडून मुरशिदाबादेस जाणाऱ्या नौकेवर त्यांनीं छापा घातला होता आणि त्यांत ते कैद झाले होते, हें तुम्हांपैकीं कोणास आठवत असेल ! ती नौका माझीच होती, आणि मींच त्यांची त्या वेळीं मुक्तता केली होती !"

ग्रामस्थ—" अरेरे ! तर मग ते आपलें रात्रंदिवस स्मरण करीत असत ! आपल्याला ते गुरु मानीत ! आपल्याच उपदेशानें त्यांचा मोह नष्ट होऊन त्यांना सन्मार्ग दृग्गोचर झाला, असें ते नेहमीं म्हणत ! ते एकसारखी आपलीच मार्गप्रतीक्षा करीत ! पण अखेर आपलें दर्शन झालें नाहीं ! कालीमातेची मर्जी ! "

कल्याणसिंहास तेथें क्षणभरहि बसवेना ! त्यानें त्या गरीब ग्रामस्थांस आपल्या गुरूच्या उपदेशाप्रमाणें नेकीनें वागून परोपकार करण्याविषयीं पुन्हां एकदां उपदेश करून त्यांचा निरोप घेतला. त्या वेळीं त्याच्या हृदयांत जबरदस्त शोकावेग उत्पन्न झाला; परंतु आपल्या वेषाकडे लक्ष देऊन त्याला तो आवरणें भाग पडलें. नंतर तो कालीमातेला प्रणाम करून तेथून निघाला आणि गंगातीरीं येऊन नावेंत बसल्यावर त्यानें नावाड्यांस गोष्ठविहाराकडे नांव हाकारण्यास आज्ञा केली.

त्या दिवशीं रात्रीं नौकेंतील एकांतस्थलीं कल्याणकुमारीनें पतिनिधनाबद्दल अतिशय शोक केला. तेथें तिचें समाधान तरी कोण करणार ? शेवटीं योगानंदस्वामींच्या उपदेशाचें स्मरण होऊन तिनें आपला आपणच शोक आवरला आणि दुःखभरानें वेडावून आत्महत्या करण्याचा उद्भवलेला अविचारहि सोडून दिला.

कांहीं दिवसांनीं कल्याणसिंहाची नौका गोष्ठविहारासन्निध आली. आपण घरांतून निघतांना कोणत्या स्थितींत व किती उमेदीनें निघालों होतों आणि एवढ्याशा अल्पकाळांत कालचक्राच्या झपाट्यानें आपल्या स्थितींत किती परिवर्तन झालें, हा विचार मनांत येऊन कल्याणसिंहाचें कोमल अंतःकरण दुःखविव्हल झालें. तो नौकेवर उभा राहून खिन्न दृष्टीनें गोष्ठविहारप्रासादाकडे पहात होता. तों प्रासादशिखरावर चंद्र-

चिन्हांकित हिरवें निशाण फडकत असलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. त्याबरोबर तो एकदम दचकला. येथेंहि कांहीं विपरीत प्रकार घडून आला आहे, अशी त्याची खात्री झाली. त्याला आपल्या भावाबद्दल अत्यंत चिंता लागून राहिली.

गोष्ठविहारच्या पाणवठ्यास नौका लागतांच, नावाड्यांस व बरोबरच्या इतर मंडळीस नौकेंतच रहावयास सांगून, कल्याणसिंह एकटाच तीरावर उतरला. तेथें जवळच एक गुराखी भेटला; त्याजपाशीं चौकशी करितां गोष्ठविहार राजवाड्यांत महमद रेझाखान रहात असतो असें त्याला समजलें. नंतर कांहीं वेळ विचार करून कल्याणसिंहानें मुकाट्यानें उपाध्यायशिरोमणी ठाकूर यांच्या घराचा मार्ग धरिला.

वृद्ध शिरोमणी ठाकूर घरांतच पोथी वाचीत बसले होते. कल्याणसिंहानें जवळ जाऊन त्यांना प्रणाम केला. ठाकूर महाशयांनीं त्याला तत्काळ ओळखलें, आणि एकदम उठून, " कल्याण " म्हणून हंबरडा फोडून त्याला अपत्यप्रेमानें आलिंगन दिलें. उभयतांनींहि कांहीं न बोलतां बराच वेळ अश्रुविसर्जन केलें.

कांहीं वेळानें कल्याणकुमारीनें आपला पुरुषवेष काढून टाकला. नंतर तिनें ठाकूर महाशयांस पितृनिधनाचें वर्तमान सांगितलें. मग त्यांनींहि तिला गोष्ठविहारच्या युद्धाची, त्यांत राजपुत्र गोविंदराम मृत्यु पावल्याची व त्याची पत्नी ललितागौरी सती गेल्याची हकीगत कळविली. ह्या एकदम भडकलेल्या दुःखज्वालांनीं बिचाऱ्या कल्याणकुमारीचें कोमल अंतःकरण दग्ध झालें व त्यामुळें तिच्या नेत्रांतील अश्रुजलहि आटून गेलें.

स्नानभोजनादि नित्यकर्मे आटोपल्यावर कल्याणकुमारी आपल्याशींच विचार करूं लागली. आतां मात्र आपल्याला जगांत कोणत्याहि प्रकारें बंधन राहिलें नाहीं. आतां गुरुमहाराजांच्या सेवेंत राहून मानव जन्माची सार्थकता करावयाची, यावांचून दुसरें कांहींच कर्तव्य उरलें नाहीं, असा तिनें आपल्या मनाचा निश्चय केला.

रेझाखान नेफिसाबेगमसह राजवाड्यांत राहिली आहे, असें शिरोमणी ठाकुरांकडून कल्याणकुमारीला समजलें. तें ऐकून तिला बरेंच आश्चर्य

वाटलें. आणि एक अवशिष्ट कर्तव्य पूर्ण करण्याचा अनायासेंच सुयोग आल्याबद्दल थोडासा आनंदहि झाला. नेफिसाबेगमेचा नबाबी परवाना आपल्या जवळ आहे तो तिला परत देऊन टाकावा व नंतर येथून निघून जावें, असें तिनें ठरविलें.

सायंकाळीं दोन घटका रात्र झाल्यावर कल्याणकुमारी पुनः पुरुषवेष धारण करून व वरून एक मुसलमानी बुरखा पांघरून शिरोमणी ठाकूरांच्या घरांतून बाहेर पडली. राजवाड्यांतील स्त्रियांचें अंतःपुर तिला पूर्णपणें माहीत असल्यामुळें, ती थेट बेगमेच्या महालाजवळ गेली. तेथें एक पहारेकरी उभा होता, त्याला तिनें परवाना दाखविला. ती कोणी तरी बड्या घराण्यांतील मुसलमान स्त्री असावी असें वरील बुरख्यावरून समजून, पहारेवाल्यानें परवान्यास वंदन करून तिला मुकाट्यानें आंत जाऊं दिलें.

नेफिसाबेगम आपल्या महालात आपल्या पतीकरितां पुष्पहार गुंफीत बसली होती व एक दासी फुलें निवडून देत होती. कल्याणसिंह आंत येतांच नेफिसानें त्याला चटकन् ओळखलें. आणि हातांतील पुष्पहार खालीं टाकून धांवत जाऊन त्याला गाढ आलिंगन दिलें. हें पाहून दासी मुकाट्यानें तेथून बाहेर निघून गेली. नेफिसानें कल्याणसिंहाचा हात धरून त्याला एका कोचावर आपल्या सन्निध बसविलें. नंतर एकमेकांनीं परस्परांस क्षेमकुशल विचारल्यावर परस्परांची हकीगतहि विचारली.

कल्याणकुमारी एकाएकीं अदृश्य झाल्यामुळें आपल्यावर किती घाणेरडा आरोप व कसा गहजब झाला हें नेफिसानें कल्याणकुमारीस सांगितलें आणि त्याप्रसंगीं कल्याणकुमारीच्या उपदेशाप्रमाणें आपण किती दृढनिश्चयानें व निःस्वार्थ बुद्धीनें वागलों, व त्याचा इष्ट परिणाम कसा झाला हेंहि निवेदन केलें. नंतर कल्याणकुमारीनें आपली सर्व हकीगत बेगमेला थोडक्यांत कळविली. कल्याणकुमारीवर अल्पावधींतच कोसळलेले अनेक दुर्धर दुःखप्रसंग ऐकून नेफिसाबेगमचें अंतःकरण अतिशय कळवळलें. आणि तिनें तिचें समाधान करण्याचा प्रयत्न चालविला.

कल्याणसिंह महालांत येतांच जी दासी बाहेर निघून गेली, तिनेंही त्याला ओळखलें होतें. मुरशिदाबादेस बेगमसाहेबांकडे गुप्तपणें हाच

राजपुत्र येत होता. आणि ही बातमी आपण खानसाहेबांस कळविली नाहीं म्हणून आपल्यावर त्याची अतिशय इतराजी झाली होती. यासाठीं आतां ही गुप्त बातमी तावडतोब खानसाहेबांस कळवून त्यांची मर्जी सुप्रसन्न करून घ्यावी, असा विचार करून ती दासी एकदम रेझाखानाच्या महालांत गेली आणि तिनें त्याला एकांती सर्व वर्तमान निवेदन केलें.

रेझाखान चटकन उठून समशेर घेऊन बेगमेच्या महालाकडे निघाला. बेगमेला तिच्या जारासमक्ष फजीत करून तिचा गुन्हा तिच्या पदरांत भरपूर घालावयाचा, आणि त्या हरामखोराचा तेथल्या तेथें शिरच्छेद करून, त्याचें शीर नेफिसाबरोबरच नबाबसाहेकडे पाठवावयाचें, म्हणजे त्यांचीहि खात्री होईल. असा क्रूर विचार करीत व सैतानी आनंदानें विकटहास्य करीत रेझाखान नेफिसाच्या महालाजवळ आला, आणि त्यानें महालाच्या दरवाजावर लाथ मारून धाडकन दार उघडलें.

रेझाखानास पाहतांच नेफिसा व कल्याणसिंह उभयतांही एकदम उठून उभीं राहिलीं. नेफिसानें पुढें होऊन पतीचें प्रेमादरपूर्वक स्वागत केलें. तेचा हा निर्लज्जपणा पाहून तर रेझाखानाचा संताप अनावर झाला.

महमद रेझाखान नेफिसाला जोरानें मागें ढकलून कंपित स्वरानें म्हणाला—"दुष्टे, कुलटे, आपल्या जारासमक्ष पतीचें स्वागत करावयास तुला लाज नाहीं वाटत ? एखाद्या बाजारबसवीला जितकी अब्रू असते तितकी देखील तुला उरली नाहीं का ?"

नेफिसा—"नाथ, काय ही भलतीच शंका ? हे माझे गुरु आहेत ! ह्यांनींच मला शुद्ध प्रेमाचें तत्व व पत्नीचें कर्तव्य शिकाविलें !".

रेझाखान—"होय ! सुरतशास्त्राचे हे तुझे गुरु आहेत, तसेच नीच स्त्रियांच्या कौटिल्याचा मला प्रत्यय आणून देणारे माझेही गुरुच आहेत ! तुझ्या समक्षच त्यांना आतां गुरुदक्षिणा देऊन तुझ्या व त्यांच्या ऋणांतून एकदमच मुक्त होतों ! बेशरम स्त्रिये, तुझ्या महालांत तुझ्या जाराच्या संगतींत तुला पकडलें असतां, अद्यापि देखील अपराध पश्चात्तापपूर्वक कबूल करण्याची तुला सद्बुद्धि होत नाहीं काय ? अथवा तुझ्या कबुलीची तरी मला आतां काय जरूर आहे ? ह्यानेंच हराम-

खोराचा शिरच्छेद करून, त्याचें मस्तक तुझ्या पातकाचें फळ म्हणून तुझ्या गळ्यांत बांधून तुला नबाबसाहेबांकडे पाठवितों ! "

रेशाखान तरवार उपसून कल्याणसिंहाच्या अंगावर धांवला. कल्याणसिंह न डगमगतां त्याच्याकडे तिरस्कारपूर्ण नजरेनें पहात निश्चल उभा होता. नेफिसा धांवत जाऊन पतीचा उगारलेला हात धरून म्हणाली—" हां हां ! प्राणनाथ स्त्रीहत्येचें महत्पातक करूं नये ! आपल्यासारख्या शूर वीराच्या समशेरीला स्त्रीरक्ताचा विटाळ सहन होणार नाहीं ! मी आपली धर्मपत्नी असल्यामुळें आपल्याबरोबर माझेंही नांव कलंकित करून नरकाची जोड करूं नये ! "

रेशाखान मागें सरून चकित स्वरानें म्हणाला—" स्त्रीहत्या ? कोठें आहे स्त्री ? दुष्टे, मला तूं अंध किंवा वेडा समजून फसवूं पाहतेस काय ?"

नेफिसा कल्याणसिंहाजवळ जाऊन त्याचा हात धरून नम्र स्वरानें म्हणाली—" प्रिय सखे, राजकन्ये, मला क्षमा कर ! आतां तुझें रहस्य गुप्त राखणें अशक्य आहे ! आपलें सत्य स्वरूप प्रगट करून नाथांची खात्री कर ! त्यामुळें तुजवर कोणतेंही संकट मी येऊं होणार नाहीं, अशी मी शपथ घेतें ! "

कल्याणकुमारीनें चटकन उठून आपल्या अंगावरील पुरुष वेष काढून टाकला, आणि पदर सांवरून ती एका बाजूस अधोवदन उभी राहिली. तिचें अप्रतिम लावण्य अवलोकन करून महमद रेशाखान अगदीं दिपून गेला, त्याच्या हातांतील तरवार आपोआपच गळून पडली आणि तो खजील होऊन एका कोचावर बसून चकित दृष्टीनें कल्याणकुमारीकडे पाहूं लागला. आपल्याला चकविण्याकरितां नेफिसानें हें कांहीं तरी कपट तर केलें नसेल, अशीही त्याला क्षणभर शंका आली. पण कल्याणकुमारीचें नैसर्गिक मनोहरकोमल सौंदर्य अवलोकन करून त्याची ती कुशंका फार वेळ टिकली नाहीं.

नेफिसा व कल्याणकुमारी ह्या दोघींनाही समोरच्या पलंगावर बसावयास सांगून रेशाखान मृदु स्वरानें म्हणाला—" राजकन्ये, सुराशिवाबादेस नेफिसाच्या महालांत पुरुष वेषानें तूंच येत होतीस काय ? नबाबी परवाना नेफिसानें तुलाच दिला होता काय ? आणि त्या परवान्याचा

उपयोग करून यवन वेषानें गोपीकृष्णरायाला तुरुंगांतून तूंच नेलेंस काय ? तुझें रहस्यमय चरित्र साद्यंत ऐकण्याची मला अत्यंत उत्कंठा उत्पन्न झाली आहे ! मी तुझा बंधु आहें असें समज आणि निर्भयपणें आपली सविस्तर हकीगत सांग. "

कल्याणकुमारीनें रेझाखानाच्या सौजन्याबद्दल त्याचे आभार मानिले आणि गोष्ठविहाराहून निघाल्यापासून आतांपर्यंतचें सर्व वर्तमान शांत चित्तानें निवेदन केलें. अनेक दुःखद प्रसंगांचें पुनः स्मरण झाल्यामुळें तिचे नेत्र वारंवार अश्रूंनीं भरून येत होते, तथापि तिनें ते मोठ्या विवेकानें आंवरले.

कल्याणकुमारीची उज्ज्वल पितृभक्ति, उच्च बुद्धिमत्ता व सात्विक धैर्य पाहून रेझाखानास मोठें कौतुक वाटलें, आणि तिच्यावर अल्पावधींत आलेले अनेक दुःखद प्रसंग ऐकून त्याचें पाषाणहृदयही द्रवून गेलें. नेफिसा बेगमचें कोमल अंतःकरण तर इतकें कळवळून आलें कीं, कल्याणकुमारीची हकीगत पूर्ण झाली तरी नेफिसाच्या नेत्रांतील अश्रुप्रवाह थांबला नाहीं.

कांहीं वेळ स्तब्ध राहिल्यावर महमद रेझाखान खिन्न स्वरानें म्हणाला—" भगिनी, कल्याणकुमारी, दुर्दैवानें तुझा सर्वस्वी नाश झाला आहे, आणि त्या नाशाला मुख्यतः मीच कारण झालों आहें, याबद्दल मला आतां अत्यंत खेद होत आहे. परंतु झाल्या गोष्टी आतां परत येत नाहींत. माझ्या हातून तुझें अपरिमित नुकसान झालें; तथापि तूं माझ्या पत्नीला सन्मार्गाचा उपदेश करून मजवर उपकारच केलेस ! या तुझ्या औदार्याला तुलनाच नाहीं ! तूं मूर्तिमंत देवता आहेस ! माझ्या सर्व अपराधांची मला क्षमा कर आणि आम्हांबरोबर मुरशिदाबादेस चल. तेथें नबाबसाहेबांना तुझी सविस्तर हकीगत निवेदन करून, गोष्ठविहारची जहागिरी तुझ्या नांवानें करून देतों ! "

कल्याणकुमारी—" खानसाहेब, मजवर गुदरलेल्या प्रसंगाबद्दल मी आपल्याला मुळींच दोष देत नाहीं ! हा माझ्याच प्राक्तनाचा परिणाम आहे ! यापुढें तरी वंग जमीनदारांशीं दयार्द्र अंतःकरणानें वागा म्हणजे झालें ! मला आतां जहागीर घेऊन काय करावयाची आहे ? आईबाप,

बंधुबांधव, पति, पुत्र ह्यांपैकीं कोणत्याहि प्रकारचा मायापाश मला आतां उरलेला नाहीं! आतां संपूर्ण पृथ्वी हीच माझी जहागीर, अखिल प्राणिमात्र हेच माझे स्वजन, आणि ईश्वरोपासना व लोककल्याण हेंच माझें कर्तव्य! तुमच्या यत्किंचित जहागिरीची, किंबहुना सगळया मोंगल पादशाहीची तरी मला काय परवा आहे?"

नेफिसा—"प्रिय सखी, अशी एकदम उदासीन व विरक्त होऊं नको! तुला जहागीर नको असली, किंवा संसारांत पडावयाचें नसलें तर, ईश्वराची उपासना करीत मजपाशीं रहा. मी मातेप्रमाणें तुझा सन्मान ठेवीन आणि तुझी सेवा करीन!"

कल्याणकुमारी—"बेगमसाहेब, माझा संसार आतां अतिशय विस्तृत झाला आहे! त्याबरोबर माझ्या कर्तव्याची जबाबदारीहि अत्यंत वाढली आहे! ही जबाबदारी योग्य रीतीनें कशी पार पाडावयाची, हें माझ्या गुरुमहाराजांकडून मला समजून घेतलें पाहिजे आणि त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागलें पाहिजे! यासाठीं मला आतां निरोप द्यावा, आणि हा नवाबी परवाना आपण मजजवळ ठेविला होता, तो परत घ्यावा."

कल्याणकुमारीनें परवाना नेफिसापुढें ठेविला आणि ती चटकन उठली. रेझाखान नेफिसा या उभयतांनींहि तिला आणखी कांहीं दिवस तरी रहाण्याचा अतिशय आग्रह केला, परंतु कल्याणकुमारीनें आपला निश्चय लेशमात्रहि शिथिल केला नाहीं. तेव्हां त्यांचा नाइलाज झाला.

कल्याणकुमारीनें पुनः आपला पुरुषवेष धारण केला, आणि रेझाखानाचा निरोप घेऊन व नेफिसाबेगमेस आशीर्वाद देऊन ती राजवाड्यांतून बाहेर पडली. रेझाखान व नेफिसा सिंहद्वारापर्यंत तिला पोंचवावयास आलीं. नंतर दोन विश्वासू सेवक नौकेपर्यंत तिच्या संरक्षणाकरितां रेझाखानानें तिच्याबरोबर पाठविले.

कल्याणसिंह पुनः शिरोमणी ठाकुरांचा व त्यांच्या पत्नीचा निरोप घेण्याकरितां त्यांच्या घरीं गेला. त्या उभयतांची समजूत घालून त्यांचें समाधान करण्यासहि त्याला अत्यंत प्रयास पडले. नंतर तो आपल्या नौकेंत येऊन बसला व नौका भरवेगानें परत निघाली.

———

# उपसंहार.



रेशाखान व नेफिसाबेगम महालांत परत आल्यावर रेशाखानानें प्रांजलपणार्णे आपल्या पत्नीची क्षमा मागितली, आणि तिला प्रेमभरानें आलिंगन दिलें. कल्याणकुमारीचा उपदेश पूर्णपणें सफल झाला व आपल्यावरील घाणेरडा आरोप निःसंशय दूर झाला, असें पाहून नेफिसाला अत्यानंद होऊन मोठी धन्यता वाटली. रेशाखानाची पूर्वीची प्रिय पत्नी फतिमाबेगम हिच्या उद्दाम वर्तनानें त्याचें मन तिच्याविषयीं अगोदरच विरक्त झालें होतें, त्यांतच नेफिसाच्या प्रेमळ, विनित व एकनिष्ठ वर्तनाची भर पडल्यामुळें, त्याला फतिमेचा पूर्णपणें विसर पडला, आणि तो आत्मसर्वस्व नेफिसाला अर्पण करून, तिचा एकनिष्ठ भक्त बनला.

रेशाखानानें घडलेलें सर्व वर्तमान व कल्याणकुमारीचें संक्षिप्त चरित्र तिनें दिलेल्या परवान्यासह नबाबसाहेबांकडे पत्रद्वारें रवाना केलें, आणि आपल्या अपराधाबद्दल नम्रपणें क्षमा मागून, आपल्या प्रियपत्नीसह हुजूरच्या दर्शनास येण्याची परवानगी मागितली.

पत्र पहातांच वृद्ध नबाबास अत्यानंद झाला आणि त्यांनीं तत्काळ रेशाखानास व आपल्या लाडक्या नातीस आपल्या भेटीकरितां मुरशिदाबादेस बोलाविलें.

मुरशिदाबादेस आल्यावर नबाबांनीं रेशाखानासमक्ष नेफिसाकडून कल्याणकुमारीचें चरित्र पुनः एकवार साद्यंत ऐकून घेतलें. तेणेंकरून नबाबासहि अत्यंत कौतुक वाटलें. नंतर गोष्ठविहारची जहागीर बेवारस म्हणून नबाबी दौलतींत खालसा न करितां, कल्याणकुमारीकरितां तिच्या कोणा तरी आप्तास देण्यांत यावी, अशी नेफिसानें नबाबास विनंति केली व महमदरेशाखानानेंहि त्या गोष्टीस आग्रहपूर्वक अनुमति दिली, तेव्हां नबाबांनीं आपल्या नातीची विनंति आनंदानें मान्य केली, आणि दिवाण खानजहान यांच्या विचारानें कल्याणकुमारीचे जवळचे आप्त

शोधून, कल्याणकुमारीकरितां म्हणून गोष्ठविहारची जहागीर त्यांच्या स्वाधीन केली.

सेनापति महमदजान वडनगरच्या स्वारींत अपयश घेऊन आल्यामुळें, त्याजवर नवाबांची इतराजी झाली होती, म्हणून त्याला दुय्यम सेनापति करून, नवाबांनीं महमदरेझाखानास मुख्य सेनापति नेमिलें. वृद्ध दिवाण खानजहान हा सुशील, बुद्धिवान व न्यायप्रिय असल्यामुळें, त्याच्या कारकीर्दींत खंडणीच्या बाकीबद्दल वंग जमीनदारांवर अमानुष अत्याचार झाले नाहींत. तथापि पूर्वीच्या छळाच्या स्मरणानेंच जमीनदार लोक खंडणीच्या रकमा वक्तशीर आणून देऊं लागले, त्यामुळें कोणावर जुलूम जबरदस्ती करण्याचा प्रसंगहि फारसा येईनासा झाला; आणि खानजहानकडून बऱ्याच सवलतीहि मिळूं लागल्या, त्यामुळें जमीनदारहि बरेच निर्भय झाले.

* * *

कल्याणकुमारीची नौका योगानंदस्वामींच्या आश्रमासन्निध येतांच, ती तेथें उतरली आणि आपल्या जवळचें सर्व द्रव्य व अलंकार नावाड्यांस व रक्षकांस बक्षीस देऊन तिनें त्या सर्वांस वडनगरास रवाना केलें. नंतर आपल्या अंगावरील पुरुषवेष गंगार्पण करून तिनें गंगेंत स्नान केलें आणि आपल्या नैसर्गिक वेषानें निर्भयपणें स्वामींच्या आश्रमाचा मार्ग धरिला.

दोनप्रहरची वेळ झाली असल्यामुळें, योगानंदस्वामी आपलीं आन्हिक कर्में आटोपून, उपहाराकरितां कंदमुळें आणावयास अरण्यांत गेले होते. कल्याणकुमारी मंदिरांत जाऊन श्रीशंकराला प्रणिपात करून स्वामींची मार्गप्रतीक्षा करीत बसली. थोड्याच वेळानें योगानंदस्वामी आश्रमांत परत आले. कल्याणकुमारीनें चटकन् उठून त्यांना साष्टांग वंदन केलें. स्वामींनीं तिला तत्काळ ओळखलें व अपत्यप्रेमानें तिचें स्वागत करून तिला क्षेमकुशल विचारिलें.

कल्याणकुमारीनें खिन्न व सद्गदित स्वरानें आपली कर्मकहाणी स्वामींना थोडक्यांत निवेदन केली. त्या वेळीं तिनें कितीहि विवेक केला तरी तिचे नेत्र अश्रूंनीं भरून आल्यावांचून राहिले नाहींत.

योगानंदस्वामी कोमल स्वरानें म्हणाले—" वत्से, कल्याणी, प्रारब्ध-प्राप्त परिस्थितीबद्दल खेद मानून शोक करीत बसणें शहाणपणाचें नव्हे. प्राप्त परिस्थितीचा सदुपयोग कसा करून घेतां येईल, याचा सुज्ञ मनुष्यानें विचार करून तदनुसार वर्तन ठेविलें पाहिजे. तरच मनुष्याला आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावितां येईल !

ईश्वरानें तुला सर्व संसारिक बंधनांपासून मुक्त करून, आत्मोद्धाराचा मार्ग सुगम करून ठेवला, याबद्दल तूं ईश्वराचे उपकारच मानिले पाहिजेत. आतां तूं मनांत आणशील तर, लोकहित साधून स्वतःचा उद्धार तुला सहज करून घेतां येईल !

कल्याणकुमारी—" गुरुमहाराज, त्याच उत्कट इच्छेनें मी पुन्हां आपल्या सन्निध आलें आहें ! मजवर अनुग्रह करून मला ब्रह्मज्ञान व निष्काम कर्मयोग याचा उपदेश करावा आणि माझ्यानें होईल ती अल्प-स्वल्प सेवा ग्रहण करून मला कृतार्थ करावें ! "

योगानंद—" वत्से, तुझी पूर्वीची जिज्ञासा अद्यापि कायम आहे हें पाहून मला अत्यंत समाधान होत आहे ! ठीक आहे. तूं ह्याच आश्रमांत कांहीं दिवस वास्तव्य करून श्रीमद्भगवद्गीताशास्त्राचें अध्ययन कर. म्हणजे तुझ्या सर्व संशयाची निवृत्ति होऊन तुझ्या अंतःकरणास पूर्ण समाधान प्राप्त होईल ! "

कल्याणकुमारी साधीं भगवीं वस्त्रें परिधान करून योगानंदस्वामींच्या आश्रमांत तापसी वेषानें वास्तव्य करूं लागली आणि यथोचित गुरुशुश्रुषा-पूर्वक तिनें गीताशास्त्राच्या अध्ययनास आरंभ केला. योगानंदस्वामींचें स्वानुभवसिद्ध अध्यापन चातुर्य व कल्याणकुमारीची वैराग्यपूर्ण शुद्धबुद्धि यांचा संगम झाल्यामुळें, एक वर्षाच्या अवधींतच कल्याणकुमारीचें अध्ययन पूर्ण होऊन तिच्या सर्व शंकांचें निरसन झालें. तिची बुद्धि शुद्ध व समाहित होऊन कर्तव्यमार्ग तिला स्पष्ट दिसूं लागला.

आपली शिष्या इतक्या अल्पावकाशांत आपल्या अपेक्षेपेक्षांहि उत्कृष्ट तयार झालेली पाहून योगानंदस्वामींसहि अत्यंत समाधान वाटलें. नंतर त्यांनीं प्रेमपूर्वक तिचें नांव बालब्रह्मचारिणी किंवा "योगिनी" असें

ठेवून तिला संतुष्ट चित्तानें आशीर्वाद दिला आणि अज्ञ बांधवांना सन्मार्गाचा उपदेश करण्याकरितां तीर्थयात्रा करण्यास आज्ञा दिली.

गुरूंच्या आज्ञेप्रमाणें योगिनी मोठ्या आनंदानें त्यांचा निरोप घेऊन तीर्थाटणास निघाली. मार्गांत लागणाऱ्या प्रत्येक लहान मोठ्या गांवीं ती भगवद्गीता प्रतिपादित निष्कामकर्मयोगमार्गाचा सर्वांस उपदेश करूं लागली. योगिनीची रसाळ वाणी, निर्दोष प्रतिपादन शैली आणि निःस्वार्थी वर्तणूक पाहून सर्व श्रोतृसमुदाय तल्लीन होऊन जात असे.

ह्याप्रमाणें थोड्याच दिवसांत योगिनीचें नांव सर्व प्रदेशांत आबालवृद्ध स्त्री-पुरुषांच्या मुखीं प्रसिद्ध झालें!

॥ ॐ तत्सत् ॥

